१६९१ **स्वारीची तयारी.** इ. स. १७६९

श्री ( भाद्रपद शुद्ध प्रति-
पदा १ सप्टेंबर. )

जश्रियाविराजित राजमान्य राजश्री गोपाळराव गोविंद स्वामी
ो यांसी.

ष्य—ाधवराव बल्लाळ प्रधान नमस्कार विनंती उपरी येथील
जाणोन स्वकीयकुशल लिहिणें. विशेष तुह्मांकडून बहुत दिवस
येऊन वर्तमान कळत नाहीं तरी सविस्तर त्या प्रांतीचें वर्तमान
ानाचें वगैरे लिहिणें. इकडील वर्तमान तर विजया दशमी होतांच
चे मुहूर्त करून डेरे दाखल होऊन त्रिंबकेश्वरास जावें असें
चे मनांत ) होतें. परंतु यालेस गेल्यानें सर्व लोक बरोबर येतील,
र घरांस येऊन निघणें होईल तेन्हां स्वारीचे कामास दिवस थोडे
त, यास्तव जाण्याचा मजकूर राहिला. सत्वरच निघोन फौज
करावी हेंच लक्ष आहे. फौज सत्वर जमा व्हावयासीं ऐवज असावा
प्रकार सर्व तुह्मांस ठाऊकच आहे. तथापि जेथवर होईल तेथवर
च असों. तुह्मीं विजया दशमीचे मुहूर्तें निघावें. फौज विनाआपण
ा दीड महिना ( अगोदर ) निघाल्या खेरीज मिळत नाहीं हा
व तुह्मांस आहे. तरी सत्वर निघोन चारपांच मजली पुढें जावें
ा सत्वर फौज जमा होईल आणि त्या प्रांतीचे संस्थानिकांसही भरं-
थोडासा वाटेल. यास्तव आवई पडण्याचा प्रकार त्वरेनें जाहला
त. अपगुरकर व कोडगकर ( यांशीं ) प्रस्तुत हैदरखानाचा पेंच
आहे. या संधींत राजकारण तुह्मीं त्यांशीं करावें ह्मणजे
राजकारण ठरेल. तुह्मीं या कामाची चालना दस्तऐवज न
ा करितच असां. परंतु प्रस्तुत हे दोघे कामावर फार पडतील
व हीं राजकारणें साध्य करावीं. आणिकही तिकडील राजकार-

परत पुण्यास.

णाचे प्र[illegible] मनास आणून लिहिणें. सारांश इतक्या उपरी निवात्त्य गुंता नाहीं. यास्तव तुह्मीं आपली फौज सत्वर जमा करणें. छ २९ रबिलाखर. बहुत काय लिहिणें हे विनंती. पो छ जमादिलावल.

नं० ८२१ श्रीगणराज. ( अजमासें आश्विन शु आक्टोबरचा प० पंधरव

अपत्यें मोरोबानें कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. पत्रीं आ जे, " तुह्मी गेल्या तागायत पुण्याकडील चालचर्चा कशी आहे हें कांही लिहिलें नाहीं. याउपर तरी सविस्तर लिहिणें. कारभारी कोण आहेत कोणी कारभारी जाहले तरी फल कळलेंच आहे! परंतु वर्तमान कळा यास्तव लिहिलें आहे. " ह्मणोन लिहिलें; ऐशास सकारपूर्वक होण ह्मणोन मागेंच आवाई उठली होती. पण श्रीमंत राजश्री नारायणर साहेबांजवळ राजश्री महादाजीपंत गुरुजीनीं किरकोळ ताकीद पत्रें वगैरे मखलासी करावी इतकेंच ( ठरलें. ) वरकड कांहीं नाहीं. सकारपूर्वकाव कांहीं नाहीं. सर्व काम कारभार पहिल्या[illegible] ाणें राजश्री मोरोबा दा कडेच चालत आहे. निखालसतेचें बोलणें जालें शिवाय राहिलें नाही विदित होय हे विज्ञापना.

नं० ८२२ श्री. ( अजमासें आश्विन शु आक्टोबरचा प० पंधरव

अपत्यें मोरोबानें साष्टांग नमस्कार विज्ञापना. " रा. मोरोबादाद पत्र आलांस होतें त्यांत लिहिलें होतें कीं, ' फारकरून बोलणें ( आग श्रीमंतांशीं ) जाहलें. संशय राहिला. मध्यें संशय आले होते ते जाहले. ' असें लिहिलें होतें. असें असतां दुसरा प्रकार कसा घडला ?

१ पत्र मोरो बल्लाळानें गोपाळरावास. २ सखारामबापू. ३ नं. ८२२ चे व पुढचें नं. ८२३ हीं दोन्ही पत्रें मोरो बल्लाळानें गोपाळरावास लिहिलेलीं.

ह्मणून लिहिलें, त्यास सकारपूर्वक ( पुनः कारभारी ) होणार असी आवाई होती ह्मणोन ते समयीं रामाजी नारायण गोखल्यानें लिहिलें होतें. सांप्रत तो प्रकार राहिला. कामकारभार सारा पहिल्या प्रमाणेंच रा मोरोबादादाकडेच आहे. संशय निवारण जाहले. सकारपूर्वक घरींच असतात. श्रुत होय. राजश्री जानराव धुळप यांस आरमाराचा सुभा सांगणार यास्तव भगवंतरायांस बाळापुरास पाठवून मशारनिल्हेस हुजूर आणविलें. विदित होय हे विज्ञापना. कापड येऊन रवाना केलें आहे त्यांत खाचें (?) फार आहे. शिलकेपैकीं तीन गठ्ठे आहे. पट्या पाठविल्या आहेत. तर्थे शिलक कापड असेल तें मोजदाद करावी. त्याजवर मूण घालावी. विदित होय हे विज्ञापना.

नं० ८२३ **श्रीगणराज.** ( अजमासें भाद्रपद वद्य. सप्टेंबरचा दु० पंधरावडा ).

अपत्यें मोरोबानें साष्टांग नमस्कार विनंती. राजश्री बापूजी नारायण व आपाजी हरी यांचें पत्र पाठविलें तें पावलें. मजकूर कळला. हैदरखानाकडील मजकूर सविस्तर कळला. बल्लारीकरांनीं फारच शर्त केली. इतकियांत फौज जाती तरी ठीक पडतें. मातबर सामान हैदरखानाचें. बल्लारीकर दम कोठपर्यंत धरतील पहावा! परंतु (यांनीं त्याचा) पहिला मोहरा मोडून काढिला. संस्थानिक मेला असतां केली ही फारच केली. श्रीमंतानीं सविस्तर वर्तमान श्रवण केलें. श्रीमंतांनीं आज्ञा केली कीं रावें दसन्यास निघून जावें परंतु गुंता पडला त्यास इलाज नाहीं. असो. आतां त्रयोदशीस निघणार, उत्तमच आहे.

१ भगवंतराव धुळप यास कर्नाटकांत दोडबाळापूर येथील सुभेदार नेमून त्या जागीं जानराव धुळप होता त्यास पेशव्यांनीं पूर्ववत आरमाराचा सुभा सांगितला.
२ गोपाळराव

त्रयोदशीस निघून कृष्णा ऐनापुराजवळ उतरोन बदामी जवळून कोपळ उजवें टाकून तुंगभद्रा तीरास जावें ह्मणजे संस्थानिकास कांहीं भरवसा होईल. रास्ते अथणीस गेलेच आहेत. त्यांसही श्रीमंताचीं पत्रें गेलींच आहेत. तोफखाना येथून निघोन आज चार दिवस जाहले. दहा तोफा आहेत. समागमें रा० आनंदराव आहेत. ' कृष्णा लौकर उतरोन फौज जमा करीत फारच त्वरेनें तुंगभद्रा तीरास जावें ' ह्मणोन श्रीमंताची आज्ञा. राजश्री बापूजी नारायण यांजकडून हुंडी अकरा हजार होनांची आलेली पाठविली ती पावली. सरकारांत दिल्ही. कळावें. करकंब मंगळवेढ्यांची पागा आली ह्मणोन लिहिलें, उत्तम आहे. तोफखान्याची वाट पहावी किंवा न पहावी ह्मणोन लिहिलें, त्यास आपण कृष्णा उतरोन पलीकडे जाल तों तोफखाना येऊन पोंचतो. जलदीनें जाऊन पोंचणें ह्मणून श्रीमंताची आज्ञा आहे. तुंगभद्रा पावेतों स्वदेशच आहे. सुरापुराकडे जाण्याचा मनसबा राहिला. कृष्णा उतरोन तुंगभद्रातीरास जावेंच ह्मणोन श्रीमंतांच्या पत्रीं आहे. आह्मी दोन तीन पत्रीं लिहिलेंच आहे तीं पत्रें पावलींच असतील. सुरापुराकडे जाण्याचें न करावें. ऐनापुराजवळ कृष्णा उतरोन फौज जमा करीत तुंगभद्रातीरास जावें. श्रीमंत दसरियासच निघत होते. परंतु श्रीमंत सौभाग्यवती आनंदी बाई प्रसूत जाली ह्मणून मुहूर्त राहिला. आश्विन व॥ अष्टमीस निघतात, गुंता नाहीं. बल्लारीकरानीं फारच शर्त केली. आणखी आठ पंधरा दिवस दम धरतील. तों तिकडे फौजेची आवाई पाडावी ह्मणजे वरकड संस्थानें वांचतील यास्तव श्रीमंताची आज्ञा ऐनापुराजवळ कृष्णा उतरोन जावें अशी आहे. कळावें. लोकांस पत्रें पाठविलींच आहेत. आणखी आज्ञेप्रमाणें पाठवितों. राजश्री खंडोजी फराटे व गाढवे मात्र पुण्यांतच आहेत. वरकडांस निकडीचीं पत्रें पाठविलीं आहेत. विदित होय हे विज्ञापना.

लबाडी करितां येत नाहीं. आह्मांजवळ हजार रुपयेचे नालबंदी पासून अलीकडे चारशें पांचशें पावेतों किती आहेत ते नावनिशी पहावी. पतके कोण आहेत ते पहावे. आह्मी ज्यांस रुपये देतों ते कांहीं आमचे काका मामा कोणी नाहींत. प्रतिवर्षी श्रीमंतास संदेह! आमचे फौजेच्या गणतीस आह्मांस न कळत कारकून पाठवावें, माणूस वाईट ह्मणावें, यांत जीव नाहीं. आमचे लोक सारे दूर करून श्रीमंतानीं आपलेच परीक्षेचे ठेऊन दिल्हे तरी आह्मीं राजी आहो अगर सरदारी दूर करून जातीनिशीं[1] ( आह्मांस ) ठेविलें तरी राजी आहों!! परंतु आमचा इतबार न करितां चौकशा कराव्या, माणूस वाईट ह्मणावें, यांत जीव नाहीं, आह्मीं येथपावेतों राजी आहों. लोक उणे बाळगितों ह्मणून चोरून गणती घेतात, त्यास लोक किती ठेवितों हा भ्रम असल्यास कीर्दी नांवनिशीवार पत्रकें आवर्जे पहावे. त्यास रुजू घालावें. माणसांचा संदेह ( असेल ) तरी दाखला पहावा. येथपावेतों आह्मीं राजी असतां जे ते गोष्टीचा संदेह! आमचा ऋणानुबंधच तितका! उपाय काय! एका खाशास पांचपांचशें रुपयांचीं सनगें मी कोठून द्यावीं? श्रीमंतानीं सरंजाम ( आह्मांस ) होनाचा दिला. वरकड साऱ्यांस रुपये, आह्मांस होन! चवथाईचा तोटा अजीबात! जाजती शिबंदीचा तोटा. पागेचा खर्च. सरदारी खर्च. वरकडांचे सरदारीस पांच खिजमतगार पांच जासूद पुरतात. आह्मांस पाउणशें जासूद लागतात. तसेच ढालाईत, खासबारदार, उंटें हत्ती घोडीं ह्मणतां दीड लाख रुपये पागेस लागतात. तसाच सरदारी खर्च. यंदा जाहलें तें जाहलें. पुढले वर्षी श्रीमंतांनीं लोक ठेवून द्यावे, ( त्या लोकांपासून ) आह्मीं चाकरी घ्यावी, हें उत्तम आहे. हेंच पत्र श्रीमंतांस दाखवावें. हे आशीर्वाद.

---

१ स्वत:पुरतें.

शा० १६९१ **स्वारीची तयारी.** इ. स. १७६९

नं. ८२६ **श्रीसुब्रह्मण्य.** ( अजमासें भाद्रपद शुद्ध. सप्टेंबरचा प० पंधरवडा. )

राजश्री गोपाळराव दादा गोसावी यांसीं—

सकल गुणालंकरण अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्नेहांकित दौलतराव हिंदुराव घोरपडे दंडवत विनंती येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लेखन करीत गेलें पाहिजे. विशेष. राजश्री पंत प्रधान यांजकडे राजश्री गोविंद चिंतामणी यांची रवानगी केली आहे. मशारनिल्हे आपली भेटी घेऊन इकडील अर्थ सांगोन पुढें ( पुण्यास ) जातील. हैदरखान यांनीं कडपें कर्नोळचा तह उरकून अदवानी प्रांतास आले. तेथून कैंचनगुड्ड, बल्लारी, रायदुर्गच्या सुमारें येणार. आपणास परस्परें वर्तमान येत असेल. आह्मीं अल्प दिवसांत पुण्यास जावयास येत असों. भेटीअंतीं सर्व कळेल. बहुत काय लिहिणें हे विनंती. पौा छ १७ जमादिलावल.

नं. ८२७ **श्रीगणराज.** ( अजमासें आश्विन वद्य. आक्टोबरचा दु० पंधरवडा. )

अपत्यें मोरोबानें साष्टांग नमस्कार विनंती. राजश्री मुराररराव घोरपडे यांची व हैदरखानाची भेटी होऊन ( घोरपडे ) माघारे आल्यांचें पत्र वकिलाचें श्रीमंतांस आलें. भेटी जाहल्या. मेजवानी ह्मणोन पंचवीस हजार रुपये, तीन हत्ती, शिरपेंच, व मोत्यांची कंठी, वस्त्रेंपात्रें हैदरखान याणीं दिलीं आणि निरोप दिला. पट्टणचे? सालाबादचे पन्नास हजार रुपये ध्यावेसा करार जाहला आहे. रा० शिवराम बावा व इनीसखान यांस कांहीं फौज देऊन समागमें ध्यावें ( असें प्रथम हैदरखान ) ह्मणत होते, परंतु द्यावेच असा निश्चय ठरला नाहीं. सरकारच्या वकिलाजवळ राजश्री मुराररायांनीं सांगितलें कीं, " आह्मीं हैदर-

१ पत्र मोरो बल्लाळ याचें गोपाळरावास.

गर्दनगड आहे तेथें आहे. बुधेहाळापासून दहा अकरा कोस गर्दनगड आहे. केवळ इतकें जवळ लष्करसुद्धां कसें रहावें ह्मणून काल कूच करून हुल्याळास आलों. बुधेहाळचे ठाण्यांत राजश्री खंडोपंत होते. गाडदी तीनशें पहिले होते व दुर्गकरांचे प्यादे तीनशें. येणेंप्रमाणें सामान पाहिलें होतें व राजश्री शहाजी भोंसले व नरसिंगराव यांजबरावर गाडदी दोनशें होते तेही पाठविले. खर्चास नाहीं ह्मणत होते, खर्चाची बेगमी करून 'ठाण्यांत खबरदारीनें रहाणें. सहा कोसीं आह्मीं फौजेसह राहतों. बातमी ठेवितों. हैदरखान आलाच तरी गांवावरील तोफा वाजतांच येऊन पावतों.' ह्मणून बहुताप्रकारें सांगोन खातरजमा करीत होतों. परंतु दम न धरीत! काल आमचा कूच होतांच ठाणें टाकून आले. दम न धरीतसें दिसून आलें तेव्हां चिठी पाठविली कीं, दरवाजे जाळणें व दारु जाळून घरांस आगी देऊन येणें ह्मणोन सांगितलें ती गोष्ट त्यांच्यानें झाली नाहीं! निघोन आले. रातोरात हैदरखानाकडील लोक बुधेहाळांत आले असतील. तोफा गांवावरील होत होत्या. बातमीस राऊत पाठविले आहेत. बुधेहाळचे गाडदी व प्यादे चित्रदुर्ग-करांचे हुल्याळांत घालून बंदोबस्त करून देतों, आह्मींही जवळच आहों, ठाणें बळवावें, ह्मणोन सांगत होतों, परंतु एकंदर दम न धरीत! मग बुधिहाळाप्रमाणें होईल ह्मणून दरवाजे हुल्याळचे जाळून बुरजांच्या सफेल्या पाडून गांव लुटविला. ठाण्याचा आब गेला. आतां त्यांच्यानें ठाणें घालवत नाहीं. आह्मीं प्रस्तुत कोसीं दो कोसीं राहून बातमी हैद-रखानाकडील कळत जाईल त्याप्रमाणें कर्तव्य तें करूं. येथून हैदरखान चौदा कोसांवर आहे. प्रस्तुत श्रीमंतांचा मुक्काम कोठें आहे, चिकबा-ळापूर घेतलें किंवा नाहीं, पुढें मनसबा काय करितात, हें सविस्तर लिहून पाठवावें. आह्मीं ठाणीं राखावीं ह्मणून फार सांगायाचें सांगितलें राजश्री आनंदरावदादाकरवीं व नरसिंगराव घायगुडे यांकरवीं सांग

विलें. परंतु माणूस धरच धरीनात! बुधेहाळचे ठाण्यांत नरसिंगराव यांजसमागमें गारदी होते ते ठेतीत होतों. परंतु मागें त्याणें शास्त केली तें भय मानून कोणी धरच धरीनात. उपाय काय! बुधेहाळांत पाणीही नाहीं आणि ठाणें अफाट. ते न राहिले ह्मणून आह्मांसारख्यांच्योंन केवळ शब्द ठेववत नाहीं. श्रीमंत ठेवतील, धणीच आहेत! ( श्रीमंतांनीं आधीं ) ठाण्यांची बंदोबस्तीच चांगली केली नव्हती. बहूत काय लिहिणें हे आशीर्वाद. आह्मीं तूर्त हुल्याळानजीक आज उद्यां दोनच दिवस राहतों. हे आशीर्वाद.

नं० ९०९ **श्रीगणराज.** ( फाल्गुन शुद्ध सप्तमी. ४ मार्च. )

अपत्यें साष्टांग नमस्कार विज्ञापना. तागायत छ ९ जिल्काद मुक्काम चिक्कबाळापूर. वडिलांचे आशीर्वादें करून वर्तमान यथास्थित असे विशेष. वडिलीं फाल्गुन शुद्ध द्वितीया भौमवारचें बुधेहाळचे मुक्कामचें पत्र पाठविलें तें पावलें. हैदरखान संकरापट्टणाकडे कूच करून गेला तेथून पट्टणाकडे जावयाची दाट आवई घालून इकडे माणूस येईल याजकरितां चौक्यांचा बंदोबस्त करून तीन दिवस संकरापट्टणासच राहिला. आह्मांकडील फौजा अजमपुरापावेतों जात होत्या. त्या गांव खेडीं यांची बातमी संकरापट्टणाहून कूच करून गेला असेंच सांगत होते. तेव्हां आमच्या मतें काय कीं श्रीमंतांची खासा स्वारी बाळापुराकडे गेली यामुळें पट्टणाकडे जाऊन तेथून मागडीच्या सुमारें जाईल असें भासत होतें. कडुराहून येऊन छ २७ सवालीं रविवारीं सडें सामान बराबर बारा तेरा हजार गाडदी व चार हजार फौज व पंचवीस तोफा अशा सामानानिशीं दोन प्रहरीं कडुराहून कूच करून रातवा खपून छाप्यास आह्मांकडे आला. पहांटेच्या पांच-

घटका रात्रीस गोटा बाहेर उभें राहून गोळे व बाणांचा मार करूं लागला. अंबाऱ्या व नौबत मात्र लादली होती. वरकड घोड्यांवर जिनें देखील नाहीं. आमच्या घोड्यावर एक दुसरा जीन होता. त्याचा गोळा वाजतांच घोड्यावर बसोन मागें नौबत वाजत याप्रमाणें अघाडीस गेलों. तेथें उभें राहिलों. नौबत वाजत होती. तेथें वरचेवर लोकांनीं जीन ठेऊन कांहीं जमले. नौबती टंकारे ऐकून त्यानें तोफांचा आम्हांवर मार धरिला. चार साडेचार घटका तोफा व बाणांचा मार झाला. परशराम शिंदा पोरगा डाव्या हातास होता तो गोळा लागून पडला. त्याचा मेंदु अंगावर आला. चिरंजीव माधवराव अण्णाचे घोडीस गोळा लागून ठार पडली. चिरंजीवाच्या गुडघ्यास गोळा चाटून गेला, परंतु खैर गुडघा आहे. चिरंजीव भाऊ बसत्या घोड्यावर बसले असतां गोळ्यानें दोन घोड्या पडल्या. एक कोतवाल पडली. एकूण तीन घोड्या चिरंजीवाच्या पडल्या. प्रकाश व्हावयाचे वेळेपर्यंत तसेच उभे राहिलों. याजकरितां जागदारखाना, डेरे, राहुट्या, गोट लादावयास फुरसत पडली. पांचशें गोळा तितक्यांत सुटला. उजाडतांच डावे बाजूचें ओढ्याचा आसरा होता तेथें उभे राहिलों." ह्मणोन लिहिलें तें कळलें. ऐशास वडिलीं दम धरून अघाडीस जाऊन जमलां ह्मणून अब्रू वांचली. हैदरखान दगेखोर आहे. बहुत सावधपणें रहावें. काळजी रात्रंदिवस वडीलांकडील लागली आहे. प्रस्तुत नंदिगडचा गुंता उरके तों नंदिगडाखालींच राहणार. मग उपरांतिक काय मनसबा होईल तो पहावा. विदित होय हे विज्ञापना. चिरंजीव राजश्री बळवंतराव यांसी आर्शीर्वाद. पत्र येत नाहीं हें उत्तम नव्हे. लिहिणें विसरलां असावेंसें वाटतें. सविस्तर वर्तमान लिहीत जावें. हे

---

१ गंगाधरराव गोविंद ऊर्फ बाळासाहेब.

आशीर्वाद. उभयतां वेदमूर्तींस साष्टांग नमस्कार. राजश्री हरीपंत व समस्त मंडळीस नमस्कार. अपत्यें धोंडोबानें व विनायकानें शिर साष्टांग नमस्कार. पोष्य गोविंदे[१] शिवराम साष्टांग नमस्कार विनंती. वर्तमान ऐकून संतोष[२] झाला. हैदरनाईक शेर[३] झाला आहे. आपण सावधपणें रहावें. जरब त्यांवर बसे तें ( आपण ) करितीलच. हे विनंती.

नं. ९१० श्रीगणपति. ( २७ फेब्रुवारी. )

अपत्यें साष्टांग नमस्कार विज्ञापना. आज रविवारीं दोन प्रहरीं फाल्गुन शुद्ध तृतीयेचीं पत्रें चिरंजीवाचीं आलीं. समस्त सुखरूप आहेत. वडिलांकडेसही ढालाईत आला ह्मणोन जासूद लष्करचे आले त्यांनीं सांगितलें. पत्रें वडिलांस पावलींच असतील. वडिलांच्या नांवें लखोटा आमच्या लखोट्यांत होता तो पाठविला आहे. माणकापुरचे लखोटे दोन आहेत ते पावते करावे. छापा आला त्यांतून गारदी पुढें एक येऊन हैदरखान आला ह्मणून त्यानें सांगितलें त्यावरून यानीं खबरदारी केली. परंतु त्याचें प्रमाण यांस वाटलें नाहीं यामुळें अंतर पडलें. त्याणें सांगतांच तयारी केली असती तर बरेंच होतें. ईश्वर इच्छा! ईश्वरानेंच गाडदी यास बुद्धि निर्माण करून यांस खबर कळवावयास पाठविलें. चिरंजीव हत्तीवर नौबत व आपण गोटांतून अघाडीस जाऊन उभे राहिले याजमुळें जो शिपाई तयार झाला तो पुढें गेला. नौबत वाजवीत अंधारांत अघाडीस उभे राहिले याजमुळें हैदरखान दबून राहिला. गोटांत शिरला नाहीं. चिरंजीव मंडळी चिरंजीव नीलकंठराव व भाऊ एक जागां मार खात उभे राहिल्यामुळें गोट तयार होऊन निघाला. बुनगें बुधिहाळाजवळ जाऊन उभें राहिलें.

---

१ खासगीवाले. २ छाप्यांतून तुह्मीं सुरक्षित पार पडलां हें. ३ प्रबळ. ४ पत गोविंद हरीनें मिरजेहून वडील बंधु त्र्यंबक हरि यास कुरुंदवाडास पाठविलें.

**श० १६९१ शत्रूच्या भयानें ठाणीं गडबडतात. इ. स. १७७०**

हैदरखान माघारा निघोन दोन तीन कोस गेला तेव्हां हे लष्करांत आले. तों अस्तमान झाला. वडिलांचे पुण्येंकरून खैर फार झाली. चिरंजीव भाऊचीं दोन घोडीं ठार पडलीं. तिसरे घोडीवर बसला तीही पडली. चिरंजीव माधवराव याची घोडी पडली. गुडघ्यास गोळा चाटून गेला. परंतु खैर आहे. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं० ९११ **श्रीगणराज.** ( फाल्गुन शुद्ध अष्टमी. ९ मार्च. )

सेवेशीं गोपाळराव गोविंद व आनंदराव भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. तागायत छ ६ जिल्काद मुक्काम नजीक कंदिकिरें येथें स्वामीच्या कृपेंकरून सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेष. इकडील सविस्तर वर्तमान सांडणीस्वारासमागमें व शिऱ्यांच्या माणसासमागमें लिहून पाठविलें आहे तीं पत्रें पावोन सविस्तर विदित झालेंच असेल. हैदरखान गर्दनगडाखालींच आहे ह्मणोन वर्तमान आहे. आह्मांस तहकीक बातमी त्याजकडील कळत नाहीं. मुलुख अगदीं त्याचा. आह्मांकडील बातमी त्यास जाते. इलाज चालत नाहीं. त्याच्या चित्तांत आणखी एकवेळ गोटावर येऊन गडबड करावीसें आहे. आह्मीं सावधपणें आहों. बुधहाळचें ठाणें टाकून ( ठाण्यांतील लोक ) आले व हुल्याळचे ठाण्यांत दम न धरीत याजकरितां तेंही ठाणें लुटून जाळून मोकळें केलें हें सेवेशीं लिहिलेंच आहे. हगलवाडी आह्मांपासून जवळच आहे. येथील बंदोबस्तही बराच आहे. व खबरदारीविशीं पत्रें वरचेवर पाठवितों. त्यांजकडीलही पत्रें वरचेवर येत असतात. आह्मींही जवळ आहों. चिंता नाहीं. कडबाचें ठाणें मात्र लांब आहे व तेथील बंदोबस्त ठीक नाहीं. रायदुर्गकराकडील प्यादे फारकरून तेथेंच आहेत. याजकरितां राजश्री शहाजी भोंसले यांजसमागमें गाडदी

---

१ पेशव्यांस लिहिलेल्या पत्राची नक्कल.

होते त्यांस कडबाच्या ठाण्यांत पाठविले. आतां त्या ठाण्यास चिंता नाहीं. आह्मीं बुकापट्टणच्या रस्त्यावर आहों. हैदरखानाचें तोंड इकडेच आहे. राजश्री खंडो रघुनाथ बुधेहाळांत होते ते गाडदीसुद्धां कालच स्वामींकडे निघोन गेले. कंदिकिऱ्यांचें ठाणें चिकनायकनहळ्ळी-करांनीं बेइमानी केली होती यास्तव तेंही ठाणें जाळवितों. ठाणीं जाळलीं, वसती मोडली, ह्मणजे त्याचा थारा मोडतो. आह्मांवर छापा आला खरा, परंतु स्वामींचे कृपेंकरून त्याच्या हातास कांहीं लागलें नाहीं. एक प्रहर दिवस पावेतों तळावर येऊं दिला नाहीं. यामुळें फारकरून वस्तभाव ज्याची त्याणें आणिली. कांहीं लष्करांतच एकाची एकानें आणिली ते ओळखून देविली. त्याणें कांहीं बाकी ठेवा-वयाचा विचार केला नव्हता. छबिनेही असतां छबिने चुकावून बुधेहा-ळाकडून आला. मार फार सोसिला. मुख्य छापा पडिला तेव्हां बेफाम राहिलों असें स्वामीच्या दर्शनास आले असतां मार खाल्ला, मेह-नत केली, झुंजलों, तें लिहून पुरें पडत नाहीं! पुढें आह्मांस आज्ञा काय? तूर्त शिऱ्यांपासून दहा कोसांवर आहों. एक कडबाचें ठाणें राहिलें. हैदरखान शिरें बुकापट्टणचे रोखावर आहे. तिकडे गेला तरी हीं ठाणीं दगा कदाचित् पावतील यास्तव येथें राहिलों आहों. पुढें खासा स्वारी कोणीकडे जाणार ते सविस्तर आज्ञा करावी. विदित होय हे विज्ञापना.

नं. ९१२ **श्रीगणराज.** ( फाल्गुन शुद्ध. मार्चचा प० पंधरवडा. )

अपत्यें साष्टांग नमस्कार विज्ञापना. देवनहळ्ळीहून कूच करून चिकबाळापुरास आलों. ते दिवशीं मोर्चे बसून तोफा सुरू झाल्या. पहिल्या हल्ल्यासरशींच पेठ घेतली. चोहोंकडून मोर्चेबंदी झाली.

---

१ पत्र गोपाळरावास मोरो बल्लाळ याचें.

( आंतील लोक ) दोन दिवस चांगले लढले. आंत माणूस फार होतें. श्रीमंतही मोर्च्यांत गेले होते. तसेंच गांवकरी यांनीं आंतून पालविलें! मोर्चे खंदकापर्यंत गेले होते. पालवितांच निशाणें चढलीं. त्यांत आधीं मुराररावाचें निशाण चढलें. आज सिधोटास फौज गेली आहे. गणेशगडचा किल्लेदार सिधोटांत आहे ह्मणून तेथें फौजा गेल्या आहेत. तें ठाणें घेतल्यावर किल्लेदार सांपडला तर गुंता उरकला. नाहीं तर नंदिगड गणेशगड यांजकरितां चार दिवस मुक्काम करून गुंता उरकावा लागेल. बाळापुरच्या ठाण्यांत ( श्रीमंत ) चांगला माणूस योजून ठेवणार. सामान प्यादे याची बंदोबस्ती करून देणार. विदित होय हे विज्ञापना.

नं० ९१२ श्रीगणराज. ( फाल्गुन शुद्ध. मार्चाचा प० पंधरवडा. )

आशीर्वाद उपरी. तुह्मीं स्वारीचा मजकूर लिहिला, ऐशास नंदिगड घेतल्या उपर तिकडे काम कांहीं दिसत नाहीं. ठाणीं घेतलीं त्यांची बंदोबस्ती उत्तम प्रकारें करून भैरवदुर्गचे वाटेनें निघोन नागमंगळ, चेनापट्टण, तुमकूर, हीं ठाणीं घेऊन दरवाजे ( व ) आंतील घरें जाळून टाकावीं. लहान खेडीं तमाम जाळून टाकावीं ह्मणून लष्करांत ताकीद करावी. चेनरायपट्टण, हरपनहळ्ळी, कडूर, बाणावर, संकरापट्टण, अजमपूर, गर्दनगडची पेठ, आदिकरून जें स्थल घ्यावें तेथील दरवाजे घरें जाळावीं तेव्हां त्यास नुकसानी झालीशी वाटेल आणि मुलुखाचीही खराबी होईल. दिवसही फार आहेत. पुढें शिवमोग्यापावेतों जाऊं ह्मटल्यासही दिवस आहेत. याप्रमाणें करावें. हें श्रीमंतांच्या मर्जीस आलें तर बोलणें. त्यांची मर्जी नसलीच तरी मग बोलून फल काय? आह्मांस सुचलें तें लिहिलें आहे. राजश्री

---

१ गे.पाळरावाचें मोरो बल्लाळ यास पत्र. २ मुलूखगिरीचे दिवस.

बाजीपंत गणतीस आले यास्तव शिऱ्यांहून बुनगे आणविले आहेत. बुणग्यास ( किल्लेदार ) किल्ल्यांत जागा देत नाहीं. बाहेर पेठेंत वसती नाहीं. तेथें राहून धाकें वागावें त्यापेक्षां येथें काय वाईट! गणती होईल यास्तव आणविले. नंदिगड ( श्रीमंतांच्या हातीं ) आला असावा. नाहींतर वद्य पंचमी पावेतों खामखा घ्यावा असें आहे. माकलीदुर्ग हैदरखानाचा होता तो सरकारांत आला कीं नाहीं? तें स्थल सुलभ आहे. आला तरी तो ही घ्यावा. बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद.

नं० ९१४ श्रीगणराज. ( फाल्गुन शुद्ध नवमी. ६ मार्च. )

अपत्यें मोरोबानें साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत छ ७ जिल्काद मुक्काम नंदिगड वर्तमान यथास्थित असे. विशेष. चिकबाळापुरचें ठाणें घेऊन तेथून कूच करून आज नंदिगडास आलों. तसेच मोर्चे बसले. दरवाजापर्यंत मोर्चे गेले आहेत. वडिलांस कळावें. मीर व टिपूमिय्या मिळून चार हजार फौजेनिशीं बेंगळुरास जमा झाले होते. तेथून निघून गेले ते आज निजगलदुर्गास मुक्कामास गेले, ह्मणोन येथें बातमी कळतांच गायकवाड वगैरे पथकें चार हजार फौज आपणाकडे रवाना केली आहे. मीर व टिपूमिय्या हैदरखान याजकडे गेले तर गायकवाड याणीं तुमचेजवळ रहावें. परभारें पट्टणाकडे गेले तर फौज माघारी यावी अशी येथून आज्ञा आहे. वडिलीं बहुत सावध असावें. हैदरखान कडुरास आहे किंवा कोठें आहे तें लिहावें. आमचे मतें कडुरास हैदर आलिया कांहीं येथून तरतूद करावी.

---

१ या स्वारींत पटवर्धनानीं किती फौज ठेविली आहे ती मोजून पहाण्याकरितां पेशव्यांकडून आलेला सरदार बाजी गोविंद जोशी वसईकर. ठरावापेक्षां कमी फौज ठेविली असल्यास दर स्वारामागें तीनशें रुपये या हिशोबानें जहागिरीच्या उत्पन्नांतून रक्कम सरकार कापून घेत असे.

नंदिगडचा गुंता उरकला ह्मणजे रिकामेच आहों. कांहीं एक उलटा[1] करणार आहों. बहुत सावध वडिलीं असावें. दुरोख पडल्यावर मनसबा भारी पडेल यास्तव सावध असावें. बहुत काय लिहिणें हे विनंती. दुर्गावर दगा करणार होता परंतु ईश्वरें खैर केली यास्तव बहुत सावध असलिया मग चिंता नाहीं. रात्रंदिवस आठ पंधरा दिवस सावध असावें मग भेटी ही होईल मग कर्तव्य तें करावयास येईल. विदित होय हे विज्ञापना.

नं० ९१५ **श्रीगणराज.** ( ७ मार्च. )

चिरंजीव[2] राजश्री आबा यांसीं प्रती नीलकंठ त्रिंबक आशीर्वाद उपरी येथील वर्तमान तागायत फाल्गुन शुद्ध एकादशी सौम्यवार मुक्काम सरहद्द बुक्कापट्टण यथास्थित असे. विशेष. आपण पत्र पाठविलें तें पावलें सविस्तर मजकूर कळों आले. सावध राहणेंविशीं बुद्धिवाद लिहिला त्यास सावधपणेंच आहों. नित्य रात्रंदिवस कोठवर सावध रहावें! बातमी त्यांचे[3] लष्करची अगदीं येत नाहीं. माणूसच जात नाहीं. खर्च[4] पडता तरी न चुकतों. परंतु माणूस ( तिकडे ) जात नाहीं. छापा आला ते दिवशीं गाडदी आला त्याणें सावधता केली आणि तीर्थरूप तोफेचा गोळा उडतांच नौबत वाजवीत ढालेचे पुढें जाऊन उभे राहिले. यामुळें चिरंजीव भाऊ व आह्मीं तेथें गेलों. लोकही नौबतमुळें जमले. याजमुळें गोट अगदीं सांवरून निघाला. पांच सहा घटका रात्रीपासून चार घटका दिवसपावेतों गाडद्यांच्या गोळ्या व बाण व तोफांची वृष्टि झाली. ईश्वरें व वडिलांचे पुण्यें सर्व क्षेम झालें. बोर्डी, माणसें किती

---

१ उलटणी. लिहिण्याचा भावार्थ हा कीं, किल्ले घेत घेत आह्मीं इतके लांब आलों असल्यामुळें हैदरखान आपणास सुरक्षित समजत आहे तोंच लांब दौड मारून एकदम त्यावर उलटून येऊन पडावें असें आमच्या मनांत आहे. २ पत्र मोरो बल्लाळ यास लिहिलेलें आहे. ३ शत्रूच्या. ४ खर्च पडूनही बातमी मिळती तरी मिळवावयास चुकलों नसतों.

पडलीं ह्मणून लिहिलें, त्यास तीर्थरूपांकडील घोडीं जायां वीस व माणसें चौघे. चिरंजीवांकडील घोडीं बावीस व माणसें सहा व आह्मांकडील घोडीं दहा व माणसें तिघे. याजप्रमाणें पहिले दिवशीं मेलीं. जखमी घोडे, माणूस मिळून तिन्ही पथकांतील दीडशें पावणें दोनशें होतील. इतकें जायां झाल्याची फिकीर नाहीं, परंतु ईश्वरें क्षेम केलें हाच लाभ! चिरंजीव भाऊ ( असल्या प्रसंगीं ) उतावळी करितात ह्मणून लिहिलें, त्यास कालचे प्रसंगीं न करितां गत्यंतर नाहीं. त्यांत आपण लिहिल्याप्रमाणें त्यांस वरचेवर सांगतच आहों. पुढेंही सांगूं. चिंता न करावी. रास्तेकडील घोडें माणूस किती पडलें त्याचा अजमास कळला नाहीं. परंतु त्यांचे गोटचे लोकांचे बोलण्यावरून घोडीं चार पांच, दोन तीन माणसें, इतका सुमार. एक दोन अधिक उणे. विशेष नाहीं. उधळून घोडीं किती गेलीं ( ह्मणून लिहिलें, ) त्यास चिरंजीवाचे[1] व आमचे[2] गोटांतील एकही गेलें नाहीं. तीर्थरूपांचे गोटांतील एक दोन गेलीं असतील. रास्तेकडील दहा पांच गेलीं ह्मणतात. कळत कळत कळतीलच. रास्तेकडे अडीच प्रहराचे अमलांत गाडदी आला त्याणें सावध केलें. छबिने त्यांजकडीलच होते. तीर्थरूप यांस गोळा उडावयाचे पूर्वीं घटकाभर वर्तमान कळलें. चिरंजीव भाऊस व आह्मांस गोळेची[3] खबर! ते दिवशीं कहीस चिरंजीव व आह्मीं गेलों होतों. दहा बारा कोस जाऊन दहा बारा घटका रात्रीस आलों. उजाडतां हा प्रकार झाला! मुख्य गोष्ट कांहीं बाकी रहावयाची नव्हती, परंतु ईश्वरें रक्षिलें. सहा घटका रात्रीपासून सहा घटका दिवसपावेतों माराची वृष्टि झाली. मग सरोन उभे राहिलों. तळावर पांच सहा घटका दिवसपावेतों ( शत्रू ) आला नव्हता. मग आला. आज कूच करून हगलवाडी डावी टाकून

---

१ परशुरामभाऊकडील. २ गोपाळरावाच्या. ३ तोफेचा गोळा उडाला तेव्हां आह्मांस छाप्याची खबर कळली.

## श० १६९१ निजामअली कर्नाटकाकडे कूच करितो. इ. स. १७७०

चिकनायकनहळ्ळी उजवी टाकून दोन कोस चिकनायकनहळ्ळीचे तालु- केंत मुक्कामास गेलों. सविस्तर वडिलांनीं लिहिल्यावरून कळेल. नित्य कोठवर जागावें? रक्षिता भगवंत आहे! काळजी न करणें. मैंदरगी परगणेंपैकीं कसबा देखील तीन गांवचीं घरें वांचलीं. शिवार एक गांवचा वांचला. बाकी अगदीं गेलें. इतकें वकिलानीं आळंदगुंजोटी- करांजवळ चार रुपये खाऊन त्यांचे परगणे सोडून आमचे परगण्यांत दोन मुक्काम[1] घालून अगदीं बुडविलें! दोहींचे सरदेनें जाते तर चार खेडीं तिकडील व कांहीं इकडील असें झालें असतें. आधींच चवदा गांव. त्यांत दोन तळ वकिलानीं घालून इतकें केलें! बरें! यंदां चहूंकडून सारखें व्हावें कीं नाहीं! तेथें पीक होतें तें या प्रकारें गेलें. 'शिरोळचे खुळामुळें तुह्मीं जकातीचे कागद अटकाविले आहेत. कागद देणें.' असें पत्र मागावयास अण्णाजीराव याचा कारकून आला होता. आह्मीं दिले नाहींत. कृत्रिम त्यांचें आहे. यजमानावर बदनाम मात्र घालितात. न सोडावी हे त्यांची बुद्धि. तुह्मांस जकातेविशीं पत्र पाठविणार आहेत. श्रीमंतांस रास्तेचीं व आमचीं पत्रें पाठविणार आहेत. मनसबा पक्का करावा. विना मातबर राजकारण केल्यावांचून हैदर कांहीं हारीस येत नाहीं. छावणीचा डौल धरिलेवाचून त्याचे डोळे उघडत नाहींत. त्याची हिम्मत भारी आहे. तुमचा मनसबा कच्चा पक्का पाहून तोही बळ धरितो. जे करणें तें पक्कें करावें. तुह्मीं सुज्ञ आहां तेथें आह्मीं लिहावेंसें नाहीं. बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद.

नं० ९१६ श्रीगणपतिर्जयति. ( फाल्गुन शुद्ध द्वादशी. ८ मार्च. )[2]

आशीर्वाद उपरी. येथील कुशल तागायत फाल्गुन शुद्ध द्वादशी छ ९ जिल्काद गुरुवार जाणून स्वकीय कुशल लेखन करीत जावें.

---

१ मुक्काम निजामअलीचे. २ पत्र गोविंद हरीनें मिरजेहून गोपाळरावास लिहि- लेलें आहे.

विशेष. उचंगीदुर्गाजवळ तुमचा मुक्काम होता तेथून तुमचीं छ १६ सवालचीं पत्रें आलीं होतीं त्या अलीकडे पत्रें येत नव्हतीं. इकडे बाजारी बखवा नाना प्रकारच्या उठल्या होत्या तेणेंकरून बहुत चिंता लागली होती. त्यासीं माघ वद्य एकादशी बुधवारचीं मतोंडा नजीकचीं पत्रें पाठविलीं तीं फाल्गुन शुद्ध अष्टमी इंदुवारीं घटका रात्रीस पावलीं. त्यांतील वर्तमान कळलें तेणेंकरून चित्त स्वस्थ झालें. मुक्काम मजकुरीं आल्याउपरी श्रीमंतांकडे पत्रें पाठविलीं आहेत. आज्ञा येईल त्याप्रमाणें वर्तणूक करूं ह्मणून लिहिलें तें कळलें. श्रीमंतांनीं ठाणीं घेतलीं होतीं त्या पैकीं चिकनायकनहळ्ळी हैदरखानानें फितवा करून घेतली व कंदीकिरें व हंदीकिरें येथील लोक धास्तीनेंच ठाणीं सोडून पळालेचा मजकूर विस्तारें लिहिला तो सर्व समजला. ठाण्यांत जुने लोक होते यामुळें दगा झाला. ब्राह्मणाचा वगैरे लोकांचा नासिकाछेदनाचा प्रकार शत्रूनें केला. मोठी अन्याय गोष्टी केली! असुरी कर्म केलें! राक्षसाचा अंशच आहे! ठाण्यांत कोणी राहूं नये ऐशी दहशत पडावी या अर्थें त्यानें उग्र शासन केलें. राजश्री नरसिंगराव खेमलापुरकर याचे दोघे पुत्र व नारोखंडेराव यांसीं कैदेंत ठेविलें ह्मणून लिहिलें तें कळलें. शत्रूचे हातीं सांपडले. श्रीकृपेनें सुटका होईल तेव्हां खरें! केसोपंत फाटक वगैरे लोकांचीं नांवें लिहिलीं तीं कळलीं. श्रीमंतांकडील वर्तमान लिहिलें तें सर्व कळलें. श्रीमंतांनीं फौजा रवाना केलेचा प्रकार लिहिला तो कळला. श्रीमंतांचें छ १६ सवालचें पत्र तुह्मांस छ २१ सवालीं पावलेलें त्यांतील अर्थ लिहिला तो सर्व कळला. दाणा वैरणीचा संकटाचा प्रकार लिहिला तो कळला. राजश्री मुरारराव श्रीमंताकडे गेले. कडपेकर व कर्नोळकर यांसीं (श्रीमंतांस) सामील होणेंविशीं नबाबाचीं पत्रें गेलीं आहेत ह्मणून लिहिलें तें कळलें. लेले यांचे पुत्र सुखरूप आहेत ह्मणून खेमलपुरांस लिहावें ह्मणून

१ छाप्याबद्दलच्या.

लिहिलें तें कळलें. लिहून पाठवितों. तुह्मीं आपणाकडील वर्तमान वरचेवर लिहून पाठवीत जावें. लेले यांचे घरीं तुमचे पत्रा अगोदर त्यांचीं माणसें शिक्षा झालीं तीं आलीं आहेत. आह्मीं कोणती संतोषाची खबर कळवावी! सुटतील तेव्हां पुनर्जन्म ह्मणावा. लक्ष गोष्टीची गोष्टी. तुह्मांस त्यास केवळ समीप गांठी. तो दगाबाज आहे. विश्वास न धरितां सदैव रात्रीचे आपले तयारीनिशीं खबरदार असत जावें. एकवेळ तो फजित पावतच आहे, परंतु कालप्रतीक्षा होत आहे. फारच सावध रहावें. बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद.

पै॥ छ २१ जिल्काद. वद्य नवमी.

नं. ९१७ श्रीगणराज. ( फाल्गुन शुद्ध द्वादशी. ८ मार्च. )

चिरंजीव राजश्री मोरोबा आबा यांसी प्रती गोपाळराव गोविंद आशीर्वाद उपरी येथील कुशल छ ९ जिल्काद गुरुवार मुक्काम नजीक हगलवाडी. वर्तमान यथास्थित जाणून स्वकीय कुशल लिहीत जाणें. विशेष. तुह्मीं पत्र छ ७ मिनहूचें नंदिगडच्या मुक्कामचें पाठविलें तें काल पावोन लिहिला मजकूर कळला. नंदिगडच्या दरवाजापर्यंत मोर्चे गेले ह्मणून लिहिलें तें कळलें. ऐशियास कोटचक्रही[1] घालून पाहिलें. ज्योतिष्यानेंही हस्तगत होईल ह्मणून सांगितलें, व आमच्याही मनसब्यास येतें कीं खामखा किल्ला हस्तगत होईल. संशय नाहीं. चार दिवस अधिक लागले तरी चिंता नाहीं, परंतु बसल्यासारखें किल्ला हस्तगत केल्याशिवाय उठूं नये. " टिपू व मीर मिळोन चार हजार फौजेनिशीं बेंगळुराहून आज निघोन निजगलदुर्गास मुक्कामास गेले ह्मणून बातमी येतांच गायकवाड वगैरे पथकें चार हजार फौज आपणाकडे

---

१ कोटचक्र हें किल्ला हातीं येईल कीं नाहीं हें पहाण्याचें कांहीं यंत्र होतें असें दिसतें. मागें नंबर ९०४ च्या पत्रांतही या ' कोटचक्रा ' चा उल्लेख आला आहे.

रवाना केले. टिपू व मीर हैदरखान याजकडे गेले तर फौजेनें आपणांकडे जावें. पट्टणाकडे उभयतां गेले तरी फौजेनें माघारे यावें, ह्मणोन आज्ञा आहे " ह्मणोन विस्तारें लिहिलें तें कळलें. उभयतां बेंगळुराहून निघून आले असल्यास हैदरखानाकडे जातील. केवळ आह्मांकडे तितक्या फौजेनिशीं येणार नाहींतसें दिसतें. तत्राप न कळे. आह्मीं खबरदारीस चुकत नाहीं. होतां होईल तें खरें! राजश्री बाबूराव हुबळीकराकडील व राजश्री रामाप्पा चित्रदुर्गकराकडील ( लोक ) बातमीसाठीं पाठविले आहेत त्यांचें पत्र आलें तेंच ऐन जिन्नस पाठविलें आहे. हैदरखान संकरापट्टणास गर्दनदुर्गाहून गेले ह्मणोन लिहिलें आहे. मतोंडास पांच जासूद जोड्या उभयतांपाशीं ठेविल्या आहेत. रामाप्पा दुर्गकराकडील गरीब आमच्या लक्षांत आहेत. याजकरितां त्यास बातमीसाठीं मतोंडास पाठविले आहेत. कळेल वर्तमान तें लिहून पाठवितील. " हैदरखान कडूरास असल्यास कांहीं तरतूद येथून करावी. कांहीं एक उलटा करणार आहों. " ह्मणून लिहिलें तें कळलें. उत्तम आहे. नंदिगड हस्तगत होतांच मग तिकडे कार्य दिसत नाहीं. याजकरितां नंदिगडचा गुंता उरकतांच तेथून कूच करून भैरवदुर्गचे खिंडीनें पट्टणतालुक्यांत यावें. नागमंगल वगैरे ठाणीं पाडून टाकिलीं आहेत त्यांचीं घरें जाळून वसती मोडावी. तशींच राहिलीं ठाणीं घेऊन लुटून जाळून पाडून टाकावीं. देखील कडूर, बाणावर आदिकरून. ह्मणजे तेथील वस्तीच मोडेल. हैदरखानाच्या मतें 'एकी वाटेनें ( श्रीमंत ) गेले, तिकडील मुलुख खराब झाला तर चिंता नाहीं. कौल देऊन लावणी करूं.' असा त्याचा मनसबा. याजकरितां तमाम पट्टण प्रांत जाळून वस्ती मोडेसी केल्याखेरीज त्याचेही डोळें उघडत नाहींत! खराबी झाली व होईल असें त्यासही समजलें पाहिजे. जरूर केलें पाहिजे. बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद.

नं० ९१८ श्रीगणराज. ( फाल्गुन शुद्ध त्रयोदशी. ९ मार्च. )

चिरंजीव राजश्री मोरोपंत आबा यांसीं प्रती गोपाळराव गोविंद आशीर्वाद उपरी येथील कुशल तागायत छ १० जिल्काद मुक्काम नजीक अदकोस हगलवाडी येथें वर्तमान यथास्थित असे. विशेष. काल येथून सरकारच्या सुतरस्वारासमागमें पत्र पाठविलें आहे तें पावलें असेल. आह्मीं बुकापट्टणाकडे होतों तेव्हां चिकनायकनहळ्ळी व कंदिकिरें येथील दाणा थोडा बहुत मिळाला तो आणून चारिला. तेथून कूच करून येथें आलों, त्यास आज तीन दिवस दाणा मिळाला नाहीं. घोड्यांस तीन निरशनें झालीं. नाचणा मात्र मिळाला. दाणा मिळत नाहीं व रस्त ही येत नाहीं. हगलवाडीचे गांव व कडपेंचे गांव आहेत ते मोडतां न येत. तत्राप मोडावे तर तोफांशिवाय मोडणार नाहींत. चित्रदुर्ग व मतोंडकराचे गांवास हात लावितां न ये. शिऱ्यांकडे जावें तर तो तालुका सरकारचा. तिकडेही जातां नये. आमची भिस्त सारी घोड्यांवर. किमान पक्ष न मिळे त्या पक्षीं दोन शेर तों दर घोड्यास दाणा पाहिजे. त्यास आज तीन दिवस तोबरा नाहीं तेव्हां घोडें कसें निभावेल! यास काय उपाय! यास्तव हें पत्र तुह्मांस लिहिलें आहे. तर तुह्मीं श्रीमंतांस विनंती करून येविशींचें समर्पक उत्तर पाठवून देणें. सवंग महाग मिळतें तर न लिहितों. विकत देखील मिळेना! निरुपाय जाणून लिहिलें आहे. कडपें व हगलवाडी हीं ठाणीं सरकारचीं. येथें दाणा विकतही मिळत नाहीं असा प्रकार आहे. पक्का विचार करून उत्तर सत्वर पाठवून देणें. हैदरखान संकरापट्टणासच आहे ह्मणोन परवां पत्र मतोंडाहून आलें तें काल तुह्मांकडे पाठविलेंच आहे. काल संध्याकाळीं आणखी पत्र आलें कीं संकरापट्टणासच आहे ह्मणून पत्र आलें. ' नंदिगडास मोर्चे लाविले. दरवाजेपावेतों मोर्चे गेले. ' ह्मणून

तुह्मीं लिहिलेंच होतें; त्यास तोफा लागू झाल्या कीं न झाल्या हें लिहावें. मीर व टिपुमिय्या देवरायदुर्गास आले ह्मणून राजश्री लक्ष्मण बल्लाळ यांचें पत्र काल मदगिरीहून आलें. श्रीमंतांनीं त्याच्या पिछावर गायकवाड वगैरे मिळून तीन चार हजार फौज रवाना केली आहे ह्मणून पेशजीं लिहिलें होतें, त्यास त्याजवर फौज रवाना केली असली तर उत्तमच झालें. त्या फौजेचा पायबंद त्यास बसेल. आह्मीं तर इकडे साव-धपणें आहोंच. परंतु मनसब्याची रीत पाहतां हैदरखान व टिपू एकत्र झाले तरीच काय गडबड करतील न कळे. हैदरखानानें टिपूस आपणाकडे बोलाविलें असेल हा एक प्रकार. दुसरें श्रीमंतानीं चिकबाळापूर घेतलें. आतां खासा स्वारी बेंगळुराकडे आली ह्मणजे आंत गुंतोन राहूं. बाहेर असल्यास उपयोगाचें. हें चित्तांत आणून देवरायदुर्गाकडे आले ( असेंही असेल ). मतोंडाहून बात-मींचें पत्र आलें तेंच पाठविलें आहे. आह्मीं आपलेतर्फेनें खबर-दारीस कमी करीत नाहीं. होतां होईल तें खरें. पाण्यावीण हैराण-गत आहे. या उपर कोणाचेंही खेडें असलें तरी मनास न आणितां दाणा आणितों. बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद. तुमचें शरीर स्थितीचें वर्तमान लिहिणें हे आशीर्वाद.

नं. ९१९ श्री. ( फाल्गुन शुद्ध चतुर्दशी. १० मार्च. )

श्रीमंत राजश्री रावजी स्वामीचे सेवेशीं.

पोष्य सखाराम[1] हरी. कृतानेक विनंती. तागायत छ ११ जिल्काद मुक्काम मदगिरी जाणून स्वकीय कुशल लेखन करावें. विशेष. टिपू-

१ बाबूराव हरि व सखाराम हरि हे दोघे बंधु परभू जातीचे शूर व कर्ते सरदार होते. पैकीं बाबूराव हा हल्लीं हिंदुस्थान प्रांतीं पेशव्यानीं रामचंद्र गणेशाबरोबर फौज स्वारीस पाठविली होती तींत होता. दुसरा सखाराम हरि हा या कर्नाटकच्या स्वारींत गुंतला होता. याचें नांव यापुढें आतां बरेच वेळां येईल.

मिय्या व मीररेजा देवरायदुर्ग येथें आले आहेत हे बातमी श्रीमंतांस कळल्यानंतर आह्मांस व राजश्री बाळोजी पलांडे यांस नंदिगडचे मुक्कामाहून रवाना केलें. काल गुरुवारीं मदगिरीस आलों. येथेंही राजश्री लक्ष्मणपंत याणीं बातमी आणिली आहे कीं, चार पांच हजारांनिशीं टिपू व मीर देवराजदुर्गास आहेत. ऐशास श्रीमंतांची आज्ञा आहे कीं, त्यांचा आपल्याकडे रोख असलियास आपणास येऊन मिळावें. इकडे सरकारी तालुक्यास हरएक उपसर्ग केला तरी करूं देऊं नये. याप्रमाणें आज्ञा आहे. त्यास त्यांची कालची छ १० मिनहूची बातमी तरी देवरायदुर्गची होती. आमची फौज आली आहे हें कळल्या उपरी कसा मनसबा करितील पहावा. आपल्याकडे येण्याचा ( त्यांचा ) रोख असल्यास आह्मीं येतच आहों. त्यास राजश्री शहाजी राजे भोंसले व राजश्री नरसिंगराव घायगुडे हीं दोन्हीं पथकें आणवावीं अशी सरकारांतून ( आह्मांस ) आज्ञा आहे, तरी सदरहू दोन्हीं पथकें जलदीनें रवाना करावीं. आणि सविस्तर पत्रीं आज्ञा करावी ह्मणजे त्यासारखी वर्तणूक केली जाईल. सविस्तर राजश्री बाळोजी पलांडे याणीं लिहिलें आहे त्यावरून कळेल. बहुत काय लिहिणें कृपा लोभ असों दीजे हे विनंती. हुजुरातची फौज चार पांच पागा व किरकोळ पथकें मिळोन दोन तीन हजार व घायगुडे व भोंसले मिळून पांच हजारांची नेमणूक करून टिपूचे व मिराचे नेहमीं पिछावर राहून बाहेर निघालियास झुंज करावें ऐशी ( श्रीमंतांची आह्मांस ) आज्ञा आहे. तीं दोन पथकें रवाना करावीं. त्याच रोखें त्यांची फौज आली तरी सारेच स्वामींजवळ येऊं. कळावें हे विनंती.

नं० ९२० श्रीगणराज. ( फाल्गुन शुद्ध चतुर्दशी. १० मार्च. )

चिरंजीव राजश्री मोरोपंत आबा यांसी प्रती गोपाळराव गोविंद आशीर्वाद उपरी येथील कुशल तागायत छ ११ जिल्काद मुक्काम नजीक

१ मीर व टिपू यांची. २ तुह्मांजवळ.

हगलवाडी येथें वर्तमान यथास्थित असे. विशेष. आज दोन चार दिवस लागोपाठ पत्रें लिहून दररोज पाठवीतच आहों. मतोंडाहून बातमीचें पत्र आलें तेंच बजिन्नस पाठविलें आहे त्याजवरून कळेल. श्रीमंतांनीं छाप्याचे लढाईंत घोडे माणूस ठार जखमी किती झाले हें लिहून पाठवून देणें ह्मणून आज्ञा केली होती. हल्लीं तीन पथकांच्या यादी पाठविल्या आहेत या श्रीमंतांस दाखवाव्या. यादींपैकीं तीन पथकांत मिळून आणखी पांच सात घोडे व माणूसही पांच सात मरावयाजोगेंच आहे. यांत ईश्वर कृपेकरून बचेल तो बचेल. भारी जखमा ज्यांच्या नाहींत ते वांचतील असें दिसतें. तुह्मांस कळावें ह्मणून लिहिलें आहे. आज तीन चार दिवस दाण्याचें नांव नाहीं. मोठा कडाड झाला आहे. याजकरितां आज एक गांव मारून आणिला. तेथें दाणा कांहीं फारसा मिळाला नाहीं. थोडा बहुत मिळाला. तो गांव हगलवाडीकर आपला ह्मणून बोभाटा घेऊन आले होते. त्यांस आह्मीं येथें येऊन चार दिवस झाले परंतु ठाणेदारानें येऊन फलाणा गांव रुजू आहे नाहीं हें सांगावें, रखवालीस राऊत घेऊन जावे, तें न केलें. त्यासीं गांव रुजू नाहींत असेही आहेत. त्यांत आह्मीं मारोन आणिला ह्मणोन गांव आमचा ह्मणून बोभाटा करावा इतकाच प्रकार. तत्राप गांव आपला जरी असला तरी लष्कर उपवासी मारून गांव वांचविल्यांत नफा नाहीं. त्यांत आह्मांस कांहीं गांवची माहितगारी नाहीं. गांवच्यांनीं येऊन माहितगारी सांगावी ते सांगत नाहींत. फौज जाती, गांव थोर असला तर तो तर मोडवतच नाहीं, लहान सहान असेल तो मोडून आणतात! भरपूर दाणा तो मिळत नाहीं. हुजूर कोणी बोभाटा घेऊन येईल याजकरितां तुह्मांस कळावें ह्मणून लिहिलें आहे. राजश्री बाजीपंत वगैरे सरकारचे कारकून गणती घ्यावयाकरितां काल येथें आले.

उदईक गणती होईल. टिपूमिय्या व मीर देवरायदुर्गासच आहेत ह्मणून चहूंकडून बातमी येत आहे. राजश्री बाळोजी पळांडे वगैरे सरकारचीं पथकें मीर व टिपू मदगिरीकडे येऊन उपसर्ग करावा ह्मणोन ( श्रीमंतांनीं ) लाऊन दिलीं आहेत, त्यास मशारनिल्हेनीं आह्मांस काल पत्र पाठविलें कीं " राजश्री शहाजी भोंसले व नरसिंगराव घायगुडे यांस आपणाजवळ आणवून घेणें ह्मणून श्रीमंतांची आज्ञा आहे याजकरितां त्यांस पाठवून देणें " ह्मणून लिहिलें होतें. त्यास पेशजी उभयतांस येथेंच रहावें ह्मणून श्रीमंतांचें आज्ञापत्र आलें होतें. हल्लीं श्रीमंतांचें पत्र नसतां मशारनिल्हेनीं लिहिलें होतें. ऐशास श्रीमंत नंदिगडास आहेत. मदगिरीस पथकें असतां मीर मदगिरीकडे येत नाहीं. मिराचा व हैदरखानाचा रोंख इकडेच आहे. याजकरितां उभयतां मशारनिल्हेस येथें ठेऊन घेतले आहेत तुह्मांस कळावें ह्मणून लिहिलें आहे. तर तुह्मीं श्रीमंतांस याजप्रमाणें विनंती करावी. बाळोजी पळांडे यांजकडे मीर मदगिरीकडे येणार नाहीं. रोंख इकडेच आहे. याजकरितां हुजूर न येतां मशारनिल्हेस येथें ठेऊन घेतले आहेत ह्मणून लिहून पाठविलें आहे. व राजश्री शहाजी भोंसले यांस हरएकासमागमें जा ह्मणावें हें विहित नाहीं. आह्मीं उभयतांसही येथें ठेऊन घेतलें आहे. हैदरअल्लीखानही इकडेच आहे व मीर व टिपू इकडेच येणार. ते आल्यावर बाळोजी पळांडे व सखाराम हरी आमची कुमक कशी करणार! श्रीमंतही दूर आहेत. दोघे एकत्र झाले तरी गळाठा भारी होणार, यास्तव आह्मीं उभयतांस ठेऊन घेतलें. जखमी यांच्या यादी तिहींकडील पाठविल्या आहेत. हैदरखान संकरापट्टणास आहे. बातमीचीं पत्रें आलीं तीं पाठविलीं आहेत. मीर व टिपू देवरायदुर्गास आले. आह्मीं आपले जागां खबरदारीनें आहों. बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद. राजश्री आनंदरावदादा याजकडीलही याद पाठविली आहे. हे आशीर्वाद.

नं० ९२१ ( फाल्गुन शुद्ध चतुर्दशी.
१० मार्च. )

सावनूरकराचा कारकून माधवराव शिवराव याचें
गोपाळरावास पत्र. नंदिगड मुक्कामचें छ ११ जिल्कादचें—

" श्रीमंतांनीं छ ६ रोजीं नंदिगडास मोर्चे दिले होते. छ १० रोजीं गड फत्ते झाला. येथून एक दोन रोजीं कूच होईल. वण्णुराहून आणखी दोनशें स्वार व पांच प्यादे आह्मांकडे आले आहेत. आह्मांस श्रीमंतांनीं एक निराळाच मोर्चा नेमून दिला होता. "

नं० ९२२ ( फाल्गुन शुद्ध पौर्णिमा.
११ मार्च. )

वासुदेव धोंडदेव याचें पांडुरंगरावास शिरें येथून १२ जिल्कादचें पत्र.
" राव[1]साहेब येथून सडे फौजेसुद्धां आठ कोस पुढें आहेत. सडे आहेत. परंतु लष्करानें छाप्यापासून फार आवई खाली आहे. नित्य आवई लटकी रात्रीची पडते. हैदरखानास व आमच्या फौजांस चार साडेचार गांवाची तफावत आहे. श्रीमंत बाळापूर तालुक्यांत आहेत. मदगिरीस बाळोजी पलांडे वगैरे पथकें तीन हजार फौज नेहमीं श्रीमंतांनीं ठेविली आहे. सालमजकुरची मुलुखगिरी पहिल्या मुलुखगिऱ्या सांगत होते त्याजप्रमाणें झाली. फार कठीण आहे! इकडे रुपये अर्काटीची चाल आहे. महमदअलीखान अद्याप यावयाचा निश्चय नाहीं. हैदरखानानें नाकें कापिलीं याजमुळें धास्त माणसांस फार बसली आहे. "

नं० ९२३ श्रीगणराज. ( फाल्गुन शुद्ध पौर्णिमा.
११ मार्च. )

अपत्यें मोरोबानें साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत छ १२ जिल्काद मुक्काम नंदिगड वडिलांचे आशीर्वादेंकरून वर्तमान यथास्थित

---

१ रावसाहेब ह्मणजे गोपाळराव.

नं. ८२४ **श्रीगणराज.** (अजमासें आश्विन वद्य. आक्टोबरचा दु. पंधरवडा.)

आशीर्वाद उपरी. " श्रीमंतानीं बोलाऊं पाठविण्याचें कारण भोसल्याकडील व निजामन अल्लीकडील व हैदरखान यांजकडील प्रकार साधकबाधक बोलावें, कोणतें तूर्त करावयाचें, कोणतें पुढें करावयाचें, याचा विचार आपल्या जागां करावा; याअर्थें वडिलांस बोलाऊं पाठविणार होते. परंतु वडील तिकडून पुण्यास आल्यानें कर्नाटकांत आवाई पडेल कीं 'रायास पुण्यास बोलाऊं पाठविलें. तेव्हां तिकडे मनसबा पडल्याशिवाय बलाऊं पाठविलें नाहीं.' श्रीमंत सारे प्रकार बोलले. भोसल्याकडील अधिकोत्तर प्रकार नाहीं. देवजीपंतावर भोसल्याची इतराजी जाहली आहे, ह्मणोन रामाजी बल्लाळ यास भोसल्याकडे रवाना करितात. दोन चार दिवसांत जातील. मोंगलाकडील सिद्धांत गुदस्तांप्रमाणें श्रीमंताबरोबर मुलुखगिरी करावी असें आहे. हैदरखान यांनीं खालीं मैदान पाहून प्रबलतेस चढले आहेत यामुळें तिकडील मुलुखगिरी करून हैदरखानाचा हर्ष भग्न करावा हाच मनसबा ठरला " ह्मणून लिहिलें तें कळलें. हैदरखान प्रस्तुत कर्नोळापासून आठा कोसांवर आहे. कर्नोळकराचा तह होऊन पुढें कोणीकडे जाणार हें वर्तमान आलियावर लिहून पाठवूं. राजश्री मुरारराव सेनापती व राजश्री नागोजीरायानीं बातमीचें वर्तमान लिहिलें आहे. व श्रीमंतास पत्रें होतीं. ते पर्याय पेशजी जासुदाबरोबर लिहिलें आहेत. रा. मुरारराव यांचा श्रीमंतासीं दुसरा विचार नाहीं. परंतु हैदरअल्लीखान याचा शह केवळ जवळ असतां मुलें माणसें डकोट किल्ले टाकून कसें यावें इतकाच गुंता. वरकड कोणे गोष्टीचा गुंता नाहीं. तूर्त मशारनिल्हेचें येणें न जाहलें ह्मणून त्याजवर हरएकवेसीं आरोप ठेवून ममतेंत न्यून नसावें, ह्मणून श्रीमंतांस विनंती करावी.

---

१ पत्र गोपाळरावानें मोरो बल्लाळ यांस लिहिलेलें आहे.

या आठा दिवसांत ( मुराररावाकडून ) तीन पत्रें तीन वेळ आलीं, त्यांत कांहीं इतर भाव नाहीं. राजश्री नागोजी रायाचें पत्र श्रीमंतास आहे तें पाठविलें आहे. मशारनिल्हेनीं आमचे पत्रीं लिहिलें आहे कीं राजश्री सेनापती यांजकडे जासूद पत्रें घेऊन जातील त्यांस हुजुर ताकीद असावी कीं, हेब्बाळावरून रा. दत्तोराव यांस भेटून त्यांणीं पत्रें मागितलीं तरी त्याजजवळ देऊन ते आपलीं पत्रें देतील तीं घेऊन पुढें जात जाणें, ह्मणून जासुदांस आज्ञा असावी ह्मणून लिहिलें आहे. सदरहू प्रमाणें जासुदांस ताकीद करविणें. बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद.

नं. ८२९ **श्रीगणराज.** ( अजमासें आश्विन वद्य. आक्टोबरचा दु० पंधरवडा. )

आशीर्वाद[1] उपरी. श्रीमंत " तुह्मांजवळ लोक चांगले नाहीं, ठळकपणें दिसत नाहीं, " ह्मणतात ; ऐशास आह्मी जितकी चौकशी करावयाची तितकी करून माणूस पाहून ठेवितों. जरकरून माणसाचा दाखला पाहणें असेल तरी फलटण देश, पुणें देश, अकलूज सोलापूर वगैरे व मानदेश करकंब वगैरे व कानडे वळणचे लोक ( आमच्या पथकांत ) आहेत. कानडे कांहीं कृष्णापारचे आहेत त्यांचा दाखला मालोजी[2] घोरपडे व दौलत[3] रायांस पुसावा. अलीकडील आहेत त्यांचा दाखला फकीरजी फडतरे, थोरात, महादजी शितोळे यांस व मानदेशाच्यांचा दाखला निंबाळकर, माने यांस पुसावा. फलटण देशाचे, पुणे देशाचे, शिरवळ देशाचे आहेत त्यांचा दाखला मनास आणून धारकरी माणूस किती आहे हें पहावें. ( हे लोक ) आह्माजवळ रोजमुऱ्यावर राहते तरी व[illegible]शीं पाहिजेत तशीं देऊन चाकराचे खासे बरे माणूस करून दाखवितों ! परंतु आह्मांस

---

१ हें ही पत्र मोरो बल्लाळ यास गोपाळरावानें लिहिलेलें आहे. २ मुधोळकर. ३ गजेंद्रगडकर.

खानास भेटलों याचें कारण (आमचे) जागेजुगे चांगले नाहींत. गुत्तीस पाणी नाहीं. रहावयाजोगें स्थळ नाहीं. नाइलाज जाणोन भेटी घेणें प्राप्त जाहलें. हें सविस्तर श्रीमंतांस लिहावें." ह्मणून सांगितले-वरून लिहिलें आहे, ह्मणोन वकिलानें लिहिलें आहे. वडिलांस हीं पत्रें त्यांचीं आलीं असतील अगर येतील. आमचे शरीरीं शैत्याचा उपद्रव आजी पांच रोज जाहला आहे. दरबारासही जात नाहीं. आरोग्य सत्वर होईल. चिंता न करावी. आरोग्य होतांच निघोन येतों. विदित होय. हे विज्ञापना.

नं. ८२८ **श्रीगणराज.** (अजमासें आश्विन वद्य. आक्टोबरचा दु० पंधरावडा.)

अपत्यें मोरोबानें साष्टांग नमस्कार. विनंती. राजश्री साबाजी भोंसले नागपुराहून अलीकडे आल्याचें पत्र आलें. सत्वरच श्रीमंतां-पाशीं येतील. गायकवाडाकडील कारभार विल्हे लागला. राजश्री गोविंदराव गायकवाड यांजकडे वडीलपण व सेना खासखेल करार करून त्यानीं जातीस जहागीर ध्यावी, ती खाऊन असावें, राजश्री सयाजी गाइकवाड यांस सेनाकर्ते[२] करार करून दिल्ही. (त्यानीं) सर्वही कारभार करावा. रा० फत्तेसिंग व सयाजी या उभयतानीं एकविचारें असावें. येणेंप्रमाणें ठराव. विल्हे लाविलें. चार हजार फौज देऊन राजश्री रायाजी हरफळे यांस चाकरीस पाठवावें. कराराप्रमाणें पैका सरकारांत ध्यावा. येणें प्रमाणें ठराव जाहला. सालमजकुरीं फौजेचा अजमास.

| | | | |
|---|---|---|---|
| ८००० | आह्माकडील तीन पथकें. | ४००० | गाइकवाड. |
| १००० | नरसिंगराव जनार्दन. | ५००० | साबाजी भोंसले. |
| २००० | हरी गोपाळ. | | ——— |
| २५०० | रास्ते. | ९००० | |

१ पत्र मोरो बल्लाळ याचें गोपाळरावास. २ सेनाकर्ते ही पदवी.

शा० १६९१ **स्वारीची तयारी.** इ. स. १७६९

| | |
|---|---|
| १००० शहाजी भोंसले.[1] | १६००० तेरीज. |
| १००० शहाजी भापकर. | ———— |
| ५०० दौलतरावे[2] व भास्कररॉव.[3] | २५००० |
| ———— | १५००० हुजुरातपागा व |
| १६००० | ———— किरकोळ पथकें. |
| | ४०००० |

येणें प्रमाणें चाळीस हजार फौज जमा होईल. हैदरखानाकडील खंडणीचा प्रकार राजश्री आपाजीराम बोलतात. तिसालां चाळीस लक्षांवर ठरेल. परंतु साहुकारी निशा होणें कळतच आहे! विना तिकडे[4] गेल्याखेरीज पैका येत नाहीं ( असें आपाजीराम ह्मणतो. ) तूर्त दहा लक्षांची निशा करून देणार. कळावें. आह्मांकडे आपाजीराम आले होते. दोन लक्ष रुपयांची निशा करावी ह्मणत होता. आह्मी नादीं मात्र लाविलें आहे. जरी यानीं अजीबाद ( ? ) दिल्हे तरी शेवट कोणते तऱ्हेस जाईल पहावें! यास्तव गुंतत नाहीं. विदित होय हे विज्ञापना.

नं० ८२९[5] **श्रीगणराज.** ( अजमासें भाद्रपद वद्य. सप्टंबरचा दु० पंधरवडा. )

अपत्यें मोरोबानें साष्टांग नमस्कार विनंती. " कर्नाटकात खासा स्वारी जाहलीयाविना हैदरखानाचें पारिपत्य उत्तम प्रकारें होणार नाहीं. फौजा पाठविल्यानें बराबरी होईल. येविशीं मनसबा कसा केला " ह्मणून विस्तारें लिहिलें तें कळलें. ऐसीयास हैदरखानाकडील खंडणीचा मजकूर रा० आपाजीराम बोलत होते. खंडणीचा ठराव जाहला. तिसालां चाळीस लक्ष बेरीज ठरली होती. परंतु हसेबंदीप्रमाणें साहुकारी

---

१ अक्कलकोटकर. २ गजेंद्रगडकर. ३ नरगुंदकर. ४ परत श्रीरंगपट्टणास.
५ पत्र मोरो बल्लाळ याचें गोपाळरावास.

निशा होईना. तूर्त दहा लक्ष रुपये साहुकारी निशा करून देत होते. सोळा लक्षांस रेजा अलीखानें यास वोलीस ठेवावा, चवदा लक्ष राहतील ते पेस्तरसालीं ध्यावे, येणें प्रमाणें मशारनिल्हे ह्मणत होते. परंतु सारी साहुकारी निशा नाहींच. ( हैदरानें ) कर्नाटकांत लबाडी फार मांडली आहे हें श्रीमंतांनीं ध्यानांत आणून साहुकारी निशेखेरीज होत नाहीं ह्मणोन साफ सांगोन मशारनिल्हेस निरोप दिला. हे तिकडे गेल्यावर साहुकारी निशा करून देत असल्यास उत्तमच जाहलें. ठराव जाहलाच आहे. परंतु साहुकारी निशा होणें कठीण आहे. तेव्हां खासास्वारी तिकडे आल्याखेरीज ठीक नाहीं, हे सर्व भाव श्रीमंतांस समजले आहेत. खासास्वारीच कर्नाटकांत येणार. संशय तिळमात्र नाहीं. दसरीयास निघतात. वानवडीवर येणार. श्रीमंत सौभाग्यवती मातुश्री आनंदीबाई प्रसूत जाहली तरी मात्र गुंता आहे. वरकडविशीं गुंता नाहीं. लोकांस तमाम बोलावूं पाठविलें. वडिलांकडे तोफा आठ रवाना जाहल्या. येऊन पावतील. सुरापुराकडे तूर्त न जावें. कृष्णा उतरोन तुंगभद्रा तीरासच जावें ह्मणोन पेशजीच्या पत्रीं लिहिलें आहे, त्याअन्वयें कृष्णा उतरोन जाण्याचेंच करावें. आह्मीं दसरीयास निघोन येतों. दुमाल्याचा झाडा तयार झाला आहे. कळेल तसा फडशा करून घेतों. विदित होय हे विज्ञापना.

नं० ८३० **श्रीगणराज.** ( अजमासें आश्विन वद्य. आक्टोबरचा दु० पंधरवडा. )

अपत्यें[2] मोरोबानें साष्टांग नमस्कार विनंती. राजश्री जानोजी भोसले यांजकडून राजश्री साबाजी भोसले चार हजार फौज घेऊन श्रीमंताकडे

---

१ हा अर्काटचा माजी नबाब चंदासाहेब याचा मुलगा. हा तूर्त हैदराच्या दरबारीं राहिलेला होता व त्याजकडूनच आपाजीराम याजबरोबर पुण्यास वकिलीकरितां आला होता. २ पत्र मोरो बल्लाळ याचें गोपाळरावास.

यावयासीं निघाले आहेत ह्मणोन लिहिलेंच आहे. नागपुराहून बाहेर निघाले आहेत. लवकरच येतील. हिंदुस्थानाकडील मजकूर तरी राजश्री रामचंद्र गणेश व होळकर खेचीवाड्यांत आहेत. फौजेची जमेत बरीच आहे. शिंदे उदेपुरास आहेत. उदेपुरची खंडणी ऐन पन्नास लक्ष व दरबार खर्च अंतस्थ दहा लक्ष एकूण साठ लक्ष खंडणी जाहली. त्या पो पंधरा लक्षांचें जवाहीर दिल्हें तें पांच लक्षांचें होईल! पांच-लक्षांची निशा साहुकारी जाहली. वरकड परगण्यावर तनखे करून दिल्हे आहेत. वसूल होणें कळतच आहे. कागदीं पत्रीं मात्र साठ लक्ष जाहले आहेत. कळावें. राजश्री जानोजी धुळप यांजकडील आरमार काढून हुजूर [1]ठेविलें. जामीन देणे ह्मणून तगादा करून चौकी ठेविली आहे. जामीन दिल्हा ह्मणजे मोकळे होतील. आरमाराचा सुभा राजश्री मोत्याजीराव विचारे यांस सांगितला. वस्त्रें जाहलीं. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ८३१ **श्री.** ( अजमासें श्रावण वद्य. आगस्टचा दु० पंधरवडा. )

यादी पत्रें.[2]

क्त्तिा पत्राचा मजकूर. "तुह्मांकडील कितीएक मजकूर राजश्री गोपाळराव गोविंद यांणीं विदित केला त्याजवरून सर्व कळोन आलें. अशास तुमचेविशींचें सांगणें संस्थानिकास वगैरे पत्र जे:--- "तुह्मी पहिल्यापासून पदरचे, एकनिष्ठपणें सरकारांत रुजू राहतच आलां. त्यास स्वारी कर्नाटकांत न आली सबब हैदर

१ मागें धुळपास पुन: आरमाराचा सुभा देण्याचें ठरलें असल्याचा मजकूर आहे. त्याशीं हें लिहिणें विरुद्ध आहे. २ गोपाळरावानें हें टिपण मोरो बल्लाळास पुण्यास लिहून पाठविलेलें आहे. यांत पेशव्यांकडून कर्नाटकांतील संस्थानिकांस कशा मजकुराचीं पत्रें गेलीं पाहिजेत हें लिहिलें आहे.

तें राव मशारनिल्हेस सांगितलें आहे. करार मदार करितील त्याप्रमाणें सरकारांतून चालविलें जाईल. कोणे विशीं संशय न धरितां मशारनिल्हे लिहितील त्याप्रमाणें कार्य करणें." ह्मणोन पत्रें ६

नाईक प्रबल जाहला ह्मणोन तुह्मीं काळावर दृष्टी देऊन कालानुसार वर्तावें ह्मणोन वर्तून त्यास सामील जाहलां. असो. प्रसंगानुसार वर्तलां. याजउपरी (आमच्या) फौजा त्या प्रांतास सत्वरच येत आहेत. पुढें त्या प्रांतास राजश्री गोपाळराव गोविंद आले आहेत. तरी तुह्मी यांस सामील सामान सुद्धां होणें. आणि हैदर नाइकाचें पारिपत्य करणें. पुरतें पारिपत्य स्वल्प दिवसांतच होईल. चिंता न करणें" ह्मणोन पत्रें.

१ चित्रदुर्ग. १ हरपनहळ्ळी. १ कित्तूर. १ नवलगुंद. १ गदग. १ हावनूर. १ कनकगिरी. १ सोंदें. २ नरगुंदे[1]शिंदे[2]. १ दौलतराव घोरपडे. १ कृष्णाजी[3] विश्वनाथ यास मोघम. एकूण पत्रें बारा.

नं. ८३२ **श्रीनिवास जयति.** (कार्तिक शुद्ध सप्तमी. ६ नोव्हेंबर.)

श्रीमंत राजश्री दादा[4] स्वामीचे सेवेशी.

सेवक रांजो[5] तमाजी कृतानेक साष्टांग नमस्कार. विनंती. येथील कुशल छ ६ रजब मुकाम सावनूर जाणून स्वकीय कुशल लेखन आज्ञा केली पाहिजे. विशेष. कृपा करून नबाबाकडील जोडीसमागमें पत्र पाठविलें तें पावलें. लिहिला भावार्थ अवगत जाहला. हजार प्यादे चांगले पठाण

१ नरगुंदकर भावे. २ तोरगलकर शिंदे. ३ हा कोण गृहस्थ हें माहीत नाहीं. ४ गोपाळराव. ५ सावनूरचा कारकून.

नबाबांनीं पाठवून द्यावे ह्मणजे उपयोगी पडेल आणि श्रीमंताच्या कृपेस पात्र व्हावें ह्मणून आज्ञा पत्रीं लिहिलें आणि राजश्री माधवराव यांच्या पत्रींही लिहिलें, ( त्यास ) उभयतांचीं पत्रें नबाबास वाचून दाखविलीं त्यास नबाब बोलिले कीं 'फौज पाठविण्याच्या तरतुदींत होतों, इतकियांत तुंगभद्रापार होऊन कुपेळुराजवळी हैदरखान उतरला आहे. मुलखाची खराबी केली. दिवाणास भेटीस पाठविणें भालाद माषु (?) लाऊन देणें, ह्मणून नाना प्रकारें सांगून पाठवितो! अगोदर वकिलास पाठवून स्नेहभाव लावून तुरंत परिहार करून टाकावें ह्मणून तजवीज केली होती. त्यास रावजीनीं[1] लिहिलें कीं, ( हैदराकडे ) वकील न पाठविणें. आह्मीं जलद आलों. त्यावरून वकीलही पाठविला नाहीं. आतां मुलखांत आला आहे. त्यानें सांगितल्याप्रमाणें ऐकावें लागतें. तितक्यांत रावजीचें येणें गलगनाथ या सुमारें होतें तरी कुपेळुराजवळी मुकाम न करिता' ऐसें कित्येक बोलणें बोलिले. त्यास आह्मीं उत्तर दिलें कीं, तुह्मां करितां फौज जमा जाहली पाहिजे. तोफखाना ही येतो. जलदीनें येत आहेत. आह्मांस निरोप देणें कीं लवकरी बोलावून ( त्यांस ) घेऊन येणें.( ह्मणजे ) त्या प्रमाणें रावसाहेब यांजवळी जाऊन विनंती करून रावजींस लष्कर सहवर्तमान घेऊन येतों. त्यावरून या गोष्टीचें प्रतिउत्तरच कांहीं बोलिले नाहींत. सविस्तरें कळावें या करितां लिहिलें आहे. राजश्री आपाजीराम पुणियांत होते, त्यास श्रीमंतानीं आज्ञा केली कीं "खंडणीचा ऐवज सारे चाळीस लाख रुपये जलद घेऊन येणे, तरीच सख्यत्व. नाहींतरी बिघाड." त्यावरून दीड महिन्याचा वायदा करून आपाजीराम कित्तुरास आले आहेत. तेथून निघून याचमार्गें जातील. श्रीमंत राजश्री नारायेणराव[2] छ २१ जमादिलाकरीं डेरे दाखल होणार होते. विदित होय. हैदरखान याजकडील फौज वगैरे याची पक्की खबर आणवून [3]लिहिलें आहे. विदित होय.

---

१ गोपाळरावानें. २ पेशव्यांचे धाकटे बंधु. ३ नं. ८१० चें पत्र पहा.

नं० ८३३ श्री. ( कार्तिक शुद्ध सप्तमी. ६ नोवेंबर. )

सेवेशीं[1] विनंती उपरी. हैदरखान याजकडील राजकारण राखून ठेवावें, उपयोगीं पडेल, ह्मणून दिवाण[2] यांनीं यजमानास[3] आज सहा महिने बोध करून येथून छोटेखानी[4] कारकुनासमागमें वस्त्रें व पत्रें पाठवून दिल्हीं. ( हैदरखानाकडून ) प्रति वस्त्रें व स्नेहभावाचीं पत्रें येत होतीं. हैदरखान हरपनहळीच्या खंडणीस आले. तेथून नबाबास पत्रें आलीं कीं, खंडणीस[5] मातबर ( गृहस्थ ) पाठवून बोली चुकवून देणें. 'नाहीं तरी मजा राहणार नाहीं!' त्यावरून नबाबजींची त्रेधा होऊन मिठाई दोनशें रुपयांची करून पाठविली. ( हैदरानें ) दोन दिवसांनंतर मिठाई घेतली. इनाम[6] दोनशें दिले. कारकून गेला होता तो तेथें अलीजमाखान नवाईत मू साहेब आहे त्याच्या मार्फत बोलूं लागला. बोली जाहली कीं "उत्तमपक्ष नबाबानीं भेटीस यावें. कदाचित दूर आहों ह्मणून आणि विश्वास नसल्यास दिवाण खंडेराव यास पाठविणें. ह्मणजे तुमचा व आमचा स्नेह आहे. न पाठवाल तरी बिघाड आहे." ऐशा गोष्टी कित्येक दबावून लिहून पाठविलें होतें. त्यावरून यांची त्रेधा होऊन खंडेरायास पाठवून देतों, तिकडून मातबर कोणी पाठवून देणें, खंडेरायास पाठवूं, ह्मणून ( निरोप घेऊन ) कारकून गेला होता. हैदरखान छ ३ रजबीं तुंगभद्रा पार होऊन कुपेळुरा जवळी उतरला आहे. मुलखांत तेथें मुकाम करून तेथील तीन चारशें खेड्यांची जिरायत खराबी जाहली. इतकियांत येथील कारकून जाऊन पाळला. हैदरखान याची भेट जाहली. 'खंडेराव भेटीस येत आहेत. येथून मात-

---

१ हें ही पत्र सावनूरच्या कारकुनानें गोपाळरावास लिहिलें आहे. २ खंडेराव. ३ सावरच्या नबाबास. ४ हलक्या बुद्धीच्या. ५ खंडणीचा ठराव करण्याकरितां. ६ हें इनाम मिठाई नेणारास हैदरानें दिलेलें.

बरास पाठवून द्यावें. मुलकास उपद्रव न होऊं द्यावे ' ह्मणून अली-जमाखान याचे गुजारतीनें बोलणें जाहलें. हैदरखान यांनीं फौजेस ताकीद केली कीं, ' स्वारी शिकारीस न जाणें. गवत मागून आणावें. ' ह्मणून ताकीद केली. येथें बाळाजी गणेश[1] यास हैदरखान यांनीं खंडेराव यास बोलाऊं पाठविलें आहे. बाळाजीपंत काल छ ९ रजबीं आदितवारीं दहावे तासीं आले. सामोरे आणावयास खंडेराव याचे पुत्र रामराव गेले होते. नबाबाची भेट जाहली. अकरा रुपये नजर धरून हैदरखान याची थैली दिली. स्नेहभावाचा मजकूर बाळाजीपंतांनीं सांगितलें त्याच प्रो थैलींतही लिहिलें होतें. सकृत्दर्शनीं इतकी बोली बोलून घरास आले. दिवाणजीच्या घरीं बाळाजीपंत उतरले होते. समागमें दोघे कारकून व सांडणीस्वार एक येणें प्रमाणें आहेत. काली रात्री खंडेराव व बाळाजीपंत यास ( नबाबाकडून ) निरोप जाहला. कालच खंडेराव प्रस्थानें जाऊन राहिले. आजी भोजन करून जातात. लष्करास गेलियावरी भेटी होऊन हरएक गोष्टीचा इत्यर्थ होईल तो सेवेसीं लिहून पाठवितों. बहुत काय लिहिणें हे विनंती.

नं० ८३४ श्रीगणराज. ( कार्तिक शुद्ध. नोवेंबरचा प० पंधरवडा. )

सेवेसीं[2] गोपाळराव गोविंद व आनंदराव भिकाजी. कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. हैदरअलीखान हरपनहळ्ळी उजवी घेऊन बसवापट्टणास जातो ह्मणून वर्तमान होतें, यास्तव आह्मी यावगल पो नवलगुंद नरगुंदचे पूर्वेस पांच कोस तेथें सात मुक्काम राहिलों. हैदरखान हरपनहळ्ळी उजवी घेऊन हरिहराहून चहूं कोसांवर मुक्काम करून राहिला. त्यानें गांव तो मारिले नाहींत. परंतु शिवार दरोबस्त चारिला. तेथून

---

१ हा हैदराचा कारकून खंडेरावास नेण्याकरितां आलेला. २ पत्र गोपाळराव पटवर्धन व आनंदराव रास्ते यांचें पेशव्यांस.

कुच करून हरीहर नजीक कोसावर येऊन (त्यानें) मुकाम केले. राजश्री लक्ष्मण[1] हरी हरीहरांत होते त्यांस भेटीस येणें ह्मणून पत्र पाठविलें. मशारनिल्हेनीं आह्मांस लिहिलें 'भेटीस बोलावितो.' आह्मीं लिहून पाठविलें कीं 'भेटीस न जाणें.' त्यावरून मशारनिल्हेनीं जावयास अनमान केला. चार मुकाम हरीहरानजीक पडले त्यामुळें परगण्याची बाकी राहिली नाहीं. हरीहर सरकारचें ठाणें, तेथें उपद्रव लागणार नाहीं, ह्मणून सारे परगण्यांचें व हरपनहळ्ळी तालुकियांचें गुळें (तेथें) येऊन राहिलें होतें. हैदरअल्लीखानाचा मनसुबा 'जर रा० लक्ष्मणपंत भेटीस येत नाहीं तरी हरीहरास तोफा लावाव्या' सारखें पाहून राजश्री लक्ष्मणपंतास जाणें प्राप्त जाहलें. गेले. भेटी घेतली. मशारनिल्हेचा आदर उपचार फार कांहीं केला. एक हत्ती व कंठी मोतियांची व दोन कडीं जडावाचीं दिलीं. हे गेल्यावर तिसरे दिवशीं चतुर्थी[2] गुरुवारीं हरिहराजवळ नदी[3] उतरून नदीतीरीं मुकाम केला. लष्कर उतरायास दोन दिवस लागले. त्याचे लष्करांतून (लक्ष्मणपंतास) कागद लिहितां नये. (त्यांनीं) हरिहरास येऊन आह्मास कागद लिहिला जे, "हैदरखान तुंगभद्रा उतरून उत्तरतीरीं मुकाम केला आहे. सावनूर[4] हावनूर यांस पत्रें गेलीं आहेत." त्यावरून आह्मीं यावगलाहून इंदुवारीं सप्तमीस कूच करून हंदिगल परगणें गदग येथें मुकामास आलों आणि सावनूरकरांस पत्रें पाठविलीं जे, "तुह्मांकडील वकील (हैदराकडे) न पाठविणें. खंडणी न करणें. आह्मीं तुमचे कुमकेस आलों. आह्मी इतके फौजेनिशीं आलों असतां सावनूरचे गळां हैदरअल्लीखान पडत नाहीं. श्रीमंतांनीं सर्व प्रकारें मागें तुमचें कल्याण केलें व पुढेंही ही फौज तुमचे साहित्यावर (सध्यां) पाठविली आहे." ह्मणून पत्रें रवाना करून दुसरे दिवशीं मंगळवारीं मुळगुंदचे मुक्कामीं

---

१ हा पेशव्यांचा हरिहर येथील मामलेदार. २ कार्तिक शुद्ध चतुर्थी. ३ हैदरच्या लष्करांतून परत आल्यावर. ४ अर्थात् सावनूरकर व हावनूरकर यांस.

आलों. मुळगुंदचे मुक्कामीं राजश्री माधवराव[1] शिवराम व अण्णाजी तमाजी आले. त्यांस ही सांगावयाचे रीतीनें सांगितलें कीं, तुह्मीं[2] वकील न पाठवावा. श्रीमंताचे चित्तांत विपर्यास येऊन तुमचें अकल्याण होईल. आह्मी तो तुमचे साहित्यास येऊन पावलों. येथून सावनूर दहा कोस आहे. आमची एक प्रहराची वाट आहे. तुह्मीं हैदरअल्लीखान यास साफ लिहून पाठविणें कीं, " वकील पाठविण्यास कांहीं गुंतों[3] नव्हता, परंतु श्रीमंतांच्या फौजा येऊन पावल्या. आतां आह्मांस वकील पाठवितां येत नाहीं. पाठविल्यास श्रीमंतांची मर्जी राहणार नाहीं. " ह्मणून लिहून पाठविणें. असेंही करितां हैदर अल्लीखान–रटेहळ्ळी कुंदेळूर नदीपलीकडे आहे, सावनुराहून विसा कोसांवर आहे,–हे फौज आली असतां अलीकडे येऊन सावनूरचें गळां पडत नाहीं. तो पुढें आला तरी आह्मीच सावनुरा जवळ येऊन उतरतों. पुढें न आला, तेथेंच राहिला, तरी एक दुसरा परगणा खराब करील. एखादें ठाणें घेईल तरी आह्मी घेऊन देऊं. ह्मणून बहुत प्रकारें सांगितलें. राजश्री माधवराव अण्णाजीराव यांणीं सांगितलें[4] कीं, आमचा त्याचा केवळ शीवशेजार. त्यानें राजश्री खंडेराव यास पाठवणें ह्मणून बहुत प्रकारें लिहिलें असतां न पाठविल्यास आह्मांस पुढें मागें पेंच पडेल. यास्तव राजश्री खंडेराव याणीं हैदरअल्लीखान याचे भेटीस जाऊन तीन दिवसांत माघारे यावें याप्रमाणें हैदरअल्लीखान यांणीं करार केला आहे. भेटीस मात्र यावें. खंडणीची गोष्ट बोलूं नये. याप्रमाणें हैदरअल्लीखान यांजकडून बाळाजीपंत, खंडेराव यास घेऊन जावयास आले आहेत त्यानींही करार केला आहे. त्यावरून काली मंगळवारीं राजश्री खंडेराव दिवाणजी निसबत सावनूरकर नबाब हे हैदरअल्लीखान यांजकडे जावयास निघोन गेल्याच दाखल ( आहेत. ) सावनूरकर नबाबानीं उभयतां मशारनिल्हे समागमें सांगोन पाठविलें कीं,

---

१ हे दोघे सावनूरच्या नबाबाचे वकील. २ सावनूरच्या नबाबानें. ३ हरकत. ४ माधवराव व अण्णाजीराव या वकीलानीं.

श्रीमंतांनीं सर्व प्रकारें आपला मान रक्षिला. गेली दौलत दिली. पुढेंही तेंच कृपा करतील. हैदरअल्लीखान यास भेटून खंडणी देऊन श्रीमंताचे अवकृपेस पात्र व्हावें हें आह्मांकडून कदापि होणार नाहीं. त्याणीं भेटीस पाठविणें (ह्मणून निरोप पाठविला) असतां न पाठवून लटका कलह वाढवावा (यांत अर्थ नाहीं) यास्तव आह्मीं खंडेरायास पाठविलें. खंडणी कांहीं देत नाहीं. जर करून आह्मी खंडणी दिली तरी आह्माकडे अंतर[1]. या प्रमाणें सांगोन पाठविलें. आह्मीं उत्तर केलें कीं, राजश्री खंडेराव हैदरअल्लीखान यांजकडे जातात. गेल्या उपर त्यांणीं खंडणी करार करून ऐवज पावता करून जा ह्मटलें तरी पुढें तजवीज काय केली आहे? ह्मणून विचारिलें. त्यांणीं उत्तर केलें कीं, आह्मासीं त्याचे वकिलानीं खंडणीचें बोलत नाहीं ह्मणून करार मदार केला. त्यानीं बेइमानी करून खंडणी मागों लागले आणि खंडेराव यास खंडणी करून ऐवज आल्या शिवाय नच सोडीत, तरी खंडेराव यास घेऊन जाऊत अगर चित्तास येईल तें करोत! परंतु आपण खंडणी देत नाहीं. ह्मणोन सांगोन पाठविलें. खंडेराव भेटीस गेल्यापासून दुसरे दिवशीं कुच करून शिकारपुरास जावें. तेथें फौज तोफखाना ठेवून सडें बिदनुरास जावें, याप्रमाणें (हैदराचा) मनसबा आहे ह्मणून सांगितलें. ते आपण बोलून स्नेहाचे रीतीनें खंडेराव यास पाठवितात, खंडेराव गेल्यानंतर हैदरअल्लीखान कुच करून जाणार, असें असतां आह्मी उगेंच सावनूर पावेतों गेल्यांत फल काय? आपले परगणे तुडवीत जाऊन कांहीं काम होणें नाहीं. तथापि सावनुरा पावेतों गेल्यानें तो आमचे दहशतीनें दहशत खाऊन उठोन जाईल असेंही होणें नाहीं. आणि सडाच आह्मांवर चालून येईल हेंही नाहीं. आह्मीच त्यावर तो आहे तेथें चालोन जावें तरी कांहीं होणें नाहीं. जागा अडचण

---

१ गुन्हा.

आहे. मागें सारे फौजेनिशीं खासास्वारीची गांठी पंनास हजार फौजेनिशीं पडली असतां तेथेंच राहिला. ते जागांच प्रस्तुत राहिला आहे. आह्मी आठ नऊ हजारानीं जाऊन फल नाहीं. त्यानें एखादे स्थळांस वेढा घातला तरी आह्मी श्रमसाहस करावें. तो ही शहास गुंतल्यावर त्यास ही शह बसेल तेव्हां आमचीं कांहीं साधनें. राहिल्या जागां जाऊन कांहीं होणें नाहीं. जाऊन हेपलाटे मात्र खावे इतकाच मजकूर दुसरी गोष्ट त्याची धमक खासा स्वारी आली तथापी झुजावें. हे उमेद असतां आह्मी थोडक्यानीं जावें हे मसलत नाहीं. यास्तव आजी मुळगुंदाहून कूच करून सोरटुरनजीक शिरहट्टी येथें डोंगर रान आहे, तृण काष्ठ उदक आहे, पांच सात मुकाम जाहल्यास चिंता नाहीं, असें पाहून मुकामीं आलों. खंडेराव हैदरअलीखान याचे भेटीस गेले आहेत. भेटीनंतर बेत काय होतो तो मनास आणून सेवेसी लिहितों. तूर्त हैदरखान याजवळ फौज[2] दहा हजार आहे. गारदी पंधरा हजार. प्यादे दहा हजार. कामाठी चार हजार. तोफा शंभर. सवाशें हत्ती. याप्रमाणें आहे. अनवटीस पेशजी राहिला होता त्या स्थळीं बातेऱ्यांचें काम चालीस लावलें आहे. खासा स्वारी या प्रांतें आल्यास अनवटीवर पेशजी प्रा राहून झुजावें हे मसलत आहे, ह्मणून बहुत मुखीं आइकतो बहुत करून तेथेंच आहे. आपाजीराम तह करून गेले आहेत. हुजूरचे आज्ञे प्रमाणें निशा पडल्यास गुंताच उरकला. कदाचित् तह बिघडला तरी खासास्वारी समागमें सामान भारी असावें. खर्चाची बेगमी असावी. गारदी चार हजार पावेतों असावे. स्वामी सर्वजाण आहेत. तरतूद करावयाची केलीच असेल. तथापि आमचे अल्प बुद्धीस सुचलें तें लिहिलें आहे. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना. सावनुरकरनबाब जातीनिशीं[3]

---

१ हैदरअलीवर पहिली स्वारी इ. स. १७६४ त झाली तींत. २ घोडेस्वार. ३ स्वत:.

स्वामींचे मर्जीशिवाय नाहीं. वरकड वृत्त मी[1] दर्शनास आलेवर निवेदन करीन. हे विज्ञापना.

नं. ८३९ **श्रीनिवासजयति.** ( कार्तिक शुद्ध दशमी. ९ नोवेंबर. )

श्रीमंत राजश्री दादा साहेब स्वामींचे शेवेसीं.

सेवक राजो तिमाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती येथील कुशल तागायत छ ९ माहे रजब जाणोन स्व कुशल लेखन करीत गेलें पाहिजे. विशेष. हैदरखान हालूर हावनूरकराचे गडीस लागून ठाणें काल मंगळवारीं घेतलें. तेथील ठाण्याची बंदोबस्ती केली. आंतील कांहीं मालमालियत दस्त करून हालूरचे रोखें पिछाडी, कुपेलूराकडे आघाडीचा रोख घातला आहे. राजश्री खंडेरावजी हैदरखानाचे सैन्यांत पावल्याचें वर्तमान आलें नाहीं. येतांच सेवेशीं लिहून पाठवितों. कुपेलुरचे रोख धरलियानें होनहळी समीप राहिले. स्वामींचे आवई दाटी पडली आहे. हैदरखान पुढें येणार नाहीं असा मनसुभा दिसतो. आपाजीराम पुण्याहून सावनुरास काल आलेचें वर्तमान शेवेसीं लिहिलें तें कळलें असेल. काल आपाजीराम यांनीं नबाबची भेटी घेऊन स्वांर होऊन अस्तमानास निरोप घेऊन गेले. आपाजीरामानीं नजर धरली. त्यानीं नजर धरल्यास नबाबानीं वस्त्रें देऊन निरोप दिल्हा. आपाजीराम यानीं वर्तमान सांगितलें जे श्रीमंत स्वामींचे सल्ला बेताळीस लाख वर खंडणी जाहली. मिराचा गुरम कोंडा घ्यावा, मीर गेला आहे त्यास श्रीमंतां जवळी पावते केलिया सल्ला जाहला, नाहीं तर सल्ला होणें नाहीं, ह्मणोन साफ सांगितलें ह्मणोन आपाजी रायानें वर्तमान

---

१ राजो तमाजी हा पटवर्धनांचा सावनूरकराच्या दरबारीं राहणारा कारकून. त्याचें हें गोपाळरावास पत्र. लिहिणारा मनुष्य कानडा आहे. २ पेशव्यांचा हैदराशीं.

सांगितलें तें सेवेसीं लिहिलें आहे. मुख्य हैदरखान नबाबाचे जिल्हेंत येऊन राजश्री खंडेरावजीस हैदरखानाचे वकिलासवेंच पाठविल्यावर इलाज चालेनासे जाहले. स्वामीचें आगमन व्हावयास दोन रोज अधिक जाहले यास्तव खंडेरायास पाठविलें, परंतु भेटी घेऊन येणार, पुढें मनसुबा यानीं कारण नाहीं. श्रीमंत स्वामीचे पायेस एकनिष्ठ नबाब आहे. जिराईत खराब होईल ह्मणोन ( दिवाण त्याचे भेटीस ) गेले आहेत. बहुत काय लिहिणें लोभ असों दीजे हे विनंती. पो छ ९ रजब

नं. ८३६ **श्रीगणराज.** ( २४ नोवेंबर. )

अपत्यें मोरोबानें साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत कार्तिक वद्य एकादशी भृगुवासरें मुकाम मिरज वर्तमान यथास्थित असे. विशेष. वडिलीं श्रीमंतांस पत्रें पाठविलीं होतीं त्याचीं उत्तरें आलीं तीं हल्लीं सेवेशीं पाठविलीं आहेत. त्यावरून सविस्तर मजकूर विदित होईल. राजश्री बाबुराव फडणीस यांस वायूचा उपद्रव होऊन पोटांत तिडकि उठोन फारच बरें वाटत नव्हतें याजकरितां राजश्री मोरोबा दादा माघारे गेले. प्रस्तुत थोडा बहुत उपशम आहे. समाधान वाटों लागल्यावर दादा फडणीस लष्करास येणार, ह्मणून काल पत्रें पुण्याहून आलीं त्यांत रामाजीपंत गोखल्यानें लिहिलें होतें. हल्लीं श्रीमंत जेजुरीस आहेत. आजपर्यंत भोंसल्याची वाट पहात होते. राजश्री साबाजी भोसले चार हजार फौजेनिशीं पैठणावर आले. सत्वरच भेटी होतील. याउपर दर-मजल खासा स्वारी येत आहे. श्रीमंत राजश्री नारायण रावसाहेब यांचा मुक्काम रामतीर्थावर आहे. वडिलाचीं पत्रें श्रीमंताकडे गेलीं आहेत तीं पावल्यावर त्यांचाही रोख सुरापुराकडे पडेलसें वाटतें. विदित होय हे विज्ञापना.

---

१ पत्र मोरो बल्लाळ याचें गोपाळरावास.

शा० १६९१ **हैदर व सावनूरकर.** इ. स. १७६९

नं० ८३७ **श्रीनिवास जयति.** ( कार्तिक शुद्ध द्वादशी. ११ नोवेंबर. )

श्रीमंत राजश्री दादा स्वामीचे सेवेशीं.

सेवक राजो तमाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती उपरी येथील कुशल तागायत छ ११ माहे रजब शनिवार प्रातःकाल जाणोन स्वकुशल लेखन करीत गेलें पाहिजे. विशेष. स्वामीनीं पत्र व स्वार जोडी हरकारे बातमीबदल पाठविल्या. येऊन छ १० रोजीं शुक्रवारीं दोन प्रहरास दाखल जाहल्या. काल शुक्रवारीं हैदरखानाचे लष्कराहून आमचा माऊस भाऊ भेटीस्तव आला. त्यांनीं वर्तमान सांगितलें जे सोमवारीं हालुराकडे येऊन हालूर ठाणें घेतलें. त्याज उपरांतिक सावनूर व हालूरची खंडणी चुकऊन रटेहळ्ळी व मासुरा वरून मायेनहाळ्ळी अलीकडे झाडीचे आसरेनें राहावयाचा सिद्धांत केला आहे. खुद्दमात्र बिदनुरास जाऊन सत्वरी येणार. याप्रकारचें वर्तमान सांगितलें. जडे अणवटीस बातेरा दोनी धारे बांधवीत आहे. राजश्री खंडेराव कुपेलुरास जाऊन पावल्याचें वर्तमान येऊन दोन रोज जाहले. अलीकडे वर्तमान नाहीं. भेटी जाहली किंवा नाहीं ते लिहिलीं आलीं नाहींत. स्वामीस वर्तमान लिहितों तें तहकीक करून घेऊन सेवेशीं लिहितों. स्वामीजवळी बहुतानीं सांगतील तरी पत्र येत नसेल, लष्कर आहे, सेवकानीं गलत लिहिणार नाहीं. सेवेशीं श्रुत होय बहुत काय लिहिणें लोभ कीजे हे विनंती.

---

१ नं० ८३५ चें व हें पत्र लिहिणारा इसम एकच. २ चुकती करून घेऊन. उगवून. ३ दोहों बाजूनीं.

नं. ८३८ श्री. (अजमासें कार्तिक शुद्ध. नोव्हेंबरचा प. पंधरवडा.)

पुं०॥ राजश्री गोपाळराव दादा स्वामीचे सेवेसीं:—

साष्टांग नमस्कार विनंति. हैदर नाईक याचे लष्करांत मुसाइंगेल[2] कुमदान[3] आहे. मातबर फिरंगी यांचा सरदार. त्याकडे आह्मी सूत्र लाविलें होतें. त्याणें आपणाकडील कारकून आह्माकडे पाठवून दिला आहे कीं, हैदर नाईक आपणास सरंजाम व वेतन चालवितो त्याप्रो तुह्मी आह्मांस चालवाल तर आपण येतों. त्याजवळ भारी सामान आहे. आणखी गारदी फिरंगी वगैरे जितके लागतील तितके घेऊन येतों ह्मणोन सांगून पाठविलें. आपला इतबार नसला तरी नव दहा सरदार त्यामध्यें[4] आहेत त्यांचे कैबिले[5] आणून ठेवितों. तुमची निशा जसी पडेल तशी करून देतों ह्मणतात. तूर्त सामान त्याजपाशीं आहे त्याची यादी त्यांणीं लिहून दिली आहे. त्याप्रमाणें रोजमुरा द्यावा ह्मणतात. ते यादी अलाहिदा पाठविली आहे त्यावरून कळों येईल. हे[6] त्यांतून फुटोन आले ह्मणजे त्यांचें लष्कर खालीं पडेल. याप्रकारें सर्वही ठीक केलें आहे. याप्रमाणें श्रीमंतांचा कौल व कराराची यादी आपणास आणून दिली ह्मणजे त्याघडीस आपण येतों ह्मणतात. त्यांस काय आज्ञा? हें काम कांहीं आमचें नव्हे. आह्मी सूत्र मात्र राखोन योग घडवूं परंतु लाखों रुपये देऊन त्यास संग्रही ठेवून त्याकडून चाकरी घेणें हें काम आपलें आहे. हीं अखत्यारीचीं कामें! कांहीं फौज व एक धणी करून पाठविला असता तर सर्व मनमबा ठीक होता. अद्यापि त्याचें सूत्र आह्मी तोडिलें नाहीं. त्याचा कारकून ठेवून

---

१ हरिहरचा मामलेदार लक्ष्मण हरी लागू यानें हैदराच्या लष्करांतील सरदार फितविण्याचा उद्योग केला होता त्यासंबंधें त्याचें हें गोपाळरावास पत्र. २ हा फ्रेंच सरदार इ० स० १७५९ पासून हैदराकडे राहिला होता. ३ पलटणीवरचा मुख्य सरदार. ४ त्याच्या फौजेंत. ५ बायकामुलें ओलीस. ६ हा फ्रेंच सरदार हैदराच्या लष्करांतून फुटून आल्यास.

घेतला आहे कीं, पुणेस लिहून पाठवून उत्तर आणवितों तंव पावेतों रहाणें, असें सांगोन ठेवून घेतलें आहे. त्यास काय आज्ञा करावी? दिलावरजंगाचें वर्तमान पहिलेंच लिहिलें आहे. त्याचे मार्फतीनें कित्येक लोक येणार. तोही आह्मांपाशींच आहे. असे नाना उपाय केले आहेत. परंतु आह्मांजवळ रुपये नाहींत व आपली आज्ञाही नाहीं. यास्तव शब्दपांडित्य मात्र करून ठेविलें आहे. परंतु कांहीं लटकें राजकारण नव्हे. खरेंखुरें केलें आहे. समयास कामावर पडेल. यादींत कांहीं कमीही होईल. त्यांनीं यादी लिहून दिल्ही तरी त्याचे मातबर कोणी येतील तेव्हां होईल. अजमास मात्र त्याचे कारकुनानीं लिहून दिल्हा त्यावरून लिहिलें असे. मीर[1] फौजुल्लाही येईल. त्याकडेही सूत्र लाविलें आहे. बहुत काय लिहिणें हे विनंती.

नं. ८३९ **श्रीगणराज.** ( अजमासें आश्विन शुद्ध. आक्टोबरचा प० पंधरवडा. )

अपत्यें नीलकंठानें[2] दोनिकर जोडून साष्टांग नमस्कार विज्ञापना. आह्मीं आज कल्होळचे मुकामास आलों. येऊन उतरतों तोंच ती. रा.

---

१ मीरफैजुल्ला हा शिऱ्यांच्या नबाबाचा जांवई. शिऱ्यांचें संस्थान नानासाहेब पेशव्यांनीं इ. स. १७५७।५८त जिंकिलें तेव्हां त्यांनीं यास पोटापुरती जहागीर दिली होती. परंतु ती टाकून देऊन तो हैदरास मिळाला व तेव्हांपासून हैदराच्या भाग्यास चढती कळा लागली. हैदरानें त्याचा मान मरातब चांगला राखिला होता. दरबारांत हैदराच्या मांडीशीं मांडी लावून त्याच गादीवर बसावें असा त्याचा मान असे व हैदराप्रमाणेंच यावरही चंवऱ्या धरण्याची वहिवाट पडली होती. इ. स. १७६९पासून हैदराची मीरफैजुल्लावर अवकृपा झाली. ती इतकी कीं त्यानें त्याचे मान व हक्क काढून घेतले व जहागीर काढून घेतली. त्याची सारी चीजवस्तुही बळजबरीनें घेतली. त्यानें त्यास कैदेंत ठेविलें नाहीं हें खरें, पण त्यास कामावरही ठेविलें नाहीं. या कृतघ्नपणाबद्दल कर्नल विल्क हैदरास दोष देतो, परंतु या पत्रांतील संदर्भावरून पाहतां मीरफैजुल्ला हैदराशीं बेइमानी करण्यास प्रवृत्त झाला होता हें स्पष्ट आहे. हीच बातमी हैदरास जर कळली असेल तर तो मीरफैजुल्लाशीं इतक्या निष्ठुरपणानें वागला यांत त्यास दोष देण्याचें कारण दिसत नाहीं. २ पत्र नीलकंठराव त्र्यंबक याचें त्र्यंबक हरीस.

दादांचें पत्र आजच आलें " हैदर नाईक यानें बल्लारीची खंडणी करून होसपेट तालुके हरपनहळ्ळी यास वेढा घातला आहे. आह्मी रामदुर्गेचे बारीनें मजल दरमजल जातों. तुह्मीं लौकर येणें " ह्मणोन. त्यास आह्मीं उद्यांपासून ( दररोज ) पांच सहा कोसपर्यंत मजल करून लौकरच जाऊन त्यास मिळतों. चि. रा. बाळास दो चौं दिवसांत पाठविणेचें करावें. मार्गाचें कठीण. तुंगभद्रातीरास वडील जातात. श्रीमंतांचीं पत्रें तुंगभद्रातीरास जाणेंविशी निकडीचीं आलीं त्याजमुळें चालले आहेत. आह्मीं कुलगोडावरून जातों. चिरंजीव राजश्री कोन्हेररायास व बाळास त्याच मार्गानें लवकर पाठवावें. शेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ८४० श्री. ( अजमासें आश्विन वद्य. आक्टोबरचा दु० पंधरावडा. )

राजश्रियाविराजित परोपकृतिनिरत राजमान्य राजश्री गोपाळराव स्वामी गोसावी यांसीं.

सेवक लखमव व हणमंतगौडा बहादूर देसाई परगणे गुंतल व सरकार बसवापट्टण वगैरे महालानिहाय. कृतानेक नमस्कार विनंती उपरी. येथील क्षेम श्रीश कटाक्षें जाणून स्वानंद वैभवातिशय लेखन करोन चित्ता परितोषविलें पाहिजे. विशेष प्रस्तुत स्वामीनीं दया करून पत्र प्रेषिलें तें पाहून संतोष जाहला. " हैदरअलीखान तुंगभद्रापार होऊन अलीकडे आलेचें वर्तमान ऐकून त्याचे सुमारें जात आहे. उदईक मंगळवारीं सिरहट्टीस मुक्काम आहे. या समयीं आपले जमाव सुद्धां येऊन भेट घेणें मध्यें उर्जित आहे " असे भाव दर्शविले वरोन अमृतपानायमान सुखावाप्ति जाहली. आह्मी तरी श्रीमंत स्वामीचे हातामधील, शामरावासारखे पूर्वीपासोन आज्ञेनुसार सेवा होऊन प्रवर्तक करणेंस ( ? ) अंतरलों नाहीं. पुढेंही न होणार. श्रीमंत स्वामीनीं.[1]—

---

१ पत्र इतकेंच अपूर्ण सांपडलें.

नं. ८४१ श्रीनिवासोजयति. ( कार्तिक वद्य दशमी. २३ नोवेंबर. )

श्रीमंत राजश्री दादा स्वामीचे सेवेसी.

सेवक[1] राजो तिमाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती येथील कुशल तागायत छ २३ माहे रजब गुरुवासरे रात्रीं एक प्रहर जाणोन स्व कुशल लेखन आज्ञा निरोपित गेलें पाहिजे. विशेष स्वामींनीं पत्र व तीनी जोडी हरकारे पाठविले ते आजी अस्तमानीं येऊन पावले. आपण कृपा करून बारा तेरा वेळी[2] हस्ताक्षर लिहिला तो नबाब साहेबांस वाचून अक्षरशाहा दाखविलें. ( त्यांनीं ) स्वमुखें रुबरू उत्तर दिलें जे ( हैद-राशीं ) आजी तागायत बोलीचा प्रसंग नाहीं. पुढें होणार नाहीं. ऐसीयास अमित्र मुलखांत शिरून नाहीं ते मुलूख खराब करितो. त्याहीवर राजश्री खंडेराव यांस पाठवणें ह्मणोन बाळाजीपंत निसबत हैदरखानासमागमें स्नेहाचीं पत्रें पाठविलें. याकरितां मुलुक नाहक तस-नास होईल ह्मणोन पाठविलें. या गोष्टीस नाहीं ते संशय चित्तांत आणिलीया इलाज काय आहे? आजीपर्यंत ऐवजाची बोली नाहीं. शिवशेजारचा काम यास्तव रवाना केले. आजी तागायत देवापा नाइ-काकडे येणें आहे. त्याजकडील ऐवजाचा मार्ग करवणें ह्मणोन बोलत जातो. राजश्री खंडेरायाकडून आजी बुधवारचीं पत्रें अस्तमानीं आलीं जे, नाइका कडील मजकूर सांगणें ह्मणोन बोलतो. येथील बोली नाहीं. त्याचे चित्तांत आहे जे, जडेंवडवटीकडे कुच करून जावें हे आवाई घालोन मासूरचें ठाणें घ्यावें हा मनोदय आहे. ऐसीयास यानीं हैद-राचा चीत[3] रक्षून आहेत. समीप फौज सरकारची आली असतां त्याचें चित्तांत कांहींच संशय नाहीं. निरभयें कडून स्थलीं आहे. धमकाची बोली बोलतो. स्वामीपाशीं सांगणारानीं पुष्कळ सांगितलें. असें असतां द्रव्यावर बोली उकले असलीयानें मुलूख, कींनिमित्यें खराब करील.

---

१ पत्र लिहिणाराविषयीं नं. ८३५ पत्रावर टीप दिली आहे. २ ओळी. ३ चित्त.

द्रव्याचा ठराव असता तर तो न करिता. नबाबानीं सांगितलें कीं सर्व स्वराज्य जाऊन नाहक पेंचाची बोली वरचेवर येतात. परम आश्चर्य आहे. घरापावेतों हैदरखान आला. मग नाइलाज याकरितां राजश्री मुरारराव घोरपडे जाऊन भेटले. संतोपानें कोणी जाऊन भेटले नाहींत. यास्तव सत्वरी त्याच्या मुलखांत फौजांची स्वारी जाहलीयास सर्व गोष्टी बरोबर राहतात. दिवाणजी जाऊन अपखुषी करतील हे तो होणार नाहीं. हावनूरचा नरसिंगरायानीं कोणें रितीनें लिहिलें आहे त्याचें त्यास कळे. त्याहीवर दिवाणजीनी कबूल केलीया त्याचा परिणाम कोण रितीनें होईल! मुख्य बोली प्रसंग तो घडणार नाहीं. मागून सेवेसीं लिहून पाठवितों. बहुत काय लिहिणें लोभ कीजे हे विनंती. पो छ २४ रजेब.

नं० ८४२ श्रीगणराज. (कार्तिक वद्य एकादशी. २४ नोवेंबर.)

अपत्यें[1] नीलकंठानें साष्टांग नमस्कार विज्ञापना ता। छ २४ रजब पावेतों यथास्थित असो. विशेष. सोरटुर नजीक शिरहट्टीचे मुक्कामावरून पेशजी पत्र पाठविलें तें पोचलेंच असेल. अलीकडील वर्तमान हैदर नाईक होसुरावरच आहे. सावनूरकर याचा दिवाण गेला होता त्याची भेटी जाली, खंडणीही केली, ह्मणोन काल वर्तमान उठलें आहे. येथें सावनूरकर याचे वकील बोलतात कीं, खंडणी करीत नाहीं, आणि वर्तमान उठलें एक दोन दिवसांत! लोक असे चोरून खंडणी देऊं लागले-वर उपाय काय? बारा हजार फौज जवळ कुमकेवर असतां खंडणी देऊं लागले तर फळ पावतील! श्रीमंत पुण्याहून निघाले. वांईस आले. तेथून क्षेत्रीचे[2] सुमारें येणार. धाकटे[3] श्रीमंत क्षेत्रास आले आहेत. तुंगभद्रा तीरीं एक जागां मिळालेवर पत्र आलें नाहीं. एक दोन दिवसांत येतील. हे विज्ञापना.

---

१ नीलकंठरावाचें त्र्यंबक हरीस पत्र. २ पंढरपुरास. ३ पेशव्यांचे बंधू नारायणराव.

शा० १६९१ **कर्नाटकाकडे कूच.** इ. स. १७६९

नं० ८४३ **श्रीगणराज.** ( मार्गशीर्ष शुद्ध तृतीया. १ डिसेंबर. )

चिरंजीव राजश्री आबास आशीर्वाद उपरी. श्रीमंताकडील पत्राचें उत्तर घेऊन जासूद आले त्यांज समागमें तुह्मीं पत्र कार्तिक वद्य एकादशीचें पाठविलें तें मार्गशीर्ष शु॥ प्रतिपदेचे दिवशीं अस्तमानी पावलें. श्रीमंतांचीं पत्रें तुह्मीं पाहूनच इकडे पाठविलीं. भाव सर्व कळला असेल. श्रीमंतांनीं स्वदस्तुरचें पत्र हुजरे यांजसमागमें छ २२ रजबचें रवाना केलें तें छ २८ रोज मीनहूस पावलें. त्यांतील भाव "तूर्त तुह्मीं कोठें आहां ? फौज किती जमा ? हैदरखान यानें खंडण्या कोठें कोठें घेतल्या, त्यापैकीं वसूल काय जाहला, बाकी किती, हें लिहिणें. पुढें आह्मीं कोणत्या सुमारें यावें ? आधीं कोणतें काम करावें ? कर्नाटकांत महागाई ( आहे असें ) सांगतात. चारापाण्याची सोय कोणीकडे ? रुकनुदौलास ( आह्मां ) बरोबर पाठवावेंसें नबाबचे मानस आहे. त्यास बरोबर घेतलेनें गुंदस्तां हिसके बसले आहेत ते तुह्मांस ठाऊकच आहेत ! त्यास फितुरी असतील ते ठेऊन येणें तर त्यानीं यावें. हिसके नसावे, छावणीस जरूर पडल्यास आह्मांबरोबर रहावें असें त्यांसीं बोलिलों आहों. केवळ तोडून त्यासी बोलिलों नाहीं. अन्वय लावून बोलत आहों. त्यास मोंगलास ( बरोबर ) घेतल्यानें ठीक पडत नाहीं. परंतु बरोबर घ्यावे न घ्यावे हें तुमचे विचारास येतें कीं नाहीं ? हें मनन करून समर्पक लिहिणें." ह्मणून लिहिलें होतें. त्यास आह्मीं उत्तर लिहिलें कीं, "सालमजकुरीं हैदरखान याचें पारिपत्य न जाहलें तर पुढें आटोपत नाहीं. यास्तव पोक्ता मनसबा करून यंदां पारिपत्य यथास्थित करावें. भोसल्यासही आणावें.

---

१ पत्र गोपाळरावाचें मोरो बल्लाळ यास. २ भोंसल्यावर स्वारी झाली तींत. ३ निजामअल्लीशीं.

मोंगलाकडील निखालसपणाचा प्रकार दिसोन आल्यास बरोबर घेऊन यावें. तमाम संस्थानिकांस मिळवून शत्रूचा रेंच[1] मोडल्याखेरीज बंदोबस्त होत नाहीं. हें यंदां न घडेल तर हैदरखान यानें तिकडील तमाम संस्थानिकांसीं बोलून ठेविलें आहे कीं, पुढें खंडणी तुह्मांस मागत नाहीं. जमावानिशीं बरोबर यावें. पेशव्यांशीं कृष्णेवर झुजावें, असें संस्थानिकांसीं बोलून ठेविलें आहे. याजकरितां यंदांच त्यास जरब देऊन ठायीं ठेवावा. महागाईचा प्रकार विशेष नाहीं. सालाबादीप्रमाणेंच धारण आहे. पट्टणाकडेच मनसबा पाडावा." असेच भाव लिहून पाठविले आहेत. आह्मीं याप्रमाणें उत्तर पाठविल्यानंतर श्रीमंतांचें पत्र तुह्मीं पाठविलें तें संध्याकाळीं आलें. त्यांतील भाव तो (इकडे) येण्याचेच आहेत. भोसल्याकरितां आटकले होते तेही आले. याजउपर जलदीनेंच यावयाचा प्रकार दिसतो. पुण्याचा बंदोस्त यथास्थित करावा. भोसले बरोबर आले तर नबाबाकडील फितुरी असतील ते टाकून रुकनुदौलास बरोबर आणिल्यानंतर नबाब मागे असले तरी खेळ होणार नाहीं असाही प्रकार लिहिला आहे. श्रीमंतांनीं "जें सांगणें तें राजश्री मोरोबास सांगितलें आहे. तुह्मीं लांब गेलां याजमुळें ते मागें राहिले. याजकरितां त्यांसही लौकर जाणें ह्मणून लिहिलें आहे" असें लिहिलें होतें. त्यास आह्मीं उत्तर लिहिलें कीं, "त्यास समाधान नाहीं. आंव पडती. महिनाभर घरीं राहून औषध उपाय करून आरोग्य जाहल्यावर येतील." असें लिहून पाठविलें आहे. तुह्मीं श्रीमंतास पत्र लिहिलें होतें त्याचें उत्तर आल्याचा भाव तुह्मांस श्रीमंतांनीं समक्ष कितेक मजकूर मनसबाचा सांगितला होता तो तुह्मीं लिहिला तो विस्तारें अवगत जाहला. आह्मीं हे सर्व भाव लिहिले आहेत. कोणतेंही न लिहिलें असा प्रकार दिसत नाहीं. तुह्मीं आरोग्य जाहल्यावर निघोन यावें. राजश्री बाबुराव फडणीस यांस समाधान नाहीं याजकरितां

---

१ गर्व. ताठा.

राजश्री दादा फडणीस गेले ह्मणून लिहिलें तें कळलें. कबुलातीचा मजकूर दोन तीन पत्रीं लिहिला परंतु उत्तर कांहींच लिहिलें नाहीं! किंवा तुमचे चिटणीस वाचून दाखवीत नाहींत किंवा स्मरण होत नाहीं न कळे! त्याची तजवीज करावयाचे वाटेनें करणें. होमिकट्टे मामलतीचा मजकूर लिहिला, ऐशास जास्ती मिळकत असतां टाकूं नये खरेंच. परंतु तो शेणवी लबाड आहे. सोंधें वगैरे मामलत त्याजकडे आहे. मामलत त्याजकडून काढली तरी मामलतीचा बखेडा करील. यास्तव मामलतीची घालमील करूं नये हें आमचे चित्तास येतें. तुमचे विचारें दावलकरा-प्रमाणेंच जाहलें तरी करणें, आमचा आग्रह नाहीं. सुचलें तें लिहिलें आहे. तो लबाडीस चुकणार नाहीं. राजश्री पांडोबास तुह्माकडे जाणें ह्मणून लिहिलें आहे. बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद.

सावनूरकरामुळें गदग लक्ष्मेश्वर मुलगुंद तीन परगणे तुडवले. उपाय नाहीं. येथें मुकाम जाहल्याचा पर्याय तीर्थरूपाचें पत्रीं लिहिला आहे त्यावरून कळेल. मंगळवारीं सा घटका रात्रीं पर्जन्य पडों लागला तो सारीरात्र घटका दिवसपर्यंत सतत पाऊस पडला. चार चार गावांत पाऊस पडल्याची खबर आली. जिकडे पाऊस तिकडील रबी आली. मिरज प्रांतीं पडला असल्यास उत्तमच जाहलें. फार दिवस श्रीमं-ताकडील वर्तमान कळत नाहीं. तुह्मीं तहकीक वर्तमान आणून लिहित जाणें. श्रीमंतांचीं पत्रें यावीं, त्यास आमचें स्मरण कोण देतो! त्याणीं कां ल्याहावीं! आमची फौज झाडून जमा जाहली. खंडोजी फराटे ही आले, त्यांचा राऊत काल संध्याकाळीं आला. राहतां फलटणकर पवार व बाजी जाधव (व) खासा–वडग्याजी गोडसे राहिले आहेत. तुह्मीं उभयतांकडे दोन माणसें मुद्दाम पाठवून सत्वर येत तें करणें बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद. अपत्यें गंगाधरानें

---

१ गोविंद हरीच्या.

साष्टांग नमस्कार विज्ञापना. सदैव आशीर्वाद पत्र पाठवावयास आज्ञा केली पाहिजे हे विज्ञापना.

नं. ८४४ श्री. ( मार्गशीर्ष शुद्ध तृतीया. १ दिसेंबर. )

श्रीमंत राजश्री आबासाहेब स्वामीचे सेवेसी.

विनंती सेवक आपाजी[1] त्रिंबक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत छ २ साबान पावेतों वर्तमान यथास्थित असे. विशेष. स्वामीस दोन पत्रें पाठविलीं ( परंतु ) उत्तर न आलें याजमुळें चित्त उद्विग्न आहे. सदैव पत्रीं सांभाळ करावयास स्वामी समर्थ आहेत. आपणास अद्याप आंव पडतच आहे ह्मणून श्रीमंत राजश्री रावसाहेबांचे[2] पत्रीं लिहिलें होतें त्यावरून चिंता लागली आहे. औषध उपाय होतच असतील. आरोग्यतेचें ल्याहावया आज्ञा करावी. श्रीमंतांचें[3] पत्र स्वदस्तुरचें हुजरे यांसमागमें परवां आलें त्यांतील भाव पुढील कर्तव्याचेच लिहिले होते कीं, " पुढें आह्मीं कोणत्या सुमारें यावें, आधीं कोणतें काम करावें, कर्नाटकांत कोणते संस्थानाजवळ ( हैदरानें ) खंडणी किती घेतली, वसूल काय जाहला, कर्नाटकांत महागाई फार सांगतात, नबाब निजाम अल्लीखान यांजकडील रुकनुदौला येणार, फितुरी त्यांजकडील असतील ते टाकून हलके करून आणावे असें मानस आहे. त्यास तिकडील मनसब्याचा अर्थ सारा ध्यानांत आणून लिहून पाठविणें. वरकड जें सांगणें तें राजश्री मोरोबास सांगितलें आहे. त्याची तुमची गांठ पडत नाहीं. लवकर तुह्मांकडे जाणे ह्मणून आबास पत्र पाठविलें आहे. लवकरच येतील." असे मनसब्याचे भाव फार कांहीं लिहिले होते. त्यास

---

१ गोपाळरावाचा चिटणीस आपाजी त्रिंबक पोंक्षे याचें हें मोरो बल्लाळ यास पत्र. मागचें पत्र गोपाळरावानें लिहिलें आहे त्याचाच अनुवाद या पत्रांत केलेला आहे. २ गोपाळरावाच्या. ३ पेशव्यांचें.

श्रीमंत राजश्री रायांनीं उत्तर समर्पक लिहिलें, कीं, " यंदा त्यांचें पारिपत्य न केलें तर हा पुढें आटोपत नाहीं. एक छावणी पडली तरी कबूल करून. महंमदअल्लीसही येविसीं आगत्य. नबाबाकडीले निखालसपणें येत असल्यास आणावें. भोसल्यास आणावें. तमाम पाळेगारांस खंडण्या माफ कराव्या. जमावानिसीं साऱ्यांस बरोबर घ्यावे. पोक्ता मनसबा करून एकदां रेंच मोडावा. हें सालमजकुरी न घडेल तर सालमजकुरीं हैदरखान याणें तमाम संस्थानिकांसीं बोलून ठेविले आहे कीं पुढें खंडणी तुह्मांजवळ घेणें नाहीं. जमावानिशीं चाकरीस यावें. श्रीमंतांसीं कृष्णेवर झुजावें असें बोलून ठेविलें आहे. चार रुपयांवर नजर देऊन तह उरकून माघारे गेल्यास पुढें इतक्या गोष्टी घडतील यास्तव यंदांच खामखा पोक्ता मनसबा करून रेंच मोडावा " असे भाव कांहीं फार लिहिले आहेत. रायांसच पत्र होतें. आणखी कोणास नव्हतें. " राजश्री आत्राही लवकरच येतील परंतु त्यांचें शरीरीं समाधान नाहीं, आंव पडती, याजकरितां घरीं राहिले. उपशम होतांच येतील. ह्मणून श्रीमंताचें पत्रीं लिहिलें आहे. सांवनूरकराची खंडणी चाळीस हजार होनावर, दरबार खर्च खेरीज करून जाहली. काल पत्रें आलीं. याशिवाय देवापा नाईक याणीं त्यांचें देणें आहे. दहा हजारपावेतों तें वारून घ्यावें. सोंदेंचीं खेडीं दहा सावनूर-

१ गोपाळरावानें. २ हैदराचें. ३ करू. ४ अर्काटचा नबाव महंमदअल्ली यास ह्मणजे अर्थात् त्याचे सोबती मद्रासकर इंग्रज यास. ५ निजामअल्लीकडील. ६ निखालसपणें=सरळपणानें. कांहीं फंद फितूर करण्याची वासना न धरितां. ७ हें सल्ला मसलत विचारण्याकरितां गोपाळरावास पेशव्यांनीं पत्र पाठविलें, परंतु त्याबरोबर त्याच्याच जोडीचा सरदार व आपला मामा आनंदराव रास्ते होता त्यास यापैकीं कांहींच लिहिलें नाहीं असा भाव. ८ सावनुरकरास चाळीस हजार होन खंडणी हैदरास द्यावी लागली. शिवाय दरबार खर्च. त्या शिवाय देवाप्पा नाइकाकडील येणें दहा हजार होन बुडालें तें निराळेंच! देवाप्पा हा हैदराचा सावकार. ९ सोंदें तालुक्यापैकीं.

कराकडे आहेत तीं द्यावीं ह्मणून हैदरखान बोलतो ह्मणून लिहिलें आलें होतें. नबाब तो पैसा खंडेराव याणी कबूल केला तरी देत नाहीं ह्मणून बोलतात असें वकील हल्लीं बोलतात तें लटीक. अतरंगें पैका देतात! पर्ज्यन्य काळीं पटकी[1] बसेल ह्मणून आंतलेआंत कबूल करितात! इकडेही (त्यानीं) लक्ष राखिलें आहे. दर्शनीं कळेल. सावनूरकराची खंडणी आपाजीराम याचे विद्यमानें उरकली. तबकेंदलैली[2] मशारनिल्हे इनाम मागतात ह्मणून ऐकतों. यंदांचा[3] मनसबा भारी दिसतो. आपण आरोग्य होतांच यावयाचें करावें. हिशेब लवकर होतील न होतील असें दिसतें. रा० लक्ष्मणपंत[4] यांचे मानस तूर्त मिरजेस जाण्याचे दिसत नाहीं. असें करितां निकडच झाली तर कारकुनासमागमें हिशेब पाठवून देऊं ह्मणून बोलत होते. श्रीमंत रा० श्रीपतराव यांसही आपणासमागमे घेऊन यावें हें उत्तम. यांत स्वामीची मर्जी प्रमाण. सेवेसीं विदित होय हे विज्ञापना.

नं० ८४५ श्रीगणराज. (७ दिसेंबर.)

अपत्यें[5] वामनानें साष्टांग नमस्कार विनंती येथील कुशल तागायत मार्गशीर्ष शु॥ नवमी गुरुवासर वर्तमान यथास्थित असे. विशेष. श्रीमंत काल बुधवारीं श्रीक्षेत्रास[6] आले. काल साहित्य करकंब मंगळवेढें याकडील दिल्हें. आज भोसेकराकडे[7] चिट्ठ्या जाहल्या. उदईक सांगोलें कासेगांव परगण्यावर होतील. परवां एकादशीसही मुक्काम होईल.

---

१ पटकी बसेल=नाश होईल. पावसाळ्यांत नद्या भरल्या व मराठ्यांचें लष्कर परत गेलें ह्मणजे हैदर येऊन आपल्या राज्याचा नाश करील ह्मणून. २ हें कोणच्या तरी गांवाचें नांव दिसतें. ३ हरिहरचा मामलेदार. ४ ह्या ज्यास पत्र लिहिलें आहे त्या मोरोबा आवाचा मुलगा. हा वयानें लहान होता तरी इतक्यांतच त्यास स्वारींत बरोबर आणावें अशी सूचना. ५ हें गोपाळरावास धाकटा बंधु वामनराव याचें पत्र. ६ पंढरपुरास. ७ भोसें या गांवच्या लोकांस चिठ्या गेल्या कीं अमुक अमुक सामान पेशव्यांस मेजवानीकरितां पुरवावें.

द्वादशीस कूच होणार. सुरापुराकडे जाणार. फौज समागमें हुजुरात वगैरे चार हजार होईल. राजश्री साबाजी भोसले दोन हजार फौजेनिशीं आहेत. राजश्री गोविंदराव गाइकवाड हजार बाराशें राऊतांनिशीं आहेत. सारी हुजूरातसुद्धां सात हजार फौज आहे. वरचेवरी जमा होतात. श्रीमंत राजश्री नारायणराव साहेबांजवळ पांच हजार फौज जमा जाहली आहे. उमदी पा करजगी येथें श्रीमंत राजश्री नारायणराव साहेबांचा मुक्काम आहे. श्रीमंत त्या सुमारें गेले ह्मणजे एकत्र होऊन पुढें मजल दरमजल सुरापुराकडे जाणार. सुरापुरची खंडणी जाहली नाहीं यास्तव तिकडे जाऊन खंडणी करून देवदुर्गावरून अदवानी डावी टाकून जाणार असा मनसबा आहे. तीर्थस्वरूप राजश्री मोरोबा आबास करजगी जतच्या सुमारें बोलाविलें आहे. आबाचें पत्रही आलें होतें कीं शुक्रवारीं निघोन येतों. ते निघाले असल्यास उत्तमच आहे. आह्मी करकंबेस गेलों होतों. काल तिसरे प्रहरीं क्षेत्रास आलों. श्रीमंताची भेट जाहली. बोलणें चालणें जाहलें. आज आह्मास श्रीमंतांनीं भोजनास बोलाविलें होतें. श्रीमंतांस अगोदर समाधान नव्हतें याजकरितां शरीर कृश आहे. राजश्री मोरोबा दादा अद्यापि आले नाहींत. उदईक पुण्याहून निघणार. श्रीमंत निघोन गेलेवर आह्मी निघोन येतों. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना. पो छ ११ साबान रविलाखर.

नं. ८४६ श्री. ( १८ दिसेंबर. )

गोविंद हरीचें गोपाळरावास पत्र मार्गशीर्ष वा। ६ गुरुवार.

" हैदरखानाकडील लोक तमाम उठून आलेला मजकूर कळला. जेव्हां मराठे राउत आले तेव्हां सहजच किल्लयांत राहिला. बेवकुब लोक ! नाहक जाऊन लोभास गुंतून फजीत पावले. मग उठोन आले. बहुतांचीं घोडीं मेलीं. लोक मेले. बोलावयास देखील जागा नाहीं. या उपरी मराठे त्याजकडे जाणार नाहींत असें आमचे मतें. परंतु जातील ! निर्लज्जांस लाज नाहीं. लोक आले त्यांच्या नांवनिशीची याद पाठविली ती पावली."

नं. ८४७ श्री. ( मार्गशीर्ष शुद्ध एकादशी.
९ डिसेंबर. )

गोपाळरावाचें मोरो बल्लाळास पत्र १० साबानचें.

" आज एक महिना तीन दिवस येथें अडचणीमुळें मुक्काम जाहले. श्रीमंतांचीं पत्रें आलीं कीं हैदरखानावर जावें. कही कबाड बंद करावें. त्याजवर सलाबत पडे, तो लवकर हाले, तो प्रकार करणें ह्मणून लिहिलें होतें. त्याजवरून आज आह्मी येथून कुच करून सावनुराकडे गेलों."

नं. ८४८ श्री. ( मार्गशीर्ष वद्य एकादशी.
२४ दिसेंबर. )

वासुदेव धोंडो याचें पांडुरंगरावास पत्र २४ साबानचें.

" साऱ्या फौजा सावनुराजवळ आहेत. नरसिंगराव घायगुडे आज फौजेसुद्धां श्रीमंतांकडे गेले. श्रीमंतही कोपाळचे सुमारें तुंगभद्रातीरास एकदोन रोजीं येतात. हैदरखान मामूरचे बारीस आहे. चार गांवाची तफावत या फौजांस व त्यास आहे. लुटीचा प्रकार तो नाहीं यामुळें खर्च भारी आहे."

नं ८४९ श्री. ( मार्गशीर्ष वद्य सप्तमी.
१९ दिसेंबर. )

अपत्यें[1] मोरोबानें साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत छ २० साबान मुक्काम गजहल्ली नजीक बागलकोट. वडिलांचे आशीर्वादे करून वर्तमान यथास्थित असे. विशेष. वडिलांचा[2] निरोप घेऊन निघालों ते येरंडोलीसे[3] मुकामास आलों. दुसरे दिवशीं खिळेगांव पाडगांव येथील मुक्काम केला. तों लष्करचा सुमार लागला नाहीं. मग तेथून जतेस गेलों तों लष्करें

१ पत्र मोरो बल्लाळ याचें गोपाळरावास. २ गोविंद हरीचा. ३ मिरजेपासून तीन कोसांवर.

करजगी तालुक्यांत आलीयाची बातमी लागली. मग आह्मी होनवाडास गेलों तों श्रीमंत कृष्णातीरीं हिपरगीयास गलगल्याच्या अलीकडे मुक्कामास होते. तेथून गलगलें टाकून पुढें पांच कोस लष्कर गेलें. आह्मी कृष्णातीरास आलियावर श्रीमंतांस चिटी पाठविली. काल रविवारीं लष्करांत दाखल जाहलों. त्या दिवशीं आह्मांस मजल लांब पडली यामुळें श्रीमंतांकडे गेलों नाहीं. आज इंदुवारीं प्रातःकालची भेट जाहली. प्रथमता श्रीमंतांचा रोख सुरापुराचा होता परंतु तो मजकूर तसाच राहिला. प्रस्तुत मजल दरमजल हैदरखानावर जाण्याचा रोख आहे. लष्करांतून वडिलांकडून श्रीमंतांस पत्रें आलीं होतीं. आपाजीराम बोलीचालीमुळें हैदरखानाकडून वडिलांकडे आला आहे. याउपर पक्का खंडणीचा प्रकार जाहला तर पुढील बंदोबस्त करून तहाचा प्रकार होणें तो होईल. खंडणीचा प्रकार नच बनला आणि हैदरखान झाडींत शिरला तर त्याच्या तोंडावर थोडीबहुत फौज ठेवून त्याच्या मुलखांत मुलुखगिरी होईल असाही प्रकार आहे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

नं. ८९० L श्री. ( पौष शुद्ध द्वितीया. ३० दिसेंबर. )

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री रामचंद्रपंत स्वामीचे सेवेसीं.

पोष्य बाळाजी जनार्दन साष्टांग नमस्कार विनंती उपरी येथील कुशल तागायत छ १ रमजान पावेतों वर्तमान यथास्थित असे. विशेष. तुह्मीं पत्र पाठविलें तें पावलें. “ पुण्यांत कोटि मृत्युंजयास शत ब्राह्मण लाविले आहेत ह्मणोन कळलें, त्यास जे ब्राह्मण लाविले तेच अनुष्ठान समाप्त होइपर्यंत राहूं द्यावे व यजमानांस आरोग्य

---

१ पत्र नाना फडणीस यानें पुण्याहून नाशिकास गोपिकाबाईचा कारकून रामचंद्र नारायण गोरे यास लिहिलेलें. २ पेशवे यांस.

होण्या विषयीं प्रार्थना करीत जावी. कोणी त्वरेनें जप करितो. कोणी सावकाशीनें करितो. त्यांची प्रार्थना करावी कीं, आठ पंधरा दिवस लागले तर लावून ( जप ) सांग करावा. अनुष्ठानावर शिष्ट ब्राह्मण चौकशीनें करवावयासीं कोण ठेविले त्यांचीं नांवें लिहून पाठवावीं. श्रीमंतांचे शरीरप्रकृतीचें वर्तमान कांहींच लिहून येत नाहीं. मागें सावकाश नव्हतें. प्रस्तुत सावकाश वाटतें असें ऐकिलें. तर श्रीमंतांचे प्रकृतीचें वर्तमान कच्चें पक्कें आढळेल तें लिहून पाठवीत जावें. अनुष्ठानांत व्यंग पडूं न द्यावें. अनुष्ठान होय तों आपण वरचेवर समाचार घेऊन सांग करवावें. ब्राह्मणांनीं वाड्यांतच निजावें. हिमाइती ब्राह्मण आणि उपयोगी नसतील ते दूर करून दुसरे परिक्षेचे उत्तम लावावे ह्मणोन आज्ञा[3] जाहली आहे. उत्तर येईल त्या प्रमाणें विनंती करीन" ह्मणून विस्तारयुक्त लिहिलें, त्यास मीच लष्करांत गेलों होतों तेव्हां श्रीमंतांस विनंती केली कीं कोटि मृत्युंजयाचे अनुष्ठान करावें. त्यावरून आज्ञा जाहली कीं तुह्मी सर्व बंदोबस्त करून सांग होई तें करणें. त्यावरून मी पुण्यास आलियावर वेदमूर्ती राजश्री सदाशिव दीक्षित दाते यांस बोलावून त्यांकडून ब्राह्मण साक्षर चांगले पाहून लिहविले. सदाशिव दीक्षितांचा प्रकार प्रामाणिक निस्पृह खसखशीत. या करितां श्रीमंतानीं ही आज्ञा केली होती कीं, त्यांचे मार्फत अनुष्ठानास ब्राह्मण लावावे. तसेच दीक्षितानीं लिहिले. तदनंतर थोर थोर पंडित व आश्रित कोणी मांत्रिक असे जमा करून ब्राह्मण नेहमीं लाविले. मंत्रांच्या परीक्षा ब्राह्मणांच्या घेतल्या. त्यांत आपस्तंब आश्वलायन दोन मंत्र. त्यांत आश्वलायनच मंत्र ब्राह्मणांचे नीट करून मधुपर्क पुजा करून संकल्प केला. आचार्य बापुभट जोगळेकर अग्निहोत्री. व ब्रह्मे वेंकट श्रोत्री. सदस्य बापुभट पाळंदे. उप-

---

१ ब्राह्मणांची. २ आरोग्य. ३ आज्ञा गोपिकाबाईची.

द्रष्टे उपेंद्र श्रोत्री. या प्रमाणें आचार्य वर्ण द्यावया जोगे येथें नाहींत या करितां जोगळेकर थोर ब्राह्मण जाणून दिल्हे. वरकड तित्रेही फार चांगले आहेत. मी नित्य जाऊन ( ब्राह्मणांस ) प्रार्थना करीत असतों व समाचारही घेत असतों. चौकशीस कोण कोण ह्मणून लिहिलेंत, त्यास जपास ब्राह्मण बसले ह्मणजे पांच ब्राह्मण पूर्वाभिमुख, पांच उत्तरभिमुख बसवावे, त्यांत एक एक आश्रितानीं जवळ बसावें. त्यानीं ब्राह्मणांचे मुखाकडे पाहत असावें. शिंक व जांभई आली तर त्यांत रुद्राक्ष माळेचा ओढूं नये. तो आश्रितानीं पहावा. या कार्यास रामशास्त्री, धोंड जोशी श्रीवर्धनकर, सदाशिव दीक्षित दाते, महादेवशास्त्री, काशिनाथ शास्त्री, भिंक जोशी पंचनदीकर व आचार्यादिक चौघे याणीं जप समाप्त होईपर्यंत बसावें. प्रत्यह सहस्र जप एक ब्राह्मण करितो. ज्याची त्वरा चालत नाहीं त्यास घटका दोन घटका अधिक लागतात. तिसरे प्रहरीं भोजन करितात. प्रत्यह एक पक्कान्न अथवा क्षीर. भोजनाचें उत्तम करितों. थोरले रावसाहेबांचे[१] दिवाणखान्यांत देवतास्थापन व ब्राह्मण जपास बसतात, व भोजन करितात. व निद्रेस थोरलें देवघर श्रीमंत राजश्री नारायणरायांचें केलें आहे. ब्राह्मण बाहेर जाऊं देतच नाहीं. दोघे अग्निहोत्री मात्र होम देऊन वरचेवर येतात. जितके प्रकार तुह्मीं लिहिलेत तितकेही अगोदरच केले आहेत. ब्राह्मण हिमाइती वगैरे लाविलाच नाहीं. व लावतानाच चांगले योजूनच लाविले. ' बहुत दिवस आपणाकडून पत्र येऊन वर्तमान कळत नाहीं ' ह्मणोन लिहिलेंत, त्यास पुण्यास आलियावर श्रीमंत मातुश्रीस सर्व वर्तमान कळवावें याकरितां त्रिंबकपंतास एक पत्र पाठविलें व त्या मागून तुह्मांसही मुजरत प्याद्याबरोबर पाठविलें

---

१ थोरले बाजीराव साहेब ज्या दिवाणखान्यांत बसत होते तेथें.

त्यावरून कळलेंच असेल. श्रीमंताचे लष्करचीं पत्रें पुसेसांवळीचे मुक्कामचीं छ २८ साबानचीं आलीं. प्रकृत चांगली आहे. फौज कर्नाटकांत रवाना करून महिन्या पंधरा दिवशीं फिरतील असा प्रस्तुत मनसबा आहे. सविस्तर विनंती करावी. नेहमींच जपाचे ब्राह्मण लाविले ह्मणून वरतें लिहिलें, त्यास चार महिने नेहमीं ब्राह्मणास व्रतस्थ राहणें. नेम करून राहणें कठीण पडतें. या करितां अध्यांकडे अर्धे (?) दुसरे उत्तम लावून करावे असे सर्वांचे मतें आहे. बहुत काय लिहिणें लोभ असों दीजे हे विनंती. पो छ ९ रमजान.

नं० ८९१ श्री. ( अजमासें मार्गशीर्ष वद्य.

दिसेंबरचा दु० पंधरवडा. )

सेवेसीं[1] साष्टांग नमस्कार विज्ञापना राजश्री सखारामपंत धड पुण्यांतही नाहींत आणि स्वारीसमागमेंही नाहींत. मध्येंच राहिले आहेत. ते हुजूरचे आज्ञेवरून राहिले असतील, परंतु केवळ रिकामे बसणार नाहींत. पुण्यांत असल्यापेक्षां [2]येथें निर्वेध आहेत. पुण्यांत असल्यास त्यांजकडे कोण गेला, कोणासीं काय बोलतात, इतके तरी ( तर्क लोक ) करतील. येथें कोणी तर्क करावयासही नाहींत. कोणी कोणाचा संकोच करावा असाही कोणी नाहीं. सुचलें तें लिहिलें आहे. केवळ पत्रावळ होऊन बसण्यांत ( सखारामपंताचा ) संतोष किती राहील हें स्वामींनीं चित्तांत आणावें. आह्मीं लिहिलें तरी आकसानें लिहितों असेंही आपल्या मनांत येईल! ते काय करितात हेंही आह्मांस पुरतें कळलें नाहीं. परंतु उगेच मध्यें राहिले आहेत याचा संदेह चित्तांत येऊन लिहिलें आहे. हे विज्ञापना.

---

१ ही गोपाळरावानें पेशव्यांस पाठविलेल्या चिटीची नक्कल. २ पेशवे स्वारीस कर्नाटकांत गेले आणि सखाराम बापू दूर मागें देशीं राहिला तर कांहीं बखेडा करील या शंकेनें ही चिटी लिहिलेली होती!

नं० ८९२ श्री. ( पौष शुद्ध षष्ठी.
३ जानेवारी. )

पु०॥ राजश्री गोपाळरावजी दादा गोसावी यांसीं.

[1]विनंती उपरी. " आपण लाइर्लो[2]जास हैदरखानाची भेटी घेतली. तो समय काबू राखिल्याचा कबूल. परंतु दीड दोन महिने भेटी जाहल्यावर पत्र न यावयास कारण कोणतें? असो. हें वांटितां गांठी पडत नाहीं वाहिली गंगा, राहिलें तें तीर्थ. होऊन गेलें तें गेलें. याउपरी तरी ति[3]कडील मोहास न गुंततां श्रीमंतास वचन दिल्याप्रमाणें सत्य करावें. दुसरीकडे लक्ष ठेवूं नये. तसें मनःपूर्वक असलें तर निघावयाची तरतूद करावी. आह्मीं आपले ठायीं इतर भाव ठेवीत नाहीं. " ह्मणोन चित्तापासून लिहिलें तें कळलें. ऐसियास आपल्यास व नागोजी-राव श्रीनिवास यांस सांगोन व लिहून हे भाव पूर्वींच परिहारांत आणिले असतां हरघडी तोच दाखला देऊन लिहावेसें नाहीं! लाइ-लाजास त्या रीतीनें डाव मारून नेला इतकाच भाव त्या पदार्थी समजावा. आपण तागायत ( ? ) इकडील साभिमानास शोचतां व आह्मी सर्वस्वें येथील विचार आपल्यावर सोंपिला असतां या लक्षांत दुसरा लक्ष कसा कामास येईल? तथापि [4]तो तंतु राखिल्यांत कोणाची उभा-रणी होणें आहे? राजश्री पंत प्रधान याणीं सर्व प्रकारें अंतःकरणांत घेऊन चालविलें. पुढें अधिकोत्तर बंदोबस्त करून घ्यावा हें त्यांच्या चित्तांत. व त्यांचा मनोधर्म रक्षोन या दौलतीची पोक्ती उभारणी करून घ्यावी हे आमची अपेक्षा. आपणासारखे बंधु हा योग घडावयास सापेक्ष तत्पर असतां अल्प लक्ष रक्षण्यांत काय ( फल )

---

१ पत्र मुरारराव घोरपडे यानें गोपाळरावास लिहिलेलें आहे. हें मुख्य पत्र नसून पुरवणी आहे सबब श्रीकाराच्या ठिकाणीं ' श्रीसुबराज ' हीं अक्षरें नाहींत. २ नाइलाजास्तव. ३ हैदरखानाकडील. ४ हैदराकडील सूत.

आहे ! जो प्रकार होणें तो राजश्री पंत प्रधान यांच्या अंतःकरणें व आपल्या साह्यें कडूनच होऊन यावा. आह्मी आपल्याशिवाय परिछिन्न दुसरें जाणत नाहीं. श्रीमंतांजवळ बातम्या अगर कोणाची सांगणी आमच्या आचरणाविषयीं विषम रीतीची जालियावर त्यानीं न जावें. सकल प्रकारें इकडील विषयीं चित्ताची निश्चयता असू द्यावी. आपण आमच्या चिताचा खंबीर[1] घ्यावयास इतकें लिहिलें (असलें) तरी तसा प्रकार सर्वथा चित्तांत येऊं न द्यावा. प्रतिवर्षी आल्याप्रमाणें मात्र मनसबा वरचेवर करून जावयाचें न करावें. अरळ तरळ करून राजश्री पंत प्रधान स्वदेशास गेले ह्मणजे मागं आह्मांस कठीण पडतें. त्या प्रसंगीं हरकसें करून काबू साधून त्यांची स्वारी येईपर्यंत कालक्षेप केल्या प्रकारें संशयसमुद्र निमाण होऊन दोंहीं पक्षींही बुड्या माराव्या लागतात. यास्तव मनसबा मात्र यासालीं पक्का घडवून कर्नाटकांत फितुर न राहे तें करावें. मागण इतकेंच आहे. भेटीस यावयास तयार जाहलों. दोन रोज अधिक उणे लागले तर तितक्यावरीच परिक्षेची मदार नसावी. रवाना छ ९ माहे रमजान बहुत काय लिहिणें हे विनंती. पो छ १८ रमजान.

नं० ८९३ **श्रीगणराज.** (पौष शुद्ध दशमी. ७ जानेवारी.)

चिरंजीव राजश्री आबा यांप्रति गोपाळराव गोविंद आशीर्वाद[2] उपरी येथील कुशल तागायत छ ९ रमजान मुक्काम हलगेमराळे तालुका हावनूर वाळा नदी उत्तरतीर नजिक बालेहमूर एक कोस जाणोन स्वकीय लिहित जाणें. विशेष. आह्मी गुरुवारीं गळगनाथावरून कूच करून येथें

---

१ खंबीर घ्यावयास=दृढनिश्चयाची परीक्षा घ्यावयास. २ पत्र गोपाळरावानें मोरो बल्लाळ यास लिहिलेलें. पेशवे व पटवर्धन यांचीं लष्करें निरानिराळीं दूर अंतरावर होतीं व मोरोबा नेहमीं पेशव्याबरोबर असे.

आलों. दोन मुक्काम येथें केले. हैदरखान मासुराहून कूच करून मायेनहळ्ळीस गेल्याचें वर्तमान आलें. मायेनहळ्ळीहून कूच करून गेल्याचें वर्तमान येईल. उपरांतिक वर्तमान येणें कठीण. झाडींत गेल्यावर वर्तमान येणार नाहीं. आह्मी आज येथून कूच करून करजगीच्या सुमारें वाळा नदीवर मुकामास गेलों. काल हवेरी व करजगीहून बातमीचीं पत्रें आलीं कीं हैदरखान मायेनहळ्ळीहून कूच करून होनहळीकडे गेले. तेथून कूच करून पट्टणाकडे जाणार ह्मणून आवाई आहे, असें लिहिलें होतें. तुह्मांकडे वर्तमान येत असेल तें वरचेवर लिहित जावें. आह्मांकडे वर्तमान येईल तें लिहून पाठवूं. हैदरखान दरोबस्त इकडून पट्टण प्रांतांत गेल्याचें वर्तमान आह्मांस कळणार नाहीं यास्तव आह्मांस श्रीमंताचे आज्ञेखेरीज तिकडे येतां नये व श्रीमंतानींही आज्ञा केली जे, पत्र येईल ते समईं तुह्मीं येणें. त्यावरून श्रीमंताची आज्ञा हुजूर यावयाची येईल ते समईं येतों. आज्ञेची मार्गप्रतिक्षा करितों. येथें शिलेदार किरकोळ रघोजी शेळके याचा लेंक पन्नास (स्वारांसह व) कडे तर्फेतील चव्हाण व भोसल्याकडील पन्नास व दोघांचे दोन हत्ती. राजेवाडीचे वगैरे पन्नास, शहाजी भोसले यांचे भाऊ भावनजीराव चाळीस पन्नास. नागोजी नाईक खासबारदार कित्ता. हुजुरातचे मुसलमान भालकीकर या प्रो लोकें येथें आहेत. आणखी या चौ दिवसांत पांचसातशें जमा झाले तरी (श्रीमंतांच्या लष्करास) लावून देऊं. तूर्त गडबडींत लावून द्यावे तर हे भलेपणे जाणार नाहींत. वाटेंत दगा जाहला तरी बदलौकीक, यास्तव ठेवून घेतले. हे आशीर्वाद.

---

१ हे सारे लोक पेशव्याच्या लष्करास जाऊन मिळावयाचे होते. पण थोड्याथोडक्यानीं शत्रूच्या मुलखांतून जाणें धोक्याचें होतें ह्मणून गोपाळरावानें त्यांस आपणाजवळ ठेवून घेतलें होतें.

शा० १६९१ हैदरअलीवर तिसरी स्वारी. इ. स. १७७०

नं०८९४ श्री. ( पौष शुद्ध चतुर्दशी. १० जानेवारी. )

श्रीमंत राजश्री रावसाहेब स्वामीचे शेवेसी.

विनंती. सेवक शिवाजी गणेश साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील क्षेम तागायत छ १२ रमजान पावेतों यथास्थित असे विशेष. आपण पत्र पाठविलें तेथें आज्ञा कीं, " शिकारपुरावर हैदरखान फौजेसहवर्तमान आहे ह्मणून तुह्मीं लिहिलें त्यास तेथें नाहीं. उडगणीस आहे. बातेऱ्या बांधितो असें असतां तुह्मीं ऐकीव बातमी लिहिली तस्मात् तुह्मीं यथास्थित बातमी राखीत नसाल. तरी बंकापुरासारखी जागा. तेथें बातमी यथास्थित राखीत जावी. व हैदरखानाच्या फौजेच्या आसपास चार कोसांवर डांक बसवून बातमी रोजच्या रोज येईल ती लिहित जावी." ह्मणोन आज्ञा, त्यास शिकारपुरापासोन उडगणी लांब असेल ह्मणोन आपणास कोणी सांगितलें असेल. परंतु उडगणीस व शिकारपुरास एका कोसाचें अंतर आहे. शिकारपुरचे उत्तरभागीं उडगणी कोसावर आहे. त्यास एवढी मातबर फौज. ते शिकारपुरापासोन उडगणीपावेतों उतरलीच असेल. 'बातेऱ्या बांधितो' ह्मणोन लिहिलें, तरी मासूर व अनवटी येथेंही बातेऱ्या त्याणीं बांधल्या होत्या. त्याचा आठ चार दिवस मुकाम होतो तेथें बातेऱ्या बांधितच आहे. आह्मीं केवळ स्वामीस बातमी लिहूं ते बाजारी वर्तमानावरून लिहित नाहीं. कोणी त्याचे लष्करचा येतो व आमचें एक दुसरें माणूस आठा चहूं दिवशीं बातमीस जातच असतें तो येऊन सांगतो त्याजवरून लिहितों. त्यास माणसाचे जबानी बातमीस व कलमी बातमीस कांहीं थोडें बहुत अंतर पडतच आहे. सावनूरकराची बातमी हैदरखानाचे लष्करांतूनच येत असेल त्याच्या कारकुनास व जासुदास फारसा हैदरखानाचे लष्करांत प्रतिबंध नाहीं ह्मणोन त्याची बातमी तथ्य येत असेल. वरकड " नेहमी डांक चौकीनें बातमी ठेऊन वरचेवर वर्तमान हैदरखानाचें लष्करचें पाठ-

१ हा बंकापूरचा किल्लेदार. याचें हें गोपाळरावास पत्र.

वीत जावें माणसें पाठवाल तीं जासूद ह्मणोन पाठवूं नये एखादे गरीबाचे रूपें पाठवावीं " ह्मणोन लिहिलें, त्यास आज्ञेप्रमाणें एक कारकून गरीब ब्राह्मणाचा वेष देऊन व जंगम दोन असे तीन असामी उडगणी शिकारपुरापासून अलीकडे चार कोसांवर हुलगडी गांव आहे तेथें आमचे कारकुनाचे ओळखीचे एक दोन गृहस्थ आहेत त्यांजकडे कारकुनानें रहावें, त्या अलीकडेस हैदरखानाचे मुलखाचे सरदेशावेतों जंगमानीं रहावें, त्या अलीकडे सावनुरकराचे सरदेंत आमचे जासूद माणसानीं दो दो कोसांवर रहावें, याप्रमाणें बंदोबस्त करून आज संक्रांतीमुळें भोजनोत्तर दहा असामी रवाना करितों. "आमचे जासूद किल्ल्यांत घेतले नाहींत" ह्मणोन शब्द लावून लिहिलें, त्यास जासूद आवशीचे प्रहररात्रीस आले. कागद दरवाजेखालून दिल्हा. दिंड्या महामूर जाहल्या होत्या. जासुदानीं सांगितलें कीं जाबसाल सत्वर देणें. त्याजवरून रात्रीच जाब लिहून दरवाजे उघडल्याचे अगोदर दिल्हा. जाब घेऊन जासूद गेले, ( आणि त्यानीं ) स्वामिजवळ सांगितलें कीं किल्ल्यांत घेतलें नाहीं! त्यास दरवाजे लागले ह्मणोन किल्ल्यांत घेतलें नाहीं. वरकड सर्व जासूद आपणाकडील येतात त्यांस पुसावें कीं त्यांस दरवाजाबाहेर ठेवितों किंवा किल्ल्यांत घेतों? आह्मांस श्रीमंत सुभेदारांचे जागां आपण. ऐसे असोन आपणाकडील माणसांस किल्ल्यांत घ्यावयास अनमान काय? माणसानीं सांगितलें तेंच प्रमाण स्वामीनीं मानूं नये. शाकभाजी थोडी बहुत उदईक पाठवितों. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं० ८९९ **श्रीगणराज.** ( पौष वद्य प्रतिपदा. १२ जानेवारी. )

अपत्यें मोरोबानें साष्टांग नमस्कार विज्ञापना ता। छ १४ रमजान मुक्काम चिकनायकनहळ्ळी. वडिलांचे आशीर्वादेंकरून वर्तमान यथास्थित असे.

---

१ धारवाडच्या सुभ्याखालीं बंकापूरचा किल्ला होता. तेथील सुभेदार सध्या नारो बाबाजी हा होता. २ पत्र मोरो बल्लाळ यांचें गोपाळरावास.

विशेष. हिद्येबालचें ठाणें सरकारांत आल्याचा मजकूर सेवेशीं लिहिला आहे. अलीकडे कंदिकिरें व हंदिकिरें व चिकनायकनहल्ली तीन ठाणीं सरकारांत घेतलीं. त्यांपैकीं कंदिकिरें हल्ल्यानें घेतलें यामुळें तो गांव लुटींत गेला. चिकनायकनहळ्ळी येथील खंडणी एक लाख पस्तीस हजार रुपये जाहली. शिवाय दरबार खर्च. वसुलातीस राजश्री नारो खंडेराव यांस ठेविले आहेत. येथून पुढें हगलवाडीस जाणार. येथें एक दुसरा मुकाम जास्ती पडेल. चित्रदुर्गकर संस्थानिक निघोन आले. त्यांच्या भेटी होण्यास रविवारीं छ १६ वे तारखेस नेम केला आहे. ते आलियावर याच मुक्कामीं भेटी होऊन पुढें जाणें होईल. आजि रविवारीं दुर्गकरांची भेटी होईल. हगलवाडीस[1] एक दुसरा दिवस लागला तर मुकामच येथें होईल असें आहे. विदित होय हे विज्ञापना.

नं० ८९६ L श्री. ( १३ जानेवारी. )

श्रीमंत मातुश्री बाईसाहेब वडिलांचे शेवसीं.[2]

अपत्यें बाळाजी जनार्दन साष्टांग नमस्कार विज्ञापना ता। पौष वद्य २ पावेतों आपले आशीर्वादें करून वर्तमान यथास्थित असे. विशेष. श्रीमंताचे लष्करचीं पत्रें तुंगभद्रा दक्षिणतीर नजीक कोपलचे मुकामचीं आलीं. त्यांत मुख्यार्थ " हैदरनाईक मासूरचे बारींत आहे. लढाईचीच तरतूद करितो. गोपाळराव ( व ) रास्ते वगैरे फौज पुढें पाठविली होती ती हैदर नाइकापासून सोळा कोसांवर आहे. गोपाळराव ( सडे मात्र इकडे ) स्वारींत आले आहेत. हैदर नाइकाचा वकील आपाजीरामही बोलावयास आला आहे. परंतु रंग पडे असें बोलणें नाहीं. ( हैदरखान ) झाडींत शिरून बसला आहे याकरितां गोपाळराव

---

१ हगलवाडीचें ठाणें घ्यावयास एक दुसरा दिवस लागल्यास तें ठिकाण येथून जवळ असल्यामुळें सबंध लष्कर हालवून तेथें नेण्याचें कारण नाहीं. येथूनच फौज पाठवून काम होईल. २ पत्र नाना फडणीस याचें गोपिकाबाईस.

व बारा पंधरा हजार फौज हैदरखानाचे तोंडावर ठेवून खासास्वारी फौजेसुद्धां श्रीरंगपट्टण प्रांतीं जाऊन मुलूख मारावा, ठाणीं घ्यावीं, येणेंकरून दोन तीन पेंच शत्रूस पडून हरएक निकाल पडेल याप्रमाणें विचार आहे. लष्करांतून आपल्याकडे पत्रें येतच असतील. पिराजी नाईक निंबाळकर गंगथडी प्रांतीं फौज जमा करून दंगा करीत होते त्यांस देवआज्ञा जाहली. आपल्या कारणें मकरसंक्रमण निमित्य तिलशर्करा पाठविली आहे. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना. पौा छ १८ रजब.

नं० ८९७ श्रीगणपति. (१४ जानेवारी.)

अपत्यें[1] परशुरामानें दोनी कर जोडून शिर साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील वर्तमान ताा पौष वद्य तृतीया मुकाम नजिक सावनूर यथास्थित असे विशेष. "हैदर दगाबाज आहे. बहुत सावधपणें राहून स्वामिसेवा होय असें करावें." ह्मणोन आज्ञा, ऐशियास वडिलांचें पुण्य निमित्त आहे तेच सावधता आहे. कांहीं फिकीर नाहीं. इकडील वर्तमान तर श्रीमंत श्रीरंगपट्टण प्रांतें गेले. दोन चार ठाणीं घेतलीं. तिकडील ठाण्यांचा धर सुटला आहे असें पाहून हैदर येथें माइनहळ्ळीजवळ होता तेथून सडाच निघून कांहीं फौज व गाडदी असे बरोबर घेऊन गेला आहे. श्रीरंगपट्टणास जाणार अशी आवई घातली आहे परंतु तहकीक ह्मणतां येत नाहीं. दगाबाज आहे. माघारा ही येऊन दगा करावयास चुकणार नाहीं! परंतु आह्मीं आपले जागां सावध आहों. विदित होय हे विज्ञापना.

नंबर ८९८ श्रीगणराज. (१६ जानेवारी.)

चिरंजीव राजश्री मोरोबा आबा यांसी प्रति गोपाळराव गोविंद आशीर्वाद उपरी येथील कुशल तागायत पौष कृष्ण पंचमी भौमवासरे मुक्काम

---

१ पत्र परशुरामभाऊचें चुलता त्र्यंबक हरि यास.

नजीक सावनूर वर्तमान यथास्थित जाणून स्वकीय कुशल लिहित जाणें. विशेष. काली श्रीमंतांचे सांडणीस्वार गेले त्या समागमें सविस्तर लिहून पाठविलें आहे तीं पत्रें पावोन सविस्तर वर्तमान कळेलच. अलीकडील वर्तमान तरी हैदरखान उडगणीवरून रविवारीं संध्याकाळीं चार पांच हजार फौज व गाडदी वगैरे सरंजाम घेऊन अलीकडे पांच सहा कोस सडा येऊन मागती माघारा गेला. अलीकडे यावें असा त्याचा मनसबा आहेसा दिसतो. आह्मींही बातमी राखोन खबरदारीनें आहों. केवळ ..ठेवाट आईसें दिसतें. प्रस्तुत श्रीमंतांचें लष्कर कोठें आहे, बुधिहाळाशिवाय ठाणीं कोणकोणतीं घतल्या वर्तमान, तें सविस्तर ल्याहावें. 'गलगनाथच्या ब्राह्मणास पंचवीस रुपये श्रीमंतांनीं देणे आहेत. आपण ब्राह्मणास रुपये द्यावे. आह्मीं येथें जमा करून ह्मणोन लिहिलें, त्यास तुमच्या लिहिल्याप्रमाणें पंचवीस रुपये ब्राह्मण दिले. तुह्मीं सदरहू रुपये सरकारांतून उगवून घेऊन जमा करून ठेव हैदरखान बाहेर निघणार ह्मणून वदंता फार आहे. मनसब्याचे आव बाहेर येईलसें वाटत नाहीं. बाहेर आला तरी आह्मीं बुनगें लावून दे त्या भोंवतें फिरूं लागों. आमचा कांहीं तोटा नाहीं. आह्मीं भों असतां ( कोणच्याही ) ठाण्यास वेढा घालून बसत नाहीं. तेव्हां उग बाहेर येऊन माघारा काय ह्मणून जाईल? यास्तव येतां दिसत ना तथापि आला तरी आह्मांस जसें बनेल तसें करूं. ह्या प्रांतीं तो अ तों तुह्मीं तिकडील ठाणीं बेफिकीर घेणें. टिपू तिकडे आला अ त्याजसमागमें तीन चार हजार फौज आहे. तोफा भारी नाहींत. त्य येऊन तुमचे लष्करचें काय करणें! कहीकबाडावर लबाडी करील तेव

---

१ तुह्मीं ह्मणजे अर्थात् पेशव्यांच्या लष्करानें. यावेळीं थोरलें लष्कर पेशव बरोबर श्रीरंगपट्टण प्रांतीं ठाणीं घेत चाललें होतें, व गोपाळरावाचें लष्कर तुंगभद्रे हैदराच्या छावणीनजीक टेहाळणीसाठीं राहिलें होतें. थोरल्या लष्करांत पेशव्यांज मोरो बल्लाळ राहिला होता.

खबरदारी चांगली असावी ते असेलच. आजीपावेतों चांदणें होतें. आतां काळोखी रात्र आली आहे. चार पांच छबिने असतात. डेऱ्या-जवळ चौकीचे राऊत असतात. लष्करही केवळ सडें आहे. चार गोट[1] मिळोन वाणीबकाल मिळोन दोनशें पालें असतील. वरकड गोट गुंता कांहीं फारसा नाहीं. तुह्मीं आह्मांकडील काळजी न करणें. नवल विशेष असेल तें वरचेवर लिहून पाठवितों. चित्रदुर्गचा संस्थानिक ठिकाणाहून निघोन श्रीमंताचे भेटीनिमित्य गेला, ह्मणून सुतर स्वारानें येऊन सांगितलें. आजि भाऊछथेडी ( ? ) आलीं तीं मार्गी त्यास भेटलीं त्यांजसमागमें ( संस्थानिकानें ) रामराम सांगोन पाठविला होता. भेटी जाहल्यावर संस्थानिकास ( श्रीमंतांनीं ) समागमें घेतला, किंवा ( त्याची ) फौज ठेवून घेऊन ( त्यास ) निरोप दिल्हा हें सविस्तर लिहिणें. अलीकडे ठाणीं कोणकोणतीं घेतलीं हें लिहिणें. आपाजीराम व रेजाअलीखान यांस हैदरखानानीं आपणांकडे बलविलें ह्मणून सावनूरकरांचे वकिलांनीं नवाबास लिहिलें होतें. त्यास उभयतां मशारनिल्हे गेले किंवा आहेत, त्यांजकडील जाबसाल कसा काय, तो लिहिणें. हे आशीर्वाद.

नं० ८९९ **श्रीगणराज.** ( १६ जानेवारी. )

चिरंजीव[2] राजश्री मोरोबा आबा यांसीं आशीर्वाद उपरी. श्रीमंतांनीं पुण्याहून थोरल्या तोफा आणविल्या आहेत. त्यास पुण्याहून तोफा निलजीपर्यंत आल्या ह्मणोन राजश्री जनार्दनपंत मिरजेहून आले त्यांणीं सांगितलें. एक तोफेस दीडशें बैल लागतात व एक तोफेस सवाशें, येणेंप्रमाणें बैल आहेत. परंतु ( तोफा ) किती[3] गोळ्याच्या आहेत हें कळलें नाहीं, तथापि थोर आहेत. श्रीमंतांपाशीं जाऊन पोहोंचावयाचें संकट आहे. याकरितां तोफांसमागमें कारकून आहे त्यास पत्र लेहून

---

१ गोपाळराव, नीलकंठराव व परशुरामभाऊ मिळून तिवर्ग पटवर्धनांचे तीन व रास्त्यांचा चवथा. मिळून चार गोट. २ पत्र मोरो बल्लाळ यास गोपाळरावाचें. ३ किती शेर वजनाचा गोळा या तोफांतून सोडितां येतो हा अभिप्राय.

पाठविलें आहे कीं, तुह्मीं बागलकोटावरून आलां तरी तेथेंच मुक्काम करून राहणें. मलप्रहरेकडून आलां तरी तेथें मुक्काम करून राहणें. आणि लिहून पाठविणें कीं, तोफा किती शेरी आहेत, गोळे दारू किती आहे, गाडदी किती आहेत, कामाठी दर्यावर्दी व खलाशी व सुतार लोहार व तबलदार व बेलदार हें सामान काय आहे, तें लिहून पाठविणें ह्मणोन लिहिलें आहे. सामान काय काय आहे, किती शेरी गोळ्याच्या तोफा आहेत, हें सविस्तर लिहून पाठवितील. पत्र आलें ह्मणजे लिहून पाठवितों. त्यास तोफांचा मजकूर श्रीमंतांच्या कानावर घालावा. इकडेच राहूं देणें ह्मणोन आज्ञा करितात कीं काय तें मनास आणून लिहून पाठविणें, ह्मणजे आज्ञा करितील त्याअन्वयें ठेवून घेऊं अथवा लाऊन देऊं. उत्तर सत्वर पाठविणें. पुण्याहून वेदमूर्ती राजश्री वीरेश्वर दीक्षित व मोरोबा वैद्य व आबा पानसे व त्यांचे धाकटे बंधु येणेंप्रमाणें मिरजेस आले. तेथून दोन प्यादे देऊन तीर्थरूप राजश्री नानानीं इकडे रवाना केले. प्यादे आज पुढें आले. तेही उदईक येतील. सोबत चांगली मिळाली ह्मणजे पुढें रवाना करितों. सोबत मिळे तों ठेवून घेतों. इतकियांत भोसल्याकडील फौज आली आहे ती इकडून आली आणि येथून श्रीमंतांकडे जाऊं लागली तरी त्यासमागमें लाऊन देऊं. भोसल्याकडील फौज आली आहे त्यांजकडून सांडणीस्वार पत्रें घेऊन आले होते त्यांचीं उत्तरें घेऊन गेले आहेत. इकडून येतात किंवा परभारेंच जातात पहावें. बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद.

नं. ८६० **श्रीगणराज.** ( पौष वद्य पंचमी. १६ जानेवारी. )

चिरंजीव राजश्री मोरोपंत आबा यासीं प्रती गोपाळराव गोविंद आशीर्वाद उपरी काल माणकोपंताचें व हैदरखानाचें झूज झाल्याचें वर्तमान लिहिलें होतें. आह्मीं आज प्रातःकाळींच चार घटका रात्र असतां सडे फौजेनिशीं निघालों ते दीड प्रहर दिवसास सावनुरानजीक

आलों. हैदरखानाची फौज आली होती ती कोणीकडे गेली हें तथ्य ( वर्तमान ) नाहीं. कोणी हुबळी मिश्रिकोट, तडस, भंडिगिरें मारावयासीं गेली ह्मणतात. आह्मीं येथेंच राहिलों तरी सडे होतों. पायबंद, दवासनें नव्हतीं. यास्तव गोटास येतों. पुढें श्रीमंताचे आज्ञेनुसार करणें तें करूं. रा. माणकोपंताचें पत्र आलें तेंच पाठविलें आहे. सावनूरकराचीं बातमीचीं पत्रें आलीं तींही पाठविलीं आहेत. सावनुरावर शत्रूची फौज उतरली ह्मणून वर्तमान होतें यास्तव निकडीनें गांठ घालावी ह्मणोन आमचीं तीन पथकें व राजश्री बहिरजी घोरपडे आलों. परंतु त्याची फौज कालच गेली. आह्मीं उगेच त्याचे मागें कोणी कोणीकडे फिरावें ! यास्तव संध्याकाळीं गोटास येतों. सविस्तर वर्तमान श्रीमंतांस श्रवण करणें. अष्टम गुरूनें आपला गुण केला ! घोडीं किती मेलीं हें कळलें नाहीं. आमची फौज सावनुराहून येईतोंपर्यंत येथें राहून फौज मिळवून घेऊन येतों. ( कालच्या झुजांत आमचे ) लोक जखमी फार जाहले. लोकांनीं कस्तही फार केली परंतु ते फार. ते तीन चार हजार होतील. हे तीनशें. याणीं काय करावें ! तथापि शिपाईगिरीस कोणी कमी केली नाहीं. पंचवीस माणूस तरवारेचे जखमी आहे ह्मणून ऐकतों. गोटास आल्याउपर सविस्तर लिहून पाठवितों. बहुत काय लिहिणें रवाना पावणे दोन प्रहर. पूर्वार्ध. हे आशीर्वाद.

नं० ८६१ श्रीगणराज. ( १७ जानेवारी. )

अपैत्यें नीलकंठानें साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील कुशल तागायत पौष व॥ षष्टी मुक्काम सावनूर यथास्थित असे. विशेष. चिरंजीव राजश्री कोन्हेरराव आदितवारीं आले. नंतर इकडील वर्तमान श्रीमंत बुधेहाळास गेले तेच दिवशीं तें ठाणें घेतलें. पुढें हगलवाडीस ठाणें

---

१. राहिलों असतों परंतु. २. गजेंद्रगडकर. ३. पत्र नीलकंठराव याचें त्र्यंबक हरीस.

घालोन पट्टणप्रांतीं ठाणीं बसविणार. बुधेहाळचें ठाणें बसवून आज नऊ दिवस जहाले. तेच दिवशीं पत्र आलें होतें. त्या अलीकडे पत्र आलें नाहीं. बाराशें प्यादे व गारदी मिळोन होते. दोनशें पठाण होते. परंतु कांहींच झुजले नाहींत! तोफेचे पांच सात बार जाहले (तोंच) कौलास आले! वरकडही पट्टण प्रांतींचीं ठाणीं बसतील. हैदराचा लेक[1] पट्टणास गेला. हैदरनाईक उडगणहळ्ळी शिकारपुरचे पलीकडे दोन कोस आहे तेथें राहिला आहे. अलीकडे तीन बातम्या बांधून चौक्या बसवून पलीकडे आपण राहिला आहे. आह्मांवर यावें या योजनेंत आहे. आमच्याही बातम्या आहेत. छत्तिस चौक्या पहार बंदोबस्तीनें आहों. आह्मांकडील काळजी न करावी. श्रुत होय हे विज्ञापना.

नं० ८६२ श्रीगणराज. (पौष वद्य नवमी.
२० जानेवारी.)

चिरंजीव राजश्री आबा यांप्रती गोपाळराव गोविंद आशीर्वाद उपरी येथील कुशल ता। छ २२ रमजान मंदवार मुक्काम नजीक सावनूर येथें वर्तमान यथास्थित असे. विशेष. इकडील सविस्तर वर्तमान लेहून काल व परवां पत्रें सुतरस्वारा[3] समागमें पाठविलीं आहेत तीं पावोन सविस्तर अर्थ कळेल. हैदरखान गादीवरच आहे. सावनुराकडे येकदां येऊन हालचाल करावी ही एक आवई. दुसरी एक आवई मुरगोड नंदीकड्यांकडून झाडीच्या आसऱ्यानें जाऊन सरदेच्या[4] मुलखावर हालचाल करावी असा मनसबा आहे. त्याची रीत सर्व ठाऊकच आहे. आवई एकीकडील दाखवावी आणि जावें दुसरीकडे! असें आहे. केवळ त्याच्या लष्करांतून बातमी ठीक येतच नाहीं. जवळच्या सरदेच्या गांवखेड्याची बातमी येत असते. चहूंकडील बातमी चहूं प्रकारची येते! कोणाची खरी बातमी, कोणाची लटकी बातमी, असें

१ टिपूसुलतान. २ गोरो बल्लाळ. ३ सांडणीस्वार. ४ सरहद्दीच्या.

होतें. दहा पंधरांकडून बातमी नित्य आणवीत असतों. आह्मी खबरदारीस चुकत नाहीं. आह्मांकडील चिंता न करावी. पुण्याहून चार सांडणीस्वार कांहीं ऐवज वगैरे जिन्नस घेऊन आले त्यांस रवाना केले आहेत. कळावें. गोदीपासून ( शत्रूचें ) काली शुक्रवारीं कूच जाहलें नाहीं. आजी मंदवारीं कूच करील कीं काय पहावें. कूच जाहल्याची बातमी आली ह्मणजे लिहून पाठवूं. तिकडील वर्तमान वरचेवर लिहून पाठवावें. चिकनाइकनहळ्ळी व कंदिकिरें हीं ठाणीं घेतलीं त्या अलीकडे ठाणीं कोणकोणतीं घेतलीं, कोणत्या सुमारें गेले, सविस्तर ल्याहावें. महंमद अल्लीखान घांट चढोन वर आला. श्रीमंतांस लौकरच सामील होणार, ह्मणोन वर्तमान आहे. त्यास तिकडील मजकूर काय, महंमद अल्लीखान येणार किंवा नाहीं त्याजकडील कागद पत्रें येत असतीलच, सविस्तर ल्याहावें. आज पांच सहा दिवस नित्य पत्रें तुह्मांकडे जात असतात. हल्लीं पुणियाहून सूतरस्वार चार आले. कांहीं पैसा नक्की पागेकडील ऐवज सहा हजार आहे, ह्मणून ( त्यांनीं ) सांगितलें. ऐवज जामदारखान्यांत ठेवून आजीपत्रें देऊन रवाना केले आहेत. परवांही पत्रें रवाना केलीं आहेत. पावतील. चिकनाइकन हळ्ळीहून पुढें कोणीकडे गेला, ठाणीं कोणकोणतीं घेतलीं, ( हें ल्याहावें. ) पट्टणचीं ठाणीं सारीं येतात. पट्टण व बेंगरुळशिवाय कोणतेंही ठाणें झुजत नाहीं. हैदरखान झाडीचा आसरा सोडून त्या मैदान रानांत येत नाहीं. आमची त्याची गांठ पडली आहे. तोही दाबून दबावून पाहतो परंतु आह्मीं त्याचे ओळखे आहों! त्याचे फंद आह्मांस ठाऊक आहेत, यास्तव खातरेंत न आणितां खबरदारीनें राहून राहिला जागा आजीपावेतों सोडिला नाहीं. पुढेंही सोडावयाची कस्त नाहीं. आणखी होईल वर्तमान तें वरचेवर लिहून पाठवितों. बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद.

शा० १६९१ हैदरअलीवर तिसरी स्वारी. इ. स. १७७०

नं० ८६३ श्रीगणराज. ( पौष वद्य अष्टमी.
( १९ जानेवारी.

आशीर्वाद उपरी. राजश्री जानोजी भोसले यांजकडून राजश्री मान-शिंगराव वाघ व तुळजाजी भागवत व मजीदखान श्रीमंतांचे लष्करास राजश्री साबाजी भोंसले यांजकडे जावयासाठीं तिकडून आले. त्यानीं आकूर नजिक डंबळ येथील मुकामाहून आह्माकडे पत्र पाठविलें कीं, श्रीमंत तो दूर गेले. आह्मी आज महिना दीड महिना वाट चालतों. थकलों आहों. याकरितां तुह्मांकडेच येतों. ह्मणून आज छ २१ रमजानीं पत्र आलें. सडे हजार बाराशें निशीं आहेत. ते आज महिना दीडमहिना वाट चालतात, थकले, हें खरें. दुसरें हैदरखान गोदीवर आला आहे. त्यासही इभ्रत पडावी कीं आह्माकडे आणखी फौजा रवाना ( श्रीमंतांनीं ) केल्या ह्मणून. यास्तव इकडेच येणें ह्मणून त्यांस पत्रें पाठविलीं. ते आज उद्यां तेथें येथील. हैदरखान इकडे आहे. तेव्हां येथेंही फौज भारी असल्यानें उपयोगीच आहे. हेही कांहीं फारसे नाहींत. दुसरी फौज आली ह्मणून त्यास इभ्रत बसेल इतकाच प्रकार. यास्तव तुह्मांस व श्रीमंतांस लिहिलें आहे. तर तुह्मीं श्रीमंतांस याजप्रमाणें विनंती करावी. यांची फौजही थोडी आहे. श्रीमंताचे मर्जीस येथें ठेवावयाचें आलें तर राजश्री साबाजी भोसले यांचें पत्र त्यांस येथेंच रहावें ह्मणून घेऊन पाठवून द्यावें. हें श्रीमंताचे मर्जीस न आलें तर तुमचें उत्तर येइजे तों येथेंच राहून चार दिवस असुदे होतील. पाठवून देणें ह्मणोन तुमचें उत्तर येतांच येथून निघोन श्रीमंतांकडे येतील. तूर्त गडबड ( शत्रूची ) इकडेच दिसते. यास्तव भोसले यांची फौज ठेवून घ्यावयाची मर्जी असली तरी भोसले यांचें पत्र राहणें ह्मणून, घेऊन पाठवून देणें. त्यांस कांहीं खर्चास द्यावें लागेल याची बंदोबस्ती करणें बहुत काय लिहिणें हे आसिरवाद.

नं० ८६४. L श्री. ( पौष वद्य द्वादशी.
२३ जानेवारी. )

तीर्थरूप मातुश्री बाईसाहेब वडिलांचे सेवेसीं.

अपत्यें माधवरायानें चरणावरी मस्तक ठेवून साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील क्षेम ता० छ २९ रमाजान मु० तुरविकिरें प्रांत पट्टण येथें वडिलांचे आशीर्वादेंकरून सुखरूप असें विशेष. इकडील वर्तमान तर पट्टग प्रांतींचीं दहापांच ठाणीं घेतलीं. वरकडही घेत आहों. येथून पट्टण वीस पंचवीस कोस आहे. हैदरनाईक बिदनूरचे झाडींत सावनूरचे रोंखावर आहे. ( त्यानें ) कांहीं फौज आम्हीं पटणचें सुमारें आलों म्हणून टिपूखान त्याचा लेक आहे त्याबरोबर देऊन ( इकडे ) रवाना केला आहे. तो ठाण्याचे आसऱ्यानें राहत असतो. त्याचीही बातमी लावून तजविजींत आहों. हैदरखान गोपाळरायाचे तोंडावर आहे. आपलेकडील वर्तमान तर एक बेंगरुळास लागावें तर फार दिवस लागतील. पट्टणास लागावें तर शहास गुंतावें. असें आहे. यास्तव आधीं ठाणींच घेतों. इतक्यांत हैदरखानही ( तहाचें ) बोलेल. न बोलल्यास छावणीस फौज मातबर ठेवावी किंवा मीच रहावें, तरच ( शत्रूचें ) पुरतें पारिपत्य होईल. अद्याप दिवसही आहेत. हैदरखान झाडी धरून आहे यास्तव इकडे पेंच पडतात. महमद अल्लीखानास आणावें, इंग्रजाचें राजकारण बळवावें. याच उद्देशें वकील पाठवून राजकारण लाविलें आहे. हैदरखान बहुतकरून सलुख करील. न बोलेल तर त्यास सोडितां येत नाहीं. देशीं पेंच म्हणावा तर नबाबाजवळ विशेष फौज नाहीं. भोसले तर एक भाऊ आह्मांबरोबर आहेत. त्यापशीं प्रस्तुत पेंच नाहीं. परंतु मी छावणीस राहिल्यास खर्चाचा पेच फार बसेल इतकेंच कारण. यास्तव छावणीस फौजच ठेवावी लागेल.

---

१ मूळपत्र माधवराव पेशवे यांनीं आपली आई गोपिकाबाई हिस लिहिलें आहे.

यंदां मोंगलदेशीं राहिले ते येथें बोलून चालून त्यांस ( आपल्या राज्याचे ) वगैरे बंदोबस्त करणें ह्मणून राहिले. वडिलांस कळावें. सदैव आशीर्वादपत्र पाठवावें. चिरंजीव नारायणरायाची व माझी पुण्यापेक्षां प्रकृति बरी आहे. यंदां लष्करांत यावें असें तर नव्हतें. एक वडिलांचे मात्र आशीर्वादेंकरून. +

नं. ८६९ श्रीगणराज. ( पौष वद्य चतुर्दशी २९ जानेवारी. )

चिरंजीव राजश्री मोरोपंत आबा यांसीं प्रती गोपाळराव गोविंद आशीर्वाद उपरी येथील कुशल तागायत छ २७ रमजान गुरुवार पावेतों नजीक सावनूर वर्तमान यथास्थित जाणून स्वकीय कुशल लिहीत जावें. विशेष. हैदरखान गेल्याचें वर्तमान आलें होतें ते समईं फौजांनीं बारी पावेतों जावयाची तजवीज केली होती. परंतु मामूरची बारी सर्वांनीं पाहिली आहे. एकच घोड्याची वाट. पलीकडे बातेऱ्या बांधोन आहे. हजार गाडदी शिवाय प्यादे त्या बातेरीस आहेत. उडगणीचे वाटेनें तीन कोस झाडी. एक वाट आहे तखली (?)तून जावयाची. ती वाट त्याचे गोटांतच जाते. दुसरी वाट नाहीं. तिसरी वाट अनवटी वरील व त्या रस्त्यावरीच अनवटीच्या डावेउजवे बाजूनें जात आहे. जाईन ह्मटल्यास वाट नाहीं. या प्रकारें वाटांची बंदोबस्ती आहे. फौजांनीं जाऊन यावें इतका प्रकार दिसतो. कालपासोन मागें फिरोन आल्याची खबर गरम आहे. कदाचित् आला नसला तरी फौजांनीं जाऊन गडबड करून पहावी कीं काय? श्रीमंतांस विनंती करून लिहून पाठवावें. त्याणें बिदनूर व सोंदें प्रांताची बंदोबस्ती फारच केली आहे, ह्मणोन कोणी लष्करांतून येतात ते सांगतात. उडगणीस ( त्यांचें ) लष्कर आहे तेथीलही

---

+ पत्राची नक्कल इतकीच अपूर्ण मिळाली.

१ मुख्यत: ' श्रीमंतांनीं पाहिली आहे ' हें ह्मणण्याचा उद्देश. कारण ह्यांनींच गोपाळरावास हैदराच्या छावणीवर चालून जाण्याविषयीं हुकूम केला होता.

बंदोबस्त फारच केला आहे. तें सविस्तर मामूरचे बातमीचे पत्रावरून कळेल. राजश्री सदाशिव रामचंद्र आज येथून कूच करून आले आहेत. काल लक्ष्मेश्वराहून येथें आले. समागमें वेदशास्त्रसंपन्न राजश्री वीरेश्वर दीक्षित व मोरोबा वैद्य व आबा पानशे व त्यांचे बंधु येणेंप्रमाणें यांसमागमचें तिकडे आले आहेत. भोसल्याकडून राजश्री मानसिंग वाघ व मजीदखान रोहिले यांचीं पत्रें आलीं होतीं कीं आह्मीं तुह्मांकडेच येतों ह्मणून लिहिलें होतें. आह्मी लिहिलें होतें हिकडूनच येणें. त्यास ते हिकडे न येतां परभारेंच गेले. हरपनहळ्ळीवरून गेले. कळावें. राजश्री बाजी घोरपडे व पिराजी नाईक यांचें झूज जाहलें. पिराजी नाईक यानें बाजी घोरपड्यास मोडिलें. दोन हत्ती घोरपडे याचे पिराजीनाईक यास सांपडले. दुसरें वर्तमान पिराजीनाईक निंबाळकर याचे शरीरीं समाधान नव्हतें. फारच कृश जाहले होते. ते मृत्यु पावले. बायको बिडास आली. ह्मणोन बिडाहून व करकंबेकडून वर्तमान आलें. कवडे व भापकर श्रीमंतांनीं पाठविले होते ते सीमेवरच आहेत ह्मणोन वर्तमान आहे. बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद.

नं० ८६६ ( पौष वद्य अमावास्या. २६ जानेवारी. )

बाळाजी गोविंद व देवीसिंगें सुभेदार यांचें गोपाळरावास पत्र २८ रमजानचें. " पुण्याहून रणमंडळ तोफा श्रीमंतांनीं जलदीनें लष्करांत आणविण्यास ताकीद केली. त्यास तोफा घेऊन आह्मीं लोखंडीपर्यंत आलों. समागमें गाडदी पाऊणशें मात्र आहेत. पुढें मार्ग कठीण ह्मणून ऐकतों. राजश्री नाना फडणीस यांची आज्ञा आहे कीं, श्रीमंतांचें लष्कर लांब गेलें असल्यास आपले विचारें लष्करास जावें, याकरितां काय ते आज्ञा व्हावी."

---

१. रणमंडळ तोफेबरोबर गारदी होते त्यांवरचा हा अंमलदार. बाळाजी गोविंद हा कारकून.

नं० ८६७ ( माघ शुद्ध प्रतिपदा. २७ जानेवारी. )

बाळाजी महादेव भिडे यांचें पत्र नारोपंत फडणिसास. २९ रमजान मु०॥ सावनूर येथून. "रुद्राजी धुळप याचा सुभा निवाला ह्मणोन वर्तमान आलें. दुसरा सुभेदार आरमाराकडे कोण व सुभ्याकडे[1] कोण हें ल्याहावें.

नं. ८६८. श्रीगणराज. ( माघ शुद्ध प्रतिपदा. २८ जानेवारी. )

चिरंजीव राजश्री वामनराव बावा यांसीं प्रती गोपाळराव गोविंद आशीर्वाद उपरी येथील कुशल ता॥ छ २९ रमजान मुकाम नजीक सावनूर जाणून स्वकीय कुशल लिहीत जावें. विशेष. तुह्मांकडील वर्तमान पेशजी सविस्तर इकडील लिहिलें आहे तीं पत्रें पाहून सविस्तर वर्तमान कळलें असेल. अलीकडील वर्तमान तर श्रीमंतानीं हगलवाडी, कंदिकिरें, चिकनायकनहळ्ळी, हीं ठाणीं घेतलीं. थोडी बहुत साधेल ती खंडणी घेऊन पुढें गेले. अलीकडे कोणतीं ठाणीं घेतलीं, पुढें कोणीकडे गेले, हें वर्तमान आज पांच सा दिवस कांहीं आलें नाहीं सूतरस्वार गेले आहेत, वर्तमान येईल तें लिहून पाठवूं. टिपूमियास बेंगरूळ व पट्टण वगैरेचे कुमकेस हैदरखान याणीं पाठविला होता. त्याच्यानें कुमक ठाण्यांची होईना ह्मणोन हैदरखान सर्व बाजारबुणगें उडगणीवर टाकून सडे सामानानिशीं बसवापट्टणावरून चेनगिरीपावेतों गेला. पुढें काट जावयाचा होईना ह्मणून आज दोन दिवस वर्तमान चहूंकडून येतें. तुह्मांस कळावें ह्मणोन लिहिलें आहे. टाकण शिंगरूं शेळ्या ( येथून पाठविलेल्या ) येऊन पावल्या

---

१ विजयदुर्गच्या सुभ्याकडे.

असतील. हे आशीर्वाद. सेवेशी आपाजी त्रिंबक साष्टांग नमस्कार विज्ञापना. इकडील वर्तमान पेशजी लिहिलें आहे. हल्लीं श्रीमंतांचे पत्रीं लिहिलें आहे त्याजवरून विदित होईल हे विज्ञापना.

नं. ८६९ **श्रीगणराज.** ( माघ शुद्ध षष्ठी. १ फेब्रुवारी. )

चिरंजीव राजश्री मोरोबो आबा यांसीं आशीर्वाद उपरी. आह्मीं या मुक्कामास आलों त्याच दिवशीं सविस्तर लिहून सांडणीस्वारासमागमें पत्रें पाठविलीं आहेत तीं पावोन सविस्तर कळलेंच असेल. पत्रें तिकडे रवाना केल्यानंतर दुसरे दिवशीं कूच करून बसवापट्टणच्या सरदेस जाणार होतों. इतक्यांत हरीहराहून व चित्रदुर्गचे गांव सरदेस आहेत त्यांजकडील बातमी आली कीं हैदरखान चेनगिरी नजीक आला. मीररेजा यास आपणापासोन दोन कोसांवर अव्राडीस उतरविलें आहे. याप्रमाणें बातमी आली याजकरितां येथेंच मुक्काम केला. येथून पुढें सा कोस जावें तेव्हां आह्मांस व त्यास आठ नऊ कोसांची तफावत राहील. तफावत थोडी, याजकरितां येथें मुकाम केला आहे. तेथून पंधरा कोसांची तफावत त्यास आह्मांस आहे. श्रीमंत बेंगरुळाकडे ( आहेत ) त्यापक्षीं काय मनसबा करील तो पहावा! बातमी येत जाईल त्याप्रमाणें लिहून पाठवूं. सावनूरकर नबाबाच्या पुत्रास व खंडेराव यास पाठवावें ह्मणोन लिहिलें, त्याजवरून त्यांस सांगितलें. हे थोडक्याच सामानानिशीं आले होते. श्रीमंतांकडे जावें त्यापक्षीं सामान अधिक असावें या अर्थें कांहीं राऊत व प्यादे गाडदी सावनुराहून आणविले आहेत. ते आले ह्मणजे रवानगी करून पाठवितों. कित्तुरास कारकून व माणसें गेलीं आहेत.

---

१ गोपाळरावाच्या. २ पत्र मोरो बल्लाळ यास गोपाळरावाचें.

त्या संबंधाचीही फौज ठेविल्या खेरीज पोषमासचा हला येत नाहीं. आह्मांस व हैदरखानास तूर्त चौदाकोसांची तफावत आहे. आह्मीं आपले बातमीविशीं वगैरे खबरदारीस चुकत नाहीं. तूर्त दुर्गकराचे मुलखास ( आमच्या लष्कराकडून ) वैरणीचा उपद्रव लागतो. नित्य बोभाटे येतात. आह्मीं ताकीद करावयास चुकत नाहीं. लहान खेडीं एका बुरजाचीं असतील तेथून वैरण आणवितों. लष्करचा उपद्रव ( कसा काय असतो हें ) आह्मांस दखल आहे. कोणी एखादें घर जाळितात. घरांत शिरून दाणा दुणा आणितात. एखादे दिवशीं आणीत असतील! अनिवार लष्कर. त्यांत निक्षून ताकीद करितां येत नाहीं. तथापि फार ताकीद आहे. तुह्मांजवळ दुर्गकर रड सांगत असतील यास्तव लिहिलें आहे. तुह्मीं त्यांचें समाधान करून सांगावें. वैरण न आणीन ह्मटल्यास गत्यंतर नाहीं. असा चहूंकडून पेंच आहे. हैदरखान प्रस्तुत चेनगिरी बसवापट्टणास राहिला तेव्हां आह्मांस दुसरी जागा कूच करून जावयाजोगी दिसत नाहीं. हरीहरचे उत्तरेस नदीवर जावें तरी एक दुसरें खेडें हरीहरचें राहिलें आहे. तें खराब होईल. येथें रहावें तरी दुर्गकराचा बोभाट. नदीवर गेल्यानें सावनूर तालुक्यास उपद्रव होईल. असें आहे. बहुत काय लिहिणें हें आशीर्वाद.

नं. ८७० श्रीगणराज. ( माघ शुद्ध षष्ठी.
१ फेब्रुवारी. )

चिरंजीव राजश्री गोरोपंत आबा यांसीं प्रती गोपाळराव गोविंद आशीर्वाद उपरी येथील कुशल तागायत छ ४ सवाल गुरुवासरे मुक्काम नजीक देवगिरी वाळानदी वर्तमान यथास्थित जाणून स्वकीय कुशल लिहीत जावें. विशेष. तुह्मीं छ २७ रमजानचीं पत्रें सांडणीस्वारांसमागमें पाठविलीं तीं छ १ सवालीं पावोन सविस्तर मजकूर कळला. श्रीमंतांचींही पत्रें

पावलीं. ‘ हैदरखान या रोखें आला तेव्हां पिछावर यावें कीं नाहीं ’ ह्मणोन श्रीमंतांचें पत्रीं होतें व तुह्मींही लिहिलें, त्यास हैदरखान तिकडे गेला, परंतु माघारे यावे अशीच बातमी येत होती. दुसरा प्रकार- श्रीमंतांनीं जातेसमयीं आज्ञा केली होती ( कीं, ) हैदरखान इकडे आला तत्राप येथून आज्ञा येईल तेव्हांच येणें. अशी आज्ञा होती. त्याज- वरून श्रीमंतांस व तुह्मांस पत्रें पाठविलीं त्यास पत्राचें उत्तर याव- यास चार दिवस अधिक लागले. पत्राचें उत्तर आलें त्यांत आज्ञा कीं, ‘ पिछावर येणें. ’ पत्रें छ १ सवालीं आलीं. दुसरे दिवशीं चतुर्थी रिक्तातिथि व नबाब सावनूरकर डेऱ्यास येणार ह्मणून कूच न केलें. नबाब ही डेऱ्यास आले होते. काल बुधवारीं दिनशुद्धि बरीच होती. द्वादश चंद्राचें दान देऊन कूच करून येथें आलों. आज कूच करून राणेबिदनुरापाशीं येतों. उदईक शुक्रवारीं नजीक हरीहराजवळ येतों. तेथून पुढें दरमजल येतों. हैदरखान तरीकिरें अगर कडूरच्या आसपास असल्यास आह्मीं शहवर राहतोंच. श्रीमंत मुलवागलाकडे गेले असल्यास तो पट्टणाकडे जाईल तेव्हां आह्मीं दरम्यान राहावें किंवा श्रीमंतांकडे यावें याजविशीची श्रीमंतांस विनंती करून लिहून पाठवावें. राजश्री गोविंदराव वगैरे कांहीं फौज ठेवणें ह्मणून लिहितात, त्याजवरून गोविंदराव आह्मांकडील राऊत त्यांत रा० बाबूराव जगजीवन व रास्ते यांजकडील राऊतांत त्यांच कोणी राहील. आमच्या तीन पथकांतील राउतांची व बाबूराव यांची गांठ घालून दिल्ही आहे. आह्मांकडील व नरगुंदकराचे व रास्ते- कडील मिळोन हजार अकराशें राउतांची नेमणूक करून ठेविली आहे. राजश्री नारो बाबाजी धारवाडास आले आहेत. त्यांसही पत्र लिहून पाठविलें. ते दोन चार दिवसांत बंकापुरास येतील. येथें वर्तमान कीं, पट्टणांत नंदराज दळवाई यांणीं फितवा करून श्रीमं-

तांकडे मिळाले. ठाणें श्रीमंतांचें पडलें ह्मणून वर्तमानें येतात. बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद. पौा छ. ९ सवाल.

नं. ८७१ ( माघ वद्य द्वितीया. १२ फेब्रुवारी. )

मोरो बल्लाळाचें गोपाळरावास भैरवदुर्ग मु० चें पत्र. ( पौा छ २१ सवाल ) " श्रीमंत मागडीहून आज कूच करून गेले. मागडी पाडून टाकणार. बेंगरुळास बसावें न बसावें याचा ठराव जाहला नाहीं. वेंडील सणकीबागुरास आले आहेत, बहुत सावध असावें. चिकनायकनहळ्ळीचें ठाणें हैदरखानाकडील लोकानीं फितवा करून घेतलें. फौज येथून नरसिंगराव गेले होते तों ते ठाणीं टाकून पळून गेले. आंतील रयत झाडून पळून गेली. ठाणीं ओस टाकिलीं यास्तव हल्लीं नरसिंगराव व शहाजी भोसले व महिमाजी शिंदे ( अशी फौज ) तीन हजार चिकनायकहळ्ळीस ठेविली. येथून रवाना केली आहे "

नं. ८७२ ( माघ वद्य द्वितीया. १२ फेब्रुवारी. )

मोरो बल्लाळाचें गोपाळरावास पत्र भैरवदुर्गाहून. पौा छ २१ सवाल.

" राजश्री महिमाजी शिंदे यांजबरोबर फौज देऊन गुरमकोंड्याकडे श्रीमंतांनीं पाठविलें होतें. हें वर्तमान हैदरखान यास कळतांच त्यांणीं मिराबरोबर दोन तीन हजार फौज सडी देऊन पाठविले. तो बुकापट्टणावरून शिरें डावें टाकून पुढें गेला. तो देवराजदुर्गाजवळ उतरल्याची बातमी आली. प्रहर रात्र जाहली नाहीं तों श्रीमंतांनीं मलबा पानशे यांजबरोबर सडी फौज देऊन आठ दहा हजार फौज रवाना केली आहे. गांठ पडली तर गुंता राहणार नाहीं. कर्नोळकर व कडपेकर यांस निजामनअल्लीखान यांणीं ताकीद केली आहे कीं, तुह्मीं श्रीमंतांस जाऊन मिळावें. "

---

तुह्मी.

नंबर ८७३ **श्रीगणराज.** ( माघ वद्य द्वितीया.
१२ फेब्रुवारी. )

अपत्यें साष्टांग नमस्कार विज्ञापना. " उडगणीवर हैदरखानाची फौज थोडी आहे परंतु पायदळ भारी आहे. बाऱ्या नाक्यांची बंदोबस्ती भारी करून जागां जागां चौक्या ठेविल्या आहेत. पट्टणास जाऊन तेथील बंदोबस्त करून मागती माघारे उलटावें हा भाव त्याचा आहे. " ह्मणून वडिलीं लिहिलें तें कळलें. ऐशास प्रस्तुत हैदरखान पट्टणाकडे जात नाहीं. नागमंगलावर श्रीमंतांचा मुक्काम होता तों पट्टणचा रोंख होता. तो रोंख चुकला. पुढें बेंगरुळास आमचे मोर्चे बसल्यावर पट्टणास जाणें तर जाईल. तूर्त जात नाहीं. तरीकिऱ्यावर राहो, अथवा माघारा उडगणीवर जावो. वडिलीं येण्याचा मजकूर लिहिला, ऐशास येविशींचा मजकूर श्रीमंतास वारंवार विनंती करीत आहे. त्यास हैदरखान त्या रानांत आहे तों आपणांस तेथेंच राहिलें पाहिजे. उडगणीवर होता तों सावनूरचा शह रक्षून रहावें लागलें. तेथून तरीकिऱ्याच्या सुमारें आला तेव्हां दुर्गकराचा व नवीं ठाणीं घेतलीं आहेत त्यांचा शह रक्षला पाहिजे. तेथें दोनही शहाच्या सुमारें राहणें पडलें. त्याचा शह सोडून तें रान खालीं टाकून इकडे आल्यानें त्यास खालीं रान सांपडून तो एखाद्या संस्थानच्या गळां पडेल. गडबड करील. मग पायबंद बसेल. यास्तव तूर्त त्या रोंखावर राहिलें पाहिजे. त्यांत हैदरखानाचा शह चुकत जाईल तसें लिहीत जाऊं. भैरवदुर्गावर छ. १४ सवालीं पहांटेस हल्ला झाली. हल्ला करून किल्ला घेतला. तेथील किल्लेदार सांपडला. गुरें फार होतीं. ( आंतील ) लोक फार नागवले. ब्राह्मण फार लुटले गेले. रात्रौ ब्राह्मणांस श्रीमंतांनीं आणून भोजनास घालून एक एक वस्त्र दिलें. किल्ला चांगला आहे. सरकारांत चिक-

---

१ पत्र मोरो बल्लाळ याचें गोपाळरावास.

मागडीचें ठाणें ठेविलें. उत्तरदुर्गावर या किल्लेदाराचा भाऊ होता यास्तव त्यास बरोबर देऊन उत्तरदुर्गास फौज पाठविली आहे. अद्याप तो किल्ला ( हातीं ) आला नाहीं. उत्तरदुर्गास फौज पाठविली नाहीं. शेंपन्नास राऊत किल्ला पहावयास पाठविले होते. विदीत होय. भैरवदुर्ग किल्ला फार चांगला आहे. यास्तव चारशें माणूस गाडदी व हशमी मिळोन ठेवून बंदोबस्त दाणा, दारूगोळी जकिरा भरून ठेविला आहे. विदित होय हे विज्ञापना.

नं० ८७४ श्रीगणराज. ( पौष वद्य चतुर्दशी. २९ जानेवारी. )

चिरंजीव राजश्री मोरोबा आबा यांसीं आशीर्वाद उपरी. 'हैदरखान तिकडे गेला इतकी बातमी आल्यावर हालचाल ( त्याच्या ) गोटावर केली नाहीं ह्मणून श्रीमंतांच्या चित्तांत ( आह्माविषयीं ) विपर्यास आला असेल कीं काय न कळे! धणीपणानें शब्द लावितील तरी सुखें लाऊत! गोट झाडीच्या आंत पांच कोस. बाऱ्या बंद करून गाडदी प्यादे पांचपांचशें माणूस ठेऊन बंदोबस्त करून गेला. हालचाल करून फळ नाहीं यानकरितां हालचाल न केली. हालचाल करावीच अशी श्रीमंतांची मर्जी असल्यास तसेंच लिहावें ह्मणजे हालचाल करून. यश अपयश धन्याचें! आह्मां सेवक लोकांस काय! खावंदाची मर्जी ती गोष्ट करावी. मनास आणून लिहावें. त्या अन्वयें हालचाल करूं. आमचे चित्तीं हालचाल केल्यास कांहीं काट चालला तरी उत्तम. जाऊन काट न चालतां माघारे आलों तरी हे कोणे वेळेस काय कारितील हा भ्रम शत्रूस आहे तो जाईल. वीस कोस जावें, तेव्हां पांच हजार फौज गोटाचे रखवालीस, कही भरून आणावयास, छबिन्यास पाहिजे. बाकी राहिली सहा हजार. त्यांत झाडींत जावें कितीकांनीं, मार्गे

---

१ नं० ८७४ व ८७५ हीं दोनीं पत्रें गोपाळरावानें मोरो बल्लाळास लिहिलेलीं.

रहावें कितीकांनीं, हें ध्यानांत आणावें. श्रीमंतांची मर्जीच असली तरी तसेंच लिहिणें. मग शब्द ठेवितील तो कामाचा नाहीं! हे आशीर्वाद.

नं. ८७५ **श्रीगणराज.** (माघ शुद्ध षष्ठी. १ फेब्रुवारी.)

चिरंजीव राजश्री मोरोबा आबा यांसीं आशीर्वाद उपरी. तुह्मीं पत्रें छ २८ रमजानचीं बेलूरच्या मुक्कामचीं पाठविलीं तीं आजच छ ४ सवालीं गुरुवारीं प्रातःकाळीं पावोन सविस्तर मजकूर कळला. तुह्मीं लिहिल्या अन्वयेंच येतों. वरचेवर लिहून पाठवूं. बंदोबस्ताविशीं सावधपणें आहों. चिंता न करावी. श्रीमंत नागमंगळाकडे गेले तेव्हां पट्टणच्या रोखें चालिले. तेव्हां हैदरखान पट्टणाकडे जात नाहीं. तरीकिऱ्याच्या झाडींत राहीलसें दिसतें. बातमी वरचेवरी राखितों. होईल त्या प्रमाणें लिहून पाठवूं. तेथून श्रीमंत आज्ञा करतील त्याप्रमाणें वर्तणूक करूं. माघारा फिरला तरी आह्मीं माघारे फिरों. तो झाडीच्या आसपास राहिला तरी आह्मीं बुद्धिहाळाजवळ तुह्मीं लिहिल्याप्रमाणें राहूं. तुह्मांकडे वरचेवरी लिहून पाठवूं. रणमंडळतोफ पुण्याहून आली. वीस शेरी गोळ्याची आहे. गदग परगणीयांत आल्यावरी पत्र आह्मांकडे आलें. तोफ मातबर. विना आज्ञा पाठवितां नये. ह्मणून कोपळास लाऊन दिली होती. तों श्रीमंतांचें पत्र आलें कीं कोपळावरूनच चित्रदुर्ग उजवा टाकून शिऱ्यांस पाठविणें. त्याप्रमाणें तोफेसमागमें कारकून आहे त्यास लेहून पाठविलें. सावनूरकर नबाबानीं पांच सातशें राऊत नवे ठेविले. गाडदी व प्यादे तीन हजारपावेतों जमा केले आहेत. थोरले लेंकास व राजश्री खंडेराव यांस आह्मांसमागमें दोन तीनशें राउतांनिशीं व गाडदी दीडशें दोनशें येणेंप्रमाणें तयारी करून पाठवितात. नबाबास सांगितल्याप्रमाणें तरतूद करितात. गुंता नाहीं. नबाबाचे पुत्र व खंडेराव येत

तों एक दोन मुक्काम नजिक हरिहराजवळ करावे लागतील. हैदरखान तरीकिऱ्याच्या झाडींत असल्यास आह्मीं बुद्धिहाळाजवळ राहिलों तरी दाण्याचा मोठा पेच. आह्मांसमागमें तोफा नाहींत. चित्रदुर्गाहून दाणा आणावयाची सोय नाहीं. व दाणा दुर्गास मिळत नाहीं. ऐशियास मनास आणून बंदोबस्त करून पाठविणें. नाहीं तरी हरिहराजवळ राहिल्यानें मागाहून[1] तरी दाणा येईल. त्याचे पाठीवर आहों ही तर अवाई त्यास गेलीच तरीकिऱ्याच्या झाडींत राहिला तरी आह्मीं हरिहराजवळ राहिल्यानें दुरोख शह राहतो. दाण्याची सोय पडेल. याचा विचार करून श्रीमंतांच्या कानावर घालून लिहून पाठविणें. तों हरिहरापाशीं आलों ह्मणजे बातमी कळते. वरचेवरी पत्रें ही पाठवितों. मिरजेचीं पत्रें दोन वेळ आलीं तीं पाठविलीं आहेत. आह्मीं हरिहर सोडून पुढें आलों तरी दाणा मिळणार नाहीं एवढेंच संकट आहे. हरिहरास गेल्यावर जसें हैदरखानाचें वर्तमान लागेल तसें करूं. नरगुंदकर व या चहूं पथकांतील मिळून हजार बाराशें राऊतांची नेमणूक करून ( सावनुरास ) ठेविले. आमच्या तिही पथकांतील व बाबूराव जगजीवन ठेविले. हे आशीर्वाद.

नं. ८७६ श्री. ( माघ शुद्ध अष्टमी. ३ फेब्रुवारी. )

अपत्यें[2] साष्टांग नमस्कार विज्ञापना. चित्रदुर्गकराचे दोन तीन गांव राजश्री आनंदरावदादानीं मारिले ह्मणून चित्रदुर्गकरांस कळलें. त्यावरून त्यानीं श्रीमंतांच्या कानावर घातलें. त्यावर श्रीमंतांनीं आज्ञा केली कीं, राजश्री आनंदराव यांस पत्र लिहून पाठविणें. त्यावर मी

---

१ मागच्या प्रदेशांतून. धारवाडच्या सुभ्यांतून. २ नं. ८७६।७७।७८ हीं तिन्हीं पत्रें मोरो बल्लाळ यानें गोपाळरावास लिहिलेलीं.

विनंती केली कीं, त्यांस एकल्यास लिहिलें तर त्यांस असें भासेल कीं यांनीं सांगितलें. यास्तव उभयतांचे नांवचें पत्र लिहिविलें आहे. त्यास श्रीमंतांनीं स्वदस्तुरचें रागें भरून पत्र लिहिलें आहे. ऐशास वडिलांच्या चित्तांत राग येईल यास्तव विनंती लिहिली आहे. सरकारचें पत्र सांडणिस्वाराबरोबर पाठविलें आहे. आह्मींच उभयतांचे नांवें लिहविलें. त्यानीं रास्ते यांचा बोभाट येथें सांगितला. आह्मीं गेलों तों दरबारीं कळलें. मग आह्मीं पत्र उभयमांचे नांवें लिहिविलें. विदित होय हे विज्ञापना.

नं० ८७७ श्रीगणराज. ( माघ शुद्ध अष्टमी. ३ फेब्रुवारी. )

अपत्यें मोरोचानें साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत छ ६ सवाल पावेतों वडिलांचे आशीर्वादेंकरून वर्तमान यथास्थित असे विशेष.

' राजश्री सदाशिव रामचंद्र लक्ष्मेश्वरास आले होते. तेथून कूच करून लष्करास येऊन येथून पुढें गेले. ' ह्मणून वडिलीं लिहिलें तें कळलें. ऐशास दुर्गकरांच्या तालुक्यांतून येतील यास्तव ताकीद केली असली तर उत्तम. नाहीं तरी वाटेनें साळसूदपणें येणार नाहींत! ( श्रीमंतांनीं ) राजश्री महिमाजी शिंदे यां समागमें दोन तीन हजार फौज दिली ( व ) दोन तोफा देऊन गुरमकोंड्याकडे पाठविले आहेत. आज पिराजी नाईक निंबाळकर यांचा मजकूर वडिलीं लिहिला तो कळला. चांगला माणूस होता. परंतु होणारास उपाय नाहीं! येथेंही वर्तमान आलें होतें.

चित्रदुर्गकरांच्या डेऱ्यास श्रीमंत आदितवारीं प्रतिपदेस गेले होते. त्यांनीं वस्त्रें दिलीं. श्रीमंतांस कंठी दिली. हत्ती दिला. श्रीमंत राजश्री नारायण रावसाहेबांस घोडा, पदक, दुहेरी पोशाक. वरकड मुत्सद्दी व सरदार लोकांस वस्त्रें दिलीं. श्रीमंतांस हत्ती फार

---

१ पटवर्धनानीं.

यथास्थित असे. विशेष. वडिलीं छ २७ रमजानचीं पत्रें नजिक सारापुरच्या मुक्कामचीं सांडणीस्वाराबरोबर पाठविलीं तीं छ १ सवालीं मुक्काम मजकुरीं पावलीं. लिहिला मजकूर कळला. "हैदरखान गेल्याचें वर्तमान आलें होतें ते समयीं फौजानीं बारीपावेतों जावयाची तजवीज केली होती परंतु मामूरची बारी बहुतांनीं पाहिली आहे. एक घोड्याची वाट. पलीकडे एक बातेरी बांधून हजार गाडदीं शिवाय प्यादे त्या बातेरीस आहेत. उडगणीच्या वाटेनें तीन कोस झाडी. एक वाट आहे ते खळींतून जावयाची. वाट त्यांच्या गोटांत जाते. दुसरी वाट नाहीं. या प्रकारें वाटांची बंदोबस्ती आहे. फौजानीं जाऊन यावें इतका प्रकार दिसतो. कालपासून माघारा फिरून उडगणीस आल्याची गरम खबर आली आहे. कदाचित आला नसला तर फौजानीं जाऊन गडबड करून पहावी कीं काय तें श्रीमंतांस विनंती करून लिहून पाठविणें," ह्मणोन आज्ञा; ऐशियास उडगणीस जाऊन उपयोगीं काय? एखादे निमित्य तिकडे सडे जाऊं नये. गलगनाथापासून उतरोन हैदरखानाचे रोखें पांच गांवच्या अंतरानें रहावें तो तरीकिऱ्यास जाऊन राहिला आहे यास्तव त्याचे रोखें येऊन रहावें. श्रीमंत परवां बुधवारीं बेळुरावर होते. कालीं गुरुवारीं नागमंगळास आले आहेत. आणखी एक दोन मुक्काम येथेंच होतील. चिकबाळापूर घ्यावें, कोल्हार घ्यावें, हा मनसबा आहे. महमद अलीखानाकडील उत्तर अद्याप आलें नाहीं. विदित होय हे विज्ञापना. तुह्मांपासून सावनूर पांच गांवें व हैदरखान ही पांच गांवें + वर येऊन रहावें. यांत जेथें सोईस येईल तेथें रहावें. विदित होय हे विज्ञापना.

---

+ मधलीं अक्षरें मूळपत्रांत फाटलीं आहेत.

नं. ८८० ( ४ फेब्रुवारी. )

नागोराव यांचें गोपाळरावास माघ शु० ९ चें पत्र.

रायदुर्गनजीकच्या मुक्कामचें.

" मुराररावाचें माघ शु० ६ स कूच झालें. रथसप्तमीचा मुक्काम केरुरास झाला. तेथें स्त्रीपुत्रांची भेट झाली. अमित्राचीं पत्रें वरचे-वर येतात कीं, आह्मीं श्रीमंतांशीं सल्ला करितों. हरकसेंही त्यांनीं देशास जावयाचा मनसबा करितों. आपण इकडे यावें हें उचित. न आल्यास दोहींकडेही जाऊं नये. कदाचित जालन तर आपला आमचा विरोध अतिशय वाढेल. श्रीमंत माघारे गेल्यावर आह्मांस मनसबा आपल्याशींच आहे. याप्रमाणें पत्रें आलीं यामुळें मुरारराव सेनापति कांहींसे दुग्ध्यांत पडले. शेवटीं श्रीमंताकडेच यावयाचा मन-सबा ठरला. जवळ होता तो सरंजाम घेऊन निघोन आले. बरोबर तीन साडे तीन हजार नामी स्वार व दोन तोफा व पांचशें गाडदी या प्रमाणें सरंजाम आहे. "

नं० ८८१ श्रीगणराज. ( फाल्गुन शुद्ध दशमी. ७ मार्च. )

अपत्यें मोरोबानें साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत छ ८ जिल्काद मुक्काम नंदिदुर्ग. वर्तमान यथास्थित असे विशेष. बाळापुरचें ठाणें घेऊन तेथून कूच करून आज नंदीगडास आलों. तसेच मोर्चे बसले. दरवाजापर्यंत मोर्चे चढले आहेत. वडिलांस कळावें. मीर व टिपु हैदर-खानाचा लेक बेंगळुरास जमा झाले होते तेथून कूच करून निघोन गेले ते छ ७ जिल्कादीं निजगलदुर्गच्या मुक्कामास गेले हीं बातमी लागतांच येथून गायकवाड वगैरे पथकें चार हजार फौज रवाना केली आहे.

---

१ हा मुराररावाचा पेशव्यांकडे राहणारा वकील. २ हैदराचा. ३ पत्र मोरो बाब्ळ यांचें गोपाळरावास.

येऊन पावतील. मीर व टिपुमिय्या हैदरखानाकडे जाऊन अथवा माघारे फिरोन पट्टणास जाऊन, गायकवाड यांणीं फौजसुद्धां तुम्हांजवळ रहावें अशी आज्ञा झाली आहे. विदित होय हे विज्ञापना.

नं. ८८२ श्रीगणराज. ( माघ शुद्ध एकादशी. ६ फेब्रुवारी. )

चिरंजीव राजश्री मोरोपंत आबा याप्रती गोपाळराव गोविंद आशीर्वाद उपरी येथील कुशल तागायत छ ९ सैवाल मुक्काम म्यागलगेरे नजीक उचंगीदुर्ग तालुके हरपनहल्ली येथें वर्तमान यथास्थित असे. विशेष. ऐरणी तुंगा उत्तरतीर तालुके सावनूर येथील मुक्कामाहून चित्रदुर्गकराचे जासुदा समागमें तुम्हांस पत्रें पाठविलीं आहेत तीं प्रविष्ट झाल्यानंतर सविस्तर वर्तमान कळेल. नबाबाचे पुत्र यावयाचे होते याजकरितां एक मुक्काम ऐरणीजवळ झाला. ते दिवशीं नबाबाचे पुत्र व राजश्री खंडेराव आले. तेथून काल इंदुवारीं कूच करून येथें आलों. आज कूच करून पुढें यावें त्यास काल अस्तमानीं हरिहराहून उडतें वर्तमान हैदरखान तरीकिरेहून कूच करून माघारा सतीचिद्नुराकडे आला ह्मणून आलें, याजकरितां आज येथें मुक्काम केला. आज वर्तमान अस्तमानपावेतों चहूंकडून येईल. आम्हीं उदईक येथून कूच करून सणकीबागुराच्या रोखें येऊं. तेथें आल्यानंतर वर्तमान कळोन हैदरखान तरीकिरेसच ठरतो किंवा तेथून कूच करून माघारा जातो अगर पट्टणाकडे जातो हें कळेल. त्याजप्रमाणें तुम्हांस लिहून पाठवूं. श्रीमंतांनीं बादलीजामेवार दोन सावनुरी खरेदी करून पाठवून देणें ह्मणून आज्ञा केली होती. मासल्यास सरकारचा पटका एक पाठविला होता त्याचप्रमाणें दोन जोमवरें सावनुराहून आणवून पाठविलीं आहेत. दोन जामेवरें मिळून तोळे साडेचाळीस. दर तोळ्यास रुपये अडीच प्रमाणें राजश्री व्यंकाप्पा नाईक यानीं खरेदी करून आणिलीं तीं व हुजुराहून मासल्यास एक पटका पाठविला होता तो

देखील माघारा पाठविला आहे. श्रीमंतांनीं सडी फौज बेंगळुराकडे पाठविली आहे. दुसरे दिवशीं श्रीमंतांच खासा स्वारीचें कूच होऊन बेंगळुरास जाणें झालें किंवा नाहीं हें लिहावें. महमदअल्लीखान येणार ऐसा निश्चय होऊन निघाले असल्यास उत्तमच आहे. महमदअल्लीखान भारी सामानानिशीं लवकरच आले तर बेंगळूर फार दिवस दम धरणार नाहीं. खासा स्वारी बेंगळुरास गेली असल्यास हैदरखान तरीकिऱ्यापाशींच राहणार नाहीं. पट्टणास जाईल. एखद्या ठाण्याच्या आश्रयास राहून कही कबाडावर तोंड टाकील तर न कळे! पट्टणास गेल्याचें वर्तमान तेथेंही कळेल त्या अन्वयें तुमचीं पत्रें येतील व श्रीमंतांची आज्ञा येईल त्याप्रमाणें वर्तणूक करूं. बल्लारीकराकडील मजकूर पेशजी तुह्मांस लिहिलाच आहे. त्याचप्रमाणें श्रीमंतांशीं बोलोन बंदोबस्त करून घ्यावा. अजमास तुह्मांस पेशजी चाळीस हजार रुपये पावेतों लिहिलाच आहे. निदान पन्नास पावेतों नजर व बाकी सालमजकुरची खंडणी देखील होत असल्यास कबूल करून विल्हे लावावें. बल्लारीकरांनीं नवा मूल संस्थानीं बसवावा ह्मणून अनंतपुराहून आणिला आहे. त्याचे नांवें सरकारच्या सनदा करून द्याव्या. बल्लारीकरांत कांहीं जीव नाहीं. श्रीमंतांनीं कृपा करून सालमजकुरी याजप्रमाणें विल्हे लाऊन घ्यावी तरीच संस्थानचा बचाव. यास्तव तुह्मीं श्रीमंतांस विनंती करून पेशजी लिहिल्याप्रमाणें झालें तर उत्तमच झालें. नाहीं तर पन्नास हजार पावेतों बोलोन विल्हे लावावें. बल्लारीकर काटक बदलले आहेत ते सूत्रवर्तीनें संस्थानिकाशीं रुजू झाले तर उत्तम झालें. नाहीं तर त्यांचा बंदोबस्त सरकारांतून करून द्यावा लागेल असें श्रीमंताशीं बोलोन विल्हे लावावें. बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद.

नं. ८८३ श्रीगणराज. ( माघ शुद्ध द्वादशी.
७ फेब्रुवारी. )

चिरंजीव राजश्री मोरोपंत आबा यांसीं प्रती गोपाळराव गोविंद

आशीर्वाद उपरी येथील कुशल तागायत छ १० सवाल बुधवार मुक्काम म्यागलगिरें तालुके हरपनहळ्ळी वर्तमान यथास्थित जाणोन स्वकीय कुशल लिहित जाणें. विशेष. तुह्मीं पत्रें छ ६ सवालचीं नागमंगलच्या मुक्कामचीं पाठविलीं तीं काल संध्याकाळीं पावोन सविस्तर मजकूर कळला. आह्मीं वाळानदीवर आल्यानंतर तुह्मांकडे पत्रें पाठविलींच आहेत. सावनूरकर नबाबाचे पुत्र यावयाचे होते ह्मणून हलक्या मजली करून ऐरणीस आलों. तेथें रविवारीं मुक्काम केला तों नबाबाचे पुत्र व खंडेराव आले. सोमवारीं कूच करून येथें आलों. हैदरखान माघारा फिरल्याची आवई ऐकिली याजकरितां बातमीस माणसें पाठविलीं आहेत. तहकीक बातमी येईल, मग कूच करून पुढें जावें, याजकरितां काल येथें मुक्काम केला. आज तहकीक बातमी आली ह्मणजे कूच करून पुढें तरीकिऱ्याच्या रोखें येतों. श्रीमंतांच्या पत्रीं व तुमच्या पत्रीं आहे जे, "हैदरखानास विसा कोसांची तफावत टाकून दरम्यान रहावें. माघारा फिरला तरी माघारें जावें. पट्टणाकडे आला तरी लिहून पाठविणें. येथून लिहून पाठवूं त्याप्रमाणें करावें." ह्मणून लिहिलें, त्यास येथून तरीकिरें वीस कोस अजमासें होईल. त्यास उदईक कूच करून पुढें गेलों ह्मणजे सोळा सतरा कोसांची तफावत राहील. तेथें कांहीं मुक्काम करावे लागतील. दाणा जिकडे विकत मिळेल तिकडून आणावा लागेल. वैरण कापून आणूं ह्मटल्यास एक काडी नाहीं. तालुके हरपनहळ्ळी व चित्रदुर्ग व हरिहर तिधा[1] आहे. वैरणीखेरीज परिणाम नाहीं. याजकरितां जेथून वैरण मिळेल तेथून आणवावी लागेल. वरकड कशास उपद्रव तिळमात्र लागणार नाहीं. राऊतही रखवालीस देत असतों. असें असतां

---

१ तिधवा.=त्रय लिहिण्याचा भावार्थ कीं तिन्ही तालुके आपलेच आहेत. त्यांतील वैरण कापून आणली तर आपल्याच व आपल्या सोबत्यांच्या मुलखास आपणच उपद्रव देतों असें होईल.

संस्थानिक बोभाट करितील तरी श्रीमंतांस विनंति करून ठेवणें. चित्रदुर्गेचा व आमचा स्नेह. त्यांस[1] ही समजाऊन सांगावें. नाहीं तरी त्यांजकडील कारकून त्यांस लिहितील तेव्हां श्रमी होतील. याजकरितां अगोदर त्यांस सांगावें. वैरणी खेरीज तिलमात्र उपद्रव लागणार नाहीं ह्मणोन सांगावें. सावनूर प्रांतीं होतों तेव्हां वैरण कडबा ( सावनूरच्या मुलखांतून ) आणीतच होतों. या प्रांतची वैरण ध्यावी लागेल. हैदरखान तरीकिऱ्याच्या आश्रयास आहे तों आह्मांस सोळा कोसांच्या तफावतीनें रहावें लागेल. तो पट्टणाकडे जाईल अथवा माघारा फिरे तों लिहिल्याप्रमाणें राहणें प्राप्तच आहे. दुर्गेकरांचा कारकून बोभाट संस्थानिकांस लिहिल तेव्हां ते श्रमी होतील. आह्मीं त्यांच्याच मुलुखाच्या बचावासाठीं आलों असेंही त्यांस सांगावें. आणि वैरणीविशीं त्यांस वाईट न वाटे असें अगोदर करून ठेवावें. श्रीमंतानीं मसलतीचे प्रकार लिहिले त्याचें प्रत्योत्तर लिहून पाठविलें आहे त्याजवरून कळेल. नागमंगलचें ठाणें पाडावयास लाविलें ह्मणोन लिहिलें तें कळलें. संभाजी मोरे याजविशीं राजश्री नाना फडणवीस यांस ( श्रीमंतांचें ) पत्र घेऊन पाठविलें तें पावलें. मिरजेस वडिलांकडे पाठवितों. सोंधेकर राजाची थैली पाठविली ती पावली. राजश्री शंकराजीपंत ऐरणीच्या तळावरूनच परत गेले परंतु थैली त्यांजकडे पावेशी पाठवितों. ' काडपचली व चेनमदलीचा ऐवज गुदस्तांचा कांहीं राजश्री तिमाजीपंतानीं आणून दिला. सवादोनशें होन पाहिजे आहेत ते आणून देतील.' म्हणून लिहिलें, उत्तम आहे. ' कृष्णापा नाईक याणीं बाराशें होन घेतले. अलीकडे गांव तिमाजीपंताचे हवालीं झाले ' ह्मणून लिहिलें, त्यास कृष्णापा नाईक लबाड आहेत. असोत ! आमच्या गांवचा ऐवज त्यांस सुटणार नाहीं ! कृष्णापा नाईकानें लबाडी केली आहे त्याचें फळ ही पावतील. चिंता नाहीं. कित्तूर-

---

१ चित्रदुर्गच्या संस्थानिकास.

कराचा ऐवज तुह्मीं लिहिल्याप्रमाणें राजश्री भास्कर तानदेव याजकडे देविला आहे. इकडे आणवीत नाहीं. इकडून राजश्री सदाशिव रामचंद्र वगैरे गेले त्यांस ताकीद केली आहे कीं दुर्गकराच्या मुलुखास उपद्रव न देणें, ह्मणून ताकीद करावयास अनमान केला नाहीं. राजश्री महिमाजी शिंदे यांसमागमें फौज व दोन तोफा देऊन गुरुमकोंड्याकडे रवाना केला ह्मणून लिहिलें तें कळलें. श्रीमंत बाळापूर व कोल्हाराकडे जाणार ते समयीं बाळापुराहून त्याची रवानगी करिते ह्मणजे मागील आवईनें ठाणींठुणीं सुटतीं. 'चित्रदुर्गकरांच्या डेऱ्यास श्रीमंत गेले होते. श्रीमंतांस हत्ती व कंठी दिली. धाकट्या श्रीमंतांस घोडा व वस्त्रें दुहेरी दिलीं. मुत्सद्दी यांस व सर्वांस वस्त्रें दिलीं.' ह्मणून लिहिलें तें सविस्तर कळलें. घोंगड्यांसाठीं हरपनहल्लीस लिहून पाठवितों. मिळाल्यातर आणवून मिरजेस पाठवितों ह्मणजे तेथून गंगापुरास रवाना करितील. सावनूरकरांकडील मजकुराची पुरवणी पाठविली ती पावली. प्रस्तुत चाकरीस आले आहेत व नबाबानींही तेथें सामान चांगलें ठेविलें आहे. या प्रसंगीं कोणतेंही बोलतां नये. बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद.

नं० ८८४ (माघ शुद्ध त्रयोदशी.
(८ फेब्रुवारी.)

गंगाधर गोविंद यांचें नारोपंत दामले यांस पत्र छ ११ सवालचें मुक्काम म्यागलगिरें नजीक उचंगीदुर्ग प्रांत चित्रदुर्ग येथून. "देवगिरी नजीकचे मुक्कामाहून पत्रें पाठविलीं तीं पावलींच असतील त्या अलीकडील वर्तमान तर तेथून दोन तीन मजलीनीं ऐरणी नजीक तुंगभद्रेच्या उत्तर तीरीं मुक्काम झाला. दुसरे दिवशींही मुक्काम होता. तेथें नबाब सावनूरकर यांचा पुत्रही[1] आला. दुसरे दिवशीं कूच करून मुक्काम मजकुरास आलों. हैदरखान तरीकिऱ्यावर आहे. त्याचा जसजसा रोख

१ हा गोपाळरावाचा धाकटा बंधू.

दिसून येईल तसा येथील मजकूर घडोन येईल. तो पट्टणाकडे गेला तरी श्रीमंतांचे आज्ञेविना श्रीमंतांकडे जावया येत नाहीं. तो माघारा उडगणी मासुराकडे गेला तरी मागती सावनुराकडेच जावें ऐशी श्रीमंतांची आज्ञा आहे. येथून कूच करून त्याचेच रोखें जाऊन पांच सहा गांवच्या अंतरानें मुक्काम होतील."

नं० ८८९ श्रीगणराज. ( माघ शुद्ध त्रयोदशी. ८ फेब्रुवारी. )

अपत्यें[1] मोरोबानें साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत छ ११ सवाल गुरुवार मुक्काम नजीक शिवगंगा वडिलांचे आशीर्वादेंकरून वर्तमान यथास्थित असे. विशेष. वडिलीं देवगिरीचे मुक्कामचें पत्र पाठविलें तें मंगळवारीं याच मुक्कामीं पावलें. लिहिलें वर्तमान कळलें. वेडील सावनुराहून कूच करून हरिहरास आले याजवरून उत्तम झालें. ऐरणीच्या सुमारे रहावें. बातमी पक्की आणवित जावी. बहुत खबरदार रहावें. तो[3] तरीकिऱ्यावर आहे. अद्याप इकडे आला नाहीं. वडिलीं बातमीवर रहावें. आह्मीं चिकनाईकनहळ्ळीपासून ठाणीं बहुत घेतलीं. कांहीं राहिलीं. कांहीं पाडून टाकलीं. आजी मागडीची गढी घ्यावयास फौज गेली आहे. अतःपर बेंगळुरास जावें असा मनसबा आहे. एक दो रोजीं नजीक गेलेवर बेंगळूर पहावयास जावें, साध्य असाध्य जें करणें तें करावें, बाळापूर धाकटें व कोल्हार हें घ्यावें, असें (श्रीमंतांच्या मनांत) आहे. विदित होय हे विज्ञापना. महमदअलीखानाकडील अद्याप उत्तर आलें नाहीं. येथील सर्व वर्तमान भेटीअंतीं विदित होईल. बाळापुराहून ऐवज आणून ठेवितों. विदित होय हे विज्ञापना. मिरजेचीं पत्रें

---

१ मोरो बल्लाळाचें गोपाळरावास पत्र. २ तुह्मां. ३ हैदर. ४ ह्मणजे अर्थात् पेशव्यानीं. पत्र लिहिणारा नेहमीं पेशव्यांबरोबर असे हें पुनः पुनः लिहावयास नकोच.

पाठविलीं तीं पावलीं. त्याचीं उत्तरें मागाहून पाठवितों. हे विज्ञापना. अपत्यें धोंडोबानें[१] व विनायकानें साष्टांग नमस्कार.

पौ॥ छ १३ सवाल.

नं. ८८६ (माघ शुद्ध चतुर्दशी. ९ फेब्रुवारी.)

मोरो बल्लाळाचें गोपाळरावास छ १२ सवालचें भैरवदुर्ग येथून पत्र—

"मुरारराव घोरपडे याणीं इकडे येण्याचें कबूल केल्यास दोन महिने झाले. तुंगभद्रेवर येऊन भेटावें ते न भेटतां श्रीमंतांची स्वारी पट्टणानजीक येऊन पोंचली तरी अजून येत नाहींत हें काय? हैदरअलीखानाकडे जावें असें त्याच्या मनांत असल्याबद्दल बातम्या येतात त्या श्रीमंतांस खऱ्या वाटतात. या कामांत आपण मध्यस्त आहां, याकरितां असें घडून येणार नाहीं ही खातरजमा आहे. प्रस्तुत श्रीमंतानीं मागडीची गढी घेतली. भैरवदुर्गास मोर्चे दिले आहेत."

नं. ८८७ श्रीगणराज. (माघ वद्य त्रयोदशी. २३ फेब्रुवारी.)

चिरंजीव राजश्री मेघश्यामरावबापू[२] यांसीं प्रती गोपाळराव गोविंद आशीर्वाद उपरी येथील कुशल तागायत छ सवाल मुक्काम नजीक मतोंड तालुके चित्रदुर्ग जाणोन स्वकीय कुशल लिहित जाणें. विशेष. तुह्मीं माघ शु १४ चें पत्र पाठविलें तें वद्य एकादशीस प्रविष्ट झालें. "सांप्रत आपला मुक्काम कोठें आहे, श्रीमंत कोठें आहेत, व अविंध कोठें आहे," (ह्मणून लिहिलें) व घोड्या सबर आहेत त्यांची याद नांवनिशीवार लिहून पाठविली ती पावली. 'रूपमंजरी व मिराआबास-सबरशा दिसतात परंतु भरंवसा दिसत नाहीं' ह्मणून लिहिलें तें

१ धोंडो भास्कर व विनायक भास्कर हे दोघेही गोपाळरावाचे चुलत बंधु. २ मेघश्याम कृष्ण पटवर्धन मंगळवेढेकर हा गोपाळरावाचा चुलतबंधु.

कळलें. खबरच असल्यातर आणखी महिन्यांत कळेल. खबर नसल्या तर आणखी काढवाव्या. 'घोड्यांस ओलें बाटूक लाविलें आहे. घोडीं व शिंगरें ताजीं आहेत.' ह्मणून लिहिलें ते कळलें. इकडील वर्तमान तर हैदरखान उडगणीहून कूच करून तरीकिऱ्यास येतांच आह्मांस सावनुराहून कूच करून हरिहर बसवापट्टणाचे सुमारें येऊन राहणें ह्मणून श्रीमंतांचीं पत्रें आलीं. त्याजवरून आह्मीं हरिहरच्या अलीकडे उचंगीदुर्गाजवळ मुक्काम करून राहिलों. श्रीमंत चिकनाइकनहळ्ळी, हगलवाडी, बुधिहाळ, कंदिगिरें वगैरे हीं ठाणीं घेऊन मागडीकडे लांब गेले. आह्मीं उचंगीदुर्गाजवळ राहिलों. मध्यें रान सुनकें पडलें. ठाण्यांत प्यादे बहुतकरून कैदीमच होते. कांहीं चित्रदुर्गकरांचे प्यादे ठेविले होते त्यांस गांवकरांनीं फितवा करून ठाणीं हैदरखानास दिलीं. चिकनाइकनहळ्ळींत राजश्री नारो खंडेराव व राजश्री नरसिंगराव नारायण लेले यांचे पुत्र दोघे तेथें होते त्यांस धरून नेलें. या तिघांस मात्र अविंधानें कैदेंत ठेऊन बाकी ऐंसी माणसांचीं नाकें कापून सोडून दिले. त्यांत ब्राह्मण होते त्यांचींही नाकें कापून सोडून दिले. राजश्री केसोराम फाटक—राजश्री आबाराम फाटक पहिले लक्ष्मेश्वरीं होते त्यांचे भाऊ—कंदीकिऱ्याचे ठाण्यांत होते त्यांचेंही नाक कापून सोडून दिले. ते बुद्धिहाळचे ठाण्यांत आहेत. गालफडाचें कातडें कापून नाकासारखें नाक लाऊन बसविलें आहे. नाक लागलें तर फारसा ऐब दिसणार नाहीं. ब्राह्मणांस (शत्रूनें) शासन मोठें वाईट केलें! ज्या ज्या कालीं जें होणें तें चुकत नाहीं. ठाणीं दगावलीं ह्मणून श्रीमंतानीं राजश्री शाहाजी भोसले व राजश्री नरसिंगराव घायगुडे वगैरे मिळून दोन हजार फौज ठाण्याचे रक्षणार्थ पाठविली आहे. ठाणीं ओस टाकून दरवाजांस आगी

---

१ जुने, हैदराच्या वेळचे.

देऊन आंतले लोक निघून गेले होते. ठाणीं आणखी कायम झालीं. आह्मांसही इकडे येऊन राहणें ह्मणून श्रीमंतांचीं पत्रें आलीं याजकरितां इकडे आलों. श्रीमंत भैरवदुर्गाचा किल्ला घेऊन मागडीची पेठ मारून चिकबाळापुरचीं ठाणीं घ्यावयाकरितां गेले ह्मणून मुलवागलचे मुक्कामाहून पत्रें आलीं. हैदरखान तरीकिऱ्याहून कूच करून संकरापट्टणास गेला ह्मणून बातमी आली. तो पट्टणचाच रोंख आहे. तो तसाच पुढें गेला आणि त्याचे पिछाडीवरच येणें ह्मणून श्रीमंतांचीं पत्रें आलीं तर त्याचे पिछाडीवरच जावें लागेल. बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद.

नं. ८८८ श्रीगणराज. ( अजमासें माघ वद्य. फेब्रुवारीचा दु० पंधरवडा. )

अंपत्यें साष्टांग नमस्कार विज्ञापना. राजश्री मुरारराव घोरपडे सेनापती गुत्तीहून निघून रायदुर्गच्या पलीकडे तीन कोसांवर आल्यावर श्रीमंतांस सांडणी स्वाराबराबर पत्रें पाठविलीं तीं छ १४ सवालीं पावलीं. आह्मांस पत्रें लिहिलीं होतीं कीं या उपर येण्यांत गुंता नाहीं. मजल दरमजल जलदीनेंच येऊन पावतों. दोन दिवसा आड जासूद जोड्या व सुतरस्वाराबराबर पत्र पाठवीत जाऊं. याउपर रायदुर्गाजवळ चार दिवस गुंततील तर न कळे. आह्मीं येथून कासिदा बरोबर पत्रें पाठविलीं आहेत कीं 'रायदुर्गाजवळ गुंतोन रहाल तर न गुंतावें. त्यांजकडील वकील येथें आले आहेत. येथें आल्यावर तेथील गुंता वारेल.' वडिलीं त्यांजकडे पत्रें पाठवून ते जलदीनें येत तें करावें. विदित होय हे विज्ञापना.

---

१ पत्र मोरो बल्लाळ याचें गोपाळरावास. २ रायदुर्गच्या संस्थानिकाकडून खंडणी यावयाची ती येथें वसूल होईल. ती घेण्यासाठीं तुह्मीं तेथें गुंतूं नये.

नं० ८८९ श्री. ( १९ फेब्रुवारी. )

राजश्री गोपाळराव गोसावी यांसी.

अखंडीत लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्नेहांकित शहाजी भोसले. राम-राम विनंती उपरी. येथील कुशल तागायत माघ वद्य षष्ठी मुक्काम कडबा प्रथम प्रहर जाणोन स्वकीय कुशल लेखन करीत गेलें पाहिजे. विशेष. राजश्री पंत प्रधान यांजसमागमें भैरवदुर्ग येथपर्यंत होतों. दुर्गाचें ठाणें घेतलें. तेथें बातमी ऐसी आली जे ( शत्रूनें ) तुरविकिरेचें ठाणें घेतलें व चिकनायकनहळ्ळीचें ठाणें कापून काढिलें. त्यास राजश्री नरसिंगराव घायगुडे व काळे वगैरे शनिवारीं ( पेशव्यांनीं ) पाठविले होते. त्यांनीं कडबास येऊन राहून चौ पांच कोसीं तलाव करीत होते. त्यांची फौज समीप आहे, ठाणीं कांहीं धीर धरीत नाहींत, ह्मणोन वर्तमान सरकारांत कळलें. उपरांतिक आह्मांस ( पेशव्यांनीं ) इकडे पाठविलें आहे. काल बुधवारीं मुक्काम मजकुरीं संध्याकाळीं दाखल झालों. आज घायगुडे व आह्मीं मिळून चिकनायकनहळ्ळीस जातों. आपलीही फौज समीप आहे ह्मणून कळों आलें. तर उत्तम आहे. राजश्री पंत प्रधान यांणीही सांगितलें आहे जे 'तिकडे फौजमुद्धां गोपाळराव व रास्ते आहेत तेही तलावा करितील. त्यांसही पत्रें पाठविलीं आहेत.' आपल्यास पत्र आलें असेल. आपली आणि ही फौज एकत्र झाली ह्मणजे ठाणीं घेतलीं आहेत तींही सुटतील. कळलें पाहिजे. रवाना छ १८ माहे सवाल बहुत काय लिहिणें हे विनंती.

पौ॥ छ २१ सवाल.

नं. ८९० श्रीगणराज. ( अजमासें माघ वद्य. फेब्रुवारीचा दु० पंधरावडा. )

चिरंजीव राजश्री मोरोबा आबा यांसीं आशीर्वाद उपरी. राजश्री

---

१ अक्कलकोटकर. २ शत्रूची. ३ मराठ्यांनीं घेतलेलीं. ४ पत्र मोरो बल्लाळ यास गोपाळरावाचें.

शहाजी भोसले व राजश्री नरसिंगराव धायगुडे चिकनायकनहल्ली व कंदीकिरें वगैरे ठाण्यांकडे श्रीमंतांनीं पाठविले आहेत त्यांजकडून काल राजश्री आपाजीराव[1] येथें आले त्याणीं सविस्तर सांगितलें. चिकनायकनहल्ली व कंदीकिरें व हंदिकिरें हीं ठाणीं ओसच आहेत. तुरवीकिऱ्यांत मात्र हैदरखानाकडील लोक आहेत. तीन ठाणीं रिकामीं आहेत. त्यांत (श्रीमंतांनीं) लोक पाठवून बंदोबस्त करून याणीं उपराळ्यास[2] रहावें, त्यास यांसमागमें गाडदी दोनशें दिले आहेत त्यांस कोणत्या ठाण्यांत ठेवावें! चिकनाइकनहल्ली अफाट. चाळीस बुरूज आहेत. तेथें माणूस किती असावें? पाईंच्या माणसांखेरीज ठाण्यांचा बंदोबस्त कसा होईल? याणीं फौजसुद्धां ठाण्यांत राहूं ह्मटल्यास दगा पावतील असा प्रकार आहे. याजकरितां श्रीमंतांशीं विनंती करून पाईंचे लोक ठाण्याचे भरतीसाठीं पाठवीतसें करावें. या उभयतांस पंधरा दिवसांचे अवकाशें सडेच पाठविले. यांस येऊनही पंधरा दिवस होत आले आहेत. खर्चावेंचाची बेगमी सडेच करून आले. ती सरली असें ह्मणतात. पाहते अर्थी हजार गाडदी अथवा प्यादे पाठविले तरच ठाण्यांचा हे बंदोबस्त करितील. नाहीं तर यांणीं काय करावें? श्रीमंतांस सविस्तर विनंती करून आज्ञा करितील त्याप्रमाणें लिहून पाठवावें. चिकनायकनहल्लीस हजार माणूस पाईंचें मावळी पंचरूढ ठाण्यांत असल्याखेरीज ठाणें रहात नाहीं. फौजेस[3] ठाण्यांत रहाण्यास धीर पुरवत नाहीं. फौज ठण्यांत राहिली आणि गडबड झाली तरी झुंजावयाचें टाकून आधीं घोड्यांकडे येतीऽ! यास्तव ठाण्यांत रहावयास हजार माणूस पाठवावें. मग हे उपराळ्यास रहा ह्मटलें तर राहतील. चिंता नाहीं. राजश्री शहाजी भोसले यांस महिमाजी शिंदे याजवळ ठेऊन राजश्री नरसिंगराव यांस हुजूर बलाविणार ह्मणून राजश्री आप्पा-

---

१ आपाजीराव गाडगीळ हे अक्कलकोटकरांचे दिवाण. यांचे रहाणें वांईस.
२ ठाण्यांच्या कुमकेस. ३ घोडस्वारांस.

जीराव याणीं सांगितलें, ऐशास राजश्री शहाजीबावा भोसले ह्मणजे कोण ( आणि ) महिमाजी शिंदा केवढा माणूस! त्याजवळ शहाजी भोसले यांणीं रहावें हें देवास मानेना तें श्रीमंतांस कसें मानतें! महिमाजी शिंदे याजवळ शहाजीबावास रहा ह्मटल्या ते दौलतीची आशा सोडून श्रीमंताकडे येणार. मग श्रीमंतांचे चित्तास येईल तें करोत! त्यांचे स्वरूपाजोगी सेवा त्यांस सांगावी. आणि ठाणें ठेवावयाचें असल्यास बंदोबस्ती लिहिल्याप्रमाणें करावी. नाहीं तर ठाणें पाडून टाकावें ह्मणून विनंती करावी. आणि उत्तर घेऊन पाठविणें हे आशीर्वाद.

नं. ८९१ **श्रीगणराज.** ( माघ वद्य सप्तमी. १७ फेब्रुवारी. )

अपत्यें मोरोबानें साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत छ २० सवाल मुक्काम मागडी प्रांत श्रीरंगपट्टण. वडिलांचे आशीर्वादें करून वर्तमान यथास्थित असे. विशेष. वडिलीं माघ शुद्ध चतुर्थी म्यागलगिरेच्या मुक्कामचीं पत्रें पाठविलीं तीं छ ९ सवालीं मुक्काम मजकुरीं पावलीं. लिहिला मजकूर कळला. ' श्रीमंतानीं लिहिलें कीं मतोडावर येऊन मुक्काम करावा. येणेंकरून बुद्धहाळ वगैरे ठाणीं आहेत त्यांचा बचाव होईल. यामुळें तेथून कूच करून मतोडा सन्निध येऊन मुक्काम करितों ' ह्मणून वडिलीं लिहिलें तें कळलें. ऐशास ' तेथें आल्यास दाणा मिळणार नाहीं येविशीं श्रीमंतांस पुसोन लिहिणें ' ह्मणोन आज्ञा, त्यास मतोडाजवळ आलिया ठाण्यांचा बचाव होईल आणि शिऱ्यांहून दाणा आणावयास जवळ. तिकडे दुर्ग जवळ. यामुळें मतोडावर रहावें हें उत्तम. पुढें बुधहाळावर जर यावें तर बुधहाळ मात्र सरकारचें ठाणें. मुलुख लुटला गेला. आणि या गडबडींत गावखेड्यांनीं दाणा मिळणार नाहीं. दाणा वैरणीच्या बंदोबस्तीची विनंती केली

---

१ पत्र मोरो बल्लाळ याचें गोपाळरावास.

आहे. मागाहून ठीक करून लिहून पाठवितों. दुर्गकरास उपद्रव लागेल, त्यास वैरण काडी आणणें तर आणावी. गुरूं ढोर कोणी आणिलें तर ताकीद करून सोडून देववावें. मार्गें आणिलीं असतील तेंही सोडून देववावें. राजश्री आनंदराव दादांच्या गांवाचा मजकूर लिहिला तो कळला. श्रीमंतांस विनंती करून पत्र द्यावयाची परवानगी घेतली आहे. मागाहून पत्र घेऊन पाठवितों. वडील मतोडावर आल्यास हैदरखान यास आपणांस अंतर थोडें राहतें यास्तव हैदरखानाची बातमी राखून सावध असावें. जवळ राहिल्यामुळें रात्रीची दगाबाजी करील यास्तव छबीन्याची बंदोबस्ती चांगली असावी. आह्मांस काळजी लागली आहे. तोफांचा मजकूर लिहिला तो कळला. त्यास तोफा आणावयास राजश्री नागोराम याजबरोबर हजार स्वार नेमून शिन्यांस रवाना केले. वडिलांस कळावें. सावनूरकरांचा मजकूर लिहिला तो कळला. कित्तूरकरांचीं पत्रें घेतलीं आहेत. एक दोन दिवसांनीं मागाहून पाठवितों. राजश्री खंडेरायाकडे ऐवज येणें त्याचा हवाला राजश्री लक्ष्मणपंताकडे आला ह्मणून लिहिलें तें कळलें. विदित होय हे विज्ञापना.

नं० ८९२ श्रीरामचंद्र प्रसन्न. ( १९ फेब्रुवारी. )

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री गोपाळराव स्वामीचे सेवेशीं.

पोष्य आपाजीराम कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती उपरी येथील कुशल तागायत माघ वद्य नवमी मुक्काम नजीक चिकनाइकनहल्ली यथास्थित जाणून स्वकीय कुशल लिहीत असलें पाहिजे. विशेष. इकडील वर्तमान तरी श्रीमंतीं आह्मांस व राजश्री नरसिंगराव धायगुडे यांसीं चिकनाइकनहल्लीच्या रखवालीस पाठविलें, त्यास आह्मीं उभयतां कसबे

१ रास्ते. २ तुह्मी. ३ हरिहरचा मामलेदार लक्ष्मण हरि लागू. ४ हा अक्कलकोटकरांचा दिवाण.

मजकुरास आलों तों गांव अगदीं ओस आणि बेचिराख आणि गांव मातबर. दोन हजार प्यादे गांवांत ठेविल्याशिवाय ठाणें रहावयाचें नाहीं. आह्मीं जमावसुद्धां गांवांत रहावें तरी भोंवतालीं चौदा कोस वैरण नाहीं. यास्तव कसबे मजकूरचे चहूं कोसीं (अंतरावर) राहत असतों. तळावा मात्र रोज करीत असतों. गांवांत थोडा बहुत दाणा आहे तो आणून चारीत असतों. श्रीमंतीं आह्मांस सांगितलें कीं, "गोपाळराव यांची व तुमची गांठ लवकरच पडेल. गोपाळराव शिऱ्यांचे पलीकडे चहूं गांवावर आहेत. चहूं दिवसांत तुह्मांपासून दहा कोसीं बारा कोसीं येतील. त्यास तुमची त्यांची भेट तळाव्याचे समयीं होईल. त्यास तुमचे त्यांचे मताप्रमाणें ठाणीं राखावयाचीं तीं राखावीं आणि जीं जीं राखावयाचे उपयोगीं नसतील तीं पाडून टाकावीं." ह्मणोन आज्ञा केली. त्यास आह्मांस कसबे मजकूरचे ठाण्यास येऊन आठ दिवस झाले, परंतु आपण कोठें आहांत हे कांहींच बातमी येत नाहीं. यास्तव मुजरत जासूदजोडी आपणाकडे पाठविली आहे. तरी आपण कोणत्या मुक्कामीं आहां आणि इकडे किती दिवसांत येणार, हें लिहावें. चिकनायकनहळ्ळीचें ठाणें कापून गेल्या पासून हंदिकिरेचें ठाणें व तुरविकिरें वगैरे दोन चार ठाणीं पळून गेलीं आहेत. ठाण्यांत हैदरनाइकाकडील प्यादे थोडे बहुत आहेत. त्यास आपण इकडे सत्वर यावें ह्मणजे ठाणीं घ्यावयास येतील. आपण या रोखें आल्यावर ठाणीं आपले आपण पळून जातील ऐसें आहे. यांत आपले विचारें करों येईल तें खरें. आपलेकडील वर्तमान सविस्तर लिहिलें पाहिजे. बहुत काय लिहिणें कृपा लोभ असों दीजे हे विनंती.

पै॥ छ २९ सवाल.

---

१ सोळा कोसांवर.

शः १६९१ **हैदरअलीवर तिसरी स्वारी.** इ. स. १७७०

नं० ८९३ **श्री.** ( माघ वद्य नवमी. १९ फेब्रुवारी. )

श्रीमंत राजश्री राव स्वामीचे सेवेशीं.

पोष्य मुकुंदराव श्रीपत कृतानेक दंडवत प्रणाम विनंती येथील कुशल तागायत छ २२ माहे सवाल जाणून स्वकीय कुशल लेखन आज्ञा केली पाहिजे. विशेष ( आपण ) छ २१ मिनहूचें पत्र सांडणीस्वारासमागमें पाठविलें तें छ २२ मिनहूस पावलें. संतोष झाला. असेंच निरंतर पत्रद्वारा संतोषवीत असावें. यानंतर आपण श्रीमंतांस पत्रें लिहून पाठविलीं तीं डांकेचे सांडणीस्वार श्रीमंतांचे तेथें असतील त्यांजवळ देऊन रवाना करावें ह्मणून लिहिलें त्याजवरून पत्रें डांकेचे सांडणीस्वाराजवळ देविलीं. पुढें जाण्याची तजवीज केली आहे. जातील. 'श्रीमंत कोणते ठिकाणीं आहेत, अलीकडे ठाणीं कोणकोणतीं घेतलीं,' तें लिहावें ह्मणोन लिहिलें, ऐशास श्रीमंत प्रस्तुत मागडीनजीक आहेत. भैरवदुर्ग हल्ला करून घेऊन मागडीस आले. मागडीखालील जमीदोजी(?) किल्ला घेऊन पहाडी किल्ला करेसवती बिलेसवती ह्मणोन आहे त्याची माची घेतली. या उपर वरत्या तोफा चढवून तोफा लागू करणार तर करतीलच. वरूनही बोलीचालीचा प्रकार राजकारण लागलें आहे.

---

१ हा गृहस्थ जातीनें परभू असून त्यावेळीं शिवनेरीचा किल्लेदार होता. परभू आपणास क्षत्रिय ह्मणवितात व आपण त्रिकर्मांचे अधिकारी आहों असें प्रतिपादितात. ब्राह्मण त्यांचा हक्क कबूल करीत नसून त्यांस शूद्राप्रमाणें लेखितात. हा वाद पुरातन पासूनचालत आला आहे. ब्राह्मणांस पूर्वी पत्र लिहितेवेळीं साष्टांग नमस्कार लिहिण्याचा परभूनीं प्रघात घातला असावा व ब्राह्मणांस तें न रुचल्यामुळें 'दंडवत' किंवा 'राम राम' असें केवळ शूद्राप्रमाणें न लिहितां 'दंडवत प्रणाम' लिहिण्याची तोड काढिली असावी. हा 'प्रणाम' ही त्यांनीं लिहूं नये ह्मणून आग्रह ब्राह्मणांनीं धरिला होता असें सन १७९०।९१ सालीं गंगाधर गोविंद पटवर्धन याने लिहिलेल्या एका पत्रावरून सिद्ध होतें. त्या सालच्या पत्रव्यवहारांस 'परभू-प्रकरणा' संबधीं आह्मांस महत्वाचीं कांहीं पत्रें छापावयाचीं आहेत त्यावेळीं आमच्या परभमित्रांची संमति मिळाल्यास याविषयीं अधिक चर्चा करूं.

याप्रमाणें आमचीं पत्रें आजच आलीं. लष्कर सोडून तीन दिवस झाले. “ राजश्री मुरारराव घोरपडे सेनापती श्रीमंताकडे गेले ह्मणोन ऐकिलें हें सत्य किंवा मिथ्या तें लिहावें. महमदअलीखान घाटावर आला ह्मणतात. तसेंच कडपेकर व कर्नोळकर श्रीमंतांकडे येतात ह्मणोन ऐकितों. तर येविशींचें वर्तमान तपशीलवार लिहून पाठवावें ” ह्मणून लिहिलें, ऐशास राजश्री राव सेनापती यांजकडे सरकारचे वकील राजश्री विष्णु नरसिंह येऊन त्यांणीं त्वरा करून राव मशारनिल्हे गुडीबंड्यावरून श्रीमंताकडेस लष्करास गेले. त्यांचें पत्र छ १९ सवालचें सांडणीस्वाराबराबर आह्मांस आलें होतें. नबाब महमदअलीखान तर अद्यापि घाटाखालींच आहेत. श्रीमंताकडून वकील खानाकडे गेले आहेत. कर्नोळकर व कडपेकर हे श्रीमंताकडे जाणार ह्मणून वर्तमान आहे, परंतु जातील न जातील पहावें. संशयात्मक आहे. ‘ चिकनायकनहळ्ळीचें ठाणें हैदरखानानें घेतलें ह्मणून ऐकिलें त्यास ठाणें मजकुरीं राजश्री नारो खंडेराव होते त्यांची गत काय झाली तें सविस्तर लिहावें ’ ह्मणून लिहिलें, ऐशीयास हैदरखानानीं गडबड केल्याचा मजकूर सविस्तर लिहून मुजरद जोड्या आपणांकडे रवाना केल्या आहेत. त्यास पत्रें पावोन सर्व अर्थ कळेल. चिकनायकनहळ्ळीचें ठाणें छ १२ सवालीं पहाटेचे दीड प्रहर रात्रीस हजार दोन हजार पाईचे लोक व कांहीं फौज असे येऊन कोटास शिड्या लाऊन लोक चहूंकडून किल्लयांत घेतले. दुर्गकरांकडील तीन चारशें लोक व स्थलिक सहा सातशें ठाण्यांत होते त्याणीं फितूर केला. आह्मांकडील लोक शंभर दीडशें होते त्यांणीं तीन चार घटका लढाई केली. परंतु ते फार. हे थोडे. दहा वीस माणूस ठार झालें. तीस चाळीसपर्यंत जखमी होऊन येथें आलें. जखमा भारीच आहेच. कांहीं लोक धरून नेलें. राजश्री नारो खंडेराव वगैरे हुजुरचे लोक होते त्यांस धरून नेलें. कंदीकिरेकर ठाणेदार याणीं दहशत खाऊन ठाणें टाकून पळून आले. तुरवीकिरें येथील ठाणेदारास हें

वर्तमान कळतांच तेही ठाणें टाकून पळोन हुजूर गेले. खानाकडील लोक ठाणें मजकुरीं येऊन ठाणें कायम केलें. छ १९ सवालीं हंदिकिरेचें ठाणें खानमजकूर याणीं घेऊन राजश्री केसोराम ठाणेदार ठाण्यांत होते त्यांस धरून नेलें. तसेंच छ ८ सवालीं मिरासमागमें दोन तीन हजार फौज देऊन शिऱ्याचे पेठेवर रवाना केलें. त्यास तरीकिऱ्याहून पांच सहा गांवें रात्रीं येऊन बुकापट्टणपर्यंत येतांच सूर्यउदय झाला. पुढें येण्यास गांठ पडली नाहीं. तेव्हां मिरानें बुकापट्टणावर हल्ला करून किल्ल्यांत उतरोन ठाणें लुटलें. परंतु राजश्री साजोशामजी ठाणें मजकुरीं होते त्यानीं दोन प्रहरपर्यंत दरवाजे व दरवाजावरील बुरूज बळाऊन फौज उधळून काढली. ठाणें शर्तीनिशीं राखिलें. हें वर्तमान आह्मांस कळतांच येथून कुमक पाठवून ठाणें मजकूरचा बंदोबस्त यथास्थित केला. मिरानें आणखीही दहा बारा गांव तालुके मजकूरचे मारिले. याप्रमाणें करीत जाऊन देवरायदुर्गाजवळ उतरला होता. हें वर्तमान श्रीमंतांस विनंती पत्र लिहून पाठविल्यावरून सरकारची फौज मिरावर गेली होती; परंतु त्यानें गांठ पडूं दिली नाहीं. मिरानें कूच करून जाऊन सांप्रत गुडीबंड्याजवळ उतरला आहे. बाळापूर तालुक्याचेही तीन चार गांव मिरानें मारिले. राजश्री महिमाजी शिंदे दोन अडीच हजार फौजेनिशीं गुरुमकुंड्याच्या परमर्षास श्रीमंतांनीं रवाना केले ते मदगिरी पलीकडे जाऊन पांच कोसांवर होसुराअलीकडे उतरले आहेत. प्रस्तुतचें वर्तमान या प्रकारें आहे. आपणास कळावें याकरितां लिहिलें आहे. बहुत काय लिहिणें लोभ असों दीजे हे विनंती.

नं. ८९४ ( माघ वद्य द्वादशी.
२२ फेब्रुवारी. )

गोपाळरावाचें वामनराव व पांडुरंगराव यांस पत्र २९ सवालचें मुक्काम मतोडचें:—

" हैदरखान तरीकिऱ्यावर आहे. श्रीमंतांनीं भैरवदुर्ग घेऊन मागडी-दुर्गास गेले आहेत. मागडीदुर्ग हस्तगत झाला ह्मणजे बेंगळूराकडे जाणार अथवा चिकबाळापूर व कोलार हीं घेणार. चिकनाइकनहळ्ळी वगैरे ठाणीं हैदरखानानें फितव्यानें घेतलीं होतीं तेव्हां बुधेहाळचें ठाणें टाकून लोक जात होते. परंतु आह्मीं समीप पोंचलों यामुळें आतां स्वस्थ झाले आहेत. "

नं ८९५ ( माघ वद्य द्वादशी.
२२ फेब्रुवारी.

वासुदेव धोंडदेव याचें पांडुरंगरावास २५ सवालचें पत्रः—

" चिकनाइकनहळ्ळीस मराठी माणूस ऐंशी नव्वदपर्यंत होतें. नारो-खंडेराव यानें वसुलाचा तगादा केला ह्मणून ठाण्यांत पांच सातशें लोक होते त्यांनीं हैदराकडे संधान बांधून त्याने पांच सात हजार गाडदी आणविले व त्यांस शिड्या लाऊन आंत घेतलें. खेगळापुरकर दोघे भाऊ लेले याणीं त्यावेळीं फार चांगली लढाई केली. चोहोंकडून लोक कोंडले गेल्यामुळें सर्वत्र सांपडले. ते हैदराकडील लोकांनीं तरीकिऱ्यास हुजूर नेले. हैदरानें लेले यांस मर्द माणूस समजून ठेऊन घेतलें व बाकीच्यांचे नाक कान कापून सोडून दिले. "

नं. ८९६ श्री. ( माघ वद्य त्रयोदशी.
२३ फेब्रुवारी.

राजश्रियाविरात राजमान्य राजश्री नरसिंगराव स्वामीचे सेवेशीः—

पोष्य गोपाळराव गोविंद कृतानेक नमस्कार विनंति उपरी येथील कुशल तागायत छ २६ सवाल मुक्काम नजीक मतोड येथें वर्तमान यथास्थित असे. विशेष. तुह्मीं पत्र पाठविलें तें प्रविष्ट झालें.

---

१ धायगुडे.

' आह्मीं आपला मार्ग लक्षीत आहों. श्रीमंतांची आज्ञा तो आपलिया विचारें ठाण्यांचा बंदोवस्त करणें तो करावा. ' ह्मणून लिहिलें तें कळलें. आमचा मुक्काम येथेंच आहे. हैदरखान तरीकिऱ्याहून कूच करून संकरायपट्टणाकडे गेला ह्मणून बित्तिम वर्तमान आहे. तुह्मांस ही तिकडे बातमी लागेल. त्याची बातमी राखोन सावधपणें असावें. आह्मांस तो इकडेच राहणें ह्मणून श्रीमंतांची आज्ञा आहे याजकरितां तिकडे येत नाहीं. त्यांत ही जवळ असतों तर वरचेवर यावयास ठीक पडतें. लांब आहे. फौज टाकून यावयाचे दिवस नव्हेत. आणि नित्य कही समागमें फौज जात आहे तेव्हां दाणा वैरण मिळती. येथें नित्य फौजेस तलावा तीन गांवें चार गांवचा आहे. तूर्त तिकडे यावयास बनत नाहीं. ठाण्यांचा बंदोबस्तीचा प्रकार तर तुमच्या व राजश्री शहाजी बावांच्या युक्तीस पडेल तसें करावें. उपयोगाची थोडक्या माणसानीं ठाणें राहीं अशी गढी असेल ती ठेवावी. अफाट कामाची नसेल ती गढी पाडून टाकावी. हैदरखानाची बातमी *

नं. ८९७ श्री. ( माघ वद्य त्रयोदशी.
२३ फेब्रुवारी.

सेवेशीं गोपाळराव गोविंद व आनंदराव भिकाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत छ २६ सवाल भृगुवार मुक्काम नजीक मतोड येथें स्वामीचे कृपेंकरून सेवकांचें वर्तमान यथास्थित असे. विशेष. स्वामींनीं छ २० सवालचीं पत्रें पाठविलीं तीं काल संध्याकाळीं पावलीं. तेथें आज्ञा जे " तुह्मीं मतोंडा नजीक राहणें. हैदरखानाची बातमी राखोन वरचेवर इकडे लिहून पाठविणें. " ह्मणून आज्ञा, उत्तम आहे. आज्ञेप्रमाणें आह्मीं मतोंडा नजीक आहों. बुधेहाळही

---

१ गांव ह्मणजे चार कोस. २ गोपाळराव पटवर्धन व आनंदराव रास्ते यांनीं पेशव्यांस लिहिलेल्या पत्राचा हा मसुदा आहे.

समीप आहे. तेथीलही खबरदारी केली आहे. हैदरखान आजपर्यंत तरीकिऱ्यास होता तेथून परवां छ २४ सवालीं कूच करून संकरापट्टणास गेला. प्रस्तुत संकरापट्टणास मुक्काम आहे. पुढें पट्टणास जाईल किंवा तेथेंच राहील त्याची बातमी कळेल त्याप्रमाणें लिहून पाठवूं. त्याच्या लष्करांतून थेट बातमी येथें कळतच नाहीं. तशाहीमध्यें युक्तीनें ठिकाणीं[1] लागेल ती बातमी लिहितों. “हैदरखान पट्टणाकडे गेला अथवा इकडे आला तरी लिहून पाठविणें. तदोत्तर तुह्मांस लिहिणें तें लिहिलें जाईल.” ह्मणून आज्ञा, उत्तम आहे. आज्ञेप्रमाणें याच सुमारें राहतों. हैदरखानाकडील बातमी कळेल त्याप्रमाणें सेवेशीं लिहून पाठवूं. आज्ञा होईल त्याचप्रमाणें वर्तणूक करूं. परंतु स्वामींची खासा स्वारी चिकबाळापुराकडे गेली तेव्हां हा संकरापट्टणास राहणार नाहीं. रान सुनकें पाहून बेंगळुराकडे जाईल अथवा पट्टणाकडे जाईल. त्याची बातमी पक्की कळल्यानंतर स्वामीकडे लिहून पाठवूं. त्याचा जाबसाल येईल (तों) अवकाश फार लागेल. ऐशियास हैदरखान पट्टणाकडे गेल्याची अथवा बेंगळुराकडे गेल्याची बातमी पक्की कळतांच आह्मीं कोणत्या रोखें यावें, किंवा तो पट्टणाकडे गेला तरी हुजूर यावें, किंवा बाजूनेंच हा जाईल तसतसें आह्मीं जावें, येविशींची आज्ञा अगोदर असावी ह्मणजे त्याप्रमाणें वर्तणूक करूं. हैदरखान आहे त्याच रोखें अजमपुराकडे फौजा तलाव्यास व दाणा दुणा मिळाला पाहिजे याजकरितां पाठवीत असतों. आज दोन तीन दिवस थोडा बहुत मिळतो. हैदरखान संकरापट्टणाकडे आहे तों अजमपुराकडे त्याच्या रोखें स्वारी शिकारी करीतच आहों. दाणा मिळेल तो मिळेल. गुजराणा करीत आहों. संकरापट्टणाहून पुढें कूच करून गेला तर कोणत्या सुमारें जावें अथवा हुजूर यावें ही आज्ञा करावी.

---

१ ठिकाणीं लावणें ह्मणजे पत्ता पाडणें.

शा० १६९१ हैदरअलीवर तिसरी स्वारी. इ. स. १७७०

नं० ८९८ श्रीगणराज. ( माघ वद्य चतुर्दशी. २४ फेब्रुवारी. )

चिरंजीव राजश्री मोरोपंत आबा यांसी प्रती गोपाळराव गोविंद आशीर्वाद उपरी येथील कुशल तागायत छ २७ सवाल मुक्काम अनागोंदी नजीक मर्तोंड येथें वर्तमान यथास्थित असे. विशेष. तुह्मीं छ १९ सवालचीं पत्रें जासूद जोडी समागमें भैरवदुर्गनजीक शिवगंगा मुक्कामाहून पाठविलीं तीं छ २१ मिनहूस मुक्काम मजकुरींच पावलीं. " राजश्री महिमाजी शिंदे याजसमागमें फौज देऊन गुरमकोंड्याकडे रवाना केल्याची बातमी हैदरखानास लागली त्याजवरून मशारनिल्हेनीं मिराबरोबर दोन तीन हजार फौज देऊन तिकडे रवाना केलें. मीर बुकापट्टणावरून देवदुर्गाजवळ जाऊन उतरला आहे ह्मणून बातमी येतांच श्रीमंतांनीं राजश्री मलबा पानसे यांजबराबर सात आठ हजार फौज सडी देऊन मिरावर रवाना केले आहेत. गांठ पडल्यानंतर गुंताच उरकेल. " ह्मणून लिहिलें तें कळलें. " श्रीमंतांनीं जामेवारें दोन बादली सावनुराहून आणिलीं होतीं तीं जामेवारें दोन व सरकारांतून मामल्यास एक जामेवार पाठविलें तें ऐकून तीन जामेवारें पावलीं. कडपें व कर्नोळकरांस श्रीमंतांकडे जावें ह्मणून नबाब निजामअलीखान यानीं पत्रें पाठविलीं आहेत ह्मणून कडपें व कर्नोळकरांचीं पत्रें याजप्रमाणें आलीं होतीं. त्याजवरून श्रीमंतांनीं त्यांजकडे पत्रें पाठविलीं आहेत. त्याजकडून मातबरास आणाविला आहे. तो आल्यानंतर त्यांसीं बोलोन चालोन तेही सत्वरच येतील. " ह्मणोन लिहिलें तें कळलें. नबाब निजामअलीखान यांच्या पत्रापूर्वीच ते श्रीमंतांच्या लक्षांतच आहेत. त्यांस ममतेचीं पत्रें पाठवून त्यांजकडील मातबरास आणवून त्यांशीं बोलोन चालोन ते फौजसुद्धां लवकरच येत तें करावें. " चित्तलदुर्गकरांचे गांव खेडीं यांस उपद्रव लागतो ह्मणून संस्थानिकांच्या गांवकरांचे बोभाट आले त्याजवरून ( त्यांनीं ) श्रीमंतांसीं विनंती केली त्याजवरून श्रीमंतांनीं पत्र पाठविलें

आहे. त्यास येविशींचा बंदोबस्त असेलच. याजउपर तरी त्यांचा बोभाटा नये असा बंदोबस्त करावा." ह्मणून लिहिलें तें कळलें. आह्मीं आपल्या तर्फेनें त्यांच्या तालुक्याचे बंदोबस्तास कमी केलें नाहीं. लहानसहान एक बुर्जी गांव—ज्यांनीं रखवालीस राऊत नेले नाहींत—अशा गांवांस वैरणीमुळें उपसर्ग लागला तो लागला. या मुक्कामास आल्यानंतर दुर्गेकरांचे तालुक्यांत राऊत जाऊं दिला नाहीं. तरीकिरें व अजमपुरचे गांव येथून चार पांच कोसांवर लागले आहेत तिकडे नेहमीं फौज बरोबर देऊन कही लाऊन देत आहों. उभयतां[1] चिरंजीव मिळोन एक दिवस जातात. राजश्री आनंदरावदादा एक दिवस व आह्मीं स्वतः एक दिवस. अजमपुर तरीकिऱ्याचे गांव मारून आणीत आहों. दाणा उथळपातळ मिळतो. मातबर गांव आहेत ते तोफाशिवाय ( हातीं ) येत नाहींत. आज चार दिवस तिकडे जात आहों. लहानसहान गांव मोडून आणीत आहों. "छ १४ सवालीं भैरवदुर्गावर श्रीमंतांनीं हल्ला करून किल्ला घेतला. ब्राह्मण फार नागवले. त्या ब्राह्मणांस भोजनास घातलें. श्रीमंतांनीं एकेक वस्त्रही दिलें. किल्ला चांगला आहे याजकरितां सरकारांत ठेविला." ह्मणून लिहिलें तें कळलें. ऐशियास तो किल्ला चांगला आहे. सरकारांत ठेविल्यास चिंता नाहीं. बंदोबस्त चांगला असल्यास चिंता नाहीं. "आरवलहमूरचा मजकूर पेशजी लिहिलाच आहे. आणखी श्रीमंतांस विनंती करून पत्रें घेऊन मागाहून पाठवितों." ह्मणून लिहिलें तें कळलें. ऐशास येविशीं पेशजी आह्मींच दोन वेळां मजकूर लिहिला परंतु तुमचें उत्तर कांहीं आलें नाहीं. उत्तर पाठविलें ह्मणून तुह्मीं लिहिलें कशावरून! असो. 'आरवलहमूरचा ऐवज न घेणें' ह्मणून पत्र घेऊन स्मरणपूर्वक पाठवून देणें. "चितदुर्गीं सांडणस्वार सरकारचे आहेत ते शिऱ्यांत आणून ठेवावे ह्मणजे वर्तमान वरचेवर येईल" ह्मणून लिहिलें

---

१ नीलकंठराव व परशुरामभाऊ.

तें कळलें. ऐशास चित्रदुर्गांत सांडणीस्वार सरकारचे होते आह्मीं इकडे आलों तेव्हां तेथून निघोन लष्करासच गेले. त्यास श्रीमंतांस विनंती करून मदगिरीस सांडणीची डांक ठेवावी. शिऱ्यांस तो आहेच. आह्मीं येथून शिऱ्यांस पत्र पोंचवीत आहों. शिऱ्यांहून पुढें सरकारचे सुतरस्वार घेऊन जातील असा बंदोबस्त करावा. हे आशीर्वाद.

नं. ८९९ श्री. ( २६ फेब्रुवारी. )

चिरंजीव राजश्री तात्यासाहेब यांसीं प्रती वासुदेव धोंडदेव. आशीर्वाद उपरी येथील कुशल तागायत फाल्गुन शु० १ पावेतों यथास्थित असे. विशेष. अलीकडे आपणाकडून पत्र येऊन सांभाळ होत नाहीं. ऐशास सदैव पत्र पाठवून संभाळीत असलें पाहिजे. इकडील वर्तमान तर हैदरखानानें माघ वद्य ३० पहांटेस पांच घटका रात्रौ छापा घालावयास आला. बातमीस छबिने होते, परंतु सारे चुकावून अकस्मात आला. येतांच तोफांचे बार व बाणांच्या माराखालीं लष्कर हैराण केलें. कारखाने वगैरे लादालाद कार्याकारण झाली. राहातां पैकीं मुदबखाचे दोन पडदे, बाळासाहेब यांची राहुटी, जामदारखान्याची राहुटी, घड्याळजी याची राहुटी येणेंप्रमाणें व कोठी सारी येणेंप्रमाणें कारखाना राहिला. व तांदुळाच्या गोण्या मिरजेहून मागाहून ( तुह्मीं ) पाठविल्या त्या. येणेंप्रमाणें सामान राहिलें. बरकड सारें सामान जामदारखाना कापड रोख सारें निभावून आलें. गोळ्यांचा मार भारी याजमुळें सामान राहिलें. रामचंद्र रुद्र यांचा डेरा राहिला. सूर्योदय पांच सहा घटिका दिवस आल्यानंतर हैदरखान गोटांत आला. त्यानें मोठी मारगिरी केली. परंतु सारी फौज रावसाहेबीं उतावळी न करितां राखोन निघाले. त्याचें सामान पांच हजार फौज, दहा हजार बार व बावीस तोफा, साठ उंट बाणांचे,

---

१ गोपाळरावाचा धाकटा भाऊ पांडुरंगराव गोविंद यास हें पत्र. २ गोपाळरावानें.

येणेंप्रमाणें होतें. आमच्या फौजा प्रहर दिवस पावेतों जमल्या नाहींत. उपरांत फौज जमा झाली. तोंड लावावयाचा प्रकार तोफांच्या मारापुढें न चाले यास्तव राहिले. फाल्गुन शुद्ध प्रतिपदेस सायंकाळच्या प्रहर दिवसास तळ सोडून हैदरखान माघारा आल्या वाटेनें बणावरास गेला. मग सर्व्या फौजा माघाऱ्या बुधेहाळच्या मुक्कामास आल्या. आज मुक्काम आहे. जखमी वगैरे यांची याद मागाहून पाठवूं. हे आशीर्वाद.

नं ९०० श्री. (फाल्गुन शुद्ध प्रतिपदा.
२६ फेब्रुवारी.)

अपत्यें मोरोबानें साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत छ २९ सवाल मुक्काम देवनहळ्ळी प्रांत श्रीरंगपट्टण. वडिलांचे आशीर्वादें करून वर्तमान यथास्थित असे. विशेष. वडिलीं अनागोंदी हयग्रीवातीरच्या मुक्कामचें छ २१ सवालचें पत्र पाठविलें तें छ २४ सवालीं मुक्काम मजकूरीं पावलें. लिहिला मजकूर कळला. "येथून मतोंड डावे बाजूस दोन कोस आहे. अघाडीस चार कोस बुधेहाळ आहे. तरीकिरें बारा चौदा कोस आहे. हैदरखान तरीकिऱ्यावर आहे. परंतु तथ्य बातमी कळत नाहीं." ह्मणून लिहिलें, ऐशास अलीकडे हैदरखानाचे बातमीचें वर्तमान तहकीक आलें असेल. पुढें वडिलांचें येणें या रोखें झालें. शिवाय चिकनाइकनहळ्ळीस फौज येथून पाठविली. त्याजमुळें हैदरखान पुढें जातो किंवा तेथेंच राहिला आहे याचा मजकूर वडिलीं लिहावा. देवनहळ्ळींचें ठाणें घेऊन ठाणें पाडिलें. गुरमकुंड्याकडे महिमाजी शिंदे पेशजी नेमून पाठविलें होते ते राहिले. हल्लीं राजश्री राघो बापूजी व आनंदराव गोपाळ वगैरे हुजूरचीं पथकें मिळोन

१ पत्र मोरो बल्लाळ याचें गोपाळरावास.

पांच हजार फौज नेमिली. काल निघोन गेले. मीर चिकबाळापुरच्या झाडींत आहे ह्मणून बातमी येत आहे. विदित होय हे विज्ञापना.

पै॥ छ ७ जिल्काद.

नं. ९०१ श्रीगणराज. ( २७ फेब्रुवारी. )

चिरंजीव राजश्री मोरोबा आबा यांसीं प्रती गोपाळराव गोविंद आशीर्वाद उपरी येथील कुशल तागायत फाल्गुन शुद्ध द्वितीया भौमवासर मुक्काम नजीक बुधेहाळ एक कोस. वर्तमान यथास्थित असे. विशेष. इकडील वर्तमान तर हैदरखान संकरापट्टणाकडे कूच करून गेल्याचें वर्तमान लिहिलें होतें, त्यास संकरापट्टणास छ २४ सवालीं गेला. तेथून पट्टणाकडे जावयाची आवई घालून इकडे माणूस येईल याजकरितां चौक्यांचा बंदोबस्त करून तीन दिवस संकरापट्टणास राहिला. आह्मांकडील फौजा तलाव्यास अजमपुरापावेतों जात होत्या त्यांस गांव खेड्यांच्या माणसांची बातमी 'संकरापट्टणाहून कुच करून गेला' असेंच सांगत. तेव्हां आमच्या मतें काय कीं, श्रीमंतांची स्वारी बाळापुराकडे गेली याजकरितां पट्टणाकडे जाऊन मागडीच्या सुमारें जाईल असें भासत होतें. परंतु छ २७ सवालीं कडुरास आला. तेथून छ २८ सवालीं रविवारीं अमावास्येस सडें सामान बारा तेरा हजार गाडदी व चार हजार फौजेचा अजमास व पंचवीस तोफा येणेंप्रमाणें सामानानिशीं दोनप्रहरीं कडुराकडून कूच करून रातवा[1] खपोन छप्प्यास आह्मांकडे आला. पहाटेच्या पांच घटका रातीस गोटाबाहेर उभा राहून गोळे व बाणांचा मार करूं लागला. अंबाऱ्या व नौबद माल लादलेली होती. व वरकड घोड्यांवर जीन देखील नाहीं! आमच्या[2] घोड्यांवर एक दुसऱ्यावर जीन होतें. त्याचा गोळा वाजतांच घोड्यावर बसोन मागें नौबत याप्रमाणें बाजारापुढें अघाडीस येऊन उभे

१ रातवा खपणें= रात्रभर चालणें. २ आमच्या खासगत पथकांतील.

राहिलों. नौबद वाजतच होती तेथें वरचेवर लोकानीं जीन ठेऊन येऊन कांहीं जमले. नौबती टंकारे ऐकून अगदीं तोफाचा मार (शत्रूनें) आह्मांवर धरिला. चार साडेचार घटका तोफांचा व बाणांचा मार खाऊन उभे राहिलों. परशराम शिंदा पोरगा आमच्या डाव्या हाताजवळच होता त्यास गोळा लागोन ठार झाला. मेंदु आमच्या अंगावर उसळून अंग रक्तानें अगदीं भरलें. घोडेंमाणूस त्याच जाग्यावर गोळ्यानीं व बाणानीं ठार फार झालें. चिरंजीव राजश्री माधवराव[1] अण्णाचे घोड्यास गोळी लागून घोडी ठार झाली. उजव्या गुडघ्यास चिरंजीव अण्णाच्या गोळी लागून वरील मासकातड्याच्या चिंध्या झाल्या. हाड व गुडघ्याची वाटी शाबूत राहिली. त्याच गोळ्यानें तीच घोडी पडली. सारांश अण्णाची ईश्वरें खैर केली. चिरंजीव राजश्री भाऊंच्या[2] बसत्या[3] घोडीवर बसले असतां (एकमागून एक) दोन घोड्या गोळे लागून पडल्या. एक कोतवाल पडली. एकूण तीन घोड्या चिरंजीव राजश्री भाऊच्या पडल्या. दिशा प्रकाश व्हावयाचे वेळेपर्यंत तसेच उभे राहिलों, याजकरितां जामदारखाना व डेरे, राहुट्या वगैरे गोट लादावयास फुरसत पडली. गोळ्यांचा व बाणांचा मार असा कधीं जाहला नसेल. पांच सहाशें गोळा तितक्यांत सुटला. दिशा प्रकाश होऊं लागतांच जरा डाव्या बाजूनें ओढ्याचा आसरा होता तेथें जाऊन उभे राहिलों. तेथें मार अतिशय झाला. तों पांच घटका दिवस आला. तोंपर्यंत गोटास (शत्रूचा) हात लागला नाहीं. तोंपावेतों गोटांतील (सामान कांहीं) गडबडींत राहिलें होतें तें आणविलें. राहतांपैकीं मुदबखाच्या डेऱ्याची पडद्याची सलिता एक व जामदारखान्याकडील राहुटी व रामचंद्र रुद्र यांचा डेरा येणेंप्रमाणें तळावर राहिलें. ते समयीं उंटें नाहींशीं झालीं ह्मणोन तीन दागिने राहिले त्यांस आग

---

१ माधवराव कृष्ण मंगळवेढेकर. परशुरामभाऊप्रमाणेंच हा ही गोपाळरावाचा चुलत भाऊ. २ परशुरामभाऊच्या. ३ नेहमीं जिच्यावर बसावयाचें त्या.

लाविली. पांच घटका दिवस आल्यानंतर त्याजकडील लोक गोटांत शिरों लागले. ते समयीं आह्मांकडील लोकांनीं घोडीं घातलीं. संताजी पवार झैसाळकर वगैरे दहा पांच माणूस चांगलें ठार झालें. त्यांणीं ( गारद्यांचे ) बुरूज बांधोन तोफांचा ( व ) बाणांचा मार फारच केला. अघाडीचा मार भोंरी ( यास्तव ) घोडीं फारशीं घालूं दिलीं नाहींत. तसेच दम धरून उभे राहिलों. पांच घटका दिवसानंतर ते गोटांत शिरोन तळास आगी दिल्या. तिसरा प्रहरपर्यंत तळावरच होता. आमचें बुनगें या मुक्कामास लाऊन दिलें आणि आह्मीं संध्याकाळपर्यंत तेथेंच उभे राहिलें होतों. तिसरे प्रहरपर्यंत हैदरखान तळावर होता. तिसरे प्रहरीं निघोन माघारे कडुराकडे गेला. तीन कोसपर्यंत गेल्या नंतर रात्रौ आह्मीं निघोन गोटास आलों. श्रीमंतांच्या पुण्यप्रतापेंकरून खैर झाली. नौबतीच्या हत्तीजवळ कोतवाल हत्ती पाठीमागें होता त्याच्या पायास गोळा चाटोन गेला. ठार व जखमी घोड्यांची व माणसांची यादी लिहून मागाहून पाठवितों. गोटांतील एकाची वस्त एकानें घेतली ते ज्याचे ते वळखून घेतात. त्याच्या हातास कांहीं लागलें नाहीं. बाजारचें घाबरेपणानें कोणाचें कांहीं राहिलें तें मात्र कांहीं त्यांच्या हातास लागलें असेल तर न कळे. तो तळ सोडून गेल्यावर दाणादुणा लोकांनीं जाऊन आणिला. आमच्या तिहीं गोटचे ऐंशीं घोडे ठार झाले. राजश्री आनंदरावदादाकडील अजमास लागला नाहीं. मागाहून सविस्तर लिहून पाठवितों. पहिला सरकारांत गाडदी यवन होता तो हैदरखानाकडे आहे. तो रवेंतूनच पुढें वर्तमान सांगण्यास आला. तो पुढें चार घटकांच्या अवकाशें पुढें आला. त्याणें सांगितलें कीं तुह्मांवर छापा आला. परंतु आह्मांस खरें न भासे! आह्मीं त्यास पुसिलें कीं, तूं त्याचा चाकर ह्मणवितोस ( आणि ) वर्तमान सांगतोस हें खरें कशावरून ह्मणावें? तेव्हां त्याणें सांगितलें कीं श्रीमंत कैलासवासी नानासाहेबांचें मी मीठ खादलें व तुह्मीं बहुतांचे पाळनवाले,

याजकरितां सांगावयास आलों. लटकें झालें तर पाहऱ्यांत ठेवावें. हात तोडावे. अशी खातरजमा करून सांगत होता, परंतु प्रमाण न वाटे. तत्राप तो आल्यापासून हुशारीनें राहिलों होतों ह्मणून फार गडबड न झाली. कळावें. जखमी व ठार घोडीं माणसें त्यांची यादी मागाहून पाठवितों. गाडदी आला त्याचें प्रमाण मानून तळ सोडला ह्मणतील ह्मणून दोन चार पथकांस सांगोन तयारी करविली, ते स्वार आले नाहींत तों गोळाच उडाला! मसलतीस अंगेजी नशिबाची केली नाहीं यामुळें अब्रूनिशीं त्याच्या हातास कांहीं न लागतां निघालों. तळावर देखील सहा घटका दिवस पावेतों येऊं दिला नाहीं. चिरंजीव राजश्री भाऊची व महादेवाची मोठी खैर झाली. घोडीं तिन्ही पथकांचीं मिळोन ऐशीं पावेतों ठार व पंचवीस माणूस ठार झालें. शंभर दीडशें माणूस जखमी आहे. वीसपावेतों माणूस हैदरखानाचें पाडाव आहे. गाडदी याचे आवईनें आह्मीं गडबडोन निघालों नाहीं एवढा दोष कोणी ठेविला तर सुखरूप ठेऊत! परंतु त्याचा चाकर--त्याचें खरें कसें मानावें? बंदोबस्ती करीत होतों परंतु अवकाश सांपडला नाहीं. फार काय लिहिणें हे आशीर्वाद.

नं० ९०२ श्रीगणराज. ( फाल्गुन शुद्ध द्वितीया. २७ फेब्रुवारी. )

चिरंजीव राजश्री आबा यांसीं आशीर्वाद उपरी. श्रीमंत चिकबाळापुराकडे गेले आहेत, त्यास बाळापूर घेतील. गुंता नाहीं. परंतु बाळापूर घेतल्याचा उपयोग नंदीगड व गणेशगड घेतल्याशिवाय नाहीं. बाळापुरचें रक्षण होणार नाहीं. एकीकडे झाडी, एकीकडे किल्ले, तेव्हां बचाव होणें कळतेंच! ठाणें टिकणार नाहीं. आंत राहतील त्यांची गत चिकनायकनहळ्ळीप्रमाणें होईल. ब्राह्मण नाहक माणसांतून गेले!

---

१ दैववादी होऊन पराक्रम केला नाहीं, प्रयत्नवादी होऊन पराक्रम केला, असा भाव. अंगेजी ह्मणजे पराक्रम. २ पत्र मोरो बल्लाळ यास गोपाळरावाचें. ३ शत्रूनें नाकें कापिल्यामुळें.

' ठाण्यांचा बंदोबस्त करून द्यावा तरच ठाण्यांत राहूं ' ह्मटल्यास त्याजवर ( श्रीमंतांची ) इतराजी होणार! रोजमरा बंद करणार! ब्राह्मणांचा इलाज काय! स्वरूप नाश झाला त्यांस पुढें येऊं देणार नाहींत! असो. झाली गोष्ट त्यास इलाज नाहीं. भैरवदुर्ग घेतला आहे, श्रीमंत लांब चालले, याजकरितां तेथील बंदोबस्त उत्तम प्रकारें असावा. नाहींतर चिकनायकनहळ्ळीप्रमाणें होईल, याजकरितां लिहिलें आहे. नंदीगड व गणेशगड हर तजवीजीनें घ्यावाच. तरच बाळापुरचा बचाव. नाहींतर घेतल्याचें सार्थक नाहीं! बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद.

नं० ९०३ ( फाल्गुन शुद्ध तृतीया.
२८ फेब्रुवारी. )

नागोरांव[1] श्रीनिवास यांचें गोपाळारावास पत्र छ १ जिल्कादचें.[2] " मागडीहून श्रीमंत देवनहळ्ळीस आले. तेथेंच २९ सवाली राव सेनापतीची व श्रीमंतांची भेट झाली. श्रीमंत समस्त मातबर सरदारांनिशीं दीडकोस पुढें आले. भेटी ममतायुक्त सन्मानें झाल्या. "

नं. ९०४ श्रीगणराज. ( फाल्गुन शुद्ध.
मार्चांचा प० पंधरवडा. )

सेवेशीं साष्टांग नमस्कार विज्ञापना. महमदअल्लीखान साल मजकुरीं येत नासींसें पुरतें ध्यानांत आलें असलें तरी बेंगळुरास बसोन खदीद (?) होऊं नये. तथापि जाणें अशीच मर्जी असेल तरी सर्वांस बोलावून विचार करावा. कोटचक्र घालून पहावें. किल्ल्यास ग्रहाचें बलाबल विचार करून जाणें असल्यास जावें. दुसरा एक मनसबा आहे परंतु तो कोणाचे खातरेस येणार नाहीं असें समजोन आपणास

१ हा मुरारराव घोरपडे सेनापती याचा वकील. २ गोपाळरावानें पेशव्यांस लिहिलेल्या पत्राची नक्कल.

सुचलें तें सेवेशीं लिहिलें असावें ह्मणून लिहिलें आहे. स्वामींनीं नागमंगलपावेतों ठाणीं घेतलीं. बाकी राहिलीं तीं पट्टण बेंगळूर खेरीज करून कोणी झुजत नाहींत. पट्टण बेंगळूर हीं दोन्हीं जबरदस्त. जाऊन बसल्यासारखीं आलीं तरी बरेंच झालें. नाहीं तरी जन त्रिविध, तेथील मार्ग पाहतील तेव्हां नाना प्रकारें बोलों लागतील. यास्तव नागमंगलाहून चेनरायपट्टणास जावें. तें ठाणें सहजांत येईल. तेथून हरपनहल्ली तेथून बाणावर. मध्यें डावीं उजवीं कांहीं ठाणीं राहिलीं असलीं तरी तींही घ्यावीं. कडुरास येऊन कडूर घ्यावें. या साऱ्या ठाण्यांच्या उपराळ्यास पांच हजार फौज ठेऊन संकरापट्टणावरून अजमपुरावरून तरीकिऱ्यावरून हीं ठाणीं घेत घेत बंकापूर शिवमोघें हीं ठाणीं घ्यावीं. चेनगिरी घ्यावी. इकडे आल्यानें हैदरखान माघारा सरोन बिदनुरास जाईल. होनहल्ली तेव्हां फार दिवस झुजली. तेव्हां (आपणाजवळ) तोफा लहान होत्या. आतां तोफांचें सामान भारी आहे व फौजेंतही फितवा नाहीं. होनहल्लीचें ठाणें घेऊन कुमसीस यावें. हैदरखान बिदनुरास जाऊन रामचंद्रहल्लीजवळ जाऊन राहील. खासा स्वारी अनंतपुरास जावी ह्मणजे हैदरखान बिदनुरांत गुंतला! मग बाहेर निघत नाहीं. मामूरचे बारीस व उडगणी अनवटीस (त्याचे, गारदी व तोफखाना आहे तो खासा स्वारीचा रोंख बिदनुराकडे झाला ह्मणजे सारे लोक बिदनुरास घेऊन जाईल. तेव्हां शिकारपूर, उडगणी, अनवटी, हें रान खालीं पडतें. आह्मीं सारे रिकामेच आहों. आणखी दोन चार हजार फौज, कांहीं तोफा ठाणीं घ्यावया आगाव पाठविल्यास शिकारपूर, उडगणी, अनवटी इकडे गडबड करून पाहतों. तमाम देसैक कित्तूर, नवलगुंद, डंबळ

---

१ 'हैदरअल्लीवरच्या पाहिल्या स्वारींत' इ. स. १७६४ त. २ त्यावेळीं दादासाहेबांकडे हैदराचा फित्तर होता तसा प्रकार आतां राहिला नाहीं. ३ रिकामें. ४ देसाई.

व वाडीकर सावंत आदीकरून आणवावे. सावनूरकर नबाबाजवळ चार हजार फौज आहे. हजार प्यादे सावनुरांत ठेऊन बाकी आणवावे. याप्रमाणें झाल्यास त्यास[1] दुरोख शह पुरवणार नाहीं. तेव्हां मर्जीप्रमाणें सल्ला न करितां त्यास गति नाहीं! पट्टण-प्रांतही खराब झाला व बिदनुर-प्रांतही खराब होतो[2], यामुळें सल्ला लवकर करीलसें वाटतें. परंतु हा विचार फार करून कोणाचे ध्यानास येणार नाहीं! विदित होय हे विज्ञापना. स्वारी अनंतपुरावर—हैदरखान बिदनुरास--असें असतां शिकारपूर, उडगणी, अनवटी, इकडे फौज गेली तरी हैदरखानाचे वस्तु[3] बिदनूर सोडून या ठाण्यांचे कुमकेस येववणार नाहीं. ठाण्यांची कुमक होत नाहीं तेव्हां ठाणीं झुजत नाहींत असें दिसतें. विदित होय हे विज्ञापना. +

नं० ९०५ श्रीगणराज. (अजमासें माघ शुद्ध. फेब्रुवारीचा प० पंधरावडा.)

आशीर्वाद उपरी. हैदरखान खासा तिकडे गेला हें वर्तमान तहकीक आहे. दर मजल गेला ह्मणून आजी हरिहरचीं पत्रें आलीं. आणखी माणसें बातमीस पाठविलीं आहेत. श्रीमंतांचे खास फौजेवर येऊन त्याच्यानें कांहीं करवत नाहीं. कहीं कबाड व माडली (?) रस्ता येणार जाणार यांजवर कांहीं गडबड करील तरी करील. व ठाणीं घेतलीं आहेत त्यांसही उपद्रव करील. यास्तव नूतन ठाणीं घेतलीं त्यांचा बंदोबस्त चांगला करावा. कहीचाही बंदोबस्त रोजचे रोज करावा. उजवे हातें झाडी व डाव्या हातें देवरायदुर्गापासून मागडी चेनापट्टण-पावेतों डोंगर. दोहींकडील आसऱ्यानें राहून कहींवर गडबड करील.

---

१ हैदरास. २ होईल. ३ हानून. + ही गोपाळरावाची मसलत पेशव्यांनीं कां ऐकिली नाहीं याचा खुलासा कोठें वाचण्यांत नाहीं. ४ पत्र गोपाळरावाचें मोरो बल्लाळ यास.

ये विशीं श्रीमंतांस विनंती करावी. तो आम्हीं पट्टणास फौज जाती ह्मणून गेला आहे. पुढें तुमचे लष्करची बातमी मिळोन त्वरेनें जाण्याचें झाल्यास जाईल. अगर तुह्मीं पट्टणास जात नसल्यास जाणारही नांहीं. राजश्री मुराररात्र घोरपडे याणीं पष्ठीस डेरे बाहेर दिले होते. 'पौर्णिमेस आपण बाहेर निघून दरमजल जातों' ह्मणून पत्रें आलीं होतीं. तीन पत्रें तुह्मांकडे पाठविलीं आहेत. पावलींच असतील. पौर्णिमेस गुत्तीहून निघोन आले असले तरी हीं पत्रें पावतांच त्रयोदशीस मुहूर्त असल्यास श्रीमंतांचे भेटीस येतील. प्रस्तुत तुह्मीं कोठे आहांत, अलीकडे ठाणीं कोणकोणतीं घेतलीं, ठाणीं घेतां त्यांत लोक किती किती ठेवितां, सारे लोक दुर्गकरांचे किंवा आंत कांहीं मिसळ सरकारचे असतात, हें सविस्तर लिहिणें. राजश्री सदाशिव रामचंद्र कांहीं हजार स्वारानिशीं लक्ष्मेश्वरास येऊन राहिले आहेत ह्मणून पत्र आलें आहे. हजार नसले तरी कांहीं कमी असतील. हैदरखान तो तिकडे गेला. पुढें आह्मांस श्रीमंत काय आज्ञा करितात तें पुसोन निश्चय करून लिहिणें. त्या प्रमाणें वर्तणूक करूं. बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद.

नं० ९०६ श्रीगणराज. (फाल्गुन शुद्ध. मार्चांना प० पंधरवडा.)

अपत्यें नीलकंठानें साष्टांग नमस्कार विज्ञापना. श्रीमंतांनीं नागमंगल घेऊन बेंगळूरच्या सुमारें फिरले. त्यास मागडी घेतली. भैरवदुर्ग पहाडीकिल्ला होता तो चार दिवस मोर्चे लाऊन शेवटीं हल्ला करून घेतला. बेंगळूर तेथून आठ कोस आहे. बेंगळुराजवळ जाऊन पाहून निश्चय

---

१ नीलकंठराव त्र्यंबक कुरुंदवाडकर यानें त्र्यंबक हरीस लिहिलेलें पत्र. २ बेंगरळास वेढा घालावा कीं न घालावा याविषयीं निश्चय.

करणार होते. मुरारजी घोरपडे रायदुर्गाजवळ आले. लवकरच येणार. कर्नोळ कडपेकर ही येणार. महमदअल्लीकडील पत्रें अद्याप आलीं नाहींत. या प्रमाणें आज सात दिवसांचीं पत्रें आलीं होतीं. अलीकडे काय झालें तेंही आज उद्यां सत्वरच वर्तमान येईल. मीर भैरवदुर्गाहून श्रीमंत येत आहेत तेथून सोळा अठरा कोसांवर राहिला आहे ह्मणून वर्तमान आलें. ते वेळेस दहा हजार फौज सडी त्याजवर (श्रीमंतांनीं) पाठविली आहे. मैदानीं गांठ पडली तर त्यास लुटतील. दो चौ दिवशीं वर्तमान येईल. तूर्त त्यांस व आह्मांस जवळ गांठ पडली आहे. निभावणार श्री समर्थ आहे. सावधपणें आहों. सणकी बागूर व बुधेहाळ यांच्या मध्यें आहों. सणकीबागूर तीन कोस आहे. बुधेहाळ सहा कोस आहे. बुधेहाळांत श्रीमंतांचें ठाणें आहे. सणकीबागुरांत चित्रदुर्गकरांचें ठाणें आहे. यंदाचा मनसबा पडत पडत भारी झाला. विवेकें व्हावयाचा प्रकार दिसत नाहीं. यंदा फौजेची इकडेच छावणी होईल असें दिसतें. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं० ९०७ **श्रीगणराज.** (फाल्गुन शुद्ध चतुर्थी. १ मार्च.)

अपत्यें मोरोबानें साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत छ २ जिल्काद मुक्काम चिकबाळापूर प्रांत श्रीरंगपट्टण. वडिलांचे आशीर्वादें वर्तमान यथास्थित असे. विशेष. वडिलीं छ २७ सवालचीं पत्रें पाठविलीं ते छ ३० सवालीं पावलीं. लिहिला मजकूर कळला. " चित्रदुर्गकरांच्या तालुक्यांत एक दोन वेळ येतांना उपसर्ग वैरण काडीचा लागला. स्वारी मतोंडाजनीक आल्यावर तिकडे एक स्वार जाऊं दिला नाहीं." ह्मणोन लिहिलें तें कळलें. तरीकिरें व अजमपुरचे गांव येथून चार पांच कोसीं

१ हैदरास. २ तह. ३ मोरो बल्लाळ याचें गोळपारावास पत्र.

आहेत तिकडे नेहमीं फौजा पाठवून तिकडून कही भरून येत आहे. एक दिवस उभयतां चिरंजीव, एक दिवस राजश्री आनंदरावदादा व एक दिवस आपण असें जाऊन तरीकिरें व अजमपुरचे गांव मोडून आणितों. दाणा उथळपातळ मिळतो. मातबर गांव आहेत ते तोफांशिवाय येत नाहींत. आज चार दिवस कही तिकडे जात आहे." ह्मणोन लिहिलें तें कळलें. सांडणीस्वार सरकारचे चित्रदुर्गांत आहेत ते शिऱ्यांत ठेवावे ह्मणजे वर्तमान वरचेवर कळत जाईल ह्मणोन लिहिलें त्यावरून दोहीं जागा सांडणीस्वार ठेविले आहेत. याउपर वडील पत्रें पाठवितील तीं शिऱ्यांस पाठवीत जावें ह्मणजे डांकेनें येत जातील. "हैदरखान तरीकिऱ्यावर होता तेथून कूच करून संकरापट्टणास गेला. तरीकिऱ्याहून सहा कोस दक्षिणेस गेला. पट्टणचा रोंख आहे. तेथेंच राहतो किंवा पुढें जातो हें वर्तमान कळल्यावर लिहून पाठवूं" ह्मणून वडिलीं लिहिलें तें कळलें. ऐशास त्याची बातमी ठीक राखून वर्तमान बातमीचें लिहित जावें. हैदरखान याची बातमी राखून खबरदार असतों ह्मणून लिहिलें, ऐशास रात्रीची छबिन्याची बंदोबस्ती चांगली असावी. तो दगाबाज आहे. यास्तव बातमीची बंदोबस्ती असावी. "अविंध पट्टणाकडे गेल्यावर आह्मीं त्याच्या पिछानें जावें किंवा हुजूर यावें येविशीं श्रीमंतांस विनंती करून लिहावें" ह्मणून लिहिलें त्याप्रमाणें (याविषयींचा खुलासा) श्रीमंतांच्या पत्रावरून कळेल. "बुधेहाळचे ठाणेदार गडबडले होते परंतु गारदी यांनीं दम धरिला. इतक्यांत आमचेंही येणें झालें ह्मणोन ठाण्याचा बचाव झाला." ह्मणोन लिहिलें ऐशास चिकनाइकनहळ्ळीचा हा प्रकार झाल्यामुळें ठाण्यांनीं दहशत खाल्ली. फौजा तिकडे नसत्या तर ठाण्यांचा बचाव न होता. "सावनूरकर नबाब यांचे पुत्र छ २३ सवाळीं येथून कूच करून श्रीमंतांकडे गेले येऊन पावतील",

ह्मणोन लिहिलें, त्यास नबाबाचे पुत्र व खंडेराव व माधवराव असे आज लष्करांत आले. अद्याप श्रीमंतांची भेटी झाली नाहीं. आज दिवस चांगला आहे. आज होईल किंवा उदईक होईल. " निजामअलीखान मैंदरगी परगण्यांतून पुढें अबजलपुरावरून मुरापूर तालुक्यांत आले. कृष्णेवर आले असतील. मैंदरगी परगण्याचा शिवार (त्यांनीं) चारिला ह्मणोन चिरंजीव राजश्री नीलकंठराव यांस लिहिलें आलें आहे. नबाब निजामअलीखान श्रीमंतांकडे येणार. त्यांजकडून कागद पत्र आले असतील तरी सविस्तर लिहावे. " ह्मणोन आज्ञा, त्यास खासा येत नाहीं. तहवारजंगाबरोबर पांच हजार फौज देऊन पाठविणार. बल्लारीकरांचा मजकूर लिहिला तो कळला. कृष्णाप्पाही येथें आला आहे. दुर्गकरांनीं तट्टें पाडून नेलीं आहेत येविशीं परशुरामपंतास दुर्गास पत्र लिहून पाठविलें, परंतु तट्टें सोडिलीं नाहींत व बैलही सोडिले नाहींत याजकरितां संस्थानिकास तुह्मी सांगून परशुरामपंतास पत्र घेऊन पाठवून तट्टें बैल सुटोन येत तें करावें ह्मणोन लिहिलें त्यावरून राजश्री पुरुषोपंतास इकडे आणून आपलें पत्र दाखविलें. त्याणीं पत्र लिहिलें आहे. याउपर तट्टें बैल सोडून देतील. विदित होय हे विज्ञापना.

नं. ९०८ **श्रीगणराज.** ( २ मार्च. )

चिरंजीव राजश्री मोरोबा आबा यांसी प्रती गोपाळराव गोविंद. आशीर्वाद उपरी येथील कुशल तागायत फाल्गुन शुद्ध पंचमी भृगुवासर मुक्काम हुल्याळ तालुके बुधिहाळ वर्तमान यथास्थित जाणून स्वकीय कुशल लिहीत जावें. विशेष. अप्प्याचें वर्तमान विस्तारें लिहून पाठविलें आहे तीं पत्रें पावलींच असतील. छापा पडला त्या दिवशीं नजीक बुधेहाळपाशीं मुक्कामास आलों. तेथें तीन मुक्काम झाले. हैदरखान

असे.[1] विशेष. वडिलीं पत्रें पाठविलीं तीं पावलीं. लिहिला मजकूर कळला. मीर व टिपू यांची फौज तिकडे आली यामुळें येथून राजश्री कृष्णराव बळवंत यांजबराबर फौज देऊन रवाना केले आहेत. असलिया गांठ घालावी. हैदरखान याजकडे गेले तर ( तीच ) फौज वडिलांपाशीं रहावी अशी येथून आज्ञा आहे. जरकरितां मीर हैदरखानाकडे गेला नाहीं, बेंगरूळ पट्टणाकडे गेला, तर निजगलापाशीं राहून हुजुरास लिहून पाठवावें. येथून आज्ञा होईल त्याप्रमाणें वर्तणूक करावी. वडिलीं बुनगें शिऱ्यांस पाठविलें होतें त्यास मुकुंद श्रीपत यांनीं आंत घेतलें नाहीं म्हणून लिहिलें होतें, त्यावरून मुकुंद श्रीपत यांस सरकारची चिठी घेऊन पाठविली आहे. श्रीमंतांच्या पत्राचें उत्तर घेऊन पाठविलें आहे. त्यावरून कळेल. नंदिगड किल्ल्यावर निशाण चढलें. किल्ल्यांतील लोक व किल्लेदार याची वस्तभाव सोडून दिली. किल्लेदाराबरोबर सरकारचे स्वार देऊन नलवागल तालुक्यांत लाऊन दिले. नंदिगडचे मोर्चे लाविले होते. ( हा किल्ला ) आठ पंधरा दिवस घेतां तरी अवघड होतें. परंतु श्रीमंतांचे पुण्येंकरून स्थळ हस्तगत झालें. आतां मोकळे झालों. आतांच माघारे फिरलों तर लौकिकांत
आहे. तेव्हां हैदरखान आतां व णीं घेतली व फौजेवर छापा घातला
यांवर ( त्यानें ) बंद बसविला, असें
चहूंकडून बातमी आणवून सावध आणखी पांच हजार फौज पाठवावी
भारी पडती. परंतु दाणा ऊन मग खनखनहळ्ळी घेऊन चेन्नापट्टण
काय करावें तें श्रीमंतांस पुसो मग तिकडे यावें. इंग्रजांकडीलही कागद
दाण्याची आपदा पुरवेना! व त्यांजकडील मातबर येणार. येथून
त्याजवरून कळेल. कडबाचे चढतील. कोल्हाराकडे गेल्यानें नित्य मनश्रीमंतांस दाखवावें. बहुत आहे. नंदिगडावर जानवा धुळप ठेविला आहे. ा आहे. विदित होय. वडिलीं बहुत सावध

---

१ श्रीमंतांस तुम्हीं पत्र पाठविलें होतें त्याचें.

असावें. कालजी नित्य दुसरी नाहीं. माझी शरीरप्रकृत आहे तशीच आहे. उपाय करितों. वडिलांचे आशीर्वादेंकरून आरोग्य होईल. राजश्री सखारामपंत आले. भेटी झाली. कळावें. अलीरेजाखान व आपाजीराम यांस निरोप दिला आहे. ते येथून गेले. सलुखाचा मजकूर घडणें कठीण आहे. विदित होय हे विज्ञापना. मिरजेचीं पत्रें पावलीं. सरकारचें पत्र घेऊन तीर्थरूपांचे नांवें पाठवितों हे विज्ञापना.

पै॥ छ १४ जिल्काद.

नं. ९२४ श्रीगणराज. ( फाल्गुन शुद्ध पौर्णिमा. ११ मार्च. )

चिरंजीव राजश्री मोरोपंत आबा यांसी प्रती गोपाळराव गोविंद. आशीर्वाद उपरी येथील कुशल तागायत छ १२ जिल्काद मुक्काम नजीक हगलवाडी जाणून स्वकीय कुशल लिहीत जाणें. विशेष. या मुक्कामास आल्यापासून तुह्मांकडे दररोज एक पत्र पाठविलेंच आहे. आज चार दिवस दाणा मिळत नाहीं. मोठा कडाड झाला आहे. नाचण्या मात्र पोटापुरत्या मिळतात. उपाय नाहीं! गणती[illegible] कारचे कारकून आले होते त्यांस त्यांनं[illegible] दिली. गणतीचा गुंता उरकला. पुढ[illegible] हें लिहावें. मिररेजा तीन हजार फौज[illegible] रायपट्टणाकडून हैदरखानाकडे जावयास दुर्गाकडे गेला. त्याची फौज पाहून माण[illegible] ह्मणून श्रीधर आबाजी ठाणें कडब यांचें प[illegible] कडे पाठविलें आहे. मतोंडाहून काल[illegible] पाठविलें आहे. त्याजवरून कळेल. अ[illegible]

१ हे दोघेही हैदराचे वकील तहाची वाटाघाट करण्याकरितां पुनः पेशव्यांकडे आले होते.

राऊत ठेऊन खबरदारीनें आहों. श्रीमंतांनीं परवां पत्र पाठविलें कीं बुनगें शिन्यांस लाऊन देऊन सडे होऊन सावध असावें ह्मणून आज्ञा केळी. त्यास आज्ञेपूर्वीच आह्मीं बुनगें शिन्यांस लाऊन दिलें. परंतु हत्ती व जामदारखाना किलच्यांत ध्यावयास ( किल्लेदारास ) महत् प्रयास पडला! उंटें व शिलेदारांचें बुनगें आंत घेत नाहींत. बाहेरच आहे पेठेंत राहणारे आवई खातात, दुसरें चोराचें ही फार, याजकरितां बुनगें आणखी लष्करांत येतें. ऐशियास आह्मांकडील बुनग्यांस व उंटांस किलच्यांत जागा देऊन ठेऊन घेणें ह्मणून राजश्री मुकुंदराव श्रीपत यांस श्रीमंतांचें पत्र पाठवून द्यावें ह्मणजे ठीक पडेल. येविशीं श्रीमंतांसही विनंती पत्र लिहिलें आहे. तर तुह्मीं श्रीमंतांस विनंती करून मुकुंदराव यांस बुनगें आह्मांकडील येईल तें किलच्यांत जागा देऊन ठेऊन घेणें ह्मणून परभारें त्यांजकडे पत्र पाठवून द्यावें व आह्मांकडेही एक पत्र पाठवून द्यावें ह्मणजे ठीक पडेल. हैदरखान संकरापट्टणास आहे ह्मणून मतोंडाहून वर्तमान येत आहे. संकरापट्टण येथून वीस कोस आहे. मिररेजाही तिकडेच गेला आहे. तेव्हां हैदरखान आतां काय मनसबा करितो पहावें! आह्मीं चहूंकडून बातमी आणवून सावध आहों. रात्रंदिवस फौजेस चाकरी भारी पडती. परंतु दाणा मिळत नाहीं हाच पेंच भारी. यास काय करावें तें श्रीमंतांस पुसोन लिहावें. वरकड सर्व पुरवेल परंतु दाण्याची आपदा पुरवेना! वरकड सविस्तर श्रीमंतांस लिहिलें आहे त्याजवरून कळेल. कडप्याचे व मतोंडच्या बातमीचें पत्र पाठविलें आहे श्रीमंतांस दाखवावें. बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद.

---

१ येऊन जाऊन गोपळरावाचा हेतु इतकाच कीं सरकारी मुलूख लुटून पोट भरण्याची श्रीमंतांकडून आपणास परवानगी मिळावी. तसें न होईल तर संस्थानिकाचा मुलूख आपण लुटल्यास तिकडे तरी कानाडोळा करावा!

नं० ९२५ श्रीगणराज. ( १३ मार्च. )

श्रियासह चिरंजीव राजश्री गोपाळराव यांसी प्रती त्र्यंबक हरी आशीर्वाद उपरी येथील क्षेम तागायत फाल्गुन वद्य द्वितीया सोमवार-पर्यंत यथास्थित असे. विशेष. तुह्मीं पत्र पाठविलें तें पावलें. लिहिलें वर्तमान कळलें. चिरंजीवांचींही पत्रें आलीं त्यावरून सविस्तर वर्तमान कळलें. हैदरनाईक याणीं अमावास्येची संधि पाहून छापा घातला. अघाडीस तुह्मीं जाऊन नौबत वाजवीत उभे राहिलां तेव्हां सारी फौज तेथें जथून राहिली. मार आगीचा घेत ठरून राहिलां ह्मणून बुनगें राहिलें. [३]आंगेजी उत्तम केली. माणसें घोडीं जाया झालीं, त्यास युद्धप्रसंगच आहे. परंतु अगोदर तुमचा छबिना व बातम्या उत्तम असत्या तर केवळ जातीनिशीं इतकें कशास करावें लागतें? बरें! होणार तें होत आहे. दगा व्हावयाचा परंतु ईश्वरें रक्षिलें? तुह्मांकडील रात्रंदिवस चिंता लागली आहे. बहुत सावधतेनें सर्वांनीं असावें. तो दगेखोर, एक दाखवील आणि एक करील. याजकरितां सावध असावें. पडलें घोडें तुमचे हांतून ठेवणें होत नाहीं. तेव्हां तुह्मीं कर्नाटकचे हैदर बहादर याच्या कज्यांत पडल्या घोड्यांचे पैके द्यावे ते पन्नास जेजाला व प्यादा दोन हजार दोन मास बाळगितां ह्मणजे इतक्या घोड्यांचा दबाव न पडता! वर्तमान सांगावयास ( शत्रूकडील गारदी ) आला त्यानें तुमची बाजू राखिली! हैदर बहुत दगाबाज, त्या परस आपण सावधता करावी. दोन जागे बदल करावे. सकाळीं जेवून एक जागेस जावें. संध्याकाळीं जेवून एक जागेस जावें. लांडी लटकीच त्यावर जावयाची आवई घालावी. ऐसें आहे. शंभर घोड्यांचे पैके देतां त्या परस दोन हजार प्यादे महिने महाल दोन तीन

---

१ पत्र कुरुंदवाडाहून पाठविलेलें आहे. २ नीलकंठरावाचीं. ३ पराक्रम. ४ ओझें, खर्चाचें जोखीम.

महिने ठेविनां तर बरें होतें. आतां बहुत सावध रहावें. एक जागां राहूं नये. तिकडील बातमी पांच[1] रुपये खर्चून राखावी. दगा न खावा. बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद. चिरंजीव राजश्री गंगाधरबाळास आशीर्वाद.

नं० ९२६ ( फाल्गुन वद्य तृतीया. १४ मार्च. )

लक्ष्मणें बल्लाळ यांचें गोपाळरावास १२ जिल्कादचें पत्र--

"टिपूसुलतान व मीररेजा दोघे एकत्र होऊन सडे फौजेनिशीं चहूं कोसांचे अंतरानें देवरायदुर्गाजवळ झाडींत उतरले हे बातमी सरकारांत विदित झाली ते समयीं फौज रवाना झाली ते मदगिरीस आली. नंदिगड भृगुवारीं छ १० जिल्कादीं फत्ते झाल्यावर कृष्णरावआपाची रवानगी पांच हजार फौजेनिशीं झाली तेही दोडबळकालचे मुक्कामीं नजीक थोरलें बाळापूर येथें आले. तें वर्तमान टिपूसुलतान व मीर यांस कळल्यावर रातोरात कूच करून मागडी सावंतीदुर्गीच्या रानांत गेले. येथें बाळोजी पळांडे यांची फौज होती तेही सरकारचे आज्ञेप्रमाणें कृष्णराव बळवंत यांजकडे गेलियावर हैरदूजणांचा व सरकारचे फौजेचा मुकाबला झाला अथवा चुकावून कोणीकडे गेले याची बातमी आली नाहीं. भौमवारीं अगर आज सरकारचे फौजेनें नंदिगडाहून कूच होणार. बाजीपंत अण्णा व नारो शंकर आजच येथें आले. उदईक कूच करून पुढें जातील. श्रीमंतांनीं बाळापुरात जानोजी धुळप यास ठेविलें. राजश्री महिमाजी शिंदे बोलावून आणिले परंतु ठेविले नाहींत."

---

१ थोडें बहुत. २ हा मदगिरीचा किल्लेदार. ३ कृष्णराव बळवंत उर्फ आपा बळवंत मेहेंदळे. ४ सदरहू इसमांचा ह्मणजे मीर व टिपू यांचा. ५ मुकाबला होणें ह्मणजे गांठ पडणें.

नं० ९२७ श्रीगणपतिर्जयति. ( फाल्गुन वद्य. मार्चाचा दु० पंधरवडा. )

आशीर्वाद उपरी. 'बुधेहाळावरून कूच करून हुल्याळच्या सुमारें दोन कोस जाणार' ह्मणून लिहिलें तें कळलें. हैदरखान कावा करून छाप्यास आलेला व बरोबर सामान घेऊन आलेला प्रकार विस्तारें लिहिला तो कळला. दगाबाजाचा विश्वास नाहीं! बहुत सावधपणें असलें पाहिजे. 'शिर्के याचा लाखोटा पाठविला आहे हा मुजरद माणसा बराबर रवाना करावा' ह्मणून लिहिलें त्यावरून मुजरद जासूद फाल्गुन वद्य प्रतिपदेस रवाना केला आहे. उत्तर आलें उपरी पाठवून देऊं. तुमचीं पत्रें पौर्णिमेस रविवारीं दोनप्रहरीं पावलीं. अगोदर शुक्रवारीं हैसाळचें पत्र पावलें. शनवारीं बाबूराव जगजीवन याणीं चिरंजीव राजश्री त्र्यंबकराव परचुरे यांस पत्र लिहिलें होतें तेंच त्याणीं मुजरद माणसाबरोबर पाठविलें तें शनवारीं पावलें. दोन्हीं पत्रें कुरुंदवाडास पाठविलीं. [2]वडील चिंताक्रांत. आह्मीं येथील सर्व चिंतार्णवीं. तुमचीं पत्रें येतांच संतोष झाला. लोक पडले, घोडीं पडलीं, परंतु एवढ्या मारांत फारकरून खैर झाली. आणि तुह्मीं नामी गोष्टी केली जे [3]हिरिरी केली नाहीं. तो कडाकोट जमून गोलच्या गोल उभा राहिला. तेथें हिरिरी करून साध्य नाहीं! न [4]उठलां ही फार सरस गोष्ट झाली. सहा घटका रात्रीपासून अस्तमानपर्यंत तो काळें तोंड करून जायतोंपावेतों ताटकळत रहावें लागलें, श्रम पडले, परंतु सोसावेच लागले! चिरंजीव भाऊचीं दोन वेळ दोन घोडीं पडोन त्याची खैर झाली हा परम लाभ झाला. मोठें गंडांतर श्रीनें चुकविलें! तसेच चिरंजीव माधवराव अण्णाची घोडी ठार पडली, गुडघ्यास गोळा घांसून गेला आणि खैर झाली! पाय शाबूत राहिला. एक नाजुक

---

१ पत्र गोविंद हरींचें मिरजेहून गोपाळरावास. २ वडील बंधु त्र्यंबक हरि. ३ हल्ला. ४ उठणें ह्मणजे हल्ला करणें.

जागा मोठी. त्यापेक्षां तारता ( परमेश्वर ) थोर! रेजगेण देखील गुलामानें भरून मार दिला! साऱ्या वाटा चुकावून छबिन्यास बातमीस दगा देऊन अचानक आला. धोप एकीकडील दाखवून कावा करून समूळ बुडवावें ह्मणोनच आला होता! धण्याचें पुण्य समर्थ! श्रीनें खैर केली. पुढेंही रक्षण करणार श्री समर्थ आहे. सावधतेस अंतर न करावें बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद.

न. ९२८ श्रीगणपतिंर्जयतिं. ( फाल्गुन वद्य. मार्चाचा दु. पंधरवडा. )

आशीर्वाद उपरी. मनसब्याचा पर्याय कोणे रीतीचा? श्रीमंतांची उमेद कैसी? एवढ्या कृतघ्न शत्रूवर गेले. फौजेचा भरणा थोडा. 'फार फौज शत्रूस मारी. थोडी आपल्यास मारी' असें जें ह्मणतात तें प्रमाणांत आलें! अद्याप बोलत नाहीं. त्याणें खूप जिकिली! दिवस डोइवरी आले. एखाद्या मातबर स्थळाच्या गळीं पडोन शहास गुंततां नये. स्थलें दोन. पट्टण किंवा बेंगळूर. एक चैत्र मास मुलुखगिरीस उरला. स्वारी येण्याची ढोकली ( ? )शी दिसतें. अद्यापि त्यास रसायनच लागलें नाहीं, मग त्यानें तह कां करावा? एवढ्या समर्थांची स्वारी न साधतां माघारे कसे उलटतील? तेव्हां छावणीचा प्रकार प्राप्त झाला. तेव्हां खर्च भारी. तेव्हां धान्य पोटास पाहिजे याचा विचार काय? ( श्रीमंत छावणीस राहिल्यास ) इकडे एवढा राज्यकारभार कसा चालेल? याची तरतूद काय केली? तुह्मांस शत्रूच्या शहावरी ठेविलें ते तुमच्या नक्षावरी धण्याचा नक्ष हें ध्यानांत आणावें कीं नाहीं? आणखी चार हजार फौज तुह्मांजवळी यावी ह्मणजे तुह्मीं त्यास भारी व्हाल हें धण्यास कोण समजाऊन सांगतो? मागील पत्रीं आह्मीं हाच विचार लिहिला होता. नाना प्रकारच्या कल्पना चित्तांत येतात

---

१ त्या अर्थी. २ छरे. ३ पत्र गोविंद हरीचें मिरजेहून गोपाळरावास.

यास्तव लिहितों. यंदा देशास यावें. पुढें कार्तिक मासीं फौजबंदी करून जावें असा आमचा विचार. ते[1] राज्यभार चालवितात. त्यांच्या ध्यानांत सर्व आहे. त्यांचें पुण्य विचित्र आहे. हैदरनाईक फजीत पावतो यांत संदेह नाहीं. तिकडून बातमी राखोन लांबलांब एक दोन मजली करून अकस्मात् गांठावा ह्मणजे कार्य साधेल. कळलें पाहिजे. बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद.

नं० ९२९ **श्रीगणराज.** ( फाल्गुन वद्य षष्ठी. १७ मार्च. )

चिरंजीव राजश्री मोरोबा आबा यांसी प्रती गोपाळराव गोविंद आशीर्वाद उपरी येथील कुशल तागायत छ १८ जिल्काद मंदवासर मुक्काम अरलगट्टा तालुके हगलवाडी वर्तमान यथास्थित जाणून स्वकीय कुशल लिहित जाणें. विशेष. नंदिगड घेतल्याचें पत्र तुमचें आलें त्या अलीकडे पत्र येऊन वर्तमान कळत नाहीं, तरी सविस्तर लिहावें. तुमच्या लिहिण्यांतील भाव होता जे " टिपू सुलतान व मीररेजा यांच्या पिछावर राजश्री कृष्णराव बळवंत वगैरे पांच हजार फौजेनिशीं श्रीमंतांनीं रवाना केले आहेत. उभयतां कोणीकडे जातात हेंही कळतें. तदोत्तर मशारनिल्हे फौजेसुद्धां आपणांकडे येतील. श्रीमंत कोल्हाराकडे जाऊन कोल्हार व होसूर हीं ठाणीं घेऊन तिकडून माघारे फिरून बेंगळूर उजवें घालून खनखनहळ्ळी व चेनापट्टण व मदुराकडून पुढें येणार " ह्मणून लिहिण्यांतील भाव होता त्यास नंदिगडाहून कूच करून श्रीमंत कोणीकडे गेले? राजश्री कृष्णराव बळवंत फौजेसुद्धां देवरायदुर्गच्या रोखें आले होते. राजश्री बाळोजी पलांडे व सखाराम हरी मदगिरीस होते तेही मशारनिल्हेकडे गेले ह्मणून मदगिरीहून राजश्री लक्ष्मण बल्लाळ यांचें पत्र आलें होतें व मशारनिल्हे माघारे फिरोन श्रीमंतांकडे गेले

---

१ पेशवे.

ह्मणोन वर्तमान आहे ह्मणून मदगिरीच्या पत्रांत होतें. त्यास तुमच्या लिहिण्यांतील भाव होता ती गोष्ट राहिली किंवा काय? मशार-निल्हे पांच हजार फौजेनिशीं इकडेच येतील ह्मणोन लिहिलें ते कोठें आहेत? श्रीमंतांची खासा स्वारी कोठें आहे? कांहींच मनसबा कळत नाहीं! हैदरखान बाणावराकडे आला ह्मणून लिहिलेंच होतें, त्यास बाणावराहून कूच करून चेनरायपट्टणास आला. मीररेजा जाऊन सामील झाला. तुरवीकिरें त्याजकडील ठाणें तेथें पायींच्या माणसांचा भरणा करावा आणि दिवसेंदिवस काळोखी रात्र होते तेव्हां एक वेळ ( आमच्या ) लष्करावर येऊन गलबल करून पहावी असा त्याचा मनसबा आहे. आह्मीं तर आपल्या जागां सावधपणें आहों. पहिलें सावधपण चांगलें नव्हतें ते वेळेस ( देखील ) त्याच्या हातास कांहीं लागलें नाहीं. आतां तर चांगले सावधपणें आहों, मग त्याणें काय करावयाचें आहे! परंतु दाण्याचा व पाण्याचा मोठा पेंच आहे. तळ्यांस पाणी नाहीं. केवळ त्याच्या लगते तर राहतां नये. सोळा कोसांचे अठरा कोसांचे तफावर्तानें राहावया जागें पाणी नाहीं. तळ्यांचीं पाण्यें तमाम आटलीं. माघारे सरोन पाणी पाहून रहावें तर फार माघारे आलों असें होईल. श्रीमंतांचे मुक्काम तुरवीकिरें व नागमंगळ या प्रांतीं फार झाले होते तेव्हां त्यांच्या लष्करानें भोंव-ताले गांव फार लुटिले, वैरणी आणिल्या, याजकरितां दाण्याची सोय कांहीं होत नाहीं. रस्त शिन्यांकडून आणावी तर या गडब-डेंत वाणी कोणी रस्त आणीत नाहींत. दाण्याखेरीज तर चालत नाहीं. तुमकुराकडे गांव भरले आहेत परंतु गांव मातबर. तेच राखोन बंदोबस्त करून आहेत. ते गांव तोफांखेरीज मोडत नाहींत. दाण्याचा पेंच दोन दिवस, चार दिवस, निदान आठ दिवस सोसेल. त्यास उणा पुरा एक मास झाला. कोणे दिवशीं मिळाला तर कोणे दिवशीं नाहीं असे कांहीं दिवस गेले. पंधरा दिवस तो फारच तोटा

निमचंदी देखील घोड्यास पुर्ती मिळत नाहीं. घोड्यांचा तरणोपाय कसा होईल? चाकरीचे तर दिवस. असा पेंच. आह्मीं वारंवार श्रीमंतांस व तुह्मांस लिहितों तो मजकूर गाळून उत्तर लिहून पाठवितां! वरकड साऱ्या गोष्टी पुरवतील परंतु घोड्यांस दाण्याखेरीज कसें चालेल? हैदरखानाचा शह सोडून दाण्याचे पाठीस लागावें तर तेंही श्रीमंतांचे मर्जीस येणार नाहीं. राजश्री कृष्णराव बळवंत श्रीमंतांकडे माघारे गेले असतीलसें दिसतें. कां कीं, देवरायदुर्गाकडे येते तरी कागद पत्र आह्माकडे पाठविते. कांहीं वर्तमान कळतें. ती गोष्ट नाहीं तेव्हां माघारे गेले असावे. श्रीमंत कोल्हाराकडे गेले तेव्हां किती लांबले हें तुह्मांस ठाऊकच आहे. मीररेजा व हैदरखान एक झाले हेंही तुह्मांस लिहिलेंच आहे. असें असतां पांच हजार फौज रवाना केली होती ती माघारी नेविली याचा अर्थ काय? श्रीमंत कोल्हार, होसूर हीं ठाणीं घेतांच माघारे फिरणार किंवा कांहीं दिवस तिकडेच राहणार किंवा गुरुमकोंड्याकडे जाणार हें लिहावें. आह्मीं केवळ आपले जीवासाठीं भिऊन लिहितों असा अर्थ नाहीं. परंतु श्रीमंत कोल्हाराकडे आणखी दोन मजली महमदअलीच्या राजकारणाकरितां पुढें जात जात गेले, ( आणि त्यांस तिकडेच ) आठ चार मुक्काम करावे लागले, आणि हे[1] सारे एकत्र होऊन देवरायदुर्गाचा डोंगर धरीत आले, तरी आमचा येथें टिकाव असा होईल? तथापि सडे होऊन रहावें तरी बुनग्यांस आश्रय नाहीं. शिऱ्यांस बुनगें लावून द्यावें तरी ( बुनग्यानें ) बाहेर रहावें, आणि ( तेथेंही ) पाण्याचा, वैरणीचा तोटा आहे. आह्मांस कोणी सदुप (?) घातल्या नाहीं, जे वेळेस जसें साईस येईल तसें करूं, परंतु ठाणीं टाकून जातां येत नाहीं! काळोखी रात्र. शत्रू दगेखोर. या प्रकारचें वर्तमान आहे. ( आह्मांजवळ ) फौज फार आहे ह्मणावें तरी शहाजी भोसले व नरसिंगराव घायगुडे सडेच आहेत. चहूं

---

१ हैदर, टिपू, मीररेजा वगैरे.

दिवसांत मुहूर्तानें आले त्यास सव्वा महिना झाला. माणसांची काणसें झालीं आहेत! आमचे फौजेंतील कित्येक सावनूरांत राहिले. कांहीं परगण्यांत राहिले. कांहीं शिऱ्यांत बुनग्याजवळ राहिले. कित्येक थोर असून कामाचे नाहींत. मागती वाईट ह्मणतां नये. (सारें आह्मीं निभ ) स्तुत स्तवनच केलें! सर्व वर्तमान तुह्मांस कळेल. तुह्मांस तिकडे महिना पंधरा दिवस लागले तरी या फौजेनें खावें काय? यास्तव इतकें लिहिणें लागलें. आह्मांस जोंपर्यंत मिळतें तोंपर्यंत आजपावेतों हैदरखानाचा मुलुख मारिला. आणखी आठ चार दिवस मिळे तों पहातच आहों. नच मिळेल तेव्हां मग ओळख राहणार नाहीं. शिऱ्यांचा मुलुख आहे, आह्मीं आहों! मग श्रीमंत रागें भरोत अगर चित्तास येईल तें करोत! आह्मीं अवमान सोडून लिहिलें ह्मणाल तरी तसा प्रकार नाहीं. सारें तुह्मांस समजत आहे ह्मणून लिहिलें आहे. कडवाचे ठाण्यांत गाडदी व रायदुर्गेचे प्यादे आहेत त्यास पोटास नाहीं. श्रीमंतांची आज्ञा रायदुर्गाहून आणोन खावें, त्यास तेथून येणें कठीणच आहे! प्यादे उपास किती दिवस करितील? एखादे दिवशीं उठोन जातील! श्रीधर आबाजीजवळ ऐवज नाहीं. याप्रमाणें ठाण्यांचा मजकूर! बरें! जें आहे तें चांगच आहे. अशानें ठाणीं कशीं राहतील! बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद.

नं०९३० (फाल्गुन वद्य अष्टमी. १९ मार्च. )

वासुदेव धोंडदेव यांचें गोपाळरावास पत्र छ २० जिल्काद मु० शिरें येथून—

"राजश्री बळवंतराव गणपत यांचे चिरंजीव चार पांच हजार फौजे-

---

१ आनंदराव रास्त्यांस उद्देशून हें लिहिणें दिसतें. २ वाईट तें वाईट. शिवाय त्यांस वाईट ह्मणतां कामाचें नाहीं! ३ केलें पाहिजे. ४ मिळत होतें. ५ शिरें सुभ्यांपैकीं मुलूख आपला आहे हा ओळख राहणार नाहीं. पाहिजे त्याप्रमाणें लुटून पोट भरूं! ६ हा कडवा या ठाण्यावरील ठाणेदार. ७ बळवंतराव गणपत मेहेंदळे यांचा मुलगा आपा बळवंत ऊर्फ कृष्णराव बळवंत.

सुद्धां टिपू व मीररेजा यांचे पिछावर आले असतां मदगिरीपासून आठ कोसांवर पुढें उतरले होते. तों छ १७ जिल्कादीं टिपू व मीररेजा हे दोघे दोही बाजूनें येऊन चार घटका रात्रौ पहांटेस छापा घातला. हे फौजेसुद्धां तयारच होते. छापा सांभाळून त्यांजवर चालोन घेतलें. शेंपन्नास माणूस जायां झालें. निदानीं मीर व टिपू पळोन झाडीचे आसऱ्यास जाऊं लागले तेव्हां निकड करून आपले फौजेनें शें दोनशें घोडे पाडून घेतले. दुसरे दिवशीं १८ जिल्कादीं पाठीस लागणार होते. येणेंप्रमाणें मदगिरीस राजश्री लक्ष्मणपंत आहेत त्यांची बातमी आली. तेथें आमचे सदाशिवपंत गवंड्ये गेले होते ते काल सायंकाळीं येथें आले. त्यानींही वर्तमान सांगितलें. कालपासून शिऱ्यांतील लोक फार गडबडले आहेत. हैदरखान कडूर बाणावराकडे सडा होऊन गेला आहे. शिबंद्या शें पन्नांस केल्या आहेत. मीर फैजुल्लाखान याजकडीलही कांहीं फौज हैदरखानाकडे आली आहे. त्या गांवीं बोलतात कीं, शिऱ्यांस येऊन गडबड करणार. आपल्या फौजेवर येऊन हुलड करणार असेंही बोलतात."

नं० ९३१ श्रीगणराज. ( फाल्गुन वद्य नवमी. २० मार्च. )

अपत्यें साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत छ २१ जिल्काद पावेतों वडिलांचे आशीर्वादेंकरून वर्तमान यथास्थित असे. विशेष. छ १८ जिल्काद मुक्काम आरलगट्टा तालुके बुधेहाळ येथील मुक्कामचीं पत्रें सांडणीस्वाराबराबर पाठविलीं तीं छ० मजकुरीं पावलीं. लिहिला मजकूर कळला. "टिपू सुलतान व मीररेजा यांची फौज मागडीवर आली यास्तव त्यांच्या पिछावर राजश्री कृष्णराव बल्लाळ व बाळोजी पलांडे अशी पांच हजार फौज रवाना केली होती. आपणांस मिळावें अशी

---

१ पत्र मोरो बल्लाळ याचें गोपाळरावास.

( त्यांस ) श्रीमंतांची आज्ञा होती, त्यास फौज व मशारनिल्हे माघारे गेले ह्मणून शिन्यांहून लिहिलें आलें. याचा भाव काय तो लिहिणें " ह्मणोन आज्ञा, त्यास राजश्री कृष्णराव बल्लाळ व बाळोजी पलांडे असे मीर व टिपूसुलतान यांच्या पिछावर पाठविले त्यांत दोन भाव. जर-करितां टिपूमियां मागडीच्या झाडींत राहिला तर फौजांनीं भैरवदुर्गाच्या सुमारें रहावें. मीररेजा तेथून निघोन हैदरखानाकडे गेला. टिपूसुलतान मागडीच्या झाडींत राहिल्यामुळें या फौजा बहिरवदुर्गाजवळ राहिल्या होत्या, ह्मणोन श्रीमंतांनीं माघारे बोलाविले. भैरवदुर्गापुढें एक कोस राहिले असतां टिपूनें आवशीच्या सहा घटका रात्रीस तयार होऊन छाप्यास आला. आपण खासा मागें राहून पांच सातशें स्वार पुढें पाठविले. करोल[1] होते. एक रंजक गोटावर केली. तों हे सावध होतेच. तैसेच घोड्यावर बसोन पाठलाग केला. दहावीस माणूस मारिलें. दहा पांच लहान मोठे घोडे पाडून घेऊन माघारे निघोन किल्ल्याजवळ राहिले. तो झाडींत शिरला. दुसरे दिवशीं कूच करून हे लष्करास आले. आनंदराव गोपाळ व राघो बापोजी चार हजार फौज गुरुमकुंड्याकडे गेली होती. तिकडे ( त्यांनीं ) मुलूख जाळिला. गुरांची लूट केली. मातबर गढी ( होती तेवढी मात्र ) हातीं लागली नाहीं. किल्ल्याजवळ गेले होते; परंतु वरून तोफांचा मार केला याज-मुळें तेथें राहिले नाहींत. श्रीमंतांचें बलावणें जातांच निघोन आले. काल लष्करास मिळाले. वडिलांकडे तीच फौज रवाना केली आहे. येऊन पावतील. श्रीमंतांच्या पत्राचें उत्तर पाठविलें आहे त्याजवरून विदित होय. आमची शरीर प्रकृत आहे तशीच आहे. उपाय करीत आहों. विदित होय हे विज्ञापना.

पै॥ छ २४ जिल्हेज.

---

१ बंदूकस्वार.

श० १६९१ **हैदरअलीवर तिसरी स्वारी.** इ० स० १७७०

नं० ९३२ **श्रीगणराज.** ( फाल्गुन वद्य नवमी. २० मार्च. )

अपत्यें साष्टांग नमस्कार विज्ञापना. नंदिगडावर अकरा मुक्काम होते. तेथून कूच होऊन देवनहळ्ळीचे नजीक नंदिगडाहून दोन कोस तेथें मुक्काम जाला. तेथून कूच होऊन शिलगट्टयावर मुक्कामास आलों. येथून मल्हा पानसे कोल्हाराकडे रवाना झाले आहेत. ठाणीं घेऊन पाडावीं ( अशी त्यांस श्रीमंतांची आज्ञा आहे. ) कैवार किल्ला घेतला फौजेचा जथ बराच आहे. राजश्री नारोशंकरही लष्करास येऊन पावले. तहवारजंग सात हजार फौज सात आठ तोफा ( या ) सामानिशीं पेनगुड्यावर दोन चार रोजांत येऊन मिळतील. शिलगट्टयावर चार मुक्काम झाले. आणखी दोन चार मुक्काम होतील. कोल्हाराकडून फौज आलियावर आपण लिहिल्या मार्गाचाच रोख आहे. ठाणीं घेऊन ठेविलीं तर रक्षावयास ठीक पडत नाहीत यास्तव पाडून जाळून टाकणें हेंच उत्तम आहे. सामानांत कमीपेकीं गाडदी नाहींत. कांहीं होते त्यापैकीं नंदिगड व बाळापुरच्या ठाण्यांत जाऊन बाकी दोन चारशें राहिले आहेत. ' कडचानें ठाणें पाडून टाकून रायदुर्गेचे प्यादे व हुजूरचे गाडदी आहेत ते घेऊन येणें ' ह्मणून श्रीधर आबाजी यांस पत्र परभारें गेलें आहे. तें ठाणें पाडून टाकावें. ' वैरण मिळत नाहीं. निमचंदी देखील घोड्यांस मिळत नाहीं. ' असा दोन तीनदां मजकूर लिहिला तो कळला. यंदां चोहोंकडून साहित्यच आहे! सरंजामांत आसी झाली. तिकडून पैसा पावेल त्याची गत कळतच आहे! चाकरी तो निकडीची. महागाईमुळें खर्च भारी बसतो. ठीक न येत. जमसीपांना खर्च पाहतां बरेंच आहे! सर्व गोष्टी संकटावह आहेत. ईश्वर पार पाडील. विदित होय हे विज्ञापना.

पै॥ छ ४ जिल्काद

मोरो बल्लाळ याचे गोपाळरावास पत्र. २ हा निजामअल्लीचा सरदार.

शा० १६९१ **कोल्हार परगण्यावर स्वारी** इ. स. १७७०

नं० ९३३ **श्रीगणराज.** ( फाल्गुन वद्य नवमी. २० मार्च. )

अपत्यें मोरोबानें साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत २१ जिल्काद मुक्काम शिल्घट्टें प्रांत चिकबाळापूर वडिलांचे आशीर्वादेंकरून वतमान यथास्थित असे. विशेष. वडिलीं हदलकिरें तालुके हगलवाडी येथील मुक्कामचीं व हगलवाडीच्या मुक्कामचीं पत्रें पाठविलीं तीं पावोन लिहिला मजकूर कळला. 'मीररेजा[1] नागमंगळाजवळून बेलूर उजवें टाकून चेनरायपट्टणाजवळ गेला. तेथून हैदरखान यास मिळणार. हैदरखानही बाणावराजवळ आहे.' ह्मणून मतोंडाहून बातमीचीं पत्रें आलीं तींच बजिन्नस पाठविलीं तीं पावलीं त्यावरून भाव कळला. दुर्गकरांचीं येथून पाठविलीं पत्रें रामाप्पाकडे पाठविलीं आहेत ह्मणून लिहिलें तें कळलें. दुर्गकर कांहीं वडिलांच्या आज्ञेशिवाय नाहीं. दुर्गकर राजे यांनीं परशुरामपंतास बहुत नशेत करून लिहिलें आहे. ते उंटें घोडीं वडिलांकडे पाठवून देतील. होसूर कोल्हार वगैरे ठाणीं घ्यावयास स्वामी स्वारीचें प्रयोजन नाहीं ह्मणोन लिहिलें, त्यास स्वामी स्वारीचा मुक्काम येथें मुक्काम मजकुरीं होऊन राजश्री मल्बा पानसे यांजबरोबर फौज व तोफखाना देऊन कोल्हार प्रांतें रवाना झाले आहेत. तेथील ठाणें तों हैदरखानाकडील आधींच उठोन गेलें आहे. तेथील जमीदार खंडणीस आले होते. तालुक्याची खंडणी पन्नास हजार झाली आहे. कोल्हारचें ठाणें मात्र पाडावें, तालुका राखावा ( असा श्रीमंतांचा हेतु आहे. ) तहवरजंग मडकशिऱ्याजवळ आल्याचीं पत्रें आलीं खासा मागेंच आहेत. जानोजी भुळप यांस ( श्रीमंतांनीं ) चिकबाळापूरचा सुभा मागितला. नंदिगडास हुजूरचा हवालदार ठेविला आहे. रजाअलीखान व आपाजीराम यांस निरोप दिला, त्यास ते बोलोन चालोन गेले आहेत किंवा श्रीमंतांनीं रागें भरून निरोप

१ निजामअली.

दिला याचा भाव लिहिणें ह्मणोन आज्ञा, त्यास निरोप दिला ( तेव्हां ) रेजाअलीखान[1] मातबर गृहस्थ याजमुळें बहुमानेंकरून निरोप दिला. त्यांत हैदरखानाजवळी गेल्यावर येथील भाव सांगून तेथील भाव ध्यानांत आणून चार गोष्टी तोडमोडीच्या बोलून तहाचा प्रकार ठरावांत आणिला तर उत्तमच आहे. त्यांत ते हैदरखानाकडे गेल्यावर तोही भाव कळेल. महमद अलीखान यांजकडील राजकारण अद्याप पक्कें झालेसें नाहीं. खासा स्वारीची छावणी झालियानें साराच बंदोबस्त होऊन पारिपत्य चांगलें होईलसें प्रमाणच आहे. खासा श्रीमंत राहिल्यानें चोहोंकडील राजकारणें पक्कीं होऊन त्यांस भरंवसा पुरोन तेही सामील होतील, तेव्हां शत्रू निर्बल पडून कार्य उत्तम घडतें. त्यांत श्रीमंतांचे मर्जीस हेही भाव येत आहेत. त्यांत मनसबा होत होतां घडेल तो प्रमाण! " हैदरखान बाणावरानजीक आला. मीरही त्याला सामील झाला. त्यास आणखी एक वेळ लष्करावर गलबल करावी असा त्याचा मनसबा आहे. बाणावर येथून सोळा कोस आहे. आपल्या जागां सावध आहों " ह्मणून लिहिलें त्यास मीर हैदरखान एक झाले आहेत यामुळें ते एक वेळ गलबल करितील यास्तव वडिलीं सावध रहावें. राजश्री आनंदराव गोपाळ व राघो बापोजी बराबर किरकोळ पथकें देऊन चार हजार फौज गोरमकोंड्याकडे गेली होती ते काल येथून पांच सहा कोसांवर होते. आज लष्करासमीप येतील. ते चार हजार फौज वडिलांकडे नेमणूक झाली आहे. ते सत्वरच वडिलांकडे येतील. वडिलांजवळील फौज व ही चार हजार येईल अशी एक जागां झालियावर बराच जमाव होईल. " खनखन-हळ्ळीकडे गेलियावर डोंगर मिळत आले आहेत यास्तव तेथें कहींची

---

१ रेजाअलीखान हा अर्काटचा माजी नबाब चंदासाहेब याचा मुलगा. एक वेळ हा स्वतः ही तेथें नबाब झाला होता.

बंदोबस्ती असावी. चेनापट्टणाकडे गेलियावर तेथील पारिपत्य चांगलें करावें. त्याणीं मागें एक दोन वेळ लबाडी केली आहे यास्तव ठाणें घेऊन पाडून जाळून टाकावें " ह्मणून लिहिलें तें कळलें. त्या रोखें गेलियावर सहजांत तो गुंता उरकतो. ठाणीं घेतों ते शिबंदीस आट ठेवीत नाहीं. सुरुंग लावून पाडून ( जमिनी ) बराबर होतात! आनंदराव गोपाळ इंदुवारीं येथें आले. आजीचा दिवस येथें आहेत. उदईक बुधवारीं येथून निघून वडिलांकडे येतात. श्रीमंतांचें लष्कर प्रस्तुत शिलगट्टेवर आहे. गणेशगडही आज ( हातीं ) येईल. कोल्हाराकडे मलबा पानसेही गेले आहेत. कोल्हारचा किल्ला घेतला. कोल्हार तों दम धरीत नाहीं असें आहे. श्रीमंत पुढें फार लांबत नाहींत. येथूनच पेशजी लिहिलें रोखें येतात. कळावें विदित होय हे विज्ञापना. इभ्रामखान बेंगळूरचा किल्लेदार याचा लेक अमीनखान बापाशीं रुसोन श्रीमंतांकडे आला. सरकारांत चाकर ठेविला. नंदिगडच्या मुक्कामीं आला. लिहावयास विसरलों ह्मणून हल्लीं लिहिलें असे. हे विज्ञापना. अपत्यें रामाजी गणेश चरणावर मस्तक ठेऊन शिरसाष्टांग नमस्कार विज्ञापना.

पै॥ छ २४ जिल्काद.

नं० ९३४ श्री.

श्रीमंत राजश्री बाळासाहेब स्वामीचे सेवेशीं

विनंती सेवक रामाजी गणेश कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. छ २२ जिल्काद मुक्काम शिलगट्टें प्रांत श्रीरंगपट्टण स्वामीचे कृपेंकरून वर्तमान यथास्थित असे. विशेष. कृपा करून हगलवाडी मुक्कामचें पत्र पाठविलें तें पावोन बहुत समाधान झालें. पर्वीं कित्येक पकारें रागें

---

१ गंगाधरराव गोविंद हा गोपाळरावाचा धाकटा भाऊ त्याबरोबरच त्याच्या लष्करांत असे. पत्र लिहिणारा रामाजी गणेश हा मोरो बल्लाळाजवळ पेशव्यांच्या लष्करांत होता.

भरून लिहिलें, ऐशियास स्वामीकडून पत्रें येतात त्यांचीं उत्तरें जात आहेत. एक पत्राचें उत्तर गेलें नाहीं तों आह्मांवर कित्येक उपमा देऊन लिहिलें! ऐशास सर्व आपल्यापासून. आह्मीं सेवक लोक चुकलों तर आपण धणी क्षमा करीत असावें. स्वामीबराबर असावें ते येथें आहों इतका प्रकार. वरकड राजकी मजकूर तर नंदिगडास मोर्चे बसल्याचे मागलें वृत्त वरचेवर लिहिलें गेलें आहे यावरून सेवेशीं कळलें असेल. नंदिगडास मोर्चे बसल्यापासून तिसरे दिवशीं बोली लागली त्याजवर दोन दिवस दम धरून राहिले होते. जरकरितां किल्लेदार होता तोच लोकसुद्धां असतां तर दोन तीन रोजांत गुंता उरकता. परंतु चिकबाळापुरास मोर्चे बसले तेव्हां बेंगळुराहून दोनशें गाडदी नवे आले होते यामुळें दोन दिवस ( आंतील लोकांनीं ) अधिक दम धरिला. कौल घेऊन आपली वस्तभावसुद्धां थोरले बाळापुरा पार करून द्यावे असा करार मदार केला तेव्हां कौल करार घेऊन उतरले. कांहीं ऐवजही होता तो घेऊन गेले. किल्ला घेऊन किल्ल्यांत हुजूरचा किल्लेदार ठेविला. गाडदी व प्यादे मिळून चारशें ठेविले. चिकबाळापुरचें ठाणें घेऊन महिमाजी शिंदे ठेवावे असा करार होऊन महिमाजी शिंदे गुरमकोंड्याकडे गेले होते त्यांस बलावून आणविले ते आल्यावर ते राहिले.[1] जानोजी धुळप विजयदुर्गेकर आरमारचा सुभा यास बाळापुरचा सुभा सांगितला. परकी दोडबाळापुरचे कारकुन परकी आहेत त्यांस धंदे सांगितले नंदिगडाहून कूच होऊन कोल्हागाकडे जावें असा सिद्धांत करून शिलगट्ट्यास आले तों जमीदार खंडणीस आले. ठाणें हैदरखानाच्या लोकांनीं टाकून गेले. मुलूख व कसबा मिळून पन्नास हजार खंडणी झाली. निम्मे मुलुख राहिला त्यावर राजश्री मलबा पानसे बराबर सात आठ हजार फौज व तोफा देऊन रवाना केले आहेत. तिकडे दोन

---

१ महिमाजींची नेमणूक रद्द झाली.

चार रोज लागत तों येथें मुक्काम आहेत. छ १८ जिल्कादीं निजा मअलीखानाकडून सांडणीस्वार पत्रें घेऊन आला. तहवरजंग बराबर फौजसुद्धां मडकशिऱ्यांस आले. खासा[1] बल्लारी पलीकडे एक मजल आहेत. बहुतकरून खासा येत नाहीं. गुरमकोंड्याकडे गेली फौज अद्याप आली नाहीं. परंतु त्या फौजेची स्वारी चांगली साधली. अद्याप गणेशगड सर झाला नाहीं. मुराराव यांजकडे बोली लागली होती परंतु अद्याप हस्तगत नाहीं. श्रीमंतांचा मनसुबा बेंगळुरास बसावें असा आहे. परंतु बसल्यास सत्वर ( तें हातीं ) आलें तर बरें. नाहीं तर पेंच पडेल. यास्तव बसत नाहीं व रेजाअल्लीखान यांस निरोप देऊन पाठविले. रेजाअल्लीखान यास शिरपेंच, हत्ती व वस्त्रें दिलीं. आप्पाजीराम यांस वस्त्रें दिलीं. कांहीं जीवें[2] आहे. बहुधा सल्ला होईल. ( श्रीमंतांनीं ) लौकिकांत उदासता अशी दाखवून निरोप दिला आहे, परंतु अंतर्यामीं ममता आहे. त्यांचाही[3] भाव थोडक्याच दिवसांत कळेल. बेंगळुरच्या किल्लेदाराचा लेंक बरा मातबरींत होता. हजार पांचशें स्वार दोन हजार गाडदी असे त्याचे निसबतीस होते. बरा भारीपणांत होता. परंतु बापलेंकाची कटकट झाली ह्मणतात. भाव कोणता न कळे. मिरा बराबर होता. मीर शेवंतीदुर्गास जाऊं लागला ते दिवशीं आपण निघाला तो होसकोट्यास दोनचार माणसांसुद्धां आला. तेथून श्रीमंतांकडे लिहून पाठविलें. येथून स्वार जाऊन त्यास लष्करास नंदिगडच्या मुक्कामीं आणिला. श्रीमंतांची भेटी झाली. तिकडील कित्येक भाव त्यानें सांगितले. कित्येक अंगेजणीचे[4] प्रकार बोलतो. परंतु भरंवसा पुरवत नाहीं. श्रीमंतानीं मातबरासारिखा ठेविला आहे. पुढें काय होईल पहावें. श्रीमंतांच्या मनांत छावणी करून रहावें असा

१ निजामअली. २ तहाचें बोलणें तडीस जाईल असें वाटतें. ३ हैदराचा. ४ यंव करीन, त्यंव करीन, असें सांगतो. अंगेजणी ह्मणजे पराक्रम.

आहों. होतां होईल तें खरें! दाण्यादुण्याचें धॅरणें, परंतु आजपर्यंत कसेंही चाललें. कडब तालुक्यांत श्रीमंतांची मातबर फौज फिरली नाहीं ह्मणून थोडी बहुत गुजराण आमची चालली! सारा मजकूर राजश्री बाजीपंत गणतीस आले होते त्याणीं पाहिलें आहे. त्यापेक्षां आतां दाण्याचा अगदींच तोटा! आतां शिरें तालुक्याचे गांव आहेत आणि आह्मीं आहों! श्रीमंत काय ह्मणतील तें सुखें ह्मणोत! हैदरखान मीर-रेजा वगैरे सारे एकत्र झाले आहेत. श्रीमंतांस तिकडे चार दिवस लाग-तसे असल्यास फौज पांच हजार इकडे पाठवावी. श्रीमंतांचे मर्जीस आलें तरी विनंती करावी. मर्जीसच येत नसल्यास तुमचा इलाज काय! परंतु श्रीमंत तिकडे लांबले, हे सारे जमा झाले आहेत. जोरबेजोर हालचाल करतील यांत संशय नाहीं. सविस्तर सांडणीस्वारासमागमें लिहून पाठविलेंच आहे. ( श्रीमंतांनीं आमच्या कुमकेस ) फौज पाठ-विली तर उत्तम. न पाठविली तर आमचे हातून होईल तितकें करूं. कडब ठाणें उठवणें ह्मणून श्रीमंतांची आज्ञा त्यावरून ठाण्यांतील लोक उठवून आणिले. दरवाजे व घरें जाळिलीं. दारू जाळिली. तोफा फोडिल्या. याप्रमाणें केलें. हैदरखान चेनरायपट्टणास आहे. कोणी बोलतात कीं पट्टणाकडे गेला. राजश्री कृष्णराव बळवंत यांचें व टिपूमियाचें झुंज झालें ह्मणतात. परंतु तुह्मीं कांहीं लिहिलें नाहीं! राजश्री शंकराजीराव याणीं श्रीधर आबाजीस लिहिलें होतें कीं, श्रीमंत कोल्हाराकडे गेले आहेत. महमदअलीकडील राजकारणाचा प्रकार असला तरी चार दिवस अधिक लागतील. लागल्यास चिंता नाहीं. इकडे कांहीं फौज पांच हजारपावेतों विचारास आलें तरी पाठवावी. आजपर्यंत धरणेंपारणें राहण्याचें आलें. सर्व राजश्री बाळाजीपंत गणतीस आले त्याणीं पाहिलें आहे. हर कसेंही चाललें. पुढें तसें चालतां दिसत नाहीं. देवरायदुर्गपावेतों कही भरून आणिली. याउपरी

---

१ उपास. धरण्याच्या उलट पारणें. ' दारीं धरणें देणें ' ह्मणजे दारांत उपास करीत बसणें.

एक दुसरा उपास करूं. उपरांतिक शिरें प्रांत आहे! लष्कर तो उपाशीं मारतां येत नाहीं व कोणी उपाशीं मरूं लागल्या उपर आमचेंही ऐकणार नाहींत. श्रीमंत रागें भरतील तरी उपाय नाहीं. श्रीमंतांनीं आपणाकडे (आह्मांस) बलाविलें तरी चारा पाणी मिळेल. नाहीं तरी शिरें प्रांताखेरीज गत नाहीं. येविशीं श्रीमंतांस विनंती करावयाची असली तरी करणें. मोंगलाची फौज रायदुर्गप्रांतें आली ह्मणून बोलतात. तिकडे तथ्य वर्तमान येतच असेल. तुह्मीं आपणाकडील कुशल वर्तमान लिहीत जाणें. आपाजीराम व रेजाअल्लीखान केवळ जाबसाल तुटक करून गेले किंवा कांहीं तंतु राखोन गेले हें लिहिणें. आजपर्यंत हैदरखान बोलत नाहीं तेव्हां गुडध्योंखेरीज नाहीं असें आमच्या अकलेस येतें. मग कसें असेल तसें असो! बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद.

नं० ९३६ (फाल्गुन वद्य दशमी २२ मार्च.)

वासुदेव धोंडदेव याचें गोपाळरावास पत्र. शिरें मुक्काम. २३ जिल्कादचें—

"सैदू गाईकवाड जासूद कित्तूरास गेला तो काल येथें आला. तो जबानी सांगत होता जे, मीश्रीकोट, तडस, हल्याळ, सांबराणी, इकडे चारपांच हजार फौज व आठ नऊ हजार पाईचें माणूस हैदरखानाचें आलें आहे. आपले तालुके व प्रांत हुबळी वगैरे ओस झाला.

१ आमच्या फौजेपैकीं कोणी उपाशीं मरूं लागले तर शिरें प्रांत सरकारी मुलूख आहे तरी तोही लुटतील. आमच्या ताकिदीस जुमानणार नाहींत. २ पेशव्यांच्या लष्करांत. ३ हे दोघेही हैदराचे वकील. ४ आमच्याच राष्ट्रांपैकीं कोणाची तरी शत्रुस फूस असली पाहिजे असा लिहिण्याचा अभिप्राय.

राजश्री नारो बाबाजी सुभेदार याणीं जमाव दोन चार हजार केला आहे. नित्य त्यांचे यांचे झपाटे होतात. कित्तुरचेंही हजार माणूस नारो बाबाजींनीं आणविलें आहे."

नं० ९३७ ( २३ मार्च. )

बापूजी बल्लाळ जोशी यांचें गोपाळरावास फाल्गुन वद्य एकादशीचें पुणें मुक्कामचें पत्र. "कोंकणांतील आरमार राजश्री बाळाजीपंत घाट्ये व मोत्याजीराव विचारे असे आरमार घेऊन दोन महिन्यांची अडशेरीवर घालून स्वारीस गेले होते त्यास तीन महिने झाले. अद्यापि आरमार कोठें आहे ठिकाण नाहीं. येथें वर्तमान आलें आहे कीं, रामेश्वरापुढें गेलें. तेथें फरांसीस व वलंदेज यांची गांठ पडली. पुढें कोठें गेले हें वर्तमान नाहीं. विजयदुर्गाजवळ दोन मुंबा थोर नांगर टाकून बसले आहेत. इंग्रजांचे ह्मणोन बोलतात. मदनगड किल्ला राजपुरीजवळ होता तेथें नवा हबशी आला होता. त्यास तो मुलुखास जाचूं लागला त्यावरून विसाजीपंत लेले याणीं वेढा घातला. महिनाभरपावेतों झुंजला. हल्लीं सलुखांत आहे. किल्ला[1] येईल असें आहे."

नं० ९३८ श्रीगणराज. ( २३ मार्च. )

चिरंजीव राजश्री मोरोबा आबा यांसी प्रती गोपाळराव गोविंद. आशीर्वाद. उपरी येथील कुशल तागायत फाल्गुन वद्य एकादशी शुक्रवार मुक्काम नजीक चेलूर बिदरी. वर्तमान यथास्थित जाणून स्वकीय कुशल लिहित जावें. विशेष. आह्मीं आठ दहा दिवस हगलवाडी तालुक्यांत राहिलों. कोठें चार मुक्काम, कोठे तीन मुक्काम, येणेंप्रमाणें राहत गेलों. परंतु पाण्याचा तोटा. तळ्यास पाणी नाहीं. याजकरितां शिऱ्यांच्या सरदेस मचलदऱ्याचे ओढ्यावर रहावयास गेलों. तेथें आठ चार दिवस

---

१ किल्ला लेले याच्या हातीं येईल.

पाणी पुरेलसें दिसतें. दाण्याखेरीज एक दुसरा दिवस कसेंही चालेल, परंतु पाण्याखेरीज एक घटकाभर चालणार नाहीं. असा विचार आहे. धारवाड तालुक्याहून राजश्री नारो बाबाजी याणीं श्रीमंतांस पत्रें लिहिलीं आहेत व आह्मांस पत्र पाठविलें तेंही श्रीमंतांकडेच पाठविलें आहे. हैदरखान याणीं लालामियास दोन हजार फौज व चार हजार पायदळ व तोफा येणेंप्रमाणें सामानानिशीं सावनूर प्रांतास पाठविलें आहे. (त्यानें) हल्याळास वेढा घातला आहे व पुढेंही उपद्रव करावा या मजकुरांत आहे. राजश्री नारो बाबाजी याणीं लिहिलें आहे कीं, चार हजार फौज पाठवून द्यावी. त्यास श्रीमंतांचे आज्ञेखेरीज फौज कशी पाठवावी? याजकरितां न पाठविली. व चार हजार फौज पाठवून फळही नाहीं. सविस्तर श्रीमंतांस लिहिलें आहे. तुह्मींही विनंती करावी. कसा बंदोबस्त करावयाचा तो करितील! हैदरखानाकडील बातमी ठीक कळत नाहीं. कोणी संकरापट्टणावर आहे ह्मणतात. कोणी पट्टणाकडे गेला ह्मणतात. कोणी हसन बेकुराजवळ आहे ह्मणतात व लिहितात! याप्रमाणें वर्तमान आहे. कळावें. धारवाड तालुक्याचा मुलूख अद्यापि असुदा आहे. विना तिकडे फौज गेल्याखेरीज बंदोबस्त राहणार नाहीं. तुह्मीं श्रीमंतांस विनंती करावी. बंदोबस्त करावयाचा तो करितील. फौज थोडी बहुत पाठवितील तर दबाव बसणार. नाहींपेक्षां फौज व कांहीं तोफा पाठवाव्या. नाहीं तर त्यांना प्रांत खराब झाला आहे याचें उसनें तिकडे काढील! ( तो ) मुलुख भरला आहे. श्रीमंतांस विनंती करावी. पोक्त फौज व तोफा तिकडे पाठवीत तें करावें. राजश्री बाबूराव जगजिवन याजकडूनही आतांच माणसें आलीं. राजश्री नारो बाबाजीच्याच पत्राप्रमाणचें त्याणींही लिहिलें आहे. फौज सत्वर तिकडे ( श्रीमंत पाठवीत ती गोष्ट करावी. राजश्री बाबूराव जगजीवन यांचें पत्र आलें तेंही पाठविलें आहे. सावनूरकर नबाब ह्मणतात जे, ' निम्मे फौज,

१ निर्बंध. २ हैदराचा.

सावनुरांत रहावी. निम्मे फौज राजश्री नारो बाबाजीकडे जावी.' असें ह्मणतात ह्मणून लिहिलें असे. पत्रावरून सविस्तर कळेल. बहुत काय लिहिणें. त्या प्रांतीं फौज दहा हजार तरी असली पाहिजे. फौज नसली तरी प्रांत धास्तीमुळें रहात नाहीं. बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद.

नं० ९३९ श्रीगणराज. ( फाल्गुन शुद्ध एकादशी. २३ मार्च. )

चिरंजीव राजश्री तात्या[1] यांसी प्रती गोपाळराव गोविंद आशीर्वाद उपरी येथील कुशल तागायत छ २४ जिल्काद मुक्काम नजीक मचलदरा तालुके शिरें जाणून स्वकीय कुशल लिहीत जावें. विशेष. तुह्मीं पत्र पाठविलें तें प्रविष्ट झालें. कित्तूर बाबद होन ४७२७ व रोख रुपये बावनशें येणेंप्रमाणें ऐवज आला ह्मणून लिहिलें तें कळलें. पेशजी तुह्मीं शिवाजी जासूद मुधोळास होता त्याजसमागमें पत्र पाठविलें तेंही पावलें. लिहिला मजकूर कळला. श्रीमंत कोल्हाराकडे गेले. तिकडील ठाणीं घेत पट्टण डावें घेऊन हरपनहळ्ळीकडे येणार. फिरोन माघारे आल्यानंतर श्रीमंतांची व आमची गांठ पडेल. तोंपावेतों दाण्यापाण्याची सोय पाहून इकडे बहुतच सावधपणें आहों. चिंता न करावी. पहिले थोडेसे बेसावध होतों तेव्हां त्यांचे[2] हातास कांहीं लागलें नाहीं. आतां तर सडे आहों. रात्रीचें लष्कर देखील तयार असतें. तेव्हां फिकीर नाहीं. ठाणीं होतीं याजमुळें ठाणीं सोडून जातां नये असें होतें. आतां एक हगलवाडी मात्र आहे. वरकड ठाणीं जाळून सोडिलीं, एवढ्यानें मोकळे आहों. त्यास आह्मांस चार पांच गांवचें अंतर. त्यांत आह्मीं सडे सावध, असें असतां मनसब्याचे रीतीनें येणार नाहीं असें दिसतें. तत्राप आला तरी त्याची काळजी वडिलांचें पुण्य समर्थ आहे तों

---

१ धाकटाबंधु पांडुरंगराव गोविंद. २ छाप्याच्यावेळीं हैदराच्या.

वागवीत नाहीं! तुमचीं पत्रें या आठा पंधरा दिवसांत दोन आलीं परंतु लाखोटे नव्हते. डांक मिरजेंत मिळत नाहीं किंवा कसें हें कळत नाहीं! मुख्य आळस खरा! वर्तमान तो कांहींच लिहीत नाहीं. सविस्तर वर्तमान लिहिणें. बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद.

नं० ९४० श्रीगणराज. (फाल्गुन वद्य द्वादशी. २४ मार्च.)

चिरंजीव राजश्री मोरोबा आज्ञा यांसी आशीर्वाद उपरी. तुह्मीं पत्रें सांडणीस्वारासमागमें पाठविलीं तीं काल छ २४ जिल्कादीं दोनप्रहरीं पावोन सविस्तर मजकूर कळला. "राजश्री मल्हार जगजीवन यांज-समागमें फौज व तोफखाना देऊन कोल्हाराकडे पाठविले आहेत. कोल्हारचें ठाणें टाकून (शत्रू पळून) गेलेच आहेत. परंतु ठाणें पाडावयास चार दिवस लागतील. कोल्हारची खंडणी पन्नास हजार रुपये जमीदारानीं केली. चार दिवस याच मुक्कामीं (श्रीमंत) राहतील. गणेशगड याच मुक्कामीं येईल. तदोत्तर येथून कूच होऊन मागें लिहिलें आहे त्या सुमारें येणार" ह्मणोन लिहिलें तें कळलें. कोल्हाराकडील फारसा गुंता नाहीं. परंतु रुकनुद्दौला मडकशिऱ्यांस आले आहेत त्यांची वाट (श्रीमंत) पाहूं लागले तरी आठ चार दिवस तिकडे लागतील. नाहीं तरी तिकडे गुंतावयाचें कारण दिसत नाहीं. कोल्हार आजपर्यंत पाडून आलेच असतील. महमदअल्लीखान

---

१ पत्र गोपाळरावाचें. २ पानशे. ३ 'कांहीं एक शत्रूवर उलटा करणार आहों' वगैरे शब्दांनीं मोरोबानें पूर्वी एक दोन पत्रांत गोपाळरावास ज्याविषयीं इशारा दिलाच होता तो हैदरावर अकस्मात् लांब लांब मजली करून येऊन तुटून पडण्याचा बेत आतां तडीस न्यावा असें पेशव्यांच्या मनांत आल्यावरून बाणावराच्या आसपास हैदर होता तिकडे येण्याचा रोख यावेळीं त्यांचा होता. त्यास उद्देशून हें लिहिणें.

याजकडील राजकारणाचा प्रकार तरी विना छावणी त्याचें येणें होत नाहीं. छावणीचा निश्चय झाला ह्मणजे ते राजकारण पक्कें करितील. नाहीं तरी तुमचा इतबार त्यांस पुरवणार नाहीं. तेही नादीं लावून लावून लिहितील. छावणी खासा स्वारीची झाल्याखेरीज कोणतीही गोष्ट होत नाहीं असें मनसब्याचे रीतीनें दिसतें. असेंही असतां श्रीमंतांची मर्जी असेल ती खरी! राजश्री आनंदराव गोपाळ व राजश्री राघो बापूजी गुरमकोंड्याकडे गेले होते तिकडून आले तीच फौज चार हजार इकडे पाठवितात. बुधवारीं तेथून निघणार" ह्मणून लिहिलें तें कळलें. बुधवारीं निघाले असल्यास दोन तीन रोजांत येथें येऊन पावतील. राजश्री कृष्णराव बळवंत व राजश्री बाळोजी पलांडे (परत लष्करास) गेले याजकरितां मशारनिल्हे फौजेसह आले ह्मणोन लिहिलें तें कळलें. भैरवदुर्गच्या सुमारें ती फौज राहती तर फार उपयोगीं पडती. असो. हुजूर नेवविली, मर्जी श्रीमंतांची! धारवाडाकडून पत्रें राजश्री नारो बाबाजीचीं आलीं तीं काल सांडणीस्वारासमागमें पाठविलीं आहेत त्याची पैरवी काय करावयाची ती करावी. तिकडे फौज पोक्त गेल्याखेरीज तालुक्याचा बचाव होत नाहीं. (तिकडील लोक) फारच गडबडले आहेत. "नंदिगडास देवस्थान चांगलें आहे. तेथें चार ब्राह्मण अनुष्ठानास घातले आहेत" ह्मणून लिहिलें, उत्तम आहे. सारांश आरोग्य उत्तम प्रकारें होय ती गोष्ट करावी. "कोल्हारचें ठाणें टाकून (शत्रूचे लोक) पळाले. जमीदारानीं पन्नास हजार खंडणी केली. ठाणें मात्र पाडावयाचा गुंता आहे. राजश्री जानोजी धुळप यांस बाळापुरचा सुभा सांगितला. नंदिगडास हुजूरचा हवालदार ठेविला" ह्मणोन विस्तारें लिहिलें तें कळलें. +

---

१ छावणी केल्याखेरीज. २ चिकबाळापूर ह्मणजे धाकटें बाळापूर येथील.
+ हें पत्र इतकेंच अपूर्ण सांपडलें.

श० १६९१ **नंदिगड, कोल्हार व गणेशगड.** इ. स. १७७०

नं० ९४१ **श्रीसुबराज.** ( फाल्गुन वद्य द्वादशी. २४ मार्च. )

राजश्री गोपाळराव दादा गोसावी यांसी.

सकल गुणालंकरण अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्नेहांकित मुराराव हिंदुराव मलकत मदार सेनापती. दंडवत. विनंती उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लेखन करीत जावें. आपण जासूद जोडीसमागमें विस्तारें पत्र लिहिलें त्यावरून बहुत समाधान झालें. इकडील अर्थ पेशजी सर्व लिहिलाच आहे. राजश्री पंत प्रधान यानीं नंदिगड घेऊन तेथील बंदोबस्त केला. तेथून कूच करून सिगलगट्टे घेऊन पाडिलें व तेथून कोल्हार पाडून आजी छ २९ जिल्कादीं मुलबागलास मुकाम झाला. येथें पंचरशी तोफा चार आहेत ह्मणून बोलवा आहे. स्थल घेतल्यावर कळेल. येथून झालें वर्तमान मागाहून लिहीत आहों. राजश्री पंत प्रधान यांनीं फौजेसह राजश्री आनंदराव व नागोराम व राघो बापूजी यांची रवानगी आपणाकडे नेमून आमची फौज पाठवावयास सांगितलें त्यावरून चिरंजीव राजश्री मालोजी बाब घोरपडे यांस फौजेसह पाठविलें आहे. आमचा मानस आपणाकडे फौज आमची पाठवावी असेंच होतें त्याप्रमाणें योग घडला. हरएकविशीं आपली मर्जी राखून रहावयास सांगितलें आहे. घरची फौज समजून समीप उतरून घेऊन काम घेत जावें. कित्येक गृहकृत्यांचा अर्थ राजश्री बिसाजी बाळाजीस सांगितलें आहे. सांगतील. त्यावरून विदित होईल. याचें उत्तर सुतरस्वाराबराबर अगत्य पाठवावें. आपण सावध आहांतच. हरउपायें अमित्रास बाहेर काढावें. बाहेर आल्यास यश येतच आहे. आपण यशस्वी आहां. आमची फौज दूर न ठेवितां समीप असों द्यावी. काम पडल्यास करितील. रवाना छ २९ जिल्काद. बहुत काय लिहिणें हे विनंती.

नं० ९४२ श्रीगणराज. ( फाल्गुन वद्य त्रयोदशी. २९ मार्च. )

अपत्यें मोरोबानें साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत छ २९ जिल्काद मुक्काम कोल्हार वर्तमान यथास्थित असे. विशेष. सिगलगट्याहून वडिलांकडे पत्रें पाठविलीं आहेत. तेच दिवशीं कूच होऊन कैवारचा मुक्काम झाला. तेथून मुक्काम मजकुरास आलों. आज कूच होऊन मुलबागलास मुक्कामास गेलों तेथून माघारे फिरून होसुरास येऊन चेन्नापट्टण, खनखनहळ्ळी तालुक्यांतून वडिलांकडे सत्वरच येत आहों. कोल्हारचें ठाणें पाडून टाकिलें. कोल्हारचा किल्ला पाडिला. पुढें ठाणीं घेतात तीं पाडून जमीनदोस्त करणार. राजश्री आनंदराव गोपाळ व मालोजी घोरपडे व गायकवाडाची फौज येकूण पांच हजार फौज वडिलांकडे येथून रवाना झाली आहे. याणीं वडिलांजवळ रहावें. वडिलांकडून पत्र येत नाहीं. हैदरखान कोठें आहे, त्यास तुह्मांस अंतर किती आहे, तें लिहावें. खान चेनरायणपट्टणास आला आहे ह्मणून ऐकिलें. तेव्हां मैदानांत आला आहे, यास्तव ही फौज पाठविली आहे. तो मागडीकडे येईल तरी वाटेंत मैदान आहे. समय साधलिया हालचाल एकवेळ करून पहावी. फौज फार ह्मणून गैरसावधपणें न रहावें. असें आहे. राजश्री आनंदराव तेथें आले आहेत. सर्व वर्तमान विदित करितील. बहुत काय लिहिणें हे विज्ञापना. पै॥ छ ७ जिल्हेज.

नं ९४३ श्री. ( २९ मार्च. )

श्रीमंत राजश्री मेघश्यामराव बापू स्वामीचे सेवेशीं.

पोष्य शिवाजी बाबाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती. उपरी येथील कुशल तागायत फाल्गुन वद्य त्रयोदशी मंदवार मुक्काम नजीक

१ पत्र मोरो बल्लाळ याचें गोपाळरावास. २ त्या अर्थी. ३ याचें उपनांव हैसकर. वास्तव्य मंगळवेढें. यास अबदागीर, दिवट्या व जात तैनात मिळून सालिना सातशें रुपये वेतन होतें. याचें नांव मागें अनेक वेळां आलेलें आहे व ऐ

चेळूर तालुके हगलवाडी वर्तमान यथास्थित जाणून स्वकीय कुशल लेखन केलें पाहिजे. विशेष. आपण पत्रीं नमस्कार लिहिल्यावरून संतोष झाला. छाप्याचें वर्तमान पेशजी सविस्तर लिहिलें आहे तीं पत्रें पावोन सविस्तर मजकूर कळलाच असेल. श्रीमंत राजश्री माधवराव अण्णाची[1] जखम आजपर्यंत चांगली होती. (परंतु अलीकडे) दोन दिवस काहिली फार होते. ते शिऱ्यांस आहेत. श्रीमंत राजश्री भाऊसाहेब[2] शिऱ्यांस समाचारासाठीं गेले आहेत. तेथून सविस्तर भावना लिहितील त्यावरून कळेल. श्रीमंत[3] चिकबाळापूर व नंदिगड घेऊन कोल्हाराकडे गेले आहेत. कोल्हारचें ठाणें घेतलें. पाडून टाकिलें. आतां बेंगळुराकडे येणार. बेंगळुरास मोर्चे लावावे असा निश्चय नाहीं. नबाब निजामअल्लीखान याजकडून तहवारजंग सात आठ हजार फौज व दहा तोफा येणेंप्रमाणें श्रीमंतांकडे यावयास मडकशिऱ्यांपाशीं आले आहेत. दोन चार रोजांत श्रीमंतांस सामील होतील. नबाब निजामअल्लीखान तुंगभद्रा तीरास संस्थानच्या पेशकशीचा[4] ऐवज वसूल करितात. श्रीमंतांशीं सलुखानें आहेत. हैदरखान याजकडील वकील रेजाअल्लीखान व आपाजीराम यांस श्रीमंतांनीं रागें भरून निरोप दिला. ते निघोन हैदरखानाकडे गेले. हैदरखानाचा मुलूख तमाम उजाड झाला. याजकरितां तह करावा असा भाव चित्तांत आणून मागतीं (त्यानें) वकिलास पाठविलें तर न कळे! तह नाहीं त्या पक्षीं छावणी होणार आहे. हैदरखान मागती छापा घालावयास येणार आहे. अमावास्येचा काळोख आहे परंतु आतां सावधपणें आहों.

---

( मागील पृष्ठावरून पुढें चालू. )

ले. संग्रहाच्या पहिल्या अंकांत नं. ५ च्या पत्रांत याविषयीं सविस्तर माहितीची टीपही दिली आहे. त्यानें हें पत्र मेघश्यामराव कृष्ण पटवर्धन मंगळवेढेकर यास लिहिलें आहे. हैदराकडे पूर्वी सन १७६३ त पाडाव सांपडलेला तो मेघश्यामराव हाच.

१ हा मेघश्यामरावाचा धाकटा बंधु. हैदरानें छापा घातला तेव्हां यास जबर जखम झाली होती. २ परशुराम भाऊ. ३ पेशवे. ४ पेशकशीचा. नजरेचा.

होतां होईल तें खरें! ही फौज थोडकी याजकरितां श्रीमंतांनीं राजश्री आनंदराव गोपाळ यांस तीन हजार फौजेनिशीं इकडे रवाना केले आहेत. एक दोन दिवसांत येतील. बहुत काय लिहिणें लोभ असों दीजे हे विनंती.

नं ९४४ श्रीगणराज. (फाल्गुन वद्य अमावास्या. २७ मार्च.)

अपत्यें मोरोबानें साष्टांग नमस्कार विज्ञापना. तागायत छ २८ जिल्काद मुक्काम मुलबागल प्रांत कोल्हार वडिलांचे आशीर्वादें करून वर्तमान यथास्थित असे. विशेष. वडिलीं छ० २६ जिल्काद चलूरच मुक्कामचीं पत्रें पाठविलीं तीं पावोन लिहिला मजकूर कळला. छ० २४ जिल्कादचीं अहमद सांडणस्वाराबराबर पत्रें पाठविलीं तीं पावलीं. सर्व भाव कळला. सिलगट्याहून वडिलांकडे पत्रें पाठविलीं तेच दिवशीं कूच होऊन कैवाराजवळ मुक्काम झाला. तेथून कोल्हारास आलों. कोल्हारचें ठाणें ओस होतें तें पाडून सुरुंग लावून उडविलें. तेथून मुलबागलास आलों. तेच दिवशीं तोफा लावून किल्ल्याचें भिंताड पाडिलें. तोफा चांगल्या लागू झाल्या. संध्याकाळचा दोन तीन घटका दिवस होता तों हल्ला करून किल्ला घेतला. तों रात्र पडली. किल्ल्यांतच सातशें लोक होते ते काळेगडी (?) प्यादे होते. पश्चिमेकडून खेड्यांनीं होवून पळोन गेले. कोल्हारचा किल्लेदार येथेंच पळोन आला होता तो व येथील किल्लेदार व गाडदी पठाण मिळून पंचवीस तीस लोक होते तेही हल्ल्याच्या तोंडीं होते तितके मात्र सांपडले. दुसरे दिवशीं हत्तीच्या पायास बांधून मारून टाकिले. किल्लेदाराचीं मुलेंमाणसें होतीं तीं सोडून दिलीं. किल्ल्यांत चांगल्या तोफा सांपडल्या. एक चार पांच शेरी आहे. दोन तीन लहान आहेत. आयनी गोळे सांपडले. दारू बरीच होती. किल्ला पाडून टाकिला. आज वर्ष प्रतिपदा ह्मणून मुक्काम झाला. उदईक येथून कूच होऊन होसूर बेंगरुळच्या सुमारें जाणार. चेन्नापट्टण, खनखनहळ्ळी वगैरे पट्टीची पट्टी

मोकळी करणार. तहवारजंग फौजेसुद्धां समीप आले आहेत. एक दोन रोजांत लष्करास येऊन मिळतील. निजामअलीखान माघारे निघोन गेले. राजश्री आनंदराव गोपाळ व मालोजी घोरपडे व गायकवाडाकडील फौज मिळोन चार पांच हजार फौज कोल्हाराकडून वडिलांकडे रवाना केली आहे. सिलगस्याहून आज्ञा झाली होती परंतु हजेरीकरितां एक मजल पुढें आणिली होती. कोल्हारावर फौजेची हजेरी झाली मशारनिल्हे वडिलांकडे येऊन पावले असतील. हैदरखान याची फौज ( घेऊन ) लालामिय्या सावनूर प्रांतास गेला आहे. हल्याळास वेढा घातला आहे. पुढें हालचाल करावी ( असा त्याचा बेत आहे ) ह्मणून राजश्री नारो बाबाजी यांचें पत्र श्रीमंतांस होतें तें पाठविलें तें व बाबूराव जगजीवन याचें पत्र पाठविलें तें पावलें. श्रीमंतांस दाखविलीं. राजश्री नरसिंगराव घायगुडे व राजश्री शहाजी भोसले यांस तिकडे पाठवावें ह्मणून श्रीमंतांनीं आपणास लिहिलें आहे त्याप्रमाणें त्यांची रवानगी तिकडे करावी. येथून कूच करून मजल दरमजल तिकडेच येतात. दोन मार्ग आहेत. एक देवरायदुर्ग घेऊन तिकडे यावें. दुसरें होसुरावरून खनखनहळ्ळी, चेन्नापट्टण या मार्गें तिकडे यावें. असे दोन मार्ग आहेत. कोणते मार्गें येतील पहावें. अतःपर इकडे गुंतत नाहींत. इंग्रजाकडील मजकूर अद्यापि मळमळीत आहे. तूर्त इंग्रज ( श्रीमंतांच्या कुमकेस येता दिसत नाहीं. बहुत काय लिहिणें हे विनंती. अपत्यें धोंडोबानें व विनायकानें शिरसाष्टांग नमस्कार विज्ञापना. वडिलांचे कृपेकरून सुखरूप असों. हे विज्ञापना.

पै॥ छ ४ जिल्हेज.

नं० ९४९ श्रीगणराज. ( माघ वद्य चतुर्दशी.
२४ फेब्रुवारी. )

चिरंजीव राजश्री मोरोपंत आबा यांसीं प्रती गोपाळराव गोविंद. आशीर्वाद उपरी. येथील कुशल तागायत छ २७ सवाल जाणोन

स्वकीय कुशल लिहीत जावें. विशेष. हैदरखान तरीकिन्याहून कूच करून संकरापट्टणास गेला. तरीकिन्याहून सहा कोस दक्षिणेस गेला. तो पट्टणचाच रोख आहे. तेथेंच राहतो किंवा पुढें जातो हें वर्तमान कळेल त्याप्रमाणें लिहून पाठवूं. नबाब निजामअल्लीखान मैंदरगी परगण्यांतून पुढें अबजलपुरावरून सुरापुर तालुक्यांत आले. कृष्णेवर आले असतील. मैंदरगी परगण्याचा शिवार काहीं चारिला ह्मणोन चिरंजीव राजश्री नीलकंठराव यांजकडे लिहिलें आलें आहे. नबाब निजामअल्लीखान श्रीमंताकडे येणार किंवा काय? त्यांजकडून कागद पत्र येतच असतील तरी सविस्तर लिहावें. सुरापूर उजवें घेऊन येतात. मशारनिल्हे श्रीमंताकडे येतात किंवा कोणीकडे जातात हें तुह्मांस कळलें असेल. ते खासा न येत, फौज येईल तरी बरें आहे. ते आले तरी भिडेनें जसें ह्मणतील तसें ऐकावें लागेल. न ऐकावें तर खेंट्टे[1] होतील. काय श्रीमंतांचे मर्जीस येईल तें प्रमाण! हे आशीर्वाद.

नं० ९४६ श्रीगणपतिर्जयति. ( २८ मार्च. )

चिरंजीव राजश्री मोरोबा आबा यांसीं प्रती गोविंद हरी आशीर्वाद उपरी येथील कुशल तागायत चैत्र शुद्ध प्रतिपदा बुधवार जाणून स्वकीय कुशल लेखन करीत जाणें. विशेष. तुह्मीं छ ९ जिल्कादचें बाळापुरच्या मुक्कामचें पत्र पाठविलें तें छ २१ जिल्कादीं पावलें. लिहिलें वर्तमान सविस्तर कळलें. श्रीमंतांनीं ठाणीं घेतलेलीं तपशीलवार मजकूर लिहिला तो कळला. याच प्रकारें सदैव पत्र पाठवून सविस्तर वृत्त लेखन करून संतोषवीत जाणें. तीर्थस्वरूप मातुश्री काशीबाई[2] यांसीं प्रस्तुत आरोग्य आहे. कळलें पाहिजे. राजश्री मुरारराव घोरपडे

---

१ खेंट्टे होतील=रुसतील. २ मोरो बल्लाळ ऊर्फ मोरोबा आबा याची आई.

श्रीमंतांस येऊन भेटले ह्मणून लिहिलें तें कळलें. अद्यापि तहाची चर्चा [1]तो करीत नाहीं तेव्हां पुढें विचार कसा होईल! छावणीस रहावें तरी धान्य मिळालें पाहिजे, खर्च भारी बसेल, आणि इकडे सर्व राज्यभार चालला पाहिजे, याची गति काय? वारुळांत साप आणि वर मारावें तशी गति त्याची! झाडींत छपोन राहिला आहे. त्यास अद्याप उपसर्ग नाहीं. सहस्र प्रकारें तो तह करील. कदाचित् न करी तरी छावणी कांहीं करितां न ये. पेस्तर सालीं भारी फौज घेऊन त्याचें पारिपत्य करावें. झाडींत शिरेल तर दहा वीस हजार पायदळ, त्यांत तोफखाना, समागमें कांहीं थोडी बहुत फौज, घेऊन झाडी कापीत थेट बिदनुरास जावें. अगर जेथें तो असेल तेथें दुसरीकडून भारी फौजेनें शह द्यावा. मारून गर्दीस मिळवावा. सोंधें बिदनूर दोन्ही राज्यें सोडवावीं. असा मनसबा केलेखेरीज आयांस येत नाहीं. पुढें दसऱ्यानंतर फौजबंदी करून कार्तिकमासीं चाल करावी. आमच्या मतें हा मनसबा दिसतो. श्रीमंतांचें पुण्य भारी. चैत्र मासांतच झपाट्यांत सांपडोन लयास गेला तरी उत्तमच झालें. पर्जन्यकाळीं त्या प्रांतीं ( आमच्या फौजांनीं घेतलेलीं ) ठाणीं दम धरून राहतां हिंमत नाहींसें दिसतें. काय मनसबा करितील पहावें. बहुत काय लिहिणें श्रीमंतांनीं छावणीस राहूं नये. देशास यावें. फौज ठेविल्यानें टिकाव होणार नाहीं. तुह्मीं वरचेवर वर्तमान लिहीत जावें. बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद. पुण्याहून तुमच्या नांवचा लखोटा आला तो पाठविला आहे हे आशीर्वाद.

नं० ९४७ **श्रीगणपतिर्जयति.** ( २९ मार्च. )

आशीर्वाद उपरी येथील कुशल तागायत चैत्र वद्य द्वितीया गुरुवार छ १ जिल्हेज जाणून स्वकीय कुशल लेखन करीत जावें. **विशेष.**

---

१ शत्रु. २ पत्र गोविंद हरीचें गोपाळरावास.

तुह्मीं फाल्गुन शुद्ध चतुर्दशी छ० ११ जिल्काद मंदवार हगलवाडीचे मुक्कामचीं पत्रें पाठविलीं तीं छ० २१ जिल्कादीं भोमवारीं प्रातःकाळचे प्रहर दिवसास पावलीं. लिहिलें वर्तमान सविस्तर कळलें. पेशजी छाप्याचे मजकुराचीं पत्रें फाल्गुन शुद्ध तृतीयेचीं बुधेहाळचे मुक्कामचीं पाठविलीं होतीं त्यांचीं उत्तरें पूर्वींच लिहून पाठविलीं आहेत. पावलीं असतील. त्यावरून कळेल. बुधेहाळ वगैरे ठाण्यांचा मजकूर कळला. बुणगें सर्व शिऱ्यांत ठेऊन सडे हगलवाडीवर आलों ह्मणून लिहिलें तें कळलें. चिरंजीव राजश्री माधवरावही बुणग्यांत ठेविले, उत्तम केलें. टिपूमिया व मीररेजा देवरायदुर्गावरी आले आहेत. त्यांजवरी श्रीमंतांची फौज रवाना केलेला प्रकार लिहिला तो कळला. 'श्रीमंत चिकबाळापूर घेऊन नंदिगडास गेले. नंदिगडास मोर्चे लाविले आहेत' ह्मणून लिहिलें तें कळलें. बेंगळुराहून फौज देवरायदुर्गास आलेली व 'हैदरखान[1] एकत्र होऊन एकवेळ गोटावर यावें अशी मसलत आहे ह्मणून श्रीमंतांनीं लिहिलें होतें' ह्मणून लिहिलें तें कळलें. याप्रमाणें करावयासीं तो चुकणार नाहीं. सावध असावें. सर्व प्रकारें रक्षणावर श्री समर्थ आहे. राजश्री मुरारराव घोरपडे श्रीमंतांस भेटले ह्मणून लिहिलें तें कळलें. श्रीमंत ठाणीं घेत फिरतात, हा इकडे झाडीच्या आसऱ्यानें फिरतो! तमाम ठाणीं ओस झालीं. श्रीमंतांनीं बातमी राखोन सडे फौजेनें लांब लांब मजली करून यास गांठावें ह्मणजे सारेच मतलब सिद्धीस जातील. पुढें दिवस डोईवर आले. एक चैत्रमास मुलुखगिरीचा उरला. पुढें छावणी केल्यास श्रीमंतांस खर्च भारी पडेल. चौमासां कार्यही साधणें होणार नाहीं. धान्य मिळावयाचें संकट. असे कित्येक गनसबे आहेत. बाजत बरसात जें करणें तें करावें. तूर्त कार्यकारण तह करावा. देशास यावें. पेस्तर सालीं मातबर फौजेनें जाऊन सोंधें बिदनूर आधीं

[1] हैदर.

घ्यावें. चोहोंकडून उपसर्ग येईल तेव्हां तो आयांस येईल. आधीं सोंधें घ्यावें. तेथील बंदोबस्त करूनच माहीतगार पाईचे लोक मेळवून एक फौजेनें झाडींतून बिदनुरास यावें. एक फौजेनें दुसरे वाटेनें जावें. हर कसा शिकस्त करावा तेव्हां पायनामा (?) होईल, प्रस्तुतकाळीं श्रीमंतांचा प्रताप त्याजवरी चढल्याविना एकाएकीं तहास येणार नाहीं! महा कृत्रिमी! त्याचा विश्वास नाहीं. वकील श्रीमंतांपाशीं आहेच. आपण झाडींत राहून हुन्नर आपले दाखवितो! त्याचा एकवेळ रेंच मोडला पाहिजे. फजित पावल्याविना ठिकाणीं रहात नाहीं येविशींचा विचार श्रीमंतांनीं कर्तव्य तो करावा. छावणीचा प्रकार न करावा हें बहुत मतें आहे. यांत काय मनसबा करितील तो खरा! आपण देशास येऊं, फौज छावणीस ठेऊं. (असें) ह्मणतील (तर) भारी फौजेशिवाय छावणीच होणार नाहीं. खर्च भारी! तथापि धान्य तृण मिळालें पाहिजे. आतांपासूनच लष्करची तयारी (परत येण्याची दिसते.) सबर घोडीं व माणसें वरचेवर देशास रहदारी लागली. नाहीं ह्मणावयास तुमच्या व रास्ते यांच्या लष्करचें (कोणी) येत नाहीं. हुजूरातचे लष्कराची रहदारी लागली आहे. रोज शेंपन्नास चाळीस (माणूस) देशास जात नाहीं असा दिवस नाहीं. मिरजेवरील एक वाट. दुसरे मार्गें किती जात असतील न कळे! तुह्मांकडील काळजी अहिर्निशी लागली असे. काळजी करून काय होणार! श्रीभगवान् साह्यकारी सर्व प्रकारें कल्याण करील. शत्रूस तुह्मांकडून कांहीं अपाय होता तरी बरें. परंतु तो दगाबाज, याजमुळें फारच शहाणपणें राहतो. विपरीत काळाची घटका येईल तेव्हां श्रीकृपेनें त्याचें पारिपत्य होईल. श्रीमंतांच्या तेजप्रतापापुढें त्या मशकाची कथा काय! सावधपणें राहत जाणें. बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद.

नं० ९४८ श्रीगणपति. ( २९ मार्च. )

आशीर्वाद उपरी. तुह्मीं लिहिलें कीं 'भोसले व घायगुडे (व) आह्मीं एकत्रच आहों. प्रस्तुत श्रीमंतांनीं राजश्री आनंदराव गोपाळ वगैरे चार हजार फौज आह्मांकडे रवाना केली आहे.' ह्मणून लिहिलें, बहुत उत्तम गोष्ट. सोबत आली ह्मणजे दाण्या पाण्याचे सोईनें चार कोस अधिक उणें जावयास कामास येईल. श्रीमंतांस यावयास मास पक्ष लागला तरी चिंता नाहीं. शत्रूसही फौज नवी आलियाचें वर्तमान गेल्यावरी स्वस्थ राहील. गडबड करणार नाहीं. तहाचाही मजकूर (घाटत) आहे ह्मणून लिहिलें, त्यास श्रीमंतांनीं आप्पाजीराम व रेजाअल्लीखान यांस लावून दिले ते कांहीं जोतसमयीं बोलोन गेले असतील तर न कळे. श्रीमंतांचें पुण्य विचित्र आहे. हरकसा तह होऊन देशास यावें हें सर्वोत्कृष्ट आहे. तुह्मीं वरचेवर पत्र पाठवीतच आहां. वर्तमान कळतच जाईल. हल्याळास लालामियानें मोर्चे लाविले होते. पेठ लुटली. गडीस मोर्चे होते. त्यास कित्तूरकर व नारो बाबाजी मिळून वेढा उठविला ह्मणोन ऐकितों. सत्य मिथ्या न कळे. फार सावध रहात जाणें. बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद.

नं० ९४९ श्रीगणराज. ( २९ मार्च. )

चिरंजीव राजश्री मोरोबा आबा यांसीं आशीर्वाद उपरी. एक दोन पत्रीं छावणीचा प्रकार लिहिला, ऐशास श्रीमंतांचीच छावणी होणार किंवा आह्मांसच ठेऊं ह्मणतात हें कळत नाहीं. उत्तम प्रकार--श्रीमंतांनीं छावणीस रहावें ह्मणजे सहज सारेच गुंतोन राहतात. श्रीमंतांस टाकून कोणी जात नाहींत. एका छावणीनें उत्तम प्रकारें बंदोस्तच होईल असेंच श्रीमंत करितील. हा उत्तम प्रकार. मध्यम प्रकार-फौज ठेऊन खाशांनीं जावें. ऐशियास आह्मांसच रहा ह्मणतील तर

१ पत्र गोविंद हरीचें गोपाळरावास. २ पत्र गोपाळरावाचें मोरो बल्लाळ यास.

आमच्या कामकाजाचे लढे आहेत तितके ( त्यानीं ) विल्हे लावून द्यावे. पंचवीस हजार फौज चांगली व पंचवीस तोफा ठेवाव्या. आमचे लढे कोणकोणते ह्मणाल तरी—आह्मांस सरंजाम दिला आहे तो फार होनांचा. वरकडांस नक्त रुपयांचा सरंजाम दिला आहे. आमच्या सरंजामाचा पावणा रुपया होतो. लोकांचें घर बुडतें. याजकरितां वरकडांप्रमाणें नक्ताच्या सरंजामास होन तोट्याचा सरंजाम दुसरा द्यावा. नाहीं तरी नक्ताचा सरंजाम द्यावा. आनंदवल्लीकडे गेलों त्या सालीं व धोडपेच्या सालीं जास्त खर्च लागला त्याचें बोलोन घ्यावें. अदवानीकडील सरंजाम दिला त्यापासून[2] ( त्यांतील ) ठाणीं घ्यावयाचा सुभेता[3] पडलाच नाहीं. आह्मीं तरी करारापेक्षां राऊत जास्तीच ठेवितों[4] सरंजामापैकीं गुदस्तां ऐवज आला तो तुह्मांस ठाऊकच आहे. सालमजकुरीं बारा हजार माल आले आहेत. याजकरितां तो सरंजाम परिछिन्न कामाचा नाहीं. तो सरकारांत ठेवावा. आणि चांगला सरंजाम आह्मांस द्यावा. सालमजकुरीं पायमल्ली व नापीक. भेदरगीचा नबाब निजामअल्लीखान याणीं शिवार चारिला. लक्ष्मेश्वरच्या शिवारची खराबी झाली. व हरिहर दरोबस्त गेलें. मिरज प्रांतचें नापीक झालें. मंगळवेढें व करकंबची पायमल्ली झाली. बाळापूर हैदरखानाच्या तोंडांत आहे. सालमजकुरीं त्याचा उपद्रव लागला नाहीं, परंतु ( तो तालुका राखावयास ) शिबंदी भारी ( पडली. ) श्रीमंतच त्या प्रांतीं गेले तेव्हां बाकी काय राहणार हें कळतच आहे! याजकरितां तो परगणा सरकारांत ठेवावा आणि आह्मांस दुसरा परगणा खर्चास द्यावा. पागेचा खर्च आमच्या तीनंशांच्या शेऱ्यांत आहे. तो जाबसाल ( ही उगवून द्यावा. ) याप्रमाणें जाबसाल आहेत. ऐशियास आह्मांस ( इकडे छावणीस ) रहा ह्मणतात असें असल्यास हे जाबसाल उगवल्याखेरीज आमचें राहणें

---

१ बहुतेक. २ तेव्हांपासून. ३ निर्वेधपणा. ४ दर स्वारास सालिना तीनशें रुपये या हिशोबानें आठ हजार स्वारांचे चोवीस लक्ष रुपये होतात व तितक्या

होणार नाहीं, याजकरितां आतांपासून (श्रीमंतांशीं) बोलून ठेवणें. आयते वेळेस श्रीमंत रागें भरतील व तुह्मीं रागें भराल तरी कोणाचें ऐकणार नाहीं. आमची चाकरी करावयाची उमेद किती राहिली आहे ती तुह्मांस ठाऊकच आहे. ज्यांणीं मेहनत करून आह्मांस असुदगी करावी ते घरींच राहूं लागले! सारेच तुह्मीं आह्मांस शब्द ठेवितां याजकरितां गाडा हांकितों. परंतु बंदोबस्त ठीक नाहीं त्यापक्षीं

---

(मागील पृष्ठावरून पुढें चालू.)

उत्पन्नाचा मुलूख सरकारांतून पटवर्धनांस मिळाला होता. त्याप्रमाणें आठहजार शिलेदार बाळगून ते चाकरी करीत असतच. हे पथकाचे स्वार. पथकांतील स्वारानीं पदरचा घोडा, हत्यार, दारूगोळी वगैरे सर्व तीनशें रुपयांत बाळगावें. परंतु याशिवाय प्रत्येक सरदार घरपागा ह्मणून बाळगीत असत व त्या प्रमाणें पटवर्धनांच्याही तीन घराण्यांच्या तीन होत्या. पागेंतील घोडे ज्या त्या सरदाराचे मालकीचे असत. त्यांवर बसण्याकरितां स्वार ठेवावयाचे त्यांस बारगीर ह्मणत. ते बारगीर हीं दरमहा सात, आठ, दहा, रुपये वेतन ठरवून सरदारच ठेवीत. बारगिरांस हत्यारें व दारूगोळा लागेल तीही सरदार पदरचीं देई. विश्वासाची व आणीबाणीची वेळ आली ह्मणजे सरदाराची पथकापेक्षां पागेवर भिस्त अधिक असे. याप्रमाणें सरकार कामावर पागेचा उपयोग होत असून तिजबद्दल सरकारांतून सरदारांस कांहीं मिळत नसे. सरकारचें ह्मणणें पटवर्धनांस असें असे कीं, शिलेदारांस तीनशें रुपये द्यावयाचे ते कांहीं प्रसंगीं तुह्मीं अडीचशें किंवा पावणे तीनशें रुपये देऊन शिलेदार ठेवितां तो फायदा तुह्मीं सरकारास देत नाहीं. तुमच्या जहागिरी मोठ्या आहेत. पागेचा खर्च तुह्मीं त्यांतलेत्यांत पाहून घ्यावा! १ हा टोमणा धाकटा बंधु वामनराव घरीं बसून होता त्यास मारिलेला आहे. वामनरावच्या तर्फेनें इतकें सांगतां येण्याजोगें आहे कीं, त्यास दम्याचा विकार असल्यामुळें स्वारीचे हाल त्याच्यानें सहन होत नसत. तो भित्रा किंवा आळशी होता असें नाहीं. गोपाळराव मरण पावल्यावर सरदारीचें काम याजवर येऊन पडलें तेव्हां प्रकृतीकडे न पाहतां यावें तें अनेक कष्ट सोसून पराक्रमानें बजाविलें व त्यामुळें यानें आपल्या आयुष्याची हानि करून घेतली यांत संशय नाहीं.
२ मोकळेपणा, विसावा.

आमच्या वेस्तु ( सरदारी ) होत नाहीं. मग शब्द ठेवाल याजकरितां सविस्तर तुम्हांस लिहिलें आहे. जरकरून श्रीमंत खासाच रहात असें असल्यास मातोर वरास जात तों आमची रदबदली नाहीं. त्यासमागमें रहावें लागतें. इलाजच नाहीं. आम्हांस ठेवितात असें असल्यास परिछिन्न लिहिल्याप्रमाणें फडशा करून देतील तरच राहूं. श्रीमंतांस विनंती करून ठेवणें. श्रीमंतांस पत्र लिहिलें आहे. तुमच्या विचारास आलें तरी दाखवावें. नाहीं तरी मजकूरच कानावर घालावा. खासा स्वारीची छावणी होत असल्यास श्रीमंतांचें पत्र आपणाजवळच ठेवावें. दाखवावयाचें प्रयोजनच नाहीं. आम्हांसच ठेवणार असें पुरतें बोलण्यांत आलें असल्यास मग पत्र दाखविल्यास चिंता नाहीं. पत्र मोघमच आहे. तपशील सांगणें तो तुम्हींच सांगावा. मुख्य गोष्ट—आमची उमेद चाकरी करावयाची राहिली नाहीं. तथापि करणें तर चौघांप्रमाणें तरी आमचें करून घ्यावें! नाहीं तरी मग करून तरी सार्थक काय? ठेऊं लागतील तेव्हां सांगावें ( हें वाईट ) यास्तव आधीं लिहिलें आहे. आमचा बंदोबस्त करून दिल्याखेरीज राहणार नाहीं यास्तव तुम्हांस सूचना लिहीत आहों. आम्ही खबरदारीनेंच आहों. आम्हांविशीं फिकीर न करणें. हैदरखान याची फौज जागा जागा वांटली गेली आहे. त्याजवळ फौज थोडीच आहे. तोही आम्हांवर येत नाहीं. मैदान आहे. यास्तव आमची काळजी न करणें. थोरले लष्करचीं घोडीं ( चोरीस ) फार जातात म्हणून ऐकिलें, ऐशास बंदोबस्त करावयाचा तो करीतच असाल. राजश्री मुकुंदराव श्रीपतीचे कागद आले जे, तुम्हीं बुधेहाळाजवळ येऊन राहणें. त्यास बुधेहाळही जवळच आहे. तूर्त येथेंच राहणार. चारा चार दिवस पुरेसा आहे. पुढें गेलों तरी पाण्याचा तोटा आहे. पुढें जाऊन मागें येतां नये. तूर्त गडबडही नाहीं. कंदिकिरें ( व ) चिकनाईकनहल्लीस राजश्री नर-

---

१ हातून. २ श्रीमंतांस आम्हीं लिहिलें.

सिंगराव धायगुडे व राजश्री शहाजी भोसले वगैरे आहेत. आह्मींच येथें आहों याजमुळें रान दबलें आहे. बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद.

नं० ९५० श्रीगणराज. ( २९ मार्च. )

सेवेशीं[1] गोपाळराव गोविंद कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. सालमजकुरीं छावणीस रहावें लागतें ह्मणून चिरंजिव मोरोबानीं एक दोन वेळ लिहिलें होतें. परंतु खासा स्वारीची छावणी होते अथवा आह्मांस रहावें लागतें याचा तपशील लिहिला नाहीं. ऐशास खासा स्वारीची छावणी व्हावी हा उत्तम प्रकार. स्वामीची छावणी एक झाली ह्मणजे उत्तम प्रकारें बंदोबस्तच होईल. स्वामीची छावणी झाली ह्मणजे (सरदार) आले आहेत हे सर्वही गुंतोन सहजच राहतात. मागें एक वेळीं खासा स्वारीची छावणी झाली ते समयीं हैदरखानाचा फार उत्कर्ष होता. आतां त्या छावणीनेंच ( त्याचा ) रेंच मोडला. याजकरितां अलीकडे चार वर्षे नरम होता. आतांही एक छावणीनें चांगला पक्काच बंदोबस्त होईल. बहुता प्रकारें छावणी खासा स्वारीची व्हावी. मध्यम प्रकार—आह्मांस छावणीस ठेवावें हा—ऐशियास आह्मांस ठेवावेंसें झालें तरी पंचवीस हजार फौज चांगली व तोफा पंचवीस याप्रमाणें सामान ठेवावें. व आमचे जाबसाल आहेत त्यांचा तपशील चिरंजीवांचे पत्रीं लिहिला आहे ते विनंती करितील. फडशा झाला ह्मणजे आह्मांस रहावें लागेल. जाबसालाचे प्रकार समजले असावे याजकरितां विनंती लिहिली आहे सेवेशीं विदित होय हे विज्ञापना.

---

१ पत्र पेशव्यांस गोपाळरावानें लिहिलेलें. याविषयीं मागच्या पत्रांत उल्लेख आहे.

नं० ९९१ श्रीगणपति. ( २९ मार्च. )

आशीर्वाद उपरी. यंदाचा मनसबा कोण्या थरास जातो न कळे! हा कृतघ्न झाडी धरून बसला! श्रीमंतांनीं पट्टण प्रांतीं जाऊन ठाणीं घेतलीं तीं पुढें पर्जन्यकालीं रक्षिलीं पाहिजेत. राहणाऱ्यांच्या मनांत धास्त. बेंगळुरास वेढा घालावा तेव्हां तीन कोस दूर लष्कर उतरावें. तेथून मोर्चेबंदी करावी. किल्ल्यांत पांच सात हजार माणूस. तेव्हां मोर्च्यांनीं हमेषा पंधरा हजार माणूस नेहमीं पाहिजे. पंचवीस तीस हजार फौज. त्यांत कांहीं छबिन्यास पाहिजे. कांहीं कहीबराबर पाहिजे. सहजच दहा हजार फौज राहिली. बाकी वीस हजार. पैकीं कहीं कबाडास गोटांत रखवालीस निम्मे गेले. निम्मे दहा हजार माणूस मोर्चास नेहमीं बसले कीं काय? लांब जाणें येणें. त्याहीमध्यें मोर्चास बसलेउपर रोजमरा लष्करास दिला पाहिजे. हस्तगत व्हावया किती दिवस लागतील न कळे! या गोष्टीचा पोक्त मनसबा केला पाहिजे. आधीं बसों नये. बसल्याउपरी उठतां नये! छावणी करावी लागेल तेव्हां पर्जन्यकाळीं दाणादुणा मिळाला पाहिजे. मातबर लष्कर. याची पैरवी काय? तिकडे छावणीस राहिले तर इकडे देशीं कोण आहे? सार्वभौम हे. जाऊन मसलतीस गुंतलेनें राज्यभार चालिला पाहिजे. कदाचित् छावणीस न रहावें, देशास यावें, असा मनसबा केला तर तहाखेरीज येतां नये. तह तो परिछिन्न एकाएकी करीत नाहीं! शिरें, मदगिरी ( वगैरे ) मातबर ठाणीं कायम करावीं. वरकड ठाणीं पाडून टाकावीं. कार्याकारण शिऱ्यांस फौज हजार दोन हजार ठेवावी. मुरारराव घोरपडे यांची ( व त्या फौजेची ) गांठी घालून द्यावी. श्रीमंतांनीं देशास यावें. हा एक मनसबा दिसतो. देशीं येऊन

---

१ पत्र गोविंद हरीचें मिरजेहून गोपाळरावास. २ हैदर. ३ ठाण्यांत राहणाऱ्या मराठी शिबंदीच्या पोटांत शत्रूविषयीं धास्ती. ४ घालावयाचा बेत केला तर. ५ त्या अर्थी. ६ बाजूस राहिली. वेढ्याच्या उपयोगीं नाहीं. ७ वेढा घालूं नये.

मातबर फौज घेऊन पुढें आश्विन मासीं ( कर्नाटकांत ) निघोन जावें. दोन तीन टोळ्या कराव्या. वीस हजार फौज व दहा हजार पायलोक ( चाकरीस ) ठेवून सोंदें बिदनूर प्रांत सोडवावा. ( शत्रू ) झाडी धरून राहिला असेल तेथें त्यास उपद्रव लागला ह्मणजे ( बाहेर ) निघेल तोंच त्याचे पाठीवरच चालावें. हरिहराकडून एक फौजेनें यावें. एक मातबर फौजेनें जाऊन बेंगळुरास बसावें. तरतुदीनिशीं जावें. पांच सात महिन्यांत त्यास नेस्त नाबूद करावें. हा मनसबा दिसतो. श्रीमंत थोर प्राक्तनाचे! तपोबळ विचित्र. त्या पुण्यप्रतापें केला मनसबा सिद्धीस जाईल. प्रजा लोक देवब्राह्मण सर्वही अभीष्ट चिंतितात. श्री कल्याण करील. कदाचित् छावणीचा प्रकार केला तरी तो झाडींतून बंकापूर तालुका वगैरे श्रीमंतांच्या प्रांतांस उपद्रव करील. असे कित्येक मनसबे—आह्मीं रिकामे घरीं बसलों—आमच्या ध्यानांत येतात. श्रीमंतांनीं लक्ष प्रकारें देशास यावें. पुढें त्याचें पारपत्य करावें. शिमगा गेला. एक चैत्र मास उरला, त्यांत काय करतील पहावें! छावणीचा मनसबा पोक्त्या सामानाखेरीज करूं नये. बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद.

नं० ९९२ श्री. ( चैत्र शुद्ध षष्ठी. )
१ एप्रिल. )

विज्ञापना येथील कुशल तागायत छ ४ जिल्हेज यथास्थित असों. विशेष. श्रीमंतांकडील वर्तमान तरी " खासा श्रीमंत फौजसुद्धां बेंगळुरावर आहेत. गुरमकुंडा प्रांतीं वगैरे किरकोळ ठाणीं घेऊन पाडून टाकितात. चांगलें ठाणें असेल तेवढें मात्र राहतें. महंमदअल्लीकडे वकील गेलेच आहेत. श्रीमंतांस व महमदअल्लीस विसा गांवांची तफावत आहे.

---

१ बेंगळुरास वेढा घालावा. २ पत्र वासुदेव धोंडदेव पटवर्धन शीळकर याचें शिऱ्यांहून गोपाळरावास. ३ अर्काटचा नबाब.

त्यांच्या व श्रीमंतांच्या भेटी होणार. महमदअल्लीखान याणें कूच करून दोन मजली पुढें आला आहे. समागमें सामान आठ दहा हजार फिरंगी[1], दहा हजार गाडदी[2], दीडशें तोफा येणेंप्रमाणें आहे." ह्मणोन राजश्री मुकुंद श्रीपत यांचे पुत्र काल संध्याकाळीं श्रीमंतांचे लष्करांतून आठवे रोजीं येथें आले त्यांणीं हें वर्तमान सांगितलें त्याजवरून लिहिलें आहे. आपणांकडे यावयाची फौज हरी गोपाळ व गायकवाड व राजश्री मुरारराव घोरपडे यांची फौज एक हजार येणेंप्रमाणें सारे मिळोन पांच हजार फौज सडी निघून आठा कोसांवर आली आहे. सडेच आले आहेत. बुणगें फारसें नाहीं. समागमें तोफा नाहींत. चित्रदुर्गाचे सरदेनेंच होसदुर्गचेच सुमारें जाणार ह्मणोन बोलतात. हैदरखानाकडे बातमीस राजश्री मुकुंद श्रीपत यांचीं माणसें गेलीं होतीं तीं चौकीवर बुधेहाळचे सुमारें सांपडलीं. परंतु कानडी माणसें, याजमुळें तेथून सुटोन तसेच पुढें गेले होते ते काल आले. जबानी सांगत होते जे, बुधेहाळापासून तमाम जागा जागानीं कडब्रापावेतों त्याची फौज व बार आले आहेत. खासा हैदरखान श्रीरंगपट्टणचे बंदोबस्तीकरितां गेला ह्मणून सांगत होते. आणखी माणसें बातमीकरितां गेलीं आहेत. आलियानंतर जे बातमी असेल ते वरचेवर लिहितों. दाणा काल पाठविलाच आहे. आज सलिते नाहींत. चार सलिते आहेत ते मात्र पाठवितों. येथून दाणा भरून सलिते जातात, तेथें दाणा ठेवावयास कांहीं नाहीं. याजमुळें सलिते ठेऊन घ्यावे लागतात, परंतु येथून दाणा दररोज पाठवावा लागतो यास्तव सलिते वरचेवर आल्यानें दाणा पाठवावयाची सोय पडेल. येथें कहीस जाइन ह्मटल्यास सलिता नाहीं याजमुळें नड पडते. वैरणीसही उदईक जावें लागेल. वैरण फार लांब गेली आहे. कळलें पाहिजे. ओल्या मिरच्या पाठविल्या आहेत. कोथिंबीर दरोबस्त मिळत नाहीं याजमुळें पाठविली नाहीं. परवां येथून दोन शेर मिरच्या

१ इंग्रज मद्रासकर. २ गारदी.

पाठविल्या होत्या त्या माचाऱ्या पाठविल्या त्या पावल्या. चार पैसे देऊन विकत घेतल्या होत्या. वाण्यास माचाऱ्या देत होतों तो घेईना यामुळें आह्मीं ठेऊन घेतल्या. कळलें पाहिजे. बहुत काय लिहिणें हे विज्ञापना.

पै|| छ ४ जिल्हेज.

नं० ९५३ **श्रीशंकर.** ( चैत्र शुद्ध सप्तमी. २ एप्रिल. )

श्रीमंत राजश्री दादा स्वामीचे सेवेशीं.

विनंती सेवक महादाजी[1] अनंत कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना छ ५ जिल्हेज पावेतों मुक्काम बाळापूर येथें स्वामीचे कृपेंकरून सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेष. श्रीमंत राजश्री आबाकडे माणसें पाठविलीं होतीं तीं संध्याकाळीं येथें आलीं. छ ३ जिल्हेजीं मुलबागलावरून कूच करून कोल्हारास श्रीमंतांची फौज आली. पुढें दरमजल बाळापुरचे रोखें येणार. सात आठ कोसांचे सुमारें आलियावर परगणे मजकुरच्या रखवालीस राऊत पाठवून देतों. दहा बारा हजार होनांचा ऐवज ( वसूल होणें राहिला आहे ) त्यांपैकीं एक पैसा वसूल होणें दिसत नाहीं! सेवकाकडून काडीमात्र सुस्ती नाहीं! निरुपाय गोष्ट झाल्यास सेवकाचा उपाय काय! पायमल्ली झाली हें आपणास सर्व समजलें आहे. परंतु ( आबा[2] मजवर ) रागास येतात! धणी आहेत! तांदुळांविशीं

---

१ हा थोरलें बाळापूर ऊर्फ दोड बाळापूर येथील कमावीसदार. हा तालुका पटवर्धनांस नुकताच जहागीर मिळाला होता. धाकटें बाळापूर किंवा चिकबाळापूर निराळें. तें पेशव्यांनीं खुद्द आपल्या ताब्यांत ठेवून जानराव धुळप यास तेथें सुभेदार नेमिलें होतें. २ पेशव्यांच्या लष्करांत मोरो बल्लाळ याजकडे. गोपाळराव फक्त सरदारीचें काम करी. जहागिरीचा सर्व कारभार, वसूल, खर्च व नफानुकसान पाहण्याचें काम मोरोबाकडे होतें.

आज्ञापत्र आलें त्याजवरून हल्लीं बैल सर दोन येणेंप्रमाणें तांदूळ कैली ८२॥= पैकीं मुरादअली[2] ८१।१ व नंदराज दळवाई बारीक ८१।७ येणेंप्रमाणें बत्तीस[3] पायली तांदूळ पाठविले आहेत. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना. 'तुह्मीं आपणाकडून शहाणा कारकून पाठवून देणें व तुह्मींही लष्करनजीक आलियावर ऐवज घेऊन येणें ह्मणोन (आबांचें मला) पत्र आलें त्याजवरून कारकून व प्यादे लष्करास पाठविले. 'लष्कर समीप आलियास राऊत पाठवावे ह्मणजे कांहीं ऐवज जमा झाला आहे तो घेऊन येतों' ह्मणोन लिहून पाठविलें आहे. राऊत येतांच ऐवज दहा हजार रुपयेपावेतों सिद्ध केला आहे तो घेऊन जातों. सालमजकुरीं पाऊस कमी. कार्तिक पीक कमीच झालें. मागाहून पाऊस झाला त्यासमुळें वैशाख पीक जोरी, हरभरे, गहूं केले होते तें तमाम लुटिलें गेलें. रागीच्या कांहीं मळण्या झाल्या. कांहीं गेल्या. पैकीं परगणें मजकुरचीं गुरें दहा हजार पावेतों लुटलीं गेलीं. हल्लीं गुरांस चारा नाहीं. पाणी नाहीं. त्याहीमध्यें तीन प्रकारचा रोग आला त्याणें करून फार गुरें मरतात. मातबर मातबर गांवची रखवाली करून कांहीं रयतेचा बचाव केला होता, परंतु आतां फिरून फौज आलियावर राहिले गांव जातात! रयतेस कोठेंही जावयासीं जागा नाहीं. नंदिगडावर (श्रीमंतांच्या लष्कराचा) मुक्काम होता तेव्हां नित्य चाळीस उंट भरून नित्य लांकडें द्यावीं लागत. याशिवाय खेरीज मुत्सद्दी. उपाय नाहीं! घरें मोडून देत होतों! परगण्यांत त्राण तो नाहींच. ईश्वर

---

१ संख्या मोजण्याच्या तऱ्हा दोन, एक 'सर' व दुसरी 'सुमार' अशा होत्या. जनावरांच्या संख्येस सर व नग मोजावयाचे झाल्यास 'सुमार' हा शब्द लावीत. जसें उंटें सर पांच. बैल सर पंचवीस. नारळ सुमार दहा. अंजीर सुमार वीस. वगैरे. कैली किंवा वजनी जिनसास सर, सुमार लावीत नसत. २ मुरादअली व नंदराज या कर्नाटकी तांदुळाच्या जाती. ३ माप बारुलें. ४ पेशव्यांचें लष्कर प्रथम बाळापूर परगण्यांतून गेलें त्यावेळेस ही लूट झालेली. ५ हीं खुद्द पेशव्यांच्या स्वयंपाकाकडे वगैरे लांकडें. शिवाय मुत्सद्यांकडे पाठवावीं लागत तीं निराळींच.

परिणाम करील तो खरा! आज तागायत परगणे मजकूर तेवीस चोवीस हजार होनें वसूल झाले. शिबंदी खर्च जाऊन पंचवीस ( हजार रुपये ) सरकारांत पावले. दहा पावेतों शिल्लक आहे तेही प्रविष्ट करितों. पुढें शिबंदीस ऐवज पाहिजे त्याचा मार्ग होऊन वसूल होऊन येणें संकट आहे. आबा ऐवज पावत नाहीं ह्मणून बहुत रागें आहेत. मी येथें येऊन पावलियावर आठ दहा दिवशीं लष्करचा हंगाम झाला. त्याहीमध्यें निकड करून दहा हजार होन वसूल केले वैशाख पिकाचा +

नं० ९९४ श्रीगणराज. ( चैत्र शुद्ध अष्टमी. ३ एप्रिल. )

अपत्यें मोरोबानें सांष्टाग नमस्कार विज्ञापना तागायत छ ६ जिल्हेज वडिलांचे आशीर्वादेंकरून वर्तमान यथास्थित असे. विशेष. " आजपर्यंत आह्मांस थोडा बहुत दाणा मिळाला. कोणे दिवशीं निमचंदी, कोणे दिवशीं कांहीं, याप्रमाणें गुजराणा केली. आतां गुजराणा चालावयाची नाहीं. दाण्यास इलाज काय करावा " ह्मणोन लिहिलें, ऐशास हैदरखानाची बातमी राखून दोन कोसीं चार कोसीं दाणा पाण्याची सोय पाहून रहावें. तों श्रीमंतांची व आपली भेट थोड्याच दिवसांनीं होईल. राजश्री आनंदराव गोपाळ व मालोजी घोरपडे व गायकवाड यांची फौज कोल्हारच्या मुक्कामाहून वडिलांकडे रवाना झाली आहे ते आज तागायत वडिलांकडे आले असतील. विदित होय हे विज्ञापना.

पै॥ छ १० जिल्हेज.

---

१ होनाची किंमत पावणेचार रुपये नांवाचा मात्र असे. होन मोडावयाचा झाला ह्मणजे केव्हां केव्हां तीन आणे चार आणेपर्यंतसुद्धां बट्टा सोसावा लागे. २ पत्र मोरो बल्लाळ याचें गोपाळरावास.

शा० १६९२ **धारवाड प्रांतीं दंगा.** इ. स. १७७९

नं० ९५५ **श्रीगणपति.** ( चैत्र शुद्ध अष्टमी. ३ एप्रिल. )

अपत्यें परशुरामानें साष्टांग नमस्कार विज्ञापना येथील कुशल तागायत छ ६ जिल्हेज. यथास्थित असे. विशेष. वडिलांकडून पत्रें आलीं तीं पावलीं. लिहिलें सविस्तर कळलें. तीर्थस्वरूप राजश्री माधवराव अण्णास फाल्गुन वद्य द्वादशीस देवआज्ञा झाली. ईश्वरें महा घाला घातला. जखम कांहीं भारी नव्हती, परंतु आयुष्य प्रमाण! मनुष्याचा उपाय नाहीं! वडिलींही श्रम न करावे. होणार तें चुकत नाहीं. राजश्री श्रीधरपंत यांची जखम बरी आहे. श्रीमंतांकडील वर्तमान तर चिकबाळापूर व नंदिगड व गणेशगड घेतले. कोल्हार व मुलबागल हे दोन्ही किल्ले पाडून टाकिले. तेथून कूच करून माघारे शत्रूचे तोंडावर येणार ह्मणून छ १ जिल्हेजचीं पत्रें आलीं. अद्याप सलुखाचा प्रकार नाहीं. पुढें मनसबा होईल तो मागाहून लिहून पाठवितों. वरकड सविस्तर तीर्थरूप राजश्री नीलकंठराव याणीं लिहिलें आहे त्याजवरून कळेल. वडिलीं विवेंकेंकरून शांतवन करावें. मंगळवेढ्यासही लिहून त्यांचेंही[3] शांतवन करावें. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं० ९५६ **श्रीगजानन.** ( ३ एप्रिल. )

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री रावजी स्वामीचे सेवेशीं.

पोष्य त्र्यंबकराव हरी कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती उपरी येथील कुशल तागायत चैत्र शुद्ध अष्टमीपर्यंत यथास्थित जाणून स्वकीय कुशल लिहीत असलें पाहिजे. विशेष. आपण पत्र पाठविलें तें

---

१ पत्र परशुरामभाऊचें त्रिंबक हरि कुरुंदवाडकर यास. २ छाप्यांत ज्यास जखम लागली होती तो हा परशुरामभाऊचा चुलत भाऊ. त्रिंबक हरीचा पुतण्या. ३ माधवरावाचा बाप कृष्णभट्ट याचें. ४ हें पत्र गोपाळरावास लिहिलेलें आहे. लिहिणारा कोणी धारवाड सुभ्यापैकीं मामलेदार असावा.

पावलें. लिहिला भाव कळला. इकडील वर्तमान तर हैदरखानाची फौज दगेनें हल्लचाळास लागले होते. त्यास कित्तूरकर देसाई व राजश्री नारो बाबाजी याणीं उपराळा करून (ती फौज) मारून काढिली. त्याणीं मागती तीन कोस सामराणीस जाऊन राहिले. अद्याप प्यादे जवादे तोफा ऐसें जमा करितात. कोणीकडे तरी हालचाल करावी ह्मणून तजविजींत आहेत. आणि राजश्री नारो बाबाजी याणीं आपल्या ठाण्यांची बंदोबस्ती केली. कलघटगी व मिश्रीकोट व रायर हुबळी वगैरे येथें प्यादे घालून दारूगोळा सरंजाम (करून) मजबूद केलीं आहेत. मशारनिल्हेजवळ चारपांचशें जमाव स्वारांची व प्यादे हजार पांचशें आहेत. परंतु हैदरखानाकडील लोक दगे-खोर आहेत. आह्मीं आपल्या बंदोबस्तीनें आहों. काळ वेळ सांगून येत नाहीं. ऐशियास आपण बाबूराव यांस पत्रें लिहावीं जे, आमचें पत्र व अगर राजश्री नारो बाबाजींचें पत्र येईल त्या समयीं आळस न करितां जमावसुद्धां उपराळा करावी ह्मणून त्यास बरवे प्रकारचें पत्र लिहावें. या प्रांतीं दोन हजार फौज असलिया उत्तमच आहे. येविशीं बहुत काय लिहिणें कृपा लोभ असों दीजे हे विनंती.

नं० ९५७ श्री. (चैत्र शुद्ध दशमी. ५ एप्रिल.)

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री बाबूराव स्वामी गोसावी यांस—

सेवक नारो बाबाजी. नमस्कार. विनंती उपरी. येथील कुशल तागायत छ ८ जिल्हेज मुक्काम धारवाड जाणून स्वकीय लिहीत जावें. या नंतर तुह्मीं पत्र पाठविलें तें पावलें. राजश्री गोपाळराव यांचें पत्र पाठविलें तें पावलें. सविस्तर अर्थ कळला. 'हल्याळाकडील वर्त-

---

१ मदत. २ बाबूराव जगजीवन याच्या हाताखालीं कांहीं फौज गोपाळरावानें सावनूरच्या रक्षणार्थ ठेविली होती. धारवाडचा सुभेदार नारो बाबाजी यानें याच बाबूरावास पुढलें नं० ९५७ चें पत्र लिहिलें आहे.

मान अलीकडे येत नाहीं तरी सविस्तर लिहावें ह्मणजे लक्ष्मेश्वराम लिहून पाठवूं ' ह्मणून लिहिलें तें कळलें. त्यास ठाणें हल्याळ येथें सोंद्याकडील जमाव येऊन वेढा घातला होता ते उठोन गेले ह्मणोन तुह्मांस पेशजी लिहिलेंच आहे. त्यावर सांबराणीस कांहीं जमाव करून मागती हल्याळनजीक येऊन उतरले होते. हजार दीड हजार बेर्द[1] (व) शें दोनशें राऊत होते. (त्यानीं) एक दुसऱ्या खेड्यास आग लाविली. आह्मीं येथें जमाव केला, तुह्मीं तिकडून येणार, हें वर्तमान ऐकून मागती उठोन गेले. हल्याळकरांनीं कांहीं थोडा बहुत ऐवज देऊन गुरें सोडवून आणिलीं ह्मणोन ऐकितों. कलघटगीस तीन चारशें लोक व मिश्रीकोट येथें तीन चारशें लोक ठेविले आहेत. येथें आह्मांजवळ सात आठशें माणूस आहे. सोंदें प्रांतीं तेही जमाव करितात ह्मणोन वर्तमान आहे. सदरहू-प्रमाणें वर्तमान रायांस[2] आपण लिहून पाठवावें. नवल विशेष वर्तमान आलियावर तुह्मांस लिहून पाठवूं. बहुत काय लिहिणें लोभ असों दीजे हे विनंती.

पै॥ छ १० जिल्हेज.

नं० ९९८ **श्रीगणराज.** (चैत्र शुद्ध एकादशी. ६ एप्रिल.)

चिरंजीव राजश्री मोरोपंत आबा यांसी प्रती गोपाळराव गोविंद आशीर्वाद उपरी येथील कुशल तागायत छ ९ जिल्हेज शुक्रवार मुक्काम मचलदरा तालुके हगवाडी. वर्तमान यथास्थित जाणून स्वकीय कुशल लिहीत जावें. विशेष. राजश्री नरसिंगराव धायगुडे गेले त्यांजबरोबर जासूद जोडी पाठविली आहे. सविस्तर लिहून पाठविलें आहे. तीं पत्रें पावलींच असतील. राजश्री आनंदराव गोपाळ वगैरे फौज

---

१ कर्नाटकी पेंढारी. २ गोपाळरावास.

शिऱ्यांस आली आहे ह्मणून ( तुह्मीं ) लिहिलें होतें त्यास मशारनिल्हे व गायकवाडाची फौज व घोरपडे यांजकडील मिळून फौज परवां बुधवारीं आह्मांपाशीं येऊन पावली. श्रीमंत माघारे फिरोन कोल्हाराकडे आले ह्मणून वर्तमान ऐकितों. त्यास कोल्हारास आले असल्यावर आजपर्यंत पुढें बेंगळूरच्या आसपास आलेच असतील. प्रस्तुत ( श्रीमंतांचा ) मुक्काम कोठें आहे, कोणत्या रोखें येणार, काय मनसबा, सविस्तर लिहावें. हैदरखान याणीं बुणगें संकरापट्टणाकडे ठेऊन खासा सड्या सामानानिशीं पट्टणास गेला ह्मणून चहूंकडून बातमी आली आहे. बहुधा पट्टणाकडे गेला असेलसें दिसतें. आह्मीं कित्येक मजकूर लिहून नरसिंगराव याज-समागमें जोडी पाठविली आहे. श्रीमंतांचीं पत्रें तुह्मीं पाहून तो मजकूर श्रीमंतांस श्रवण करावा. त्यांचे मर्जीस येईल तें करोत! श्रीमंत छावणीस न राहतां देशास आले तरी ( इकडे ) फौज ठेऊन कांहीं फळ नाहीं. श्रीमंतांनीं तरी देशीं जाऊन फळ काय! गेल्यांत तेजही राहत नाहीं. बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद.

नं० ९५९ **श्रीगणराज.** ( चैत्र वद्य तृतीया. १३ एप्रिल. )

सेवेशीं गोपाळराव गोविंद व आनंदराव भिकाजी. कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत छ १६ जिल्हेज भृगुवार मुक्काम चेलूर तालुके हगलवाडी येथें स्वामीचे कृपेंकरून सेवकांचें वर्तमान यथास्थित असे. विशेष. राजश्री बाळकोबा तात्या सडे फौजेनिशीं मिजगल-दुर्गास आल्यानंतर ( त्यांनीं ) आह्मांस पत्रें पाठविलीं होतीं. ( त्यांत ) खासा स्वारीचा मुक्काम मनीकोल्हारावर आहे ह्मणून लिहिलें होतें. ऐशीयास मनीकोल्हाराहून कूच होऊन पुढें मिजगलदुर्गास येणें झालें किंवा तेथेंच मुक्काम आहे हें लिहावयासीं आज्ञा केली पाहिजे. हैदर-

---

१ पेशव्यांस पाठविलेल्या पत्राची नक्कल. २ रास्ते.

खान पट्टणासच आहेत ह्मणोन आह्मांकडे बातमी आहे. स्वामीपाशींही नित्य बातमी येत असेल. आज तोफांचे बार फार होतात तेव्हां मिजगलास तोफा लाविल्याशिवाय इतके बार कोठील होणार? मिजगलास खासा स्वारीचा मुक्काम ( होणार ) तेव्हां आठ दहा कोसांची तफावत राहिली. पुढें आह्मांस काय आज्ञा? हुजूर यावें किंवा किल्ला फत्ते होयपर्यंत इकडे रहावें? आज्ञा होईल त्याप्रमाणें वर्तणूक करूं. विदित होय हे विज्ञापना.

नं० ९६० श्रीगणराज. ( चैत्र वद्य चतुर्थी. १४ एप्रिल )

अपत्यें साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत छ १७ जिल्हेज मुक्कामनजीक देवरायदुर्ग वडिलांचे आशीर्वादेंकरून वर्तमान यथास्थित असे. विशेष. वडिलीं छ १६ जिल्हेज मुक्काम चेलूर तालुके हगलवाडी येथील मुक्कामचीं पत्रें पाठविलीं ते छ १७ जिल्हेजीं छ० मजकुरीं पावलीं. "राजश्री बाळकोबा तात्या मिजगलास आले. सडी फौजेनिशीं आले होते. त्यांचें पत्र आह्मांकडे आलें होतें. मागाहून खासा स्वारी येणार होती. परवां मनीकोल्हाराचा मुक्काम खासा स्वारीचा झाला. काल मिजगलास येणार होते, आज देवरायदुर्गास येणार, ह्मणून वर्तमान ऐकिलें. व कालपासून तोफाही होतात. तस्मात् श्रीमंत खासाच आले असतील. त्यास तोफा मिजगलास लाविल्या किंवा देवरायदुर्गास हें न कळे. तुह्मीं पत्र पाठवावें तेंही पाठविलें नाहीं" ह्मणून पत्रीं लिहिलें, त्यास श्रीमंत बेंगळुरावरून निघाले ते दोन मजलींनीं देवरायदुर्गास पूर्वेस दोन कोसांवर राहिलों आह्मीं. येथून दोन अडीच कोस देवरायदुर्ग आहे. बेंगळूरच्या किल्लेदाराचा लेक अमीनखान यानें सांगितलें कीं 'देवरायदुर्ग येथील अनुसंधान आपणाकडे आहे. आपणाबराबर पांच हजार फौज देऊन पाठवावें.

१ पत्र मोरो बल्लाळ याचें गोपाळरावास.

किल्ला घेऊन देतों.' त्यावरून बुदीकोटाच्या मुक्कामींहून राजश्री बाळकोबा तात्यांच्याबराबर पांच सात हजार फौज देऊन रवाना केले ते मिजगलास आले. राजश्री व्यंकटराव तुमकूर याची स्त्री कोनीं निघाली होती तेमुद्धां सांपडली. मिजगलाचा किल्लेदार पळाला. लोकांनीं रदबदली लावून किल्ला खालीं करून दिला. हल्लीं देवरायदुर्गास मोर्चे लाविले आहेत. भोंसले व मुरारराव घोरपडे व दुर्गकर यांसमागमें तोफखाना देऊन पाठविले आहेत. मागाहून खासा स्वारी किल्ला पहावयास गेली आहे. किल्ला बहुत दिवस लढत नाहीं. जागा अफाट आहे. घेऊन पाडून टाकितील. राखावयाचें संकट आहे. 'आपाजीराम हैदरखान याजकडून आले आहेत' म्हणोन लिहिलें, त्यास मशारनिल्हे आले नाहींत. हैदरखान पट्टणास आला आहे अशी बाजार आवाई बोलतात. लिहिल्यांत नाहीं. बुणगें शिऱ्यांहून आणवितों म्हणून लिहिलें त्यास बुणगें आणवावें. आपण फौजेसुद्धां यावें म्हणोन श्रीमंतांचें पत्र मागाहून पाठवितों. राजश्री नरसिंगराव घायगुडे व शहाजीबावा भोसले यांची रवानगी सावनुरास झाली नाहीं. अद्याप लष्करांत आहेत. पाठविणें तर नरसिंगराव यांस मात्र पाठविणार. वडिलीं श्रीमंतांस पत्रें पाठविलीं तीं (त्यांस) दाखविलीं. त्यांचीं उत्तरें घेऊन पाठवितों. मिरजेचीं पत्रें पाठविलीं तीं पावलीं. वरकड मनसबा एकही सिद्धांत नाहीं. परंतु फौज छावणीस ठेवणार. श्रीमंतांची व वडिलांची भेटी झालियावर मनसब्याचा सिद्धांत होणें तो होईल. तूर्त दोन तीन किल्ले हस्तगत होईतोंपर्यंत अलीकडे पलीकडे चार दिवस मुक्काम होतील. देवरायदुर्ग किल्ला चांगला आहे परंतु खासा स्वारी जाऊन पाहून मोर्चे बसविले आहेत. कळावें. श्रीमंतांचें पत्र निजगलापाशीं येणेंविशीं पाठविलें आहे. यावें. विदित होय हे विज्ञापना.

---

१ बाळंत झाली.

ा० ११९२ **मिजगलदुर्ग व देवरायदुर्ग.** इ: स. १७७०

ां० ९६१ **श्री.** ( अजमासें चैत्रशुद्ध. एप्रिलचा प० पंधरावडा. )

सेवेशीं विनंती उपरी. राजश्री नरसिंगराव घायगुडे व राजश्री शहाजी ोसले या प्रांतीं छावणीस नेमिले. आणखी फौज श्रीमंत पाठवितात. आपणांस त्या प्रांतीं छावणीस मुकरर केलें सबब राजश्री बाबूराव जगजीवन ांस फौजेसह येणें ह्मणून आपलीं पत्रें आलीं त्याजवरून नबाबसाहे-ांस बहुत अपूर्व झालें! दौलतीचा भार आपल्यावर सर्वस्वें असतां ़कडील बेफिकीर झाली असें समजून आपली फौज आणविली कीं ााय? अमित्राचा ऋणानुबंध प्रमाण सर्व ही आपणांस निवेदन ाहे. मुलुखाची खराबी बिलकुल होऊन चुकली. बाकी कांहीं ाहिली नाहीं. शहर मात्र बाकीस आहे. दौलतीचा भार आपणा-ारी आहे. पुढें याची सल्ला मनसुबा आपल्याशिवाय नाहीं. ांतील तजवीज मसलत मनास आणून निरोपावें. बहुत काय लिहिणें ोभ असों देणें हे विनंती.

ां० ९६२ **श्रीगणराज.** ( चैत्र वद्य पंचमी. १९ एप्रिल. )

चिरंजीव राजश्री मोरोबा आबा यांसीं प्रती गोपाळराव गोविंद आशी-ादि उपरी येथील कुशल तागायत छ १८ जिल्हेज भानुवार मुक्काम ाजीक गुंडहवेली एक कोस वर्तमान यथास्थित जाणून स्वकीय कुशल ेहित जाणें. श्रीमंतांचें पत्र छ १४ जिल्हेजचें आलें तेथें आज्ञा खासा ारीचा मुक्काम मनीकोल्हारावर आहे तुह्मीं बुनग्यासुद्धां निजगलास ाऊन तें काम करणें ह्मणोन पत्र आलें. पत्र शुक्रवारीं संध्याकाळीं ाालें. मंदवारीं काली कूच करून देवरायदुर्गचे पश्चिमेस तीन कोसांवर

---

१ पत्र सावनुराहून कोणी मोठ्या दर्ज्याच्या माणसानें गोपाळरावास लिहिलें आहे.

आलों. बुणगें घेऊन येणें ह्मणोन कालच राजश्री वासुदेव काकांस शिऱ्यांस लिहून पाठविलें आहे. आज बुनगें आलें पाहिजे याजकरितां आज येथें मुक्काम केला. संध्याकाळीं बुणगें येईल. प्रातःकाळीं उदईक कूच करून निजगलास जातों. येथून निजगलही चार कोस आहे. तेथें गेल्यावर कशी जागा आहे, काय वर्तमान आहे, तें कळेल. ऐशि-यास श्रीमंत तोफा पाठवितात किंवा काय, अगर आह्मीं उगाच मुक्काम करून निजगलास रहावें? निजगलचे पूर्वेस पाणी नाहीं. जागा उतरावयास नाहीं. अलीकडील अंगें दीड कोसावर पाणी ( व ) जागा उतरावयास आहे. आज पाणी जागा पहावयास पाठविले आहेत. निजगल घ्यावयाचें असल्यास तोफांची रवानगी उदईक करवावी. आह्मीं उदईक कूच करून निजगलास जातों. निजगल किल्ला मातबर आहे ह्मणून सांगतात. पूर्वेकडून पाणी व जागा रहावयाची सोय नाहीं. पूर्वेकडील अंगें पठेजवळ तळें आहे, परंतु सालमजकूरचे अवर्षणामुळें पाणी तळ्यांत नाहीं ह्मणून सांगतात. पश्चिमेकडील अंगें झील दीड कोसाचे तफावतीनें आहे. दोन कोसही होईल. तें पाणी आहे दुसरें नाहीं. श्रीमंत देवरायदुर्गास खासा बसणार. त्यास देवरायदुर्ग स्थल मातबर आहे. हे दिवस कोणते तो विचार करावा. आह्मांस तो त्या स्थलाची माहीतगारी नाहीं व निजगलाचीही नाहीं. श्रीमंतांनीं देवरायदुर्गास मोर्चे लाविले. आह्मांस निजगलास ( मोर्चे लावण्यास ) आज्ञा धण्यानीं केली तरी जसें जितकें जितकें सामान असेल तितक्या-निशीं मोर्चे लावूं. आमचें काय गेलें! श्रीमंतांनीं अद्वानीबाबत व हरपनहळ्ळीचा ऐवज आह्मांकडे वसूल आला होता त्याचा झाडा आण-विला होता त्याजवरून पाठविला आहे. जिल्कादचा खर्च व जिल्हेजचा बाणांचे उंटांचे वगैरे खर्च वजा पडावयाचा आहे. बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद.

शा० १६९२ **निजगल.** इ. स. १७७०

नं० ९६३ (चैत्र वद्य पंचमी.
१५ एप्रिल.)

मोरो बल्लाळाकडून गोपाळरावास पत्र छ १८ जिल्हेजचें.

"छावणीस रहा ह्मणूं लागल्यास कबूल करावें तरी कर्जदार होतों. न कबूल करावें तरी येथील मर्जी सर्व विदित करीन. त्यांतही श्रीमंतांची शरीरप्रकृति बिघडली आहे. सर्व संकटें आहेत. अद्यापि मनसब्याचा ठराव नाहीं. आपली भेटी झाल्यावर काय मनसबा होईल पहावा. निजगल तो हातीं आलाच. देवरायदुर्गही घेणार. काल श्रीमंत पाहून आले. मोर्चे बसविले. श्रीमंतांचा मुक्काम येथेंच आहे."

नं ९६४ (चैत्र वद्य षष्ठी.
१६ एप्रिल.)

मोरो बल्लाळ यास गोपाळरावाचें पत्र छ १९ जिल्हेजचें.

"निजगल किल्ला पहावयास राजश्री गोविंदपंत मामा पाठविले होते. तोफांशिवाय किल्ला हस्तगत व्हावयाचा नाहीं. जवळ पाणी नाहीं. किल्ल्यापासून कोसावर विहिरीचीं डबकीं २५ पर्यंत आहेत, परंतु लष्कराच्या उपयोगाचीं नाहींत. तत्रापि जसें होईल तसें पहातच आहों! तोफांचें सामान चांगलें असावें. खैराती सामान मात्र नसावें! देवरायदुर्गची बोली लागली असल्यास (श्रीमंत आह्मांकडे) तोफखान्याचें सामान चांगलें पाठवितील. डोंगरावर तोफा चढवाव्या लागतील याज-करितां सामान चांगलें असावें. श्रीमंतांस विनंती करून सामान चांगलें रवाना करावें ह्मणजे उदईक कूच करून किल्ल्याजवळ जातों."

नं ९६५ **श्रीशंकर.** (चैत्र वद्य षष्ठी.
१६ एप्रिल.)

सेवेशीं महादाजी अनंत साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत छ १९ जिल्हेज पावेतों क्षेम असों विशेष. "हैदरखान याची फौज

१ पत्र बाळापुरच्या कमाविसदाराचें मोरो बल्लाळ यास पेशव्यांच्या लष्करांत.

आली. गणेशगडचे (?) मोर्चे उठविले ह्मणून लिहिलें, त्याजवरून राजश्री कृष्णराव बळवंत फौजेसुद्धां रवाना झाले आहेत हैदरखान याच्या फौजेचें पारिपत्य करतील. मागतीं दुर्ग चांगला राखावयाजोगता असलिया आपले प्यादे पाठवून बंदोबस्त करणें. उपयोगी नसालिया पाडून टाकणें. ह्मणून लिहिलें आहे त्यास काय केलें तें लिहिणें. श्रीमंत छावणीस राहिले. श्रीमंत नारायणरावसाहेब व सौभाग्यवती बाई देशास जातात. मुहूर्तानें निघून दोन कोसांचे अंतरानें राहिले आहेत. हैदरखानाची बातमी वरचेवर लिहित जाणें. राजश्री रखमाजी भोसले यांस बोलावून पुसिलें ते मान्य करीत नाहींत. अंजीर रावसाहेबां-कडे पाठविणें. मध एक शेर पाठविणें. राजश्री धोंडोपंताची कुणबीण पाठविणें. कामाठी आहेत त्यांस अडीच रुपये दरमहा पावतात तरी हांका मारितात! त्यांचा करार काय आहे तो लिहिणें" ह्मणून आज्ञापत्र सादर झालें, त्यास राजश्री कृष्णराव बळवंत फौज घेऊन आले त्याणीं आमचे परगण्याचें उत्तम पारिपत्य केलें तें सविस्तर लिहून पाठविलें आहे त्याजवरून विदित झालेंच असेल. येतां जातां गांवगन्नांच्या खंडण्या शें दोनशें मागत होते. बहुत रदबदली करून थोडें बहुत दिलें. जातांना गुरें तीन चारशें पावेतों घेऊन गेले. तुमकूरतेल व आरमलगीतेल येथें धान्य शें दोनशें रुपयेचें रखवालीस देऊन राखिलें होतें व कांहीं जोंधळे होते ते तमाम लुटून आणून तीन दिवस मुक्काम कसब्यानजीक करून तिगल्याच्या (?) बागा व सरकारची बाग लुटून नेली. घरें लुटून आणिलीं. मी जाऊन बहुता प्रकारें विनंती केली कीं "येथें मुक्काम करून साध्य नाहीं. येलवल्लापावेतों तलावा करावा ह्मणजे त्यास[2] तरी कळेल कीं, सरकारची फौज फिरते. ऐसें असून मुक्काम करणें तरी कुदाण्या (?) तालुक्यांत धान्यें बहुत आहेत. बरोबर मी माणसें देतों. कही तिकडे पाठवावी," ह्मणून सांगितलें; तें एकीकडे

---

१ हें उपरोधिक लिहिणें आहे. २ शत्रूस.

ठेऊन तुमच्याच परगण्यांत कही पाठवून सत्यानाश केला! पांच हजार फौज बराबर असतां दोन तीन कोसांवर कांहीं लांब पाठवावयासी नये हेंच अपूर्व आहे. माकलीदुर्गेचा मजकूर आपण लिहिला तो आह्मांस ठाऊक नाहीं. पत्र मजकडे आलें नाहीं. श्रीमंत छावणीस राहिले येणेंकरून सरकारकामही होईल. सर्वांस भरंवसा झाला. रखमाजी भोंसले येत नाहींत ह्मणून लिहिलें, त्यास भगवंत त्यांस खाऊं देत नाहीं त्यास कोणाचा उपाय! स्वामीचें पुण्य समर्थ आहे. ठाण्याचा बंदोबस्त करून खबरदार आहें. कामाठी यांस दरमहा दर असामीस पोटास दोन रुपये द्यावे येणेंप्रमाणें करार आहे परंतु लष्करांत महागाईमुळें पुरत नसेल याजकरितां विनंती करीत असतील. कुणबीण मागेंच पाठविली, परंतु चालवत नाहीं ह्मणून माघारी आली. एक तट्टू. दोन माणसें. त्यांस सांगून पाठवितों. मद्य व शाखभाजी पाठविली आहे. राजश्री हणमंतराव पुढें कार्यास गेले त्यांनीं चिठी पाठविली ती पाठविली आहे. माकलीगड चांगला आहे ह्मणून लोक सांगतात. तेथील बेगमीचा मुलुख मुनीकोल्हारसुद्धां आहे. मुलुखसुद्धां आपणाकडे करून घेतल्यास उत्तम आहे. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं० ९६६ **श्रीगणराज.** ( चैत्र वद्य षष्ठी. १६ एप्रिल. )

चिरंजीव राजश्री मोरोबा आबा यांसी प्रती गोपाळराव गोविंद आशीर्वाद उपरी येथील कुशल तागायत छ १९ जिल्हेज इंदुवार वर्तमान

---

१ ह्मणजे अर्थात् पटवर्धनांच्या. २ बाळापुरप्रमाणेंच माकलीदुर्गही पेशव्यांनीं आपणास जहागीर द्यावा अशी इच्छा मोरो बल्लाळस झाली होती व किल्ला कसा काय आहे, त्याच्या सरंजामाच्या बेगमीकरितां भोंवतालचा किती तालुका नेमिला आहे वगैरे माहिती त्यानें हें पत्र लिहिणारास विचारिली होती, असें यावरून दिसतें.

यथास्थित जाणून स्वकीय कुशल लिहीत जावें. विशेष. तुह्मीं सांडणीस्वारासमागमें पत्रें पाठविलीं तीं पावोन लिहिला मजकूर कळला. निजगलचा किल्ला पहावयास राजश्री गोविंदपंत मामा वगैरे पाठविले होते. तोफांशिवाय किल्ला साध्य व्हावयाचा नाहीं. जवळपास पाणी नाहीं. किल्ल्यापासून अंतरावर विहिरीचीं डबकीं पंचवीस आहेत परंतु लष्करास + याचे नाहींत तत्राप जसें होईल तसें पहातच आहों. तोफांचें सामान चांगलें असावें. खैराती सामान मात्र नसावें. देवरायदुर्गेची बोली लागली अशी बातमी ऐकतों. बोली लागली असल्यास तोफखान्याचें सामान ( श्रीमंत आह्मांकडे ) चांगलें पाठवितील. देवरायदुर्गेची बोली लागली नसल्यास सामान खैराती पाठवितील. डोंगरावर तोफा चढवाव्या लागतील याजकरितां सामान चांगलें असावें. श्रीमंतांस विनंती करून तोफांचें सामान चांगलेंसें रवाना करणें, ह्मणजे उदईक कूच करून किल्ल्याजवळ जातों. काल बुनगें किल्ल्याजवळ आलें. राहिलें तेंही आज येईल. देवरायदुर्गेची बोली लागली असल्यास सामान तोफांचें चांगलें पाठवितील. देव-रायदुर्गेचें वर्तमान ऐकोन हेही दम धरणार नाहींत. तोफा उदईक रवाना करितात ( कीं नाहीं ) याचें उत्तर आज संध्याकाळपावेतों येऊन पावेसें पाठवावें ह्मणजे उदईक कूच करून किल्ल्याजवळ जातों. तोफा आल्याशिवाय किल्ल्याजवळ जाऊन काय करावें! दाण्यापाण्याचीही अडचण आहे. श्रीमंतांची मर्जी खामखा किल्ला घ्यावयाची असली तरी तोफखाना चांगला असावा. त्यांत आनंदराव[१] माधव यांस पाठवावें. नाहीं तरी खैराती तोफा आल्यास ठीक नाहीं. डोंगरावरी तोफा चढवाव्या लागतात असें आहे यास्तव चांगलें सामान रवाना करावें. शरीरीं तुमचे समाधान नाहीं ह्मणून कालचे पत्रीं लिहिलें

१ तोफखान्यावरचे मुख्य अधिकारी पानशे. + येथें पत्र फाटलें आहे.

त्यावरून चिंता लागली आहे. बरें! भगवंत कृपा करील. फारसें पथ्य न करणें. बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद.

नं० ९६७ L श्री. (चैत्र वद्य सप्तमी. १७ एप्रिल.)

तीर्थरूप मातुश्री बाईसाहेब वडिलांचे सेवेशीं.

अपत्यें नारायणरायानें चरणावर मस्तक ठेऊन शिरसाष्टांग नमस्कार विज्ञापना येथील वर्तमान छ २० जिल्हेजपावेतों मुक्काम देवरायदुर्ग येथें सुखरूप असों. विशेष. इकडील वर्तमान हैदरखान श्रीरंगपट्टण येथें आला. सर्व एक जागां झाले. आह्मीं किल्ले मजकुरास मोर्चे लाविले आहेत. लौकरच (हातीं) येईल. पुढें होईल तें लिहीन. वडिलांची व माझी शरीरप्रकृति उत्तम आहे. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

पै॥ छ २१ मोहरम.

नं० ९६८ श्रीगणपतिर्जयति. (१७ एप्रिल.)

आशीर्वाद उपरी. येथील कुशल तागायत चैत्र वद्य सप्तमी भौमवार चतुर्थ प्रहर यथास्थित असे. विशेष. तुह्मीं पत्र पाठविलें छ ९ जिल्हेजचें यादवाडच्या माणसाबरावर तें पत्र चवदाव्या रोजीं पावलें. लिहिलें वर्तमान सविस्तर कळलें. दुसरें पत्र छ० ७ जिल्हेजचें सौम्यवासरचें कुरुंदवाडच्या माणसाबरोबर पाठविलें तें बारावे दिवशीं पावलें. अक्षरसा सकळ वर्तमान कळलें. श्रीमंतांनीं तुह्मांकडे फौज राजश्री आनंदराव गोपाळ व राजश्री मुराररायाकडील मालोजी

---

१ पेशव्यांचे धाकटे बंधु नारायणराव याचें गोपिकाबाईस ह्मणजे आपल्या आईस पत्र. २ वडील बंधूची. ३ पत्र गोविंद हरीचें मिरजेहून गोपाळरावास.

घोरपडे व गायकवाडाकडील फौज रवाना केली ते शिन्यास आले आहेत, आजी त्यांची आमची भेटी होईल ह्मणोन लिहिलें तेणेंकरून समाधान झालें. श्रीमंतांस यावयास मास पक्ष लागला तरी चिंता नाहीं. अमित्र समीप दुष्ट कृतघ्न. त्याचा विश्वास नाहीं. तुमची बातमी त्यास कळते. त्याची तुह्मांस कळत नाहीं. तुह्मांस सामील फौज आली हें वर्तमान कळलियावरी त्यासही विचार पडेल. श्रीमंतांकडे तहवरजंग नबाब निजामअल्ली यांजकडून पांच सात हजार फौजेनिशीं आला हेंही मोठी गोष्टी झाली. " श्रीमंतांनीं कोल्हारची गढी पाडून मुलबागलावरी हल्ला करून किल्ला घेऊन तेथील किल्लेदार वगैरे तीस बत्तीस माणूस हत्तीखालीं घालून मारिलें. त्यांणीं श्रीव्यंकटेशाची यात्रा लुटिली होती व मार्गस्थ लोकही मारिले होते. त्यांचें पारिपत्य यथास्थित झालें. पुढें महमदअल्लीकडे वकील गेले आहेत ते आले नाहींत यास्तव श्रीमंत बेंगळूर डावें अगर उजवें टाकून श्रीरंगपट्टण डावें टाकून येतील तेव्हां आपणांस त्यांस जवळी पडेल " ह्मणोन लिहिलें तें कळलें. अद्यापि तहाची बोली नाहीं तस्मात् त्यास कोणाचें तरी अनुमोदन आहे याजमुळें दम धरील. परंतु ' परबुद्धि विनाशाय ' ऐशी त्याची गति होईल. ( त्याचा ) पंचवीस लक्ष होनांचा मुलुख खराब झाला. गढ्या पाडिल्या. देशोधडी लोक झाले. पुढें आपण तरी काय मनसबा करणार! अखेर तहाविना कल्याण नाहीं. मंदबुद्धि! होणारासारखी बुद्धि! " शहाजी भोसले व नरसिंगराव धायगुडे यांस सावनूर प्रांतीं जावयाची श्रीमंतांची आज्ञा झाली ते दीड महिना दोन महिने सडे होते यास्तव हुजूर गेले. आज्ञा झाली तरी बुनगेंसुद्धां सावनूर प्रांतीं जातील " ह्मणून लिहिलें तें कळलें. प्रस्तुत हैदरखानाकडील जमाव हल्याळास आला होता तोही माघारा गेलाच आहे. छावणी श्रीमंतांनीं केली तरी सावनूर प्रांतीं वीस हजार फौज पाहिजे. श्रीमंत देशास तिकडील आस्था अगदीं सोडून आले तरी

सावनूर प्रांतीं वीस हजार फौज पाहिजे. तुह्मीं व रास्ते इतकीच फौज दुसरी पाहिजे. छावणी केली तरी खर्च भारी बसेल. धान्य मिळालें पाहिजे. थोर समर्थ आहेत. ते मनसबा करणें तो पोक्त करितील. श्रीमंतांचा पुण्य प्रताप विचित्र आहे. शत्रू पादाक्रांत होऊन शरण येतां[१] द्रव्यही देईल. न देई तरी पुढें सर्वस्वास मुकला असें जाणावें. तुह्मीं आपले स्वबुद्धिनुसार श्रीमंतांस पत्र लिहिलें त्याचा मजकूर सर्व ध्यानांत आला. मनसब्याचे विचार पाहतां तुह्मीं युक्तीचेंच लिहिलें आहे. एक मजकूर तुह्मीं गुडघ्यांचा[२] लिहिला तेवढें गैर कागद भलत्याचे दृष्टीस पडला तरी विचक्षणा करितील. विचारें पाहतां यथार्थच लिहिलें, परंतु श्रीमंत मनांतच आणीत नाहींत तेव्हां अन्यत्रानीं सांगोन काय होणें! इकडील वर्तमान दिवसेंदिवस धान्य महाग होत चाललें. हरभरे साडे तीन पायली धारण. एकदांच शंभर रुपयांचे घ्यावया गेलें तर मिळत नाहीं. जोंधळे सहा पायली. गहूं साडे तीन पायली. आमची कोठी विजापुरप्रांतें हरभरे गहूं आणावया रवाना केली. जसे मिळतील तसे घेऊन येणें ह्मणोन सांगितलें आहे. मंगळवेढ्यांत चिरंजीव माधवराव याची सपिंडी झाली. आह्मीं जासूद पाठविला होता त्याचें प्रत्योत्तर आलें तेंच पाठविलें आहे. तासगांवाहून चिरंजीव केसोपंत काळे व त्र्यंबकभट वाटवे गेले आहेत. यंदाचा उष्णकाळ अतिशय! कागदीं लिहितां पुरवत नाहीं. उष्णकाळामुळें आह्मांस फारच श्रम होतात. प्रहर दिवस प्रातःकाळचा आला ह्मणजे दोन प्रहर रात्रपावेतों मोठी धगी शरीराची होती. यामागें असें उष्ण पाहिलें नव्हतें. कळावें. जासूद घरास गेले आहेत ते आले ह्मणजे मागून सविस्तर लिहितों. चिरंजीव सौभाग्यवती यमुनाबाई तळेगांवास सुखरूप पावली. पुण्यास पावून पत्रें परतां आलीं पालखी तळेगावांस पावून आणली दो चार रोजीं येईल. खंडोजी फराटे व मुरारजी गोडसे यांचीं पत्रें मुजरद माणसां-

---

१ येईल. २ नं० ९३५ च्या पत्रांतील शेवटचा मजकूर व त्यावरची टीप पहा.

बरोबर घरास प्रविष्ट करून उत्तरें आलीं तीं पाठविलीं आहेत. तशींच माणको बल्लाळ याचे घरचीं पत्रें पाठविलीं आहेत. ज्यांचीं त्यांस प्रविष्ट करावीं. लक्ष गोष्टीची गोष्ट छावणी न व्हावी हे इच्छा! श्री सत्तेनें घडेल तें खरें! बहुत सावधपणें रहावें. बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद. नारो अनंत (व) विठ्ठल अनंत लेले यांच्या घरचें पत्र पाठविलें आहे.

नं० ९६९ श्रीगणराज. (चैत्र वद्य नवमी. १९ एप्रिल.)

अपत्यें मोरोबानें साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत छ २२ जिल्हेज दोन प्रहर नजीक देवरायदुर्ग वडिलांचे आशीर्वादेंकरून वर्तमान यथास्थित असे. विशेष. वडिलीं पत्र पाठविलें तें पावलें. लिहिला मजकूर कळला. देवरायदुर्ग येथील किल्लेदाराच्या स्वाधीन निजगल वगैरे एक दोन किल्ले आहेत त्यास निजगलाजवळ उतरल्यानें किल्ला हस्तगत होईल, तोफांचें प्रयोजन नाहीं, ह्मणून श्रीमंतांचे पत्रीं होतें ह्मणोन लिहिलें तें कळलें. आज गुरुवारीं कूच करून भेटीस यावयाविशीं श्रीमंतांस विनंती केली. उद्ईक यावयाची आज्ञा झाली आहे. त्यास उद्ईक भेटीस येणार तर प्रहर सहा घटका रात्रीस तेथून निघोन दोन घटका दिवसास येथें यावें. चौदा घटका (चें लग्न) चांगलें आहे. तदोत्तर भद्रा लागतात. यास्तव चौदा घटकांच्या आंत येऊन भेटी घ्यावी हें उत्तम. मग पुढें समीप मुहूर्त नाहीं. वडिलांच्या विचारें साऱ्यांनीं भेटीस यावें असें आहे तर साऱ्यांनीं यावें. अथवा वडिलांनीं मात्र यावें. लष्कर एक झाल्यावर साऱ्यांच्या भेटी होतील. यांत वडिलांच्या विचारास येईल तसें करावें. विदित होय हे विज्ञापना.

---

१ पत्र गोपाळरावास मोरो बल्लाळ याचें.

## श० १६९२ हिंदुस्थानच्या स्वारीची कांहीं हकीकत. इ स. १७७०

नं० ९७० ( ४ मे. )

श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेशी.

विनंती[1] सेवक सदाशिव चिंतामणी कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती उपरी येथील वर्तमान तागायत वैशाख शुद्ध दशमीपावेतों स्वामींचे कृपें यथास्थित असों. विशेष. आपणाकडून पत्र आलें तें पावोन बहुत समाधान पावलों. ऐसेच निरंतर पत्र पाठवून सेवकाचा परामर्ष करीत गेलें पाहिजे. इकडील वर्तमान तरी चैत्र शुद्ध एकादशीस जाटाची लढाई संध्याकाळीं दोन घटका दिवसापासून ते चार प्रहर रात्र झाली. ( त्याचीं ) दहा बारा हजार घोडीं ( लुटून ) आणिलीं. दहा हत्ती आणिले. दौलतच लुटली गेली. गोवर्धनावर आठ दिवस मुक्काम होते. प्रस्तुत तेथून कूच करून श्रीमथुरा वृंदावन येथें मुक्काम आहेत. नजीबखान रोहिलाही भेटीस आला आहे. गाजुद्दीनखान ( ही आला आहे ) उदईक त्याची भेटी होणार. येथून पुढें काय तो मनसबा करून दिल्लीस जाणार अगर कोणेकडे जातील न कळे. जाटाची मसलत झालेशिवाय कोठें जात नाहींत. तेही बोलतात, परंतु हे[2] ऐकत नाहींत. शिंद्याचे विद्यमानें मामलत करावी ऐसें जाटाचें मानस. हे ह्मणतात जे होळकराचे विद्यमानें जें बोलणें तें बोलूं. ऐसा मजकूर आहे. ते कांहीं होळकराशीं बोलत नाहींत. राजश्री गोपाळ[3] गणेश जाटापाशीं आहे तो कांहीं लढाईस आला नाहीं. त्यास शिकांचे लढाईत जखम होती ह्मणोन न आला. अगोदर शिकांची व जाटांची लढाई मातबर झाली होती ते समयीं

---

१ उत्तरहिंदुस्थानांत रामचंद्र गणेश, विसाजी कृष्ण बिनीवाले, महादजी शिंदे व तुकोजी होळकर यांची उत्तरहिंदुस्थानांत या वेळीं स्वारी चालू होती तींतून हें गोविंद हरीस पत्र लिहिलेलें आहे. २ रामचंद्र गणेश व बिनीवाले. ३ बर्वे. यांचीच मुलगी पूर्वी दादासाहेबांस दिलेली होती. तिचें नांव जानकी बाई. ती मेल्यावर दुसरें लग्न झालें तें आनंदी बाईशीं.

गोपाळरायाची चाकरी झाली होती. मग जाटानीं त्यास पैका व सरंजाम बहुतच देऊन आपणांपाशीं ठेविला आहे. प्रस्तुत जाट खराबीस आला आहे. तोही भेटीस येणार. यांत घडेल तें प्रमाण. तिकडील वर्तमान सविस्तर लिहावयासीं आज्ञा करावी. बहुत काय लिहिणें लोभ असों दीजे. हे विनंती.

नं० ९७१ ( वैशाख शुद्ध द्वादशी. ६ मे. )

बापूजी बल्लाळ याचें मोरो बल्लाळास पत्र छ ९ मोहरमचें पुण्याहून—

" हिंदुस्थानांतून राजश्री रामचंद्र गणेश यांचीं पत्रें राजश्री नाना फडणीस यांस आलीं त्याचें वर्तमान दीगवाला नवलसिंग जाट यानें चढाई करून यांजवर सहा सात कोस चालून आला. तेव्हां त्याची व यांची मारगिरी तीन प्रहरपावेतों झाली. उपरांत रामचंद्र गणेश याणीं निकड करून हल्ला केला तेव्हां त्याचा मोड झाला. फौज लुटली गेली. तो मात्र सडा शें पन्नास राउतांनिशीं पळोन गेला. यांजकडे दहाचारशें घोडे पागेस व हत्ती दहा बारा व तोफा दहा पंधरा येणेंप्रमाणें लूट आली. फौजेस बहुत लूट सांपडली. तेथील बंदोबस्त करून पुढें गेले. नजीबखान रोहिला याजकडील वकील आला आहे. बोलणें होऊन भेटी सत्वरच होईल. पुढें शीकांवर जावयाची मसलत आहे. "

नं ९७२ ( वैशाख वद्य चतुर्थी. १२ मे. )

त्रिंबक हरीचें[1] पत्र गोपाळरावास १६ मोहरमचें.

" छावणीचा प्रकार पंचवीस तीस हजार फौज व तोफखाना ठेवणार व राजश्री त्रिंबक मामा यांस ठेवणार, उत्तम आहे. परंतु श्रीमंत राहिले असते ह्मणजे गोष्ट निराळी. बरें. हेंही उत्तमच आहे. "

---

१ पुण्यास पटवर्धनाचें दुकान होतें त्यावरील हा कारकून.

शा० १६९२ **निजगल.** इ. स. १७७०

नं ९७३ L **श्री.** ( वैशाख वद्य चतुर्थी. १३ मे. )

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री रामचंद्रपंत गोरे स्वामीचे सेवेशीं पोष्य बाळाजी जनार्दन[1] साष्टांग नमस्कार विनंती उपरी येथील कुशल तागायत छ १६ मोहरमपावेतों वर्तमान यथास्थित असे. विशेष. श्रीमंतांचीं पत्रें छ० ३ मोहरमचीं निजगल किल्ला येथील मुक्कामचीं आलीं. किल्ला हल्ला करून घेतला. श्रीमंत राजश्री रावसाहेब हल्लयाचे वेळीं उभे होते त्यांचे पाठीमागें श्रीमंत राजश्री नारायणरावसाहेब उभे होते. त्यांचे उजवे हाताचे मनगटावर गोळी चाटून गेली. हलकी आहे. लवकरच बरी होईल ह्मणून श्रीमंतांचे पत्रीं व हरीपंते[2] वगैरे यांणीं लिहिलें आहे. ईश्वरें मोठी खैर केली. श्रीमंत मातुश्री बाईसाहेबांसही पत्रें श्रीमंतांनीं लिहिलीं आहेत तीं सांडणिस्वार घेऊन आले आहेत. त्यांत सविस्तर असेलच. बहुत काय लिहिणें लोभ कीजे हे विनंती.

पै॥ छ १८ मोहरम.

नं० ९७४ **श्रीशंकर.** ( वैशाख वद्य षष्ठी. १६ मे. )

श्रीमंत राजश्री दादा स्वामीचे सेवेशीं.

विनंती सेवक महादाजी[3] अनंत साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत छ १९ मोहरमपावेतों सेवकाचें व परगणे बाळापुरचें वर्तमान यथास्थित असे. विशेष. स्वामीची आज्ञा घेऊन आलों तो ठाणें मजकुरी सुखरूप पावलों. इकडील वर्तमान तर हैदरखान पट्टणामध्यें आहे. ( त्यानें ) तीस हजार बार[4] जमा केले. दहा हजार फौज आहे.

---

१ पत्र नानाफडणिसाचें गोपिकाबाईच्या कारकुनास. २ फडके. ३ पत्र बाळापुरच्या कमाविसदाराचें गोपाळरावास. ४ गारदी.

चाळीस तोफा सिद्ध केल्या आहेत. सात आठशें फिरंगी येऊन कोइमतुराहून पोंचले. (त्याचा) महमदअली याजकडे वकील गेला आहे. फिरंगी[1] व महमदअलीची फौज येणार हैदरखान याचे कुमकेस ह्मणून फार आवाई आहे. पांच सात हजार बार व कांहीं तोफा राऊत मागडीस इंगल शामराव याजबराबर देऊन पाठविले ते मागडीस येऊन चार पांच दिवस झाले. शिब्या वगैरे सरंजाम बराबर आहे. दोहों चौ रोजांत हैदरखानही मागडीस येणार ह्मणून आवाई आहे. सरकारच्या ठाण्यांस कांहीं तरी दगा करावा ह्मणून (त्याचा) मनसबा आहे. देवनहळ्ळीस शें दोनशें प्यादे कामाठी आले आहेत. ठाणें फिरून बांधणार. रयतेस कौल दिला. देवनहळ्ळी तालुक्यांत रयत येऊन वसाहत होत आहे. सरकारची फौज देशास झाडून गेली ह्मणून फार आवाई (त्याच्या लष्करांत आहे.) टिपूखान यांणीं सावनूर प्रांतीं फार दंगा केला, मातबर गांव मारून नेले, ह्मणून खबर आहे. छावणीस फौजा राहिल्या हें त्यांस ठाऊकच नाहीं! एक वेळ स्वारी या प्रांतास आलियास सरकारच्या ठाण्यांत लोक आहेत त्यांस भरंवसा येईल आणि शत्रूसही दाब पडेल. स्वामीचा तूर्त मुक्काम कोठें आहे तें लिहावयासी आज्ञा झाली पाहिजे. मी येथें आल्यावर अंजीर द्राक्षांची डालीं पाठविली तीं मार्गीं लुटली जाऊन माणसें रडत माघारीं आलीं! ऐसा प्रकार आहे. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

पै।। छ २४ मोहरम.

नं० ९७५ श्री. (ज्येष्ठ शुद्ध पंचमी. २९ मे.)

श्रीमंत राजश्री रावजीदादा स्वामीचे सेवेशीं.

सेवक रोजो तमाजी व भास्करराव रामचंद्र कृतानेक साष्टांग नमस्कार[2]

---

१ मद्रासकर इंग्रज. २ दोघा कारकुनांचें सावनुराहून गोपाळरावास पत्र.

श० १६९२ निजगल. इ. स. १७७०

विनंती येथील कुशल तागायत छ ३ सफर स्वामीच्या कृपें यथास्थित जाणून स्वकुशल लेखनाज्ञा केली पाहिजे. विशेष. इकडील वर्तमान सविस्तर लिहून दोन जोड्या सेवेशीं पाठविल्या आहेत त्याजवरून सकल भाव अवगत झाले असतील. (टिपूनें) सांप्रत सावनूर तालुक्यापैकीं नेरगल, मनगी, आडूर, बनगल, याशिवाय लहान-लहान सात आठ खेडीं मारून तलफ करून खंडणी केली. तूर्त हनगलांत टिपूचे लोक तहसील करितात. कोसीं दोन कोसीं अकबर-खान फौज गारदी घेऊन सोंधें तालुक्यांत आहे. पुढें सावनूर तालुक्यांत ठाणीं बसविणें ह्मणून टिपूस हैदरनाईकाचीं पत्रें आलीं आहेत. एक दोन रोजांत राणेबिदनुरास येणार. तेथून बातमी तहकीक आली. शिकारपुरांत तोफखाना वगैरे तयारी होते. सर-कारांत मातबर ठाणें आहेत. आपणांस अवगतच आहे. तत्रापि आयत्या स्थलांत प्यादे दारुगोळी जकीरा वगैरेचा बंदोबस्त केला आहे परंतु त्याची दहशत भारी. लोकांचा टिकाव होऊं पावत नाहीं. येथून उपराळा करावा तर राजश्री भोंसले व धायगुडे यांची फौज धारवाडीं आहे ती इकडे येऊं पावत नाहीं. श्रीमंतां-कडून पांच हजार स्वारांचे भरतीस येते ह्मणून आपण लिहिलें होतें. येथून पत्रें श्रीमंतांस पाठविलीं आहेत परंतु फौज येतां दिसत नाहीं. अशा प्रसंगीं बाबूराव जगजीवन यांस फौज घेऊन येणें ह्मणून स्वामींनीं पत्रें पाठविलीं आहेत. राजश्री जावयाविशीं जलदी करितात. आपणाजवळ पंचवीस हजार फौज. शिवाय तोफखाना गारदी आहेत. या प्रांतीं हजार पांचशें राऊत राहिल्यानें स्वामीच्या जमावांत कमी पडतो असा +

पै॥ छ २७ मोहरम.

---

१ तुह्मीं.

नं० ९७६ श्रीगणराज. ( ३० मे. )

चिरंजीव राजश्री मोरोपंत आबा यांसी प्रती गोपाळराव गोविंद आशीर्वाद उपरी येथील कुशल तागायत जेष्ठ शुद्ध षष्ठी बुधवारपावेतों नजीक यल्लापानाईक होसकोटें वर्तमान यथास्थित जाणून स्वकीय कुशल लिहीत जावें. विशेष. तुम्हीं तुंगभद्रातीर पार झाल्यावर पत्र पाठविलें होतें त्या अलीकडे वर्तमान कळत नाहीं. तर सविस्तर लिहावें. तुम्हीं श्रीमंतांसमागमें कोठपर्यंत गेला होता, श्रीमंतांचा निरोप घेऊन मिरजेस कधीं गेला, हें मिरजेस गेल्यावरी सविस्तर लिहावें. इकडील वर्तमान हैदरखान पट्टणासच आहे. बाहेर निघावयाचे तरतुदेंत आहे. देवनहळ्ळीजवळ हजार दीडहजार फौज व दोन हजार गारदी आले आहेत. चिकबाळापुरकरांची व त्यांची झटापटी एक दोन वेळां झाली. इकडील व तिकडील मिळून तीस पावेतों माणूस जायां जखमी झालें. माघारे फिरून देवनहळ्ळीस येऊन राहिले. थोरल्या बाळापुरचीं गुरें वळवून नेलीं व दोन तीन गांवांत ठाणीं घातलीं. थोरल्या बाळापुरची पेठ ओस झाली. अशी गडबड तिकडे आहे. हगलवाडीकर संस्थानिक जमाव करून सरदेच्या ठाण्यानीं होतांच हगलवाडीवर ( शत्रू ) चालून आले. आंतील सावध होऊन मारामार करून नामोहरम करून दिले. त्याजकडील पांच सहा माणूस ठार झालें व कांहीं जखमी झालें तेव्हां माघारे निघोन गेले. दुसरे दिवशीं ( आमचे ) गारदी ठाणें टाकून आले व तसेच मागाहून जीवनरावही आले! त्यांस वर्तमान कळतांच संस्थानिकांचें सामान येऊन हगलवाडीच्या ठाण्यांत शिरलें. गारदी टाकूनच आले. इलाज नाहीं. शिऱ्यांत महमंद इसफ यास चारशें गाड्यांनिशीं पाठविला. तेथील चांगला बंदोबस्त करून बाळापूर प्रांतास जाणार. सावनूर प्रांताकडील वर्तमान तरी टिपूसुलतान यानें आगडीची पेठ मारिली

---

१ नारायणराव पेशव्यांचा पुढें ज्या गारद्यानीं खून केला, त्यांत हा महमद इसफ मुख्य होता. याची आणखी हकीगत पुढें यावयाची आहे.

होती हें वर्तमान तुह्मांस कळलेंच होतें. तदोत्तर वर्तमान तरी नेरगल, आडूर व हनगल वगैरे पांच सात गांव मारून फस्त केले. ब्राह्मणांस मारिलें. कांहीं निर्नासिक केले. बायका धरून नेल्या. असा अतिशय केला. राहिले परगणे व गांव मारणार. राजश्री आप्पाजीराव व नरसिंगराव धायगुडे यांणीं फौज धारवाडास ठेऊन श्रीमंतांकडे गेले. लक्ष्मेश्वर, हुबळी वगैरे तालुका तमाम फुटला. तडस त्यांचे तोंडीच आहे. परंतु त्यांनीं होऊत अद्यापि उपद्रव दिला नाहीं. हुबळी कांहींशी अलीकडे आहे ह्मणून ही वेळपावेतों उपद्रव नाहीं. राजश्री बाबूराव जगजीवन यांस इकडे यावयाविशीं पत्रें पाठविलीं होतीं तों ही गडबड झाली. नबाब सावनूरकर यांणीं त्यांस ठेऊन घेऊन आह्मांकडे बजीद होऊन पत्रें पाठविलीं कीं, यांस ठेवणें ह्मणून लिहिलेवरून मशारनिल्हेस न येणें ह्मणून लिहून पाठविलें आहे. ते सावनुरासच रहातील. सावनूरप्रांत व सरकार तालुका जातो ह्मणून आह्मीं हांका मारीतच होतों परंतु ऐकतो कोण! श्रीमंतांनीं आमची व तालुक्यांची आशा सोडून गेले! इलाज काय करावा! आह्मीं ज्या गोष्टी ह्मणत होतों त्याच निदर्शनास येत चालल्या. तालुका गेला ह्मणजे पोटास कोणत्या ऐवजीं खावें? छावणी श्रम साहस करून शेवटीं श्रीमंतांपाशीं पैका मागूं तेव्हां श्रीमंतांचें वाईट असें कपाळास येईल! इलाज काय करावा! कृष्णेवर असतां श्रीमंतांस वर्तमान तिकडील तालुक्याचें कळोन फौज बंदोबस्ताजोगी पाठविली असल्यास उत्तमच झालें. नाहीं तरी श्रीमंतांकडे तुह्मीं लिहून पाठवून तरतूद करणें. तुमच्यानें बंदोबस्ताची तरतूद होईल ती कागदींपत्रीं श्रीमंतांस लिहून करवावी. चित्रदुर्गाहून वीस हजार होनांचा ऐवज राऊत घेऊन आले. बाकी ऐवज राहिला तो पंधरा दिवसांत येईल. राजश्री देवराव यांणीं लिहिलें होतें कीं राजश्री पुरुषोत्तम तमाजी[1] यांणीं संस्थानिकांस लिहिलें कीं 'लष्करांत आबास चार हजार होन

1 चित्रदुर्गकराचा कारभारी.

दिले आहेत, तरी भरण्यपैकीं वजा करून घेणें ' ह्मणून लिहिलें होतें, ह्मणोन राजश्री देवराव यानीं लिहिलें. तुमचें पत्र देवराव यास नव्हतें. तुह्मीं चार हजार होन घेतलेत कीं काय? चार हजार होन घेतलेत असले तरी तो ऐवज व बाकीचा राहिल्यापैकीं झाल्याचा व चिरंजीव उभयतांचा ऐवज वजा होऊन बाकी आह्मांस काय ऐवज राहणार? आह्मीं खावें काय? तुह्मीं मिरजेस जाऊन तरतूद करून पाठवावा तो ऐवज येऊन कधीं पावणार? परम संकट पोटाचें आहे. ' राजश्री बापूजी नारायण व सिनापानाईक यांस आणून अदवानीच्या ऐवजाचें मनास आणून तो तूर्त कामावर पडे अशी तरतूद करितों आणि लिहून पाठवितों ' ह्मणून बोलून गेलां त्याचें काय केलें तें कांहींच लिहिलें नाहीं! तरी त्या ऐवजाचें काय केलेंत तें लिहून पाठविणें. सारांश कळेल तसें करून ऐवजाची तरतूद करून ऐवज पाठवून देणें. रानांत पोटापाण्याचा गळाठा न होय ती गोष्ट करावी. सावनूर प्रांतच्या मामलतेंतील ऐवज वसूल होऊन आमचे उपयोगीं पडणें अगर रदकर्जास देणें हें कळोन चुकलें! मामलतीची मामलत गेली. आह्मीं तूर्त काय खावें? पुढें श्रीमंतांस विनंती करीत मुत्सद्दी यांचीं घरें पुजीत बसावें तेव्हां श्रीमंतांस साल्जाब करावयाची जलदी काय! असें करितां निकड केलीच तरी जामीन देऊन " मामलतींत खराबी काय झाली, हैदरखान यानें तुमचे गांव किती मारिले तें मनास आणून आज्ञा करणें ती करूं. गांव हैदरखान यानें मारिले नाहीं तें तुह्मीं कां कळविलें नाहीं? " ह्मणतील! इतकेंही कपाळास येतें! तुमचा इलाज काय! तुह्मी गेल्यापासून सावनूर प्रांतची रड नित्य येते. नबाबाचींही पत्रें येतात जे तुमची तरी फौज आहे ती तरी असो देणें. तसेंच लक्ष्मेश्वरचींही पत्रें आलीं जे राजश्री बाबूराव जगजीवन यांस इकडे ठेवावें. त्याजवरून मशारनिल्हेस सावनुरीं राहणें ह्मणून लिहिलें आहे. तुह्मीं श्रीमंतांपाशीं असतांही सावनूर प्रांताचें वर्तमान आलेंच होतें. राजश्री नारो बाबाजी

## त्रिंबकरावमामा छावणीस येतात.

व भोसले सडे श्रीमंताकडे गेले होते त्यांची तरतूद करून ( श्रीमंतांनीं ) बंदोबस्त करणें कळतच आहे ! तथापि कांहीं तरतूद केली न केली हें लिहिणें. आह्मीं तो सावनूर प्रांताची आस्था गडबडीमुळें सोडिली. मिरज प्रांतची गुदस्तांची आशा नापिकामुळें सोडिली. मागील बाकी सहजच बुडत आहे. या सालीं पर्जन्य पडला तरी पेस्तर अखेर सालपावेतों हें साल झडणार अशी अवस्था. यास्तव सरदारी नको ह्मणत होतों परंतु तुह्मीं आमचे बऱ्याचकरितां आग्रह करून राहविलें. राहिलों. परंतु श्रमी होऊनही परिणाम नाहीं. आजपासून वर्ष-पावेतों काळजी कोठपावेतों करावी? पुढें असलें दैव अनुभवीतच आहों. या प्रांतांत महागाई फार. लोकांचें नित्यकृत्य चाललें पाहिजे. पोटास पाहून दिलें पाहिजे. कोणी राहुटीस, पालास, कोणी नालबंदी, ह्मणोन मागणार. यास्तव ऐवजाची तरतूद पाहिजे. आमचे हाता-खालीं ऐवज असला तरी पुढील काळजी करीत नाहीं. मग सावकार पैजारा मारतील तेव्हां मारोत! परंतु या शिलेदारांच्या पैजारा न बसत तें करणें. राजश्री त्रिंबकराव मामा बलावितात तेसमयीं जातों. पुसतात तें यथामतीनें सांगोन आजपावेतों रंगानेंच आहों. पुढें होईल तें लिहून पाठवूं. बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद.

पै॥ छ ९ सफर.

नं० ९७७ श्रीगणराज. ( ज्येष्ठ शुद्ध षष्ठी. )
३० मे. )

चिरंजीव राजश्री मोरोबा आबा यांसी प्रती गोपाळराव गोविंद आशीर्वाद उपरी आह्मीं रायदुर्गाहून इकडे आलों. तुह्मीं तिकडे गेलां. त्याजनंतरचें वर्तमान तरी आह्मीं लष्करांत आल्यानंतर चिरंजीव राजश्री नीलकंठराव यांस राजश्री त्रिंबकराव मामानीं बोलावूं पाठविलें होतें. त्यांजकडे गेले होते. मामा बहुत प्रकारें बोलिले कीं ' आह्मीं

व रायानीं एक विचारें रहावें. दुसरा विचार आमचा नाहीं. ह्मणून बहुता प्रकारें बोलून आमच्या डेऱ्यास आले होते. बोलणें चालणें समक्षही बोलिले. आह्मीं केवळ तुटक जाबसाल सांगावा कीं ' कारभारावांचून प्रयोजन काय? तुमच्या विचारास येईल तें करावें. आह्मांस चाकरी सांगाल त्याप्रमाणें करूं. ' असेंच ह्मणावें, त्यास छावणीस न रहावें या अन्वयें कसेंही ह्मणत होतों. शेवटीं राहणें प्राप्त झालें. तेव्हां उदास राहून छावणी करावी. आमच्या उदासपणाचें निमित्य करून सरकार काम न झालें असें कशास पाहिजे? याजकरितां आह्मीं मामांच्या डेऱ्यास गेलों होतों. दुसरे दिवशीं राजश्री मुरारराव घोरपडे यांच्या डेऱ्यास गेलों होतों. राजश्री सेनापति आमच्या डेऱ्यास आले तेव्हां आह्मीं मिळोनच मामाकडे गेलों होतों. कूच करावें, पुढें जाणें येणें, याचाही निश्चय बोलण्यांत आला. रास्ते व आनंदराव गोपाळही आले होते. सर्वांचे मतें ठरलें ( कीं ) निलगड पावगड वगैरे तलुक्यांत पंधरा दिवस गुजराण करावी. उपरांतिक ठाणीं पुढें टाकून दाणा वैरणीची सोय पाहून करणें तें करावें. याप्रमाणें ठरलें. राजश्री मुकुंद श्रीपत यांस दूर करूं नये ह्मणून आह्मीं श्रीमंतांस विनंती केली होती परंतु ती गोष्ट न घडली. राजश्री महिमाजी शिंदे यांस श्रीमंतांनीं शिऱ्यांस पाठविलें. मशारनिल्हे लष्करांत आले. त्यांस पाठविलें हें मामाच्याही ध्यानास आलें नाहीं. आमच्याही विचारास तर आलेंच नव्हतें परंतु श्रीमंतांनीं पाठविला तेंच मान्य करून बंदोबस्त करावा हीच गोष्ट प्राप्त झाली. तेव्हां त्याची तोड काढिली. राजश्री सखाराम हरीपाशीं बळवंतराव परभू होता. बरा मर्द माणूस खटपट्या चांगला आहे. याजकरितां त्यांची व महिमाजी शिंदे यांची गांठ घालून दिली. महमद इसफ गाडदी यास हमवार करून चारशें गाडद्यांनिशीं शिऱ्यांस पाठविला. येणेंप्रमाणें रवानगी झाली. शिऱ्यांचा बंदोबस्त चांगला झाला. आठ चार दिवसांच्या वाटेवर फौज गेली तरी जुमास खाणार नाहीं असा बंदोबस्त शिऱ्यांचा

झाला. हगलवाडीच्या संस्थानिकास काल पत्र पाठविलें आहे. तो आला तरी त्याचे गळीं ठाणें घालणार. तें न बनलें तरी कोणी मर्द माणूस हगलवाडीस पाठवून बंदोबस्त करून मग दाणा वैरणीची सोय पाहून चार दिवस गुजराणा करूं. परशरामपुराहून कूच करून नजीक कुदरुपी जवळ आलों. हैदरखान पट्टणासच आहे. मागडीकडे येणार आहे ह्मणून वर्तमान आहे. आह्मीं मामाच्या डेऱ्यास जात असतों. आपले तर्फेनें वांकडें तिलमात्र पडों देत नाहीं. हगल-वाडींत शिरें तालुकेचे सरदेस बातमीस जासूद जोड्या व शिऱ्यांस दोन तीनशें राऊत बातमीच्या कामासाठीं ठेविले आहेत. बातमी कळत जाईल. निजगल व देवरायदुर्ग या प्रांतें बैद आले आहेत. राजश्री महादाजीपंताचें बाळापुराहून पत्र परवां आलें होतें. पेठ बाळापुरची ओस झाली आहे. सामान आहे तितक्यानिशीं सावध आहों ह्मणून लिहिलें होतें. हैदरखान पट्टणास आहे. कोईमतुरा-कडून पायींचें माणूस आणिलें आहे. तोफांचा वगैरे सरंजाम करून बाहेर निघणार. मागडीकडे येणार. मागडीस कांहीं फौज बार व चार तोफा आल्या आहेत ह्मणून लिहिलें होतें. देवनहळ्ळी बांधा-वयास लाविले आहेत. मुलुखास कौल देवनहळ्ळीचा दिला ह्मणून लिहिलें होतें. आह्मीं चिकबाळापुरच्या रोखें गेलों ह्मणजे शत्रु ठाणीं टाकून पळतील! श्रीमंत देशास गेले, फौज मातबर छावणीस राहिली, ही बातमी कळल्यानंतर हैदरखान काय मनसबा करील पहावा. मागाहून सविस्तर लिहून पाठवूं. काल हगलवाडीहून बातमीचें वर्तमान आलें जे हैदरखान खासा पांच सहा हजार फौज व दहा हजार गाडदी व तोफा येणेंप्रमाणें सामानानिशीं बाणावराकडे आला आहे, पुढें ठाण्याठुण्यास अथवा हरएक जागां घालमेल करावी या मनसुब्यांत आहे, ह्मणून लिहिलें आहे. बाहेर मैदानांत येणार

नाहीं. व जोरबेजार ठाण्यास येऊन त्यांच्यानें लागवत नाहीं असें मनसब्याचे रीतीनें दिसतें. तलाप बाहेर निघाला तरी चिंता काय आहे! सरकारचेंही सामान थोडकें नाहीं. पुढें तो काय मनसबा करितो हें मागाहून लिहून पाठवितों. टिपू बिदनूर प्रांतीं आहे. झाडीचे आश्रयानें उपद्रव करावयाची (त्याची) तजवीज आहे. सावनूर प्रांतांतून वर्तमान तुह्मांस येईलच. बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद.

नं० ९७८ L श्री. (४ जून.)

श्रीमंत मातुश्री बाईसाहेब वडिलांचे सेवेशीं.

विनंती सेवक बाळाजी जनार्दन[1] कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना येथील वर्तमान जेष्ठ शुद्ध एकादशीपावेतों आपले आशीर्वादेंकरून यथास्थित असों. विशेष. श्रीमंतांचीं पत्रें कृष्णे अलीकडे रामतीर्थचे मुक्कामचीं आलीं. ग्रहणास कृष्णातीरीं सुवर्णतुला केली. नारायणरायांचे हाताची जखम बरी झाली. पाणी घेतलें.[2] त्यांनींच स्वदस्तुरें पत्र मला लिहिलें तें पाहून हात बरा झाला असें वाटलें. दर मजल जेष्ठ वद्य पंचमीस येणार. आपली स्वारी कधीं निघाली, पुण्यास कधीं येणार, हें लिहून पाठवावयासीं आज्ञा केली पाहिजे. आपली स्वारी पुण्यास येते हें श्रीमंतांस मी लिहून पाठविलें. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

---

१ नाना फडणिसाचें गोपिकाबाईस पत्र. २ स्नान करूं लागले. जखम बरी झाल्यामुळें पाण्याच्या स्पर्शानें ती नासेल ही भीति राहिली नाहीं.

# हैदरअल्लीवर तिसरी स्वारी.

## भाग दुसरा.

गोपाळराव पटवर्धन आतां स्वारी शिकारीच्या दगदगीस कंटाळला होता व ही सरदारी आतां आपणास नको असें तो वारंवार ह्मणून दाखवीत असे. या स्वारींत त्यास किती त्रास पडला व कसे हाल झाले हें मागें वर्णिलेंच आहे. त्याचें नुकसानही पुष्कळ झालें होतें व कर्ज झाल्यामुळें सावकारांचा जाचही सोसावा लागत होता. या सर्व कारणांनीं व शरीरप्रकृति नीट नसल्यामुळें त्याच्या मनास औदासिन्य प्राप्त झालें होतें. छावणीस राहण्याचें त्याच्या मनांत नव्हतेंच. तथापि खुद्द पेशवेच जर छावणीस राहिले तर त्यासही राहणें प्राप्तच होतें. गोपाळरावाएवढा कर्नाटकच्या मसलतींत अनुभवी सरदार पेशवाईत दुसरा नव्हताच. त्यामुळें पेशवे देशीं गेले तर आपणास कर्नाटकचे फौजेवर मुख्य सरदार नेमितील व छावणीस ठेवितील असें त्यास वाटणें साहजिकच होतें. तसें झाल्यास ती गोष्ट निरुपाया-मुळें कबूल करावी, परंतु कबूल करण्याआधीं आपल्या जहागिरीसंबंधानें कांहीं गैरसोई आहेत त्या श्रीमंतांनीं दूर कराव्या व नुकसान झालें आहे तें कांहीं पर्यायानें भरून द्यावें असें त्याचें ह्मणणें होतें. परंतु श्रीमंत स्वतः छावणीस राहिले नाहींत व गोपाळरावास त्यांनीं मुख्य सरदार नेमून त्याच्या हवालीं कर्नाटकची फौज करावी तेंही केलें नाहीं. त्यांनीं तिसरीच गोष्ट केली. ती गोष्ट ह्मणजे त्रिंबकराव मामाची नेमणूक ही होय. आतां मामाच्या हाताखालीं वागून आपणास छावणीस राहणें भाग पडलें ही गोष्ट गोपाळरावास परम असह्य वाटली. त्यानें कृतीनें वैषम्य दाखविलें नाहीं हें खरें, परंतु यापुढें पटवर्धनांच्या

## हैदरअल्लीवर तिसरी स्वारी.

मिळाला नाहीं पण त्याबद्दल मदगिरी मिळाला. शिवाय वीस लक्षांचा मुलूख गुरमकोंड्याचा त्यांनीं घेतला होता तोही त्यांजकडे कायम राहिला. याखेरीज त्यांनीं हैदराचा जितका मुलूख घेतला होता तितका सर्व परत दिला. हैदरानें पेशव्यांस खंडणीबद्दल पन्नास लक्ष रुपये व त्रिंबकराव वगैरे सरदारांस 'दरबारखर्चा' बद्दल दहा लक्ष रुपये देण्याचें कबूल केलें. त्यांपैकीं चार लक्षांचें जवाहीर, एकंदर एक लक्ष किमतीचे वीस हत्ती, व सत्तावीस लक्ष रुपये रोख याप्रमाणें बत्तीस लक्षांची भरती करून दिली. बाकी अठ्ठावीस राहिले त्यांची सावकारी निशा पटवून दिली. हैदराकडील पैका हातीं येतांच ज्येष्ठ शुद्ध पौर्णिमेस फौजा परत निघाल्या, त्या तुमकुरावरून शिऱ्यांपर्यंत आल्या आणि तेथून निरनिराळ्या वाटांनीं आषाढ संपतां संपतां तुंगभद्रेवर येऊन महाराष्ट्रांत आपापल्या ठिकाणास गेल्या.

ही मोहीम सन १७७० च्या जानेवारींत सुरू झाली ती १७७२ च्या जुलईत संपली. ह्मणजे मराठी फौज कर्नाटकांत सारखी अडीच वर्षें राहिली होती. या स्वारींत पटवर्धनांचें अतोनात नुकसान व हाल झाले. त्या घराण्यांतले गोपाळराव, नीलकंठराव व माधवराव हे तीन पुरुष या स्वारीच्या कामावर मरण पावले. त्यांत गोपाळरावाच्या मरणानें पेशवाईचें जें नुकसान झालें तें पुनः भरून आलेंच नाहीं. स्वारीच्या खर्चाबद्दल त्यांस दहा बारा लक्ष रुपये कर्ज झालें व संसाराचीही वाताहत होऊन गेली. गोविंद हरि, त्रिंबक हरि व कृष्णंभट हे तिघे वार्धक्यानें जर्जर झालेले व पुत्रशोकानें पोळलेले बंधु आशा करीत होते कीं, लवकर तह होऊन स्वारींतून आपलीं मुलें घरीं येतील व त्यांस आपण डोळे भरून पाहूं. पण ती यांची आशा सफल झाली नाहीं! चातकाप्रमाणें वाट पहातां पहातां त्यांस मृत्यू आला. नीलकंठरावाच्या पथकावर आतां त्यांचा मुलगा रघुनाथराव नीलकंठ हा सरदार झाला होता. तो अल्पवयी असल्यामुळें त्याचा चुलता कोन्हेरराव हान मुख्यत्वें सरदारीचें काम चाल-

वीत होता. वामनराव प्रकृतीनें अशक्त असतांही वाडवडिलांच्या लौकिकाचा अभिमान धरून रात्रंदिवस मेहनत करून या स्वारींत पडेल ती कामगिरी रगडून नेत होता. या स्वारींत परशुरामभाऊ दोनदां अजारी पडला होता. त्यांत गेल्या पौष महिन्यांत त्याचा इतका वाखा झाला होता कीं, आतां हा खचित वांचत नाहीं असेंच सर्वांस वाटलें होतें. पटवर्धनाप्रमाणेंच इतर सरदारांचीही हलाखीची स्थिति होती. शिलेदार लोकांचे तर हाल पुसूंच नये! पहिल्या वर्षींच्या छावणीस ते आपखुषीनें राहिले नव्हतेच. त्यांची कायती सारी ओढ घराकडे होती. तथापि तसेच दिवस ढकलीत असतां दुसरा पावसाळा येऊन पुनः छावणीचा प्रसंग आला तेव्हां सरदारांनीं यांच्या हाता-पायां पडून त्यांस मोठ्या मिनतवारीनें राहविलें. पुनः तें वर्ष लोटून तिसरा पावसाळा आला तरी तह होत नाहीं असें कळल्यावर मात्र त्यांनीं अगदीं ताल टाकिला! सांगितलेलें काम ऐकूं नये, नेहमीं गवगवा करावा, विचारल्यापुसल्याशिवाय शेंपन्नास स्वारांनीं एकदम लष्करांतून निघून देशीं यावें असें होऊं लागल्यामुळें सरदार लोक अगदीं मेट्टाकुटीस आले होते. कसेंहीकरून तह करावा ह्मणून ते त्रिंबकरावाच्या नेहमीं विनवण्या करीत होते व आपणास देशीं परत बोलवावें ह्मणून पेशव्यांच्या दरबारीं वशिले बांधित होते! परशुरामभाऊनें तर आपल्या चुलत्यास व आईस साफ लिहून पाठविलें होतें कीं, यंदां तह होवो अगर न होवो, आपण कांहीं छावणीस राहणार नाहीं. आपण घरीं येणार त्याबद्दल श्रीमंतांनीं जहागीर जप्त केली तरी बेहत्तर!

या स्वारींत विजयी झालेल्या मराठ्यांची जर इतकी दुर्दशा झाली होती, तर पराजय पावलेल्या हैदराची दुर्दशा किती झाली असेल याचा वाचकांनींच विचार करावा.

---

शा० १६९२ **चिकबाळापुरची लढाई.** इ. स. १७७०

नं० ९७९ ( ज्येष्ठ वद्य द्वितीया. १० जून. )

“ गांठ + पडली. ते बेखबर होते. एकाएकींच फौज गेली तेव्हां गोटांत गडबड झाली. झुजावयास अवसान झालें नाहीं. एक शिलक गाड्यांनीं केली. पांच सात बार तोफांचे झाले. आमचे लोक गोटांत सरमिसळ झाले. हत्यार लागलें नाहीं. गडबडून पळूं लागले. गाड्यांच्या बंदुका झाडून घेतल्या. तोफा बैलसुद्धां तीन घेतल्या. घोडे पांचशेंपर्यंत घेतले. कांहीं शें दोनशें झाडींत पळाले. दोन कोसपर्यंत आमच्या लोकांनीं पाठलाग केला. फारकरून पाडून आणिलें. माणूस फार मारिलें. आह्मांकडील सर्व खैर झाली. राया[1]-कडील कांहीं जखमी व ठार झाले त्याची याद अलाहिदा आहे त्यावरून विदित होईल. आमच्या पागेंत चार घोडे सांपडले. वरकड लोकांकडे वीस पंचवीस सांपडले. तीर्थरूप रायाकडे व चिरंजीव भाऊकडे घोडे दोन तीनशेंपर्यंत सांपडले. याप्रमाणें झालें. उपरांतिक माघारे येऊन त्याच तळावर राहिलों. मागाहून बुनगेंही तीन मजलीनें आलें. दुसरे दिवशीं गांवास आलों. सर्व ईश्वरें खैर केली. शत्रूवर दबाव बसला. ठाणेंसही अवसान आलें या उपरांतिक दाणा वैरण पाहून कूच करून आसपास जातील. शुद्ध एकादशीस वर्तमान आलें. द्वादशीस तयारी केली. त्रयोदशीस गेलों. चतुर्दशीस मोडिले. पूर्णिमेस माघारे आलों. इतकें वर्तमान झालें.*........तेरदाळचीं खेडीं साठ हजारांचीं चिरंजीव आबांनीं येथें द्यावयाचा करार केला आहे, त्यास वडिलीं खेडीं नेमून घेऊन बंदोबस्त करावा. खेडीं सरसनिरस पाहून त्यांचे आपले सोईनें ध्यावीं. पांचशें घोडे सांपडले त्यांपैकीं आमचीं तिन्ही पथकें देखील पेंढारी तीनशें घोडे सांपडले. मुराररात्र यांजकडे

+ नीलकंठराव त्रिंबक यानें त्रिंबक हरीस लिहिलेल्या पत्राचा हा एकच बंद सांपडला. * येथील मजकूर अनवश्यक ह्मणून गाळला आहे. १ गोपाळरावाकडील.

पन्नास घोडे सांपडले. हुजरात व रास्ते मिळून दीडशें सांपडलीं. याप्रमाणें पांचशें घोडे सांपडले. सात आठ उंट सांपडले. मुख्य गोष्ट शत्रूवर दबाव चांगला बसला. तोफा लहान अडीच शेरी एक, तीन शेरी एक, चार शेरी एक, अशा तीन आहेत. मुख्य गोष्ट शत्रूवर दबाव चांगला बसला. आतां किरकोळ फौज येऊन उपद्याप होणें नाहीं. तो[1] खासा भारी सामानानिशीं येऊन घसघस केली तर न कळे. तूर्त गुरमकोंडें प्रांतीं चारा पाणी पाहून फिरणार. दाणा महागाई आजपावेतों आहे. दीड पायलीपासून तीन पायलीपर्यंत मिळतात. अधिक चढत नाहीं. याउपर पहावें. आमची काळजी न करावी. सुखरूप आहों. वरचेवर पत्रें पाठवीत नाहीं. फार दिवस झाले. पत्रें आलीं नाहींत. आह्मीं येथून शेळ्या व तट्टें पाठविलीं तीं पावलींच असतील. वडिलीं सविस्तर लिहावें. शांतिपर्वाचे पोथीविषयीं लिहिलें होतें त्यास मिरजेस पोथी आहे ती आणून पर्जन्याची सांभाळून पाठवावी. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं० ९८० श्रीगणराज. ( १० जून )

चिरंजीव राजश्री तात्या यांसी प्रती गोपाळराव गोविंद आशीर्वाद. उपरी येथील कुशल तागायत ज्येष्ठ वद्य द्वितीया मुक्काम पेरसमुद्र तालुके चिकबाळापूर जाणून स्वकीय कुशल लिहीत जावें. विशेष. आह्मीं इकडे छावणीस राहिल्यानंतर दोन तीन पत्रें तुह्मांकडे पाठविलीं तीं पावलीं असतील. परंतु तुमचें पत्र एक महिना येत नाहीं. असें न करितां सदैव पत्र पाठवीत जावें. इकडील वर्तमान तर श्रीमंत गेल्यापासून आह्मीं रायदुर्ग व निलगड व पावगड हे संस्थानिक यांचे तालुक्यांत महिना पाऊण महिना गुजराण केली. हैदरखान याजकडील हजार बार[3] व दोन हजार कानडा प्यादा (व) पांच सातशें राऊत व तीन

---

१ हैदर. २ पत्र लिहिणाराचा धाकटा बंधु पांडुरंगराव. ३ पलटणचे शिपाई.

तोफा घेऊन येऊन चिकबाळापुराजवळ उतरोन गांवास रोज तोफा लाऊन गोटास जात. पंधरावीस दिवस गांवकरांचें त्यांचें झुंज होतच होतें. चिकबाळापुराहून निकडीचीं पत्रें येतांच सडे होऊन त्यांचे फौजेशीं गांठ घातली. सरदार शें दीडशानिशीं पळोन गेला. बाकीचे लोक तीनशेंपावेतों जिवें मारिले. पांच सहाशें जखमी झाले. दांतीं गवत धरिलें त्यांस तोडिलें नाहीं. लोकांचीं हत्यारें फार सांपडलीं. तोफा पाडाव झाल्या. चारशेंपावेतों घोडे सांपडले. अघाडीस आह्मीं व उभयतां[1] चिरंजिवानीं मिळूनच घोडीं घातलीं. तसेच गोटांत शिरून मारामार केली. गोट लुटल्यानंतर चार घटकांनीं राजश्री त्रिंबकराव मामा वगैरे सरदार आले. निकड करून गेल्याप्रमाणें श्रीमंतांच्या पुण्येंकरून यश आलें. येविशींचें सविस्तर वर्तमान[2] वडिलांस लिहिलें आहे त्यावरून कळेल. वरकड खबरदारी तुह्मीं करीतच आहां. रात्रीची खबरदारी किल्ल्याची करीत जाणें. बायका मुलें निजतील तेथें इतबारी माणसें सदरेवर चौकी असावी. देवघरचे कवाडास रात्रीचीं बाहेरून कुलपें घालावींत. असो. मुख्य गोष्टी खबरदारी असली ह्मणजे सर्व गोष्टींस उत्तम आहे. यांत सारें समजावें. दिवाणखान्याचा गिलावा आतांपासून केला तरी पुढें चांगला वाळेल. आमची चाकरी करण्याची उमेद नाहीं तेव्हां दिवाणखान्याची वगैरे काळजी कशास करावी? परंतु इतके रुपये लाऊन बांधिलें तें पुरतें नीट करावें. आमचा ऋणानुबंध आहे तरी आहे. केल्याचा उपयोग करीतच आहों. नसला तरी नसला. चिंता काय? बहुत काय लिहिणें लोभ असों दीजे हे आशीर्वाद. आमसोलें दरजोडीसमागमें शेर अदशेर पाठवीत जाणें. खोगिरें परसावाविशीं पेशजी लिहिलेंच आहे. बहुत काय लिहिणें आशीर्वाद.

हेच पत्रीं परशुराम रामचंद्र याचे आशीर्वाद. सदैव पत्र पाठवून तिकडील वृत्त लिहीत जावें. इकडील वडिलीं लिहिलें आहे त्याजवरून

---

१ नीलकंठराव व परशुरामभाऊ. २ गोविंद हरीस.

कळेल. लोभ असों दिला पाहिजे हे आशीर्वाद. अपत्यें गंगाधरानें साष्टांग नमस्कार विज्ञापना तीर्थरूपांस दादांनीं डेरे राहुट्यांविशीं लिहिलें आहे आणि आबांसही लिहिलें आहे. त्यास वडिलीं आमची राहुटी साडेसात गजी व पाऊण गजाच्या कनाता गुदस्तांप्रमाणें असें करावें ह्मणून बाबूराव राम यांस सांगावें. राहुटीस डावे आंगें पडदा होता तसाच करावा. सेवेशीं विदित होय हे विज्ञापना.

नं ९८१ ( ८ जून )

मेघश्यामराव यांचें गोपाळरावास पत्र मंगळवेढ्याहून ज्येष्ठ शु० १९ चें.

" श्रीमंत कपाट संगमीं गंगा[1] उतरोन श्रीशंभुमहादेवावरून पुण्यास ज्येष्ठ वद्य पंचमीच्या मुहूर्तास्तव गेले. राजश्री मोरोबादादा व गोविंद शिवराम एकादशीस श्रीक्षेत्रास आले होते. दुसरे दिवशीं तेही गेले. आह्मीं भेटीस गेलों होतों. "

नं ९८२ ( ज्येष्ठ वद्य द्वितीया. )
१० जून. )

मोरो बल्लाळाचें गंगाधररावास पत्र १९ सफरचें.

" तीर्थरूपांजवळ[2] कोणी नाहीं. तुह्मीं आहां. त्यास लोकांच्या बोलण्या चालण्यांत रहात जावें. वडिलांची मर्जी संपादून घ्यावी. जे गोष्टीनें वडिलांस श्रम न पडत तें करावें. श्रम या दिवसांत न कराल, तीर्थरूपांची मर्जी न संपादाल, तरी मग तुमचें शहाणपण काय! सर्वांचें आर्जव करावें. सर्वांस लगामीं राखावें. रागें भरूं नये. क्षमा असामी. इतकें करील त्याची दौलत आहे. ज्यांत तीर्थरूपांस रानांत तह्मांमुळें विसावा होय तें करावें. "

---

१ कृष्णा. २ गोपाळरावाजवळ.

नं० ९८३ ( ११ जून. )

गोविंद हरीचें गोपाळरावास पत्र ज्येष्ठ व॥ ३ भौमवारचें.

" श्रीमंत छावणीस फौज ठेऊन मजल दरमजल तुंगभद्रा उतरून कपाटसंगमास ग्रहणास आले. वद्य पंचमीस पुण्यास जाणार ह्मणून बोली आहे. तुह्मीं छावणीस राहिला. धान्य महाग. तृण नाहीं. खर्चाची हैराणगत. तथापि धण्याची मर्जी रक्षून राहिला हें उत्तम केलें. पुढें राजश्री मामांची मर्जी रक्षावी. छावणीस लोक राहिले आहेत त्यांचे मनोगत रक्षून संकटकालाचे दिवस संतोषानें घालवावे. "

नं० ९८४ ( ज्येष्ठ वद्य षष्ठी. १४ जून. )

अण्णाजी तमाजी यांचें गोपाळरावास सावनुराहून १९ सफरचें पत्र.

" श्रीमंत तुंगभद्रापार होऊन मुदेनूरच्या मुक्कामीं साहेबजादे व खंडेराव यांस श्रीमंतांनीं निरोप दिला. टिपूसाहेब पांच हजार फौज व चार तोफा घेऊन सावनूर तालुक्यांत नरेगल व अडूर व बेमेनहल्ली व सिगांव याचीं खेडीं मारिलीं व गांवोगांवीं खंडणी केली. हनगलहल्लीची पेठ मारिली. मालियत फार सांपडली. किल्यांत ठाणें घातलें आहे. टिपूसाहेब शिवमोग्यास आहे. अलावलखान मुडगोड वगैरे सरहद्दीचे जागेस आहे. हनगलचें ठाणें उठवावें तर नबाबाजवळ सरंजाम नाहीं. शहाजी भोंसले व आपाजीराव व नरसिंगराव घायगुडे धारवाडीं आहेत त्यांस या प्रांतीं यावें ह्मणून नबाबानीं पत्रें पाठविलीं आहेत. बाबूराव जगजीवन सावनुरांत मुक्काम करून आहेत. "

नं० ९८५ ( अजमासें ज्येष्ठ वद्य. जूनचा दु० पंधरवडा. )

+ यादी. हजार स्वारांचे नेमणुकेबद्दल दरबार खर्च कारकुनी गुदस्तां क़रार केले ते.

---

+ मूळ यादीवरून हें टिप्पण केलेलें आहे. हे हजार स्वार पुढें या यादीप्रमाणें

२००० मोरोबादादा ७०० मजमदार १०० पत्रें लिहिणार चिटणीस
५०० हरीपंत फडके २०० रामाजी बावा १०० पारसनीस
१००० चिटणीस १०० देशमुख ३०० पोतनीस

एकूण ५००० पांच हजार रुपयांचे यादीवर मोरोबा आबांचें निशाण आहे.

नं० ९८६ (ज्येष्ठ वद्य दशमी. १८ जून.)

रामचंद्र गोविंद यास गोपाळरावांचें पत्र २३ सफरचें.

" टिपूसुलतान शिकारपुराहून पट्टणाकडे जावयास गेले ह्मणून लिहिलें तें कळलें. शिवमोग्यापावेतों आल्याचें वर्तमान हरिहरच्याही पत्रीं होतें कीं पट्टणाकडे येईल. राजश्री आपाजीराव व नरसिंगराव श्रीमंताकडे गेले आहेत. ते कृष्णेवरून माघारे आलेच असतील. श्रीमंत आणखी फौज त्या प्रांतीं पाठविणार होते ती पाठविलीच असेल. हनगलचें ठाणें घ्यावयास राजश्री खंडेराव जाणार आहेत ह्मणून लिहिलें तें कळलें."

नं० ९८७ (११ जून.)

गोविंद हरीकडून गोपाळरावास ज्येष्ट वद्य ३ भोमवार छ १६ सफरचें पत्र.

" राजश्री त्रिंबकरावमामा व रास्ते व आनंदराव गोपाळ यांस श्रीमंतांनीं छावणीस ठेविलें. श्रीमंत दर मजल तुंगभद्रा उतरून ग्रहणास कपाटसंगमास आले. तेथें तुला केली. तेथून रामतीर्थास आले. तेथून वाळेखिंडीवरून नाझऱ्यावरून देशास गेले. वद्य पंचमीस

---

[ मागील पृष्ठावरून ]

पटवर्धनानीं ठेविल्याचें दिसून येत नाहीं. अर्थात् दरबारी लोकांस दरबारखर्च ह्मणजे 'चिरीमिरी' ही मिळाली नसेल!

पुण्यास जाणार. मोरोबादादा व गोविंद शिवराम व गुरुजी इत्यादिक श्रीक्षेत्रास गेले होते तेही पुढें गेले. राजश्री मुरारराव घोरपडे व आपण एकत्रच आहों ह्मणून लिहिलें तें कळलें. फार उत्तम आहे. राजश्री मामांची मर्जी रक्षून रहावें. तो दुष्ट दूर आहे ह्मणों नये. बातमी त्याचा कळत नाहीं. परंतु जितकीं आपलीं ठाणीं आहेत तेथें बातमी असावी ह्मणजे कांहींतरी खबर कळत जाईल. त्याचा पूत्र टिपू सावनूरप्रांतीं येऊन महद् अरिष्ट त्यानें केलें. हनगल वगैरे खेड्यांचा सत्यानाश केला. ब्राह्मण बाटविले. बायका बाटविल्या. विरूपकरण केलें. बाबूराव जगजीवन तुमच्या लष्कराकडे जाणार होते. परंतु नबाबानीं फार काकळूत करून ठेऊन घेतलें आहे. भोसले व घायगुडे धारवाडीं फौज ठेऊन श्रीमंतांच्या भेटीस गेले होते तेव्हां त्यांसही श्रीमंतांनीं सावनुराचा बंदोबस्त करावयास आज्ञा केली आहे. श्रीमंतांनीं हुजुरातचींही कांहीं कांहीं पथकें वरचेवर या कामावर नेमिलींच आहेत. भापकर व कवडेही नेमिले आहेत. श्रीमंतांनीं आधीं सावनूरचा बंदोबस्त करावयाचा होता तो न केला. भरला मुलूख धास्तीनें ओस झाला! पुढें लावणीचा हंगाम. हैदरनाईकाच्या लोकांस एक दोनदां चांगली ठेंच लागली असती ह्मणजे बंदोबस्त होता. तिकडील ठाण्यांचा गुंता नसता ह्मणजे कोठेंही पोट भरावयास येतें ह्मणून तुह्मीं लिहिलें तें प्रमाण. त्याप्रांतें फौज ठेवावया कारण काय? शिरें, मदगिरें, चेनरायदुर्ग, हगलवाडी, दोन्हीं बाळापुरें, होसकोटें, हीं ठाणीं राहिलीं पाहिजेत यास्तव फौज ठेविली. नाहीं तर कारण नव्हतें. इतकीं ठाणीं मिळून पैसा प्राप्त नाहीं! तेथील तेथें शिबंदी वारली तरी बरें! परंतु पन्नास लाख रुपयांची फौज तेवढ्यासाठीं ठेविली. लौकिकास्तव. सावनूर तालुक्याची अनास्था झाली. ऋणानुबंध! तिकडे हा काळपावेतों पाऊस झालेच असतील. बैरणकाडी होईल. श्रीकृपेनें धान्यही सवंग होईल. चार महिने संकटाचे पर्ज-

न्यकाळाचे जातील. पुढें श्रीमंत मातबर फौज व कांहीं पायदळ घेऊन आधीं बिदनूरचें पारिपत्य झालें पाहिजे ह्मणजे झाडींतून बाहेर निघेल. विना हे मसलत केल्यावांचून हैदर नाईकाचा क्षय होतां दिसत नाहीं."

नं० ९८८ (ज्येष्ठ वद्य तृतीया. ११ जून.)

गोविंद हरीचें गोपाळरावास पत्र.

तुह्मीं १ सफरचें पत्र पाठविलें तें १३ सफरीं पोंचलें. "हगलवाडीच्या ठाण्यावर हैदरनाईकाकडील लोकांनीं गडबड केली; परंतु आंतील लोकांनीं ठांसून राखिलें. बरी हिंमत केली." ह्मणून लिहिलें तें कळलें. हैदरखानाचे लोक फजित पावून पळोन गेले. पुढें तुह्मीं ठाण्यांस उपराळा करीत जावा. इकडे पर्जन्य रोहिणी कृत्तिकेचा कोठें कोठें पडला. मृगही पडला. कालच्या बाजारीं शेरभर दाणे अधिक झाले. साडेसहा पावणेसात पायलीप्रमाणें जोंधळे झाले. पावणेचार हरभरे. गहूं साडेतीन. तांदूळ अडीच. तूप सात रुपये कच्चा मण. गूळ पावणेदोन. तंबाकू दीड रुपया. याप्रमाणें धारण आहे."

नं० ९८९ श्रीशंकर. (ज्येष्ठ वद्य अष्टमी. १६ जून.)

श्रीमंत राजश्री गोपाळराव दादा स्वामीचे सेवेशीं.

पोष्य नरसिंगराव जनार्दन कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती उपरी येथील क्षेम तागायत छ २१ सफर पर्यंत मुक्काम धारवाड येथें यथास्थित असे. विशेष. आपणाकडील वर्तमान बहुत दिवसांत कळत नाहीं तर सविस्तर लिहीत जावें. इकडील वर्तमान तर हैदरनाईक

---

१ धायगुडे.

याची फौज व बारमुद्धां अकबरखान मुरगुडावर झाडींत आहे. व टिपू मिय्या होनहल्लीवर तुंगभद्रातीरीं आहे. पुढें काय मनसबा करतील तें पहावें. मुरगुडावर फौज आहे तीस व आह्मांस दहा कोसांची तफावत आहे. इकडे राहिलों परंतु आपला वियोग झाला तेणेंकरून समाधान नाहीं. आह्मीं (श्रीमंतांच्या) भेटीस गेलों तेसमयीं तिकडे यावयाविशीं बहुत आग्रह केला परंतु चित्तास आलें नाहीं. बहुत काय लिहिणें लोभ असों दीजे हे विनंती.

नं० ९९० श्रीरामचंद्र प्रसन्न. (ज्येष्ठ वद्य नवमी. १७ जून.)

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री गोपाळरावजी स्वामीचे सेवेशीं.

पोष्य आपाजीराम साष्टांग नमस्कार विनंती उपरी येथील वृत्त छ २२ माहे सफरपर्यंत मुक्काम धारवाड वर्तमान आपले कृपेंकरून यथास्थित जाणून स्वकीय लेखन करीत असलें पाहिजे. विशेष. आपणाकडून पत्रें येऊन कुशल अर्थ कांहीं कळत नाहीं. तरी आपला मुक्काम सध्यां कोठें कोणे स्थलीं आहे, पुढें वर्षाकाल महिना दोन महिने एक ठायींच राहणें घडेल किंवा कसें काय, ऐसें साकल्य वृत्त लिहून पाठवावें. वर्तमानास्तव मुद्दाम जासूद जोडी पाठविली आहे तरी सविस्तर अर्थ लिहावा. इकडील वर्तमान तर आह्मीं पेशजी सावनुरीं होतों त्यास राजश्री नारो बाबाजी बंकापुरास येऊन आह्मीं धारवाडाकडे जावें ह्मणून तिस्यानीं आक्षेप करून धारवाडाकडे आणिलें. येथें येतांच श्रीमंतांची आज्ञा आली जे–फौज धारवाडीं ठेऊन तुह्मीं सडे व घायगुडे कृष्णातीरास हुजूर यावें. त्यावरून उभयतां निघून कपाट-

---

१ अक्कलकोटकरांचा दिवाण. उपनाव गाडगीळ. हें वांईचे गाडगीळ.

हा धारवाडचा सुभेदार. उपनाम नगरकर. पुण्यांत नगरकरांचें घराणें प्रसिद्ध आहे त्याचा हा पूर्वज.

संगमास गेलों. श्रीमंतांचें दर्शन झालें. पुढें निरोप घेऊन ( या प्रांतीं ) राहुण्याची आज्ञा झाली. राजश्री मोरोबा[1] आबा ( श्रीमंतांजवळ ) होते त्यांनींच बोलून चालून आज्ञा देविली. यजमानसुद्धां[2] आज्ञा घेऊन धारवाडास आलों. हैदरनाईकाची फौज टिपूमियया वगैरे आह्मीं श्रीमंतांकडे गेलों होतों तेव्हां सावनूर तालुक्यांत हनगलाकडे येऊन कांहीं गुरें ढोरें सांपडली तीं घेऊन सर्वेच माघारे गेले. प्रस्तुत त्यांचा उपसर्ग इकडे अथवा सावनुराकडे कांहीं नाहीं. इकडे मिश्रीकोटाकडे कलघटगीकडे येण्याच्या त्याच्या आवाया आहेत. यांत जिकडे उमट खातील तिकडे आह्मींही जाऊं. फौज आणीक इकडे कांहीं असावी येविशीं श्रीमंतांस विनंती केली व आह्मीं श्रीमंतांसन्निध असतां सावनूरकरांचेही बोभाट आले, परंतु ऐकतो कोण! नाहीं ह्मणावयास काळ्यांचें पथक मात्र नेमून दिलें त्याचे दोनशें राऊत आले आहेत. वरकड भापकर व कवडे यांची नेमणूक इकडील पूर्वीं झालेली आहे. ते देशीं आहेत. कधीं येतील तेव्हां येऊत! सध्यां धायगुडे व आह्मीं व काळे इतके मात्र आहों. पडसराचे दिवस. पर्जन्य इकडे अतीशय पडतो. घोड्यांत एका ह्मटलें तरी जीव नाहीं. या प्रकारची अवस्था आहे. आपणास कळावें यास्तव लिहिलें आहे. आपण सदैव पत्रीं परामर्ष करीत जावा. बहुत काय लिहिणें कृपा लोभ असों दीजे हे विनंती.

नं० ९९१ ( ज्येष्ठ वद्य.

जूनचा दु० पंधरवडा. )

नारो बाबाजी नगरकर यांस गोपाळरावाचें पत्रः—

" हैदरखान बंकापूर व धारवाड यांच्या गळीं पडणार ह्मणून बातमी आली आहे याकरितां त्या दोन्हीं. स्थलांचा व गदग व कोपळ व दुसऱ्या जाग्यांचा बंदोबस्त राखावा. "

---

१ मोरो बल्लाळ पटवर्धन. २ शहाजी भोंसले.

श० १६९२ **धारवाडप्रांतीं दंगा.** इ. स. १७७०

नं० ९९२ **श्रीगणराज.** ( जेष्ठ वद्य.
जूनचा दु० पंधरवडा. )

अपत्यें पांडुरंगानें साष्टांग नमस्कार विज्ञापना............शिरोळकर यांस लिहिलें आहे कीं, परिछिन्न तुमचें पारिपत्य होईल. ईश्वरकृपेकरून यंदां देशीं फौजा आल्या ह्मणजे शिरोळची गढी पाडून कोल्हापुरापर्यंत मुलूख मारितों. 'राजश्री स्वामीस[1] बंदोबस्त करणें ह्मणोन लिहून पाठवणें. नाहीं तरी त्यांचा मुलूख मारणें.' ह्मणून पुण्याहून श्रीमंतांचीं आज्ञापत्रें आलीं आहेत. वडिलांस कळावें. बहुत काय लिहिणें हे विनंती.

नं० ९९३ **श्रीगणराज.** ( ज्येष्ठ वद्य.
जूनचा दु० पंधरवडा. )

चिरंजीव[2] राजश्री आबा यांस आशीर्वाद उपरी. प्रस्तुत काल दोन दिवस कुळथ्या चार साडेचार पावणेपांच पायली, व जोरी साडेतीन व पावणेचार, तांदूळ मध्यम दोन पायली, हर्त्तीभोग साडेतीन पायल्या, सांवे बारा पायली, व साळी आठ पायली, तूप सव्वाशेर, याजप्रमाणें तूर्त धारण चहूंकडून रस्तही आली आणि लूटही मिळाली ह्मणून सवंग आहे. अशीच धारण राहिली तर गडबडत नाहीं. गुमनाड व घटम वगैरे किरकोळ मिळून चाळीस हजारपावेतों खंडणी झाली. पुंगनुरास कारकून पाठविले आहेत. तेथीलही खंडणी होईल. ठाण्यांचा[3] वेध नसता तर चार दिवस पोट भरतों. राचोटीकडे गेलों तर लाख पन्नास हजार रुपयेही मिळतील. हैदरखान बाहेर निघतो किंवा न निघतो हें कळल्याशिवाय लांब जातां नये. बाहेर निघाला तर माघारे फिरावें लागेल. बाहेर निघावयाची तरतूद होत आहे. फौज नदी अलीकडे,

---

१ कोल्हापुरच्या महाराजांस. २ गोपाळरावाचें मोरो बल्लाळ यास पत्र. ३ ठाणीं राखण्याचा.

आपण खासा आंत किल्ल्यांत आहे. मीरफैजुल्लास कैदेंत ठेविलें आहे. केव्हां तरी बोलावून नेत असतो. व कुचाचा नगारा रोज करितो. जीन ठेऊन तयारी होती, आणखी मुक्काम करितो! याजप्रमाणें करितो ह्मणून एक बातमी. दुसरी बातमी मागडीकडे कांहीं सामान आलें ह्मणून. वर्तमान वरचेवर आणवीत आहे. हुंडी बेटगिरीबाबत पाठवून देणें. हे आर्शीर्वाद.

नं० ९९५ श्रीशंकर. ( आषाढ वद्य तृतीया. १० जुलई. )

श्रीमंत राजश्री गोपाळरावदादा स्वामींचे सेवेशीं.

पोष्य नरसिंगराव जनार्दन ( घायगुडे ) साष्टांग नमस्कार विनंती उपरी येथील क्षेम तागायत छ १६ रबिलावलपर्यंत मुक्काम धारवाड येथें यथास्थित असे. विशेष. आपणाकडून बहुत दिवस पत्र येऊन वर्तमान कळत नाहीं तेणेंकरून चित्त सचिंत होतें तों आपलें पत्र छ २८ सफरचें छ १९ रबिलावलीं येऊन पोंचलें तेणेंकरून चित्तास समाधान झालें. इकडील वर्तमान तर हरिहरचें पत्र आह्मांस आलें होतें कीं, इकडे टिपू येऊन गुरांढोरांस उपद्रव करीत आहे. मोर्चेही करणार ह्मणून हरिहरच्या ठाणेंदारानें लिहिलें होतें. त्यावरून आह्मीं हरिहरच्या ठाणेदारास दुसरे दिवशीं लिहून पाठविलें कीं, तुह्मीं सावध राहून बातमी आह्मांस लौकर लिहून पाठवावी ह्मणजे आह्मीं देखतपत्र येऊन पोंहचतों. मग हरिहरच्या ठाणेंदारांनीं उत्तर पाठविलें कीं, प्रस्तुत कांहीं उपद्रव या तालुक्यास नाहीं. तुह्मीं कांहीं न यावें. मग राहिलों. टिपूमिय्या तर तुंगभद्रा उत्तरतीरीं शिवमोग्याकडे आहे. प्रस्तुत कांहीं या प्रांतीं उपद्रव नाहीं. बंकापुरीं पांचशें स्वार ठेविले आहेत. राजश्री बाबूराव व नरगुंदकर मिळून सावनुरीं आहेत. देशाकडून कवडे भापकर येणार

---

१ श्रीरंगपट्टणांत.

आहेत. अद्यापि आले नाहींत. राजश्री जनार्दनराम मात्र चारशें स्वारांनिशीं छ १९ रबिलावलीं दाखल झाले. मागाहून कवडे भापकर आठा पंधरा दिवशीं येणार ते आले ह्मणजे आह्मीं जाऊन सावनूरच्या दान तोफा घेऊन हनगलचें ठाणें घेतों. या प्रांतीं आपला तालुका आहे त्याजविशीं आपण काळजी न करावी. श्रीमंतांनींही आह्मांस आंवंदा दोन परगणे हिपरगें व रोली दिले. आपणांस कळावें. बहुत काय लिहिणें लोभ असो दीजे. हे विनंती.

नं० ९९५ श्री. ( आषाढ वद्य नवमी १६ जुलई. )

राजश्री गोपाळरावदादा गोसावी यांसी.

अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्नेहांकित जानराव धुळप सुभेदार. कृतानेक दंडवत विनंती येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लेखन करीत असलें पाहिजे. विशेष. टिपूसुलतान फौजसुद्धां बेंगरुळाहून काल रात्रीस हुसकोट्यावरी जाऊन पेठेवरी दंगा मांडिला आहे ह्मणोन कानडी बातमीचीं पांच पत्रें आलीं त्यांची नक्कल पाठविली असे. आपणांकडे हुसकोट्याहून पत्रें आलीं असतील. आह्मांकडे बातमी आली ती सेवेशीं लिहून पाठविली आहे. याखेरीज परस्परें आपणांकडे बातमी आलीच असेल. त्याची कोणती पैरवी करणार ( त्याविषयीं ) आपण धणी आहां. रवाना छ २२ रबिलावल बहुत काय लिहिणें लोभ कीजे हे विनंती.

पै॥ छ २३ रबिलावल.

नं० ९९६ श्री. ( आषाढ वद्य. जुलईचा दु० पंधरवडा. )

अपत्यें गोपाळानें साष्टांग नमस्कार विज्ञापना. आपाजी कोडकर याजसमागमें पत्रें पाठविलीं आहेत तीं पावलींच असतील व नुरूगम-

१ सुभेदार चिकबाळापुरचा.

त्याच्या मुक्कामाहून पुंगनूर तालुक्यांत आल्यावर चिरंजीव राजश्री नीळकंठराव यांच्या जासुदासमागमें पाठविलीं आहेत तींही पावलींच असतील. अलीकडील वर्तमान तर नुरुगमला घेतल्यानंतर पुंगनूर तालुक्यांत फौजा गेल्या. तेथील ऐवजाच्या फडशास आठ दिवस लागले. श्रीमंतांनीं मुलबागलच्या मुक्कामीं असतां बत्तीस हजार खंडणी ठरविली होती. वसूल अगदींच झाला नव्हता. त्याचा हल्लीं फडशा झाला. पंधरा हजार रुपयांची सावकारी निशा झाली. सतरा हजार रुपयांच्या मुदती आहेत त्या मुदतीप्रमाणें रुपये द्यावे. या सतरा हजार रुपयांस वोली घेतल्या आहेत. मुदतीप्रमाणें संस्थानिकानीं निशा करून दिली ह्मणजे वोली सोडाव्या ( असें ठरलें आहे ). येणेंप्रमाणें पुंगनूरचा फडशा. तिकडून कूच करून गुरुमकोंडे तालुक्याकडे आलों. मदनपल्ली गुरुमकोंड्याखालील पेठेची जागा होती. वोस झालीच होती. पहाडी किल्ला मध्यम प्रतीचा होता. पांचशें राऊतांनिशीं व गाडदी घेऊन दबावण्यासाठीं किल्ल्याखालीं गेलों. हल्ला करितों असा हावभाव दाखवितांच किल्ल्यावरील लोकांनीं रदबदली लाविली कीं, ‘हत्यारसुद्धां सोडावें. किल्ला हवालीं करितों.’ तेव्हां त्यांस कौल देऊन बाहेर काढून किल्ल्यावर सरकारचे लोक घातले. प्रस्तुत पाईच्या माणसांचा सरकारांत तोटा. याजकरितां मदनपल्ली व तो किल्ला पुंगनूरकरांच्या हवालीं केला. थोडीबहुत नजर घेतली. गुरमकोंडा तालुका दरोबस्त सरकारांत सुटला ह्मणजे किल्ला व मदनपल्ली संमत आज्ञा होईल तेव्हां सरकारांत द्यावी याप्रमाणें करारमदार करून घेऊन पुंगनूरकरांच्या हवालीं करून पुढें गुरमकोंड्याकडे आलों. गुरमकोंडा सात आठ कोस पुढें राहिला. तूर्तच गुरुमकोंड्याकडे जावें तेव्हां राचोटी वगैरे प्रांतीं मासपक्ष लागेल. मधीं तुवल ( व ) तलपुर हीं ठाणीं हैदरखान याजकडील होतीं. ( त्या ठाण्यांतील लोक ) मार्गानें येणार जाणार यास छेडाछेड करूं लागले व लष्करचीं दहा पांच

तट्टे नेलीं होतीं. हीं ठाणीं घेतल्याखेरीज ठीक नाहीं याजकरितां दुबल, तलपूर इकडेच यावयाचा निश्चय झाला. वाट अवघड याजकरितां लष्कर यावयास एक दिवस अधिक लागेल याजकरितां सड्या फौजेनिशीं आह्मीं व राजश्री मालोजी घोरपडे दीड हजार राऊतानिशीं येणेंप्रमाणें निघोन पहिले दिवशीं बारा कोस आलों. दुसरे दिवशीं प्रहर दिवसास दुबलास आलों. येतांच पेठ घेतली. ठाणें भोंवतालें फिरून पाहिलें. वरील तोफांचे बार दहा वीस झाले. शहाजी ढाल्या नागजेस रहात होता तो राजश्री गोविंदपंत मामांच्या निसबतीस होता त्यास गोळा लागून ठार झाला व चिरंजीव राजश्री नीळकंठराव यांजकडील धर्माजी जाधव यास पेठेवर गोळी लागून ठार झाला. याप्रमाणें आलों त्या दिवशीं झालें. तळ्यावर मुक्काम करून राहिलों. रात्रौ भोंवताल्या चौक्या ठेविल्या. दुसरे दिवशीं लष्करही मागाहून आलें. छ २२ रबिलावलीं संध्याकाळच्या चार घटका दिवसास मोर्चे बसविले. तोफा यावयास संध्याकाळ झाला. त्या दिवशीं तोफा लागू करून हल्ला एकवार करविला. रात्रीमधींच मोर्चे खंदकाच्या जवळ गेले. प्रातःकाळीं तोफा सुरू होतांच दोन चार गोळे आंत गेले. एक बायकोस लागोन ठार झाली. किल्लेदार होता त्या जाग्यास एक गोळा लागतांच घाबरे झाले. आणि कौल कौल ह्मणून ओरडूं लागले! तेव्हां तोफा मना केल्या. आंतील एकजण बाहेर आला. +

(आषाढ वद्य दशमी.

नं० ९९७ १७ जुलई.)

मोरे बल्लाळ यास नरसिंगराव धायगुडे यांचें पत्र २३ रबिलावलचें:—

"हनगलाचें ठाणें हैदरअल्लीनें घेतलें होतें त्याजवर बाबूराव जग-

---

१. हा मुधोळकर नव्हे. हा मुराररावाचा पुतण्या. + पत्र इतकेंच अपूर्ण सांपडलें.

जीवन व आह्मांकडील व बंकापुरचे लोक व नबाबाची जमात ऐसे मिळून वेढा घालून दुसरे दिवशीं ठाणें घेतलें."

(आषाढ वद्य. जुलईचा
नं० ९९८ दु० पंधरवडा.)

परशरामभाऊंचें मोरो बल्लाळास पत्र.—

"लष्कर मदनपल्लीजवळ आहे. मदनपल्ली घेतली. त्याजवळच एक पहाडी किल्ला होता तो दबावानेंच घेतला. याउपर गुरमकोंड्यानजीक लष्कर आलें. तिकडे जावें असें होतें तों दुबळ ह्मणून मिरीचें[1] ठाणें होतें. लष्करापासून पांच गांवें होतें. आह्मांस सडे करून (तें ठाणें घ्यावयास) पाठविलें. दुसरे दिवशीं गांठ घातली. मामाही दुसरे दिवशीं आले. आषाढ वद्य दशमीस प्रातःकाळीं कौलास आले. किल्ल्यावर ठाणें घातलें. किल्ल्यांत पन्नास घोडे सांपडले. याउपरी राचोटीकडे जाणार असें आहे. हैदरखान पट्टणांतच आहे. चिकबाळापुरनजीक गणेशगड होता त्यासीं बाळापुरकरांनीं चौक्या देऊन त्याची रस्त आली ती एक दोन वेळां मारून किल्ला सर केला."

(श्रावण शुद्ध प्रतिपदा.
नं० ९९९ २३ जुलई.)

बाळापुराहून महादाजी अनंत याचें पत्र २९ रबिलावरचें गोपाळरावास.

"पट्टणास माणूस पाठविला होता तो काल येथें आला. हैदरखान, फैजुल्लाखान, मिररेजाखान व बारकी श्रीनिवासराव दरोगा, ऐसे पट्टणांत आहेत. बार प्यादे मिळून पंचवीस हजार व सात आठ हजार फौज आहे. दुमाही रोजमुरा देत आहे. दारूगोळी सरंजाम तयारी होत आहे. तालुक्या तालुक्यांचे प्यादे जमा करीत आहे. टिपूमियां व मखदुमखान हे अनवटीजवळ आहेत."

---

१. मीररेजाचें.

नं० १००० (२९ जुलई.)

पांडुरंगरावास गोपाळरावाचें पत्र श्रावण शु० ७ भानुवारचें—

" तलपुराजवळ आलों तों ठाणें टाकून पळून गेले. येथें परवां काल आज तीन मुक्काम झाले. येथील बंदोबस्त करून गुरमकोंडा राचोटी-कडे जाणार."

नं० १००१ (२१ जुलई.)

गोविंद हरीस पत्र सदाशिव चिंतामणीचें आषाढ वद्य चतुर्दशीचें रामगड नजीक गंगातीर प्रांत अंतरवेदी येथून--

"इकडील वर्तमान तर जाटाची लढाई जाहलेनंतरचीं पत्रें लिहिलीं होतीं त्यांचें मनन झालेंच असेल. अलीकडील वर्तमान नजीबखान रोहिला येऊन भेटला आणि अंतरवेदींत छावणी झाली. जाटांची मसलत पांसष्ट लक्षांवर ठरली आहे. आठा चहूं दिवसांत रुपयांची निशा होईल. मग पठाण अहमदखान बंगस याजवर (आह्मीं) जाणार. दहा पंधरा हजार फौज बरोबर देऊन राजश्री बाबूराव हरी तोंडावर पाठविला आहे. तो[1] श्रीभागीरथी पैलतीरीं चाळीस पन्नास हजार जमून उतरला आहे. त्याचें व नजीबखान रोहिल्याचें सूत्र एक आहे कीं, 'पेशव्यांची मसलत फसवावी.' असें असून त्याचे भरीं हे त्रिवर्ग[2] पडले आहेत! तो जे मसलत देतो त्याप्रमाणें हेही नाचतात! कोणाची मसलत कोणाचे खातरेस येत नाहीं असें झालें आहे, आणखी लष्कर पेंचात घातलें आहे! नजीबखान रोहिला महा खेळ्या आहे!!! पुढें काय होईल पहावें! पै।। छ १९ जमादिलाखर.

नं० १००२ श्री (१ आगष्ट.)

श्रीमंत राजश्री रावसाहेब[3] स्वामींचे सेवेशीं.

विनंती सेवक बाळाजी बल्लाळ कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत श्रावण शुद्ध दशमी मुक्काम हरिहर जाणून स्वामीचे कृपेकरून

---

१ अहमदखान बंगश. २ रामचंद्र गणेश, तुकाजी होळकर व महादजी शिंदे. ३ गोपाळराव.

यथास्थित असे विशेष. आज्ञेप्रमाणें घोंगडीं शंभर खेरदी करून ठेविलीं आहेत. मार्गेंच पाठवावीं तरी लष्कर दूर गेलियाचें वर्तमान होतें. आतां चार दिवसांत सेवेशीं पावतीं करितों. वरकड इकडील वर्तमान तरी टिपुसुलतान फौजसुद्धां चेन्नगिरीस होते. आपल्या फौजेचें वर्तमान त्यास आलें जे शिरें प्रांतीं येणार. हें वर्तमान ऐकून चेन्नगिरीहून कूच करून फौजसुद्धां ळोलेहोन्नुरावरी मुक्काम केले आहे. आपण खासा शें पन्नास स्वारांनिशीं बेन नदीमध्यें बेटांत कुरदगड्डीजवळ राहिले आहे. आपल्या फौजेचे फार आवाई आल्यास तुंगभद्रा पार येणार हें एक वर्तमान. दुसरें वर्तमान जे, श्रीरंगपट्टणास जाणार. तरीकिरेवरून कडूर बाणावरावरून पट्टणास जाणार ऐसें वर्तमान आहे. समागमें चार हजार फौज दोनतीन हजार बार आहेत. आपल्या परगण्याचे गढी संधान आपले आज्ञेप्रमाणें करून घेऊं. तूर्त बचाव केले आहे. ठाण्यांचीही बंदोबस्ती आहे. कळावें. राजश्री नरसिंगराव धायगुडे व राजश्री शहाजी भोसले ऐसे धारवाडप्रांतीं आहेत. सावनुरास राजश्री बाबूराव जगजीवन आहेत. स्वामीस कळावें. बहुत काय लिहिणें हे विज्ञापना. पै॥ छ २७ रबिलाखर.

नं० १००३ (श्रावण शुद्ध पंचमी.
२७ जुलई.)

बापूजी बल्लाळ जोशी व रामाजी नारायण गोखले यांचें गोविंद हरीस पत्र पुण्याहून:—

"राजकी नवलविशेष तरी श्रीमंत उभयतां शरीरेंकरून बरे आहेत. अलीकडे कर्नाटकांतून राजश्री त्रिंबकरावमामांचीं पत्रें आलीं नाहींत. उत्तरेकडील वर्तमान तरी रामचंद्र गणेश यांनीं जाटाजवळून रुपये पांसष्ट लक्षाची निशा घेऊन पुढें दरमजल जात आहेत. कोंकणपट्टीचे सुभेदार

---

१ पत्र लिहिणारा कानडा मनुष्य आहे.

व मामलेदार मुलकी समाग आले आहेत. श्रावण मासाचा समारंभ[1] झालेनंतर मग हिशेब पाहणेचा डौल. यंदां श्रीमंतांचे वाड्यांत दशग्रंथी ब्राह्मण ४०० व पंडित वर्षाप्रमाणें. येणेंप्रमाणें लिहिलें. दक्षिणाही बरीच होत्ये. राजश्री गंगोबा[2] तात्या यांशीं राजश्री मोरोबा दादांचे[3] मतें नारो शंकर दरम्यान याप्रमाणें बोलोन सहा लक्ष रुपये घ्यावे. नारो शंकर याणीं निशा करावी. याप्रमाणें बोलोन राजश्री गंगोबातात्या यांशीं आणावयास गेले. खासा गंगोबांनीं पुण्यांत रहावें. पन्नास हजार रुपयांचा सरंजाम गंगोबास द्यावा याप्रमाणें करार झाला व गंगोबाच्या चिरंजीवानीं एकाजणानें अहिल्याबाईजवळ रहावें. एकाजणानें श्रीमंतांच्या समागमें लष्करांत असावें. याप्रमाणें वर्तमान. राजश्री जानोबा धुळप यांसीं श्रीमंत आरमारचा सुभा सांगणार. त्यांस बाळापुरास पत्रें श्रीमंतांचीं गेलीं. आनंदराव धुळप यांनीं बाळापुरीं जाऊन रहावें याप्रमाणें ( ठरलें ). खासा श्रीमंत भाद्रपद शुद्ध सप्तमीस डेरे दाखल होणार ऐसी बोलवा आहे. श्रीमंत दादांस बाहेर स्वारीस काढण्याचा करार नाहीं. श्रीमंतांची मर्जी आमचे रार्येवर[4] बाळापूरचे लढाईपासून चांगलीच आहे. लिंबकरावमामांनींही श्रीमंतांस त्रिवर्गांचे[5] मर्दुमकीविशीं फारच लिहिलें होतें. रवाना मिति श्रावण शु० ९ बुधवार ”

---

१. दक्षिणा देण्याचा समारंभ. २. गंगाधर यशवंत चंद्रचूड. ३. रघुनाथराव दादासाहेब. ४. गोपाळरावावर. ५. गोपाळराव, नीळकंठराव व परशुराम भाऊ.

शा० १६९२ हैदरअल्लीवर तिसरी स्वारी. इ स १७७०

श्री. ( श्रावण वद्य पंचमी.

नं० १००४ ११ आगष्ट. )

राजश्री दादा[१] गोसावी यांसी.

अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्नेहांकित जानराव धुळप सुभेदार पाटील[२] चिकबाळापूर. दंडवत. विनंती. तागायत छ १९ रबिलाखर अस्तमान पावेतों वर्तमान यथास्थित असे. विशेष. आपण पत्र पाठविलें तें पावलें. फौजसुद्धां मुरुगमल्यास येऊन दाखल झाल्याचें वर्तमान लिहिलें त्यावरून बहुत समाधान पावलों. आपलीं पत्रें बजिन्नस थोरले बाळापुरास राजश्री महादाजीपंत फडणीस यांजकडे रवाना केलीं. हैदरअल्लीच्या फौजांचा जथ माकलीदुर्गाजवळ सरंजामसुद्धां तयार होऊन मुक्काम झाला होता. येथें राजश्री सखारामबापू व निंबाळकर व ढमढेरे मातबर सरदार सडे स्वारीनिशीं तोंडेबावी माकलीगडानजीक तळाव्यास गेले होते त्यांस बातमी कळल्यावरी त्यांनीं ते जागा सोडून होमुरावरून पलीकडे गेले. मदगिरी तालुक्यांत धामधूम करितात ह्मणून बातमी आहे. तहकीक वर्तमान आलियावरी लिहून पाठवितों. आपली स्वारी प्रस्तुत या प्रांतें आलिया आतां शत्रूचा उपमर्द सहजांतच होतो. श्रीरंगपट्टण सोडून हैदरअल्लीखान फौजसुद्धां नागमंगल बेलूर येथें मुक्काम ( करून ) आहे. तेथून कांहीं फौज मीर रेजासुद्धां मागडीवरी रवानगी केली ह्मणून वर्तमान आहे. बहुत काय लिहिणें लोभ कीजे हे विनंती.

---

१. गोपाळराव. २. आरमाराकडील मुख्य अधिकार व चिकबाळापूरचा सुभा हातांत असूनही जानोजी धुळपास 'पाटील' ह्मणवून घेण्यांत भूषण वाटतें हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. महादजी शिंदेही आपणांस 'पाटील बावा' ह्मणवीत असे हें प्रसिद्धच आहे.

शा० १६९२ **गुरमकोंड्यावर स्वारी.** इ. स. १७७०

नं० १००५ **श्रीगणराज.** ( भाद्रपद शुद्ध चतुर्थी. २४ आगष्ट. )

अपत्यें[1] मोरोबानें साष्टांग नमस्कार विज्ञापना. वडिलीं श्रावण शुद्ध त्रयोदशीचीं पत्रें राचोटीच्या मुक्कामचीं पाठविलीं तीं कालच पावलीं. लिहिला मजकूर सविस्तर अवगत झाला. ' राचोटीस तोफा सुरू झाल्या. मोर्चे बसवावे तों पांच सात बार होतांच आंतील लोक कौलास आले. हत्यारेंसुद्धां सोडावें असा करार करून लोक बाहेर काढून ठाणें घातलें. येथें दोन चार मुक्काम आहेत. कडपेंकरही फौज चाकरीस पाठविणार. वकील गेले आहेत. तसेंच गुरमकोंडचें राजकारण आलें आहे. तथ्य-मिथ्या पाहून त्यासारखें कूच करूं. " ह्मणून विस्तारें आज्ञा केली, ऐशास श्रीमंतांच्या पाठीमागें छावणीस राहिल्यास[2] बाळापुरावर ( शत्रूची ) फौज बुडविली आणि चार पांच ठाणींहीं चांगलींच हस्तगत झालीं. ईश्वरें यश बरेंच दिलें. आजवर बऱ्यापणींच दिवस घालविले. अतःपर कांहीं हैदरखानाकडील फौज खालीं मैदानांत येऊन फौजेवर किंवा ठाणींठुणीं यांचे गळीं पडत नाहीं. आवाई मात्र घालील परंतु त्यांचे वस्तु येणें होत नाहीं. तोही विवंचनेंत पडला आहे. हनगल सावनूरकरांनीं घेतलें ह्मणोन आह्मासही माधवरावानीं[3] लिहिलें होतें. पुण्यास दक्षणा ब्राह्मणांस गुदस्तापेक्षां कांहीं थोडीबहुत कमी दिली. ब्राह्मण फारच मिळाले होते. दक्षिणा झाली. आतां नालबंदीची तोडमोड होत आहे. श्रीमंत पंधरा हजारांपर्यंत गाडदी ठेवणार. तसेंच हशम दहा हजार. एकूण पायींचें माणूस पंचवीस हजार पावेतों ठेवितात. स्वारीची तयारी होत आहे. खासा स्वारी दसऱ्यास बाहेर निघोन दरमजल कर्नाटकांत येणार. याप्रमाणें लक्ष्मणपंत[4] सुभेदार पुण्याहून आले त्यांणीं सांगितलें. इतके गाडदी मिळणें ठेवणें कठीण. परंतु ऐकिलें त्यावरून लिहिलें आहे. विदित होय हे विज्ञापना.

---

१. पत्र मोरो बल्लाळ याचें गोपाळरावास. २. राहिल्यासारखें. ३ सावनूरचा एक कारकून. ४. लक्ष्मण हरि लागू.

श० १६९२ हैदरअलीवर तिसरी स्वारी. इ. स. १७७०

नं० १००६ श्रीगणराज. ( भाद्रपद शुद्ध चतुर्थी. २४ आगष्ट. )

अपत्यें पांडुरंगानें साष्टांग नमस्कार विज्ञापना. वडिलांकडील पत्रें श्रावण शुद्ध प्रतिपदेचीं महमदापुर परगणें तुंबळ येथील मुक्कामचीं आलीं तीं श्रावण शुद्ध पौर्णिमा सोमवारीं पावलीं. अलीकडे वर्तमान कळत नव्हतें, त्यासीं श्रावण शुद्ध त्रयोदशीचीं पत्रें राचोटीचे मुक्कामचीं आलीं तीं भाद्रपद शुद्ध तृतीया गुरुवारीं पावलीं. लिहिलें वर्तमान कळोन संतोष झाला. ‘राचोटीचें ठाणें हस्तगत झालें. गुरमकोंड्याचेंही राजकारण आलें आहे’ ह्मणून लिहिलें तें कळलें. गुरमकोंडा हस्तगत झाला ह्मणजे मोठी गोष्ट झाली. वरकड लिहिला मजकूर सर्व कळला. इकडे पर्जन्य आजपावेतों नाहीं याजमुळें वैरणीचा तोटा बहुत आहे. हिरवें गवत कोठें मिळत नाहीं. बोलवाडचे घोड्यांस मात्र पंधरा दिवस हिरवें गवत लाविलें आहे. नागपंचमीस नदीस पूर येऊन ओताचें कुरण भिजलें याजमुळें गवत कांहींसें झालें. किल्ल्यांतील घोड्यांस बागांतील मके विकत घेऊन चारितों. वडिलांस कळावें. दिवाणखान्याचे गिलाव्याचें काम आटपत आलें. कारंजांचें काम चालीस लागलें आहे. वडिलांस कळावें. वरकड इकडील सविस्तर वर्तमान तीर्थरूपांचे पत्रावरून कळेल. वरकड इकडील खबरी वर्तमान तीर्थस्वरूप आबानीं लिहिलेवरून कळेल. बहुत काय लिहिणें हे विनंती. पेरें लेखणींचीं येथें होतीं त्याच प्रतीचीं पांसष्ट पाठविलीं आहेत. हे विनंती.

नं० १००७ श्रीशंकर. ( श्रावण वद्य नवमी. १९ आगष्ट. )

सेवेशीं महादाजी अनंत. साष्टांग नमस्कार विज्ञापना. तागायत छ २३ रबिलाखर पावेतों सेवकाचें व परगणे मजकूरचें वर्तमान यथा-

---

१. पांडुरंगराव गोविंद याचें गोपाळरावास पत्र. २. थोरलें बाळापूर येथील मामलेदार. याचें हें गोपाळरावास पत्र.

स्थित असे. विशेष. छ १९ रोजीं कूच होऊन रुतुरकलकोट येथील मुक्कामास स्वामी गेले, चांभारटेकडी घेतली, ह्मणोन आज्ञापत्र सादर झालें तें छ २१ रोजीं पावलें. 'गुडभिंड्यास रस्त पावावयासीं फौज आली ती गेली किंवा कोठें आहे, मीररेजा बुद्धिकोटे येथें आहे ह्मणून वर्तमान आलें त्यास शहाणीं माणसें पाठवून ठीक बातमी आणून लिहून पाठविणें. दोन तीन मुक्काम घटपाजवळ होतील. (शत्रूची) फौज आली होती ती गेल्याचें त्तिसीम वर्तमान येतांच मग जिकडे जाणें तिकडे जाऊं.' ह्मणोन आज्ञा, त्यास फौज आली होती ती कांहीं पट्टणास गेली, कांहीं मागडीच्या झाडींत राहिली आहे, सात आठशें स्वार बेंगळुरांत आहेत, कांहीं फौज कोल्हाराकडे गेली आहे, ह्मणोन वर्तमान आहे. मीररेजा पट्टणांतच आहे. मीरफैजुल्ला याची रवानगी झाली. हैदरखानं याच्या तोंडास कांहीं आजार झाला होता तो बरा झाला. टिपूसुलतान तुंगभद्रातीरीं आहे. तीन हजारपावेतों फौज व पंचवीस तीस हजार बारप्यादेसुद्धां आहेत. भाऊसाहेब ह्मणून कोणी हैदरखानाकडे येऊन दोन च्यार महिने झाले त्यास पांच घोडे, पालखी, उंटें, सरंजाम करून वस्त्रें दिलीं. मीररेजाअलीखान व मीर-फैजुल्लाखान व भाऊसाहेब नूतन निर्माण झालेले या त्रिवर्गाबरोबर फौज तोफखाना देऊन रवाना करणार किंवा खासा हैदरखानच निघणार. येणेंप्रमाणें येथून माणसें गुजरत पट्टणास गेलीं होतीं तीं काल आलीं त्याणीं सांगितलें. वरकड तर राजा पट्टणचा होता तो मृत्यु पावला. नंदराजा (ह्मणून) नंदराजाचा (एक) नातू पंधरा दिवस झाले, मृत्यु पावला. त्याचा भाऊ आठ वर्षांचा आहे. बाकी निर्वंश झाला. येणेंप्रमाणें वर्तमान सांगितलें त्याजवरून सेवेशीं लिहिलें आहे. दोन माणसें आमचीं पट्टणांत आहेत. मागाहून आठा चौ रोजीं येतील.

१. हा एक नवीनच तोतया.

आणखी रवाना करितों. बेदडे चोर राऊत नग १५ परगणे मजकुरीं येऊन गुरें, बकरीं सांपडल्यास घेऊन जातात. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना. छ २५ रबिलाखर.

नं० १००८ श्री. (श्रावण वद्य त्रयोदशी. १९ आगष्ट.)

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री राघोपंत स्वामीचे सेवेशीं. पोष्य गोपाळराव गोविंद कृतानेक विनंती उपरी येथील कुशल तागायत छ २७ रबिलाखर सोमवार मुक्काम नजीक बरंजी तालुके घटम वर्तमान यथास्थित जाणून स्वकीय कुशल लिहीत असलें पाहिजे. विशेष गुडीबिंड्यास रस्त पोंचवावयास फौज येणार ती रस्त पोंचवून ठाण्याठुण्यास उपद्रव देणार ह्मणून थोरल्या बाळापुराहून व चिकबाळापुराहून निकडीचीं पत्रें आलीं त्याजवरून आह्मीं या प्रांतास यावयाचा निश्चय करून चांभार टेंकडीच्या मुक्कामाहून कूच करून मजल दरमजल घटम तालुक्यांत आलों. या तालुक्यांत येऊन आठ दिवस झाले. या मुक्कामास आल्यावरी बाळापुराहून बातमी रोजचीरोज आली. फौज आली होती त्यांनीं रस्त गुंडीबिड्यास पोंचवून होसूर तरफ थोरलें बाळापूर येथील संमतचे दोन गांव लुटून माकळीदुर्गाजवळ जाऊन राहिले होते. पुढें ठाण्याठुण्यांस उपद्रव करावा या मनसब्यांत होते तों आह्मीं आल्याची आवाई त्यांस कळतांच कूच करून चेनरायदुर्ग व कोरटेगिरें या तालुक्यांतून जातांना गुरेंढोरें सांपडलीं तीं घेऊन देवारायदुर्गाच्या झाडीच्या आसऱ्यास जाऊन तेथून निजगलास जाऊन तेथून कूच करून कुनीगलास गेले. तेथून पट्टणास गेले किंवा मागडीकडे गेले असतील न कळे. फौज आली होती ती गेली. मग

१ हा होसकोटें येथील किल्लेदार.

पुढें जावयाचें कारण नाहीं व गेल्यानें सरकारचे तालुक्यांस उपद्रव लागेल याजकरितां या मुमारें राहिलों. चंद्रोजी जाधव आणि सेख-महंमद यांणीं कोल्हार प्रांतीं अमलास खलेल केली होती याजकरितां तिकडे फौज पाठविली तों उभयतां पळोन बेंगळुराकडे गेले ह्मणून वर्तमान आहे. कोणीकडे गेले असतील न कळे. चांभारटेंकडीचा किल्ला आह्मीं आल्यावरी तिसरे दिवशीं फत्ते झाला. तेथील बंदोबस्त करून राजश्री त्रिंबकराव मामा गुरमकोंड्यापाशीं येऊन उतरले आहेत. मोर्चे बसविणार होते. कालपासून तोफांचे बार होत होते तेंव्हां तोफा लागू केल्या असतीलसें दिसतें. बाळापुराहून बातमी वरचेवरी येत असते. तुमचें एकही पत्र आलें नाहीं. अपूर्व आहे! बेंगळुरास व होसकोट्यास समीप आहे. तेथीलें बातमी नित्य तुह्मांस येत असेल व पट्टणास तुमची बातमी असेलच. त्यास गुरमकोंड्यास (त्रिंबक-रावमामा वेढा देऊन) बसल्याचें वर्तमान त्यांस गेल्यावर काय मनसबा करितात, बेंगळुरास फौज किती आहे, मागडीकडे किती आहे, व पट्टणाकडील बातमीचें वर्तमान सविस्तर लिहावें. व अधिकोत्तर बातमी जशी येईल तशी लिहित जावी. नित्य अथवा एका दिवसाआड पत्र पाठवीत जावें. कळावें लोभ करावा हे विनंती.

नं० १००९ (२२ आगस्ट.)

वासुदेव धोंडदेव यांचें पांडुरंगरावास पत्र भाद्रपद शु० २ चें. कोल्हारनजीक मुक्कामचें—

"त्रिंबकराव मामा व आमच्या फौजेस बारा कोसांची तफावत आहे. मामा गुरमकोंड्यास मोर्चे लावून बसले आहेत. तोफांची मारागिरी होत्ये. आंत माणूस दोन हजार व शेंपन्नास स्वार व दोन तीन हत्ती आहेत ह्मणतात. एक दोन रोजांत पेठेवर हल्ला करून पेठ घेणार.

---

१. बेंगरूळची.

पेठ आल्यावर किल्ला सत्वरच हस्तगत व्हावासें आहे. कोल्हार प्रांतें हैदरखानाकडील चंद्रोजी जाधव शें दोनशें स्वार व पांच सातशें प्यादे घेऊन गडबड मांडिली होती. त्याजवर येथून गोविंदपंत मामा समागमें एक हजार स्वार देऊन पाठविलें तों तो पळून गेला."

नं० १०१० (भाद्रपद शुद्ध तृतीया. २३ आगष्ट.)

आपाजी शंकर यांजकडून बाबूराव यास १ जमादिलावलचें पत्र.—

"श्रीमंतांची स्वारी कर्नाटक प्रांतीं विजयादशमीच्या मुहूर्तें होणार आहे. फौजेचाही सरंजाम भारी होत आहे. तोफा चाळीस शेरी गोळ्यांच्या ओतल्या आहेत. जातांच आधीं बेंगळूर घ्यावेसें आहे."

नं० १०११ (भाद्रपद शुद्ध षष्ठी. २६ आगष्ट.)

नारो[1] बाबाजी दामले यांचें बळवंतराव पटवर्धन यास पत्र ४ जमादिलावलचें.

"दरबारी पुण्याकडील वर्तमान तरी तोफा गाडदी मावळे लोक व जलमार्गें आरमार येणेंप्रमाणें बंदोबस्त करून खामखा यंदां हैदरनाईक नेस्त नाबूद करावासा (श्रीमंतांचा) मनोदय आहे. हजार तीन चार पावेतों कुऱ्हाडे तयार केले आहेत. आणखी होतच आहेत. सरंजाम भारी यंदा श्रीमंतांचा दिसतो. विजयादशमीस निघोन मजल दरमजल येणार अशी आवई आहे."

---

१ हा नारो बाबाजी व नं० १०१३चें पत्र लिहिणारे केसो बल्लाळ गोरे व रामचंद्र बल्लाळ गोरे हे सर्व कारकून पटवर्धनांचे. यांचे वंशज मिरजेंत आहेत.

नं० १०१२ ( २९ आगष्ट. )

गोविंद हरीचें गोपाळरावास पत्र भाद्रपद शु० ९ बुधवारचें.—

"राजश्री भगवंतराव घुळप बाळापुरास जावया श्रीमंतांनीं रवाना केले ते मिरजेस आले. आमचे भेटीस आले होते. पांच सात रोज येथें होते. काल जाणार होते. गेले असतील. याणीं चिकबाळपुरास जाऊन जानोजी घुळप यांस देशास लाऊन द्यावें. आरमार त्यांचे स्वाधीन (श्रीमंत) करणार. ह्मणोन बोली आहे."

नं० १०१३

केसो बल्लाळ व रामचंद्र बल्लाळ गोरे यांचें गंगाधररावास पत्र भाद्रपद शु० ९ चें.—

"श्रीमंत राजश्री नारायणरावसाहेब यांस दिवाणगिरीचीं वस्त्रें दिलीं नसतील, जखमेचीं दिलीं असतील, तथ्य काय तें लिहून पाठविणें, ह्मणून आज्ञा, ऐशास दिवाणगिरीचीं वस्त्रें श्रीमंत राजश्री नारायणराव साहेबांस दिलीं खरीं. मुतालिकीचीं वस्त्रें राजश्री सखारामपंतास दिलीं. (त्यांनीं) नारायणरायाजवळ बसोन कारभार करावा, त्यास समजवावा, याप्रमाणें सांगितलें; परंतु वस्त्रें दिलीं त्याचे दुसरे दिवशीं सखारामपंत दरबारास आले नाहींत. श्रीमंतांनीं बोलाविलें नाहीं. बोलावणें एखादे दिवशीं आलें तर जातात. नाहीं तरी जात नाहींत. हैदरावर स्वारी करण्याकारितां झाडी तोडण्यास कुऱ्हाडी दोन हजार व कुदळ्या एक हजार पुण्यास तयार झाल्या आहेत ह्मणून दक्षिणेहून आलेले ब्राह्मण सांगत होते. हिंदुस्थानांतील पन्नास साठ लाख रुपये खंडणी आली."

श्री. (भाद्रपद शुद्ध अष्टमी.

१०१४ २८ आगस्ट. )

श्रीमंत राजश्री राव स्वामीचे सेवेशीं.

विनंती सेवक चिमणाजी रामचंद्र कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती तागायत छ ६ माहे जमादिलावल भौमवार प्रातःकाळपर्यंत किल्ले चेनराय-

---

१ गोपाळराव.

दुर्ग स्वामींचे कृपावलोकनेंकडून सेवकाचें व किल्ले मजकुराचें वर्तमान यथास्थित असे. विशेष. आपण फौजसुद्धां इकडील प्रांताचे बंदोबस्ताविशीं आलां ह्मणोन ऐकिलें व श्रीमंत राजश्री त्रिंबकराव मामा याणीं लिहिलें त्यावरून बहुत संतोष झाला. सांप्रत इकडील वर्तमान तरी अगोदर श्रीरंगपट्टणाहून बेदांचे दोन तीन हजार स्वार गुडीबिड्यास रस्त पोंचवावयाबद्दल माकळीदुर्गाखालीं गुंडमेगिरेवर आले होते ते चेनरायदुर्ग तालुक्यांत येऊन कांहीं गांवचीं गुरें नेलीं व तालुके मजकूरचें ठाणें तोहनकिरें यास लागून दोन चार हिरेऱ्या केल्या. त्यास ठाण्यांतील लोकांनीं मारगिरी करून एक दोन भले माणूस ठार करून एक घोडें व चार पांच असामी जखमी केले. तेव्हां अमित्राकडील फौज ठाण्यास वेढा घालून बसली आणि देवरायदुर्ग व तुमकुर वगैरे ठाणियांचे प्यादे ठाणें मजकूर घ्यावयाचे विचारावर आणविले. त्यास आह्मीं किल्ल्याहून रातोरात कुमक व दारू गोळी पाठविली ते उजाडावयास चार कोस जाऊन ठाण्यांत पोंचली. उपरांतिक दुसरे दिवशीं सायंकाळीं फौज उठून गेली. मदगिरी शिरें तालुक्याचींही कांहीं गुरेंढोरें नेलीं. हें वर्तमान राजश्री सखाराम हरी चिकबाळापुरास आले आहेत त्यांस लिहिलें होतें. त्याणीं आपल्यास लिहिलेंच असेल. त्याजवर हल्लीं आणखी हैदरखान याजकडून दोन चार हजार फौज व पांच सहा हजार प्यादे व दोन तोफा येणेंप्रमाणें तीजखान बारकी व तिमगौडा तालेकिरे याजबराबर रवाना होऊन काल इंदुवारीं तुमकुरावर आले. पुढें देवरायदुर्गावर येऊन शिरें मदगिरी व चेनरायदुर्ग या तीन स्थलांमध्यें एखादें मोठें कामकाज साधावें अगर न साधे तरी तालुक्यांमध्यें लूट लबाड करून लावगी होऊं देऊं नये या विचारावर आले आहेत. त्यांपैकीं रंगापा नाईक ह्मणोन आहे तो कांहीं जमावानिशीं देवरायदुर्गास येऊन पोंहचला. बाकीची फौजही येणार. आणखी मागाहूनही जमाव येत आहे ह्मणोन वर्तमान आहे. टिपूसुलतानही चेनगिरी बसवा पट्टणाकडे होता तो कंदिकिरें चिकनाईकनहळ्ळीकडे

फौजसुद्धां आला आहे. त्यास (आपण इकडे) फौजसुद्धां आल्यानें चिकबाळापुरावरील पारिपत्याचा समय आहे. पैरवी करणार स्वामी समर्थ आहेत. खुद्द हैदरनाईक श्रीरंगपट्टणांतच आहे. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना. पै।। छ १० जमादिलावल.

नं० १०१५ श्री. (३० आगष्ट.)

श्रियासह चिरंजीव राजश्री गोपाळराव यांसीं प्रती जानकीबाई[1] अनेक आशीर्वाद उपरी. येथील कुशल तागायत भाद्रपद शुद्ध दशमी गुरुवारपर्यंत मुक्काम क्षेत्र श्री[2] येथें वर्तमान यथास्थित जाणून स्वकीय कुशलवृत्त लेखन करावें. विशेष अलीकडे तुह्मांकडील वर्तमान कांहीं कळत नव्हतें तेणेंकरून संतोष वाटत नव्हता. त्यास चिरंजीव राजश्री भाऊनीं ज्येष्ठ वद्य प्रतिपदेचें चिकबाळापुरचे मुक्कामचें पत्र चिरंजीव राजश्री आपांचे[3] नांवें पाठविलें त्याची नक्कल चिरंजीवानीं लिहून येथें पाठविली त्यावरून सविस्तर कळून संतोष झाला. चंद्रोजी जाधव हैदरखानाकडील जमावसुद्धां तीन तोफा घेऊन चिकबाळापुरावरी अकरा दिवस येऊन राहिला होता. गांवास गोळागोळी करीत होता. तों तुह्मास बातमी कळोन तुह्मीं तिन्ही पथकें व राजश्री मुराररात्र घोरपडे व रास्ते ऐसे एकत्र होऊन चालोन जाऊन त्यांसीं युद्ध करून मोड केला. त्याच्या तोफा तिन्ही घेतल्या. घोडीं शें दोनशें घेतलीं. चंद्रोजी जाधव झाडींत पळून गेला. हें सविस्तर लिहिलें होतें. बरें. श्रीनें यश दिलें हें ऐकून संतोष झाला. त्या अलीकडील वृत्त सविस्तर लिहीत जावें. आह्मांकडील वर्तमान आह्मीं ज्येष्ठ वद्य द्वितीयेस येथून गयेस जावया निघालों ते पंधरा दिवशीं गयेस गेलों. तेथें दीड महिना होतों. गया-

---

१. ही परशुरामभाऊची आई. २. काशी. ३. त्रिंबक हरी. यावरून भास्कर हरि, गोविंद हरि, त्रिंबक हरि या तिघां बंधूंपेक्षां परशुरामभाऊंचा बाप रामचंद्र हरि हा वडील होता हें सिद्ध झालेंच. बाळंभट व कृष्णंभट यांपेक्षां मात्र तो लहान होता कीं मोठा होता हें कळत नाहीं.

वर्जन झालें. आह्मांस साडेचार हजार रुपये ( खर्च ) पडून तेथून श्रावणी पौर्णिमा करून निघालों ते भाद्रपद शुद्ध पंचमीस येथें आलों. येथील राजा बळवंतसिंग होता तो भाद्रपद शुद्ध तृतीयेस मृत्यु पावला. क्षेत्रांत कांहीं दंगा अद्यापि झाला नाहीं. त्याणें पाळक लेंक[1] घेतला आहे. सांप्रत राज्य त्याचे आज्ञेनेंच त्याचे कारभारी चालवितात. सुजा-दौला येथें येणार ह्मणोन आवाई होती परंतु अंतर्वेदींत श्रीमंतांची फौज राजश्री रामचंद्र गणेश आले आहेत तो ( त्यास ) शह आहे यास्तव तो तिकडेसच आहे. या प्रकारचें वर्तमान आहे. आह्मीं सर्व मंडळीसुद्धां सुखरूप आहों. आह्मांविषयीं तिळमात्र चिंता न करावी. तुह्मांकडील सविस्तर लिहीत जावें. बहुत काय लिहिणें लोभ असों दीजे हे आशीर्वाद.

नं० १०१६ श्रीशंकर. ( भाद्र० शु० एकादशी. ३१ आगष्ट. )

सेवेशीं[2] महादाजी अनंत साष्टांग नमस्कार विज्ञापना. तागायत छ ९ जमादिलावल भृगुवार अडीच प्रहरपावेतों चिकबाळापुरीं क्षेम असों. विशेष. हैदरखान पट्टणांतच आहे. मीर बहुत श्रमी[3] होऊन आपले जागांच आहे. दरबारास जात नाहीं. गुरमकोंडा जेर झाला आहे ( असें ) तेथें वर्तमान आहे याजकरितां निरोप मागत होता. हैदर-खान निरोप देत नाहीं. 'मीच जातों आणि मोर्चे उठवितों' ऐसें ह्मणोन बाहेर दोन ढाला ( हैदरानें ) उभ्या केल्या आहेत. गाडदी प्यादे पंधरा हजारपावेतों बाहेर येऊन राहिले आहेत. राऊत पट्टणांत नाहीं. फार तर पांचशेंपावेतों असतील. झाडून फौजसुद्धां मागडीच्या झाडीकडे चेनापट्टणपावेतों आहेत. पट्टणाकडे पाऊस नाहीं. गवत

---

१. वारनहेस्टिंग्स प्रकरणांतील प्रसिद्ध चेतसिंग. २. पत्र बाळापूरच्या मामले-दाराकडून गोपाळरावास. ३. आपली जहागीर गुरमकोंडा मराठ्यांची फौज घेणार व हैदर तर कुमक कांहींच करीत नाहीं याबद्दल कष्टी.

नाहीं. याजकरितां झाडीच्या आश्रयानें चारणीस आहेत. खासा आपण निघणार आहे. येणेंप्रमाणें माणूस बातमीस पाठविला होता त्याणीं जबानी सांगितलें व टिपूसुलतान पट्टणास आला होता त्यासही रवाना करून शिरें, मदगिरी, चित्रदुर्ग इकडे लुटावें, मारावें, पोट भरावें, येणेंप्रमाणें सांगितलें. त्याजवरून सेवेशीं लिहिलें आहे. देवरायदुर्गा-जवळ फौज दोन तीन हजार स्वार व प्यादे बारसुद्धां ताजखान बारकी आला ह्मणोन वर्तमान आलें याजवरून माणसें बातमीस पाठविलीं होतीं. आज प्रातःकाळीं बाळापुरास आलीं त्यांणीं सांगितलें कीं टिपूसुलतान खासाच तीन हजार स्वारांनिशीं आला ह्मणून पाहून माणसें आलीं त्याणीं सांगितलें. त्याजवरून सेवेशीं लिहून पाठविलें आहे. बेंगळुरास माणसें पाठविलीं. बेंगळुराभोंवत्या चौक्या बहुत. मार्ग नाहीं. तेव्हां गवताचा भारा डोईवर घेऊन ( आमचा माणूस ) गेला तेव्हां निभाव होऊन बेंगळुरांत गेला. आंत दीड हजारपावेतों स्वार आहेत. राजश्री सखाराम हरी स्वारीस गेले होते त्याणेंकरून बेंगळुरांत फार गडबड झाली. त्यांच्याही मुलुखांत सरकारच्या फौजा येतात ऐसी आवाई पडली आहे. बेंगळूरचे राऊत हुसकोट्याच्या मुलुखांत स्वारी करणार ह्मणून आवाई होती. येणेंप्रमाणें माणसांनीं सांगितलें त्यावरून सेवेशीं लिहिलें आहे. गंजीकोट्याहून कांहीं शाखभाजी पाठविणें ह्मणोन तेथील इजारदार याजकडे माणूस पाठविला आहे. शाखभाजी आल्यास पावलियाचें उत्तर देविलें पाहिजे. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना. पै॥ छ १० जमादिलावल.

नं० १०१७ (८ सप्तंबर)

गोविंद हरीचें गंगाधररावास पत्र भाद्रपद वद्य ३ चें.—

"हैदरनाईकाची फौज गुडबिंड्यावर रस्त पोंचवावयास आली होती त्या फौजेवरी तुह्मीं गेला, ते पळोन गेल्याचें लिहिलें तें कळलें. श्रीमंतही भाद्रपद शुद्ध १३ रविवारचे मुहुर्तें डेरेदाखल झाल्याचें

वर्तमान पुण्याहून आलें आहे. 'झाडी तोडावयाचें सामान कुऱ्हाडी वगैरे यांची तरतूद पुण्यांत भारी होत आहे ह्मणून लष्करांत खबर आहे' ह्मणून लिहिलें तें प्रमाणच आहे. त्याप्रमाणें तरतूद आहेच"

नं० १०१८ (भाद्रपद वद्य तृतीया. ८ सप्तंबर.)

नारो बाबाजी दामले यांचें गंगाधररावास पत्र १७ जमादिलावलचें.—

"श्रीमंत राजश्री पंतप्रधान डेरेदाखल भाद्रपद शुद्ध त्रयोदशीस रविवारीं प्रातःकाळच्या दोन तास दिवसास दाखल झाले. स्वारी कर्नाटकप्रांतें यंदां फारच जलद यावी, जलमार्गें आरमार आणावें, पायींचे लोक आरब, गाडदी, फिरंगी जो कोणी कसबी असेल त्यासच ठेवावें, (याप्रमाणें ठरलें आहे). तोफाही तयार होत आहेत. कुऱ्हाडी दहा हजार पावेतों नवीन तयार केल्या आहेत. यंदां खामखा शत्रूचें पारपत्य करावें अशी धमक आहे."

नं० १०१९ (९ सप्तंबर.)

वामनरावाचें गोपाळरावास पत्र भाद्रपद वद्य ४ चें.—

"राचोटी व चांभारटेकडी हीं दोन्ही स्थळें (आपण) घेतलीं. उपरांतिक शत्रूची फौज गुडीबंड्यास रस्त पोंचवावयास आली तिचे मुकाबल्याकरितां मामानीं आह्मांस रवाना केलें तों तीही फौज पळून गेली ह्मणून लिहिलें तें कळलें. मामानीं गुरुमकोंडें येथें मोर्चे दिले आहेत. त्यास राजकारणानें किल्ला हस्तगत झाला तर न कळे. नाहींतर जागा तो बिकटच आहे."

नं० १०२० (भाद्रपद वद्य प्रतिपदा. ६ सप्तंबर.)

केसो बल्लाळ व रामचंद्र बल्लाळ गोरे यांचें गंगाधररावास पत्र १५ जमादिलावलचें.—

" श्रीमंत राजश्री पंत प्रधान उभयता[1] भाद्रपद शुद्ध त्रयोदशी भानुवारीं डेरेदाखल झाले. हैदरखानावर स्वारी मजल दरमजल येऊन होणार. झाडी तोडावयास कुऱ्हाडे कुदळी मिळोन दहा हजार सामान तयार केलें आहे. बेलदार ठेविले आहेत. "

नं० १०२१ ( १२ सप्तंबर. )

नीळकंठरावास त्रिंबक हरीचें पत्र भाद्रपद वद्य सप्तमीचें.–

तुह्मीं हैदराचे तोंडावर आहां. (मामानीं) गुरुमकोंड्यास मोर्चे बसविले आहेत. एखादे वेळेस (हैदर पट्टणांतून) बाहेर निघून निकड करून गळीं पडेल. याजकरितां सावधतेस चुकूं नये. बातमी राखोन सावध रहावें. मागें (तुह्मीं) एक वेळ दगा खाऊन लष्करचा नाश[2] केला, महादेव[3] वारला. घोडीं पडलीं. बहुत सावधपणें सकाळपासून संध्याकाळपावेतों एक जागां, संध्याकाळचा वेळ झाला ह्मणजे जागा बदलून दुसरें जागां रहात जावें. एके वेळीं जागा दुपारीं बदलावा. एके दिवशीं संध्याकाळीं दोन तास दिवसासच जागा बदलून दुसरीकडे जावें. "

नं० १०२२ ( १३ सप्तंबर. )

गोपाळराव गोविंद याचें पांडुरंगरावास भाद्रपद कृष्ण ९ चें पत्र.

" गुरमकोंड्याचे मोर्चे खंदकावर गेले आहेत. सरकारच्या तोफांचें बळ थोडकें ह्मणून दिवसगत लागली. हैदरखान पट्टणासच आहे. टिपूसुलतान बेंगळुरापुढें कृष्णराजपुरावर आहे. (त्याजबरोबर) फौज तीन साडेतीन हजार आहे. चार हजार गाडदी व पायींचें माणूस आहे. देवरायदुर्गास हजार फौज आहे. "

---

१. पेशवे व त्यांचे बंधू नारायणराव. २. छापा पडला तेव्हां. ३. पुतण्या महादेव कृष्ण पटवर्धन मंगळवेढेकर.

श० १६९२ **हैदरअलीवर तिसरी स्वारी.** इ. स. १७७०

नं० १०२३ (आश्विन शुद्ध. सप्तं. द्वि. पंधरवडा.)

मोरो बल्लाळांचें गोपाळरावास पत्र.

"पुण्याकडील वर्तमान श्रीमंत खासा भाद्रपद शुद्ध त्रयोदशीस निघोन गुलटेकडीवर डेरादाखल झाले. दसऱ्यापर्यंत तेथेंच मुक्काम आहे. विजयादशमी होतांच कूच करून मजल दरमजल पंढरपुराकडे येणार. मोंगलास बोलाऊं पाठविलें आहे. राजश्री जानोजी भोसले तो खुद्दच फौजसुद्धां आले. दसऱ्याच्या मुहुर्तेकरून श्रीमंतांच्या व त्यांच्या भेटी होणार आहेत. तमाम लोकांस बोलावणीं गेलीं आहेत. दसरा करून सारे जमा होतील. कर्नाटकांत यावयाची त्वरा आहे. कार्तिक शुद्धांतच कृष्णापार होतील."

नं० १०२४ (भाद्र. वद्य. सप्तं० प० पंधरवडा.)

नरसिंगराव घायगुडे यांस गोपाळरावांचें पत्र.

"हैदरखान पट्टणांत आहे. बाहेर पडणार नाहीं. टिपू सुलतान चेनगिरीकडेच होता परंतु आह्मीं या प्रांतास आलों ही बातमी त्यास समजतांच तुंगा भद्रा या दोहों नद्यांच्या बेटांमध्यें मुक्काम करून राहिला आहे. कारण काय ह्मणाल तरी लांब धावणी करून चिक-बाळापुरास गांठ घातली त्याप्रमाणें होईल याजकरितां अडचणीच्या जाग्यांत जाऊन राहिला आहे. हनगलही सावनूरकरांनीं घेतलें. आतां तिकडे जात नाहीं. राजश्री मामा गुरमकोंड्यास आले. दोन चार दिवस मुहूर्त नव्हता. मोर्चे लाविले नाहींत. श्रावण वद्य त्रयोदशीस पेठ घेऊन मोर्चे लाविले. किल्ला साध्य होईलसा दिसतो."

नं० १०२५ (आश्विन शुद्ध सप्तमी. २६ सप्तंबर.)

नारो बाबाजी दामले यांचें गंगाधररावास पत्र ६ जमादिलाखरचें.

"श्रीमंत अगोदरच डेरे दाखल झाले आहेत. विजयादशमीचे

सुमारें मजल दरमजल कर्नाटक प्रांतें यावें अशी तरतूद आहे. तोफा, गाडदी, पायींचे लोक, अशी तरतूद फारच आहे. जानोजी भोसले खुद्द दहा हजार फौजेनिशीं तयार होऊन येणार. बारामतीचे सुमारें खासा जानोजी व कांहीं फौज आली ह्मणोन बातमी आहे. वरकड त्रिकोडी मनोळीकडेही फौज येणार ह्मणून बातमी आहे." दुसरी बातमी श्रीमंत राजश्री नारायणराव फौजसुद्धां अगोदरच पुढें रवाना करावे, मागाहून राहिली फौज घेऊन खाशांनीं यावें, हा मनसबा आहे."

नं० १०२६ (२७ सप्तंबर.)

"मोरो बल्लाळाचें गोपाळरावास आश्विन शुद्ध ८ सौम्यवारचें पत्र.

मामांनीं गुरमकोंड्यास मोर्चे दिले आहेत. आज वीस दिवस झाले. अद्यापि पेठ झुजत आहे. मोर्चे खंदकापावेतों गेले परंतु खंदकभरी आंत पाणी आहे. एक बाजूस मात्र पाणी नाहीं. आंत मिराचा भाचा आहे. आणि तीन हजारपावेतों माणूस आहे."

नं० १०२७ (आश्विन शुद्ध दशमी. २९ सप्तंबर.)

वासुदेव धोंडदेव याचें गोपाळरावास ९ जमादिलाखरचें पत्र.

"गुरमकोंडेचें वर्तमान तरी तळ्याचे कोनचा बुरूज होता तो सुरुंगानें उडविला. अर्धा बुरूज उडाला. खंदक भरून निघाला. तेसमयींच इकडील मोर्चे जाऊन अर्ध्या बुरुजावर जाऊन बसले. तेथील मोठी मारगिरी आंतील प्याद्यांची होत आहे. राजश्री मुराराव हिंदुराव यांचाही सुरुंग तयार झाला आहे. एक सुरुंग किल्ल्याचें भिंताड टाकून आंत गेला आहे त्या सुरुंगानें रात्रौ टाळें पाडून फौजेची फौज आंत जावी असें केलें आहे."

नं० १०२८ श्री. (भाद्रपद वद्य अमावास्या. १९ सप्तंबर.)

सेवेशीं बाजी गोविंद साष्टांग नमस्कार विनंती येथील कुशल तागायत

छ २८ जमादिलावलपावेतों मुक्काम नजीक गुरमकोंडा वर्तमान यथास्थित असे. विशेष. आपण पत्र पाठविलें तें पावलें. "किल्ल्याचें राजकारण आलें आहे ऐसें परस्पर ऐकिलें, आपण कांहींच लिहिलें नाहीं," ह्मणोन लिहिलें, ऐशियास किल्ल्याचें राजकारण कांहींच आलें नाहीं. मोर्चे खंदकावर गेले. दोहों चोहों दिवशीं हल्ला करावा असें ठरावांत आलें आहे. मिराकडून मात्र अफदुलकादर व बालक रामबक्षी ऐसे श्रीमंतांचें पत्र व मिराचें ऐसीं घेऊन आले. त्यांतील मजकूर किल्ल्या निसबतीचा कांहींच मजकूर ते बोलत नाहीं व त्यांचे अकत्यारांतही नाहीं. किल्ल्यांत वैरण पाण्याचा मोठा पेंचच आहे. वरकड सारें अनुकूलच आहे. जागाही जेर झालीच आहे. मीर श्रीमंतांकडे येणार. तो आल्यावर जुनें आहे तें सर्व चालवावें व नवे हजारपावेतों स्वार करार करून द्यावे याप्रमाणें करारमदार ठरोन मिरानें लवकर उठून यावें याजकरितां उभयतांनीं मिराचा खिजमतगार मिराकडे पाठविला. सहा दिवस झाले. चवदा दिवसांचा करार केला आहे. किल्ल्याचें खालील भिताड फारसें मजबूत नाहीं. खंदक मात्र भारी आहे. परंतु काळ्या मृत्तिकेचा[1] तोटा आह्मांजवळी झाला. तोफाही थोडक्या. याजकरितां दिवसगत लागली. याउपर फडशाही लवकरच व्हावा ऐसें आहे. कळावें बहुत काय लिहिणें हे विनंती.

नं० १०२९ श्री.

सेवेशीं विज्ञापना. छ १ जमादिलाखर भृगुवारपावेतों वर्तमान यथास्थित असे. विशेष. काल टकल्याकडील राउतासमागमें पत्र पाठविलें आहे तें प्रविष्ट झालेंच असेल. चिणगीशा फकीर मिरजेहून

---

१. दारूचा. २. पटवर्धनांचें बुनगें गुरमकोंड्यास वेढा घालून थोरली फौज बसली होती तिजसमागमें होतें. त्या बुनग्यावरील कारकुनानें हें गोपाळरावास पत्र लिहिलें.

कापडासमागमेंच निघाला. कापड केंचनगुड्डास आलें. बैल मिरजेचे तेथून माघारे लावून दिले ह्मणून राजश्री रात्रोपंत दातार यांणीं पत्रें पाठवून दिलीं तीं मागाहून येतात ह्मणून काल सांगितलें. याच गांवची + चिणगीशा येथें आला. ढालाईत येथें पत्रें घेऊन आले तर तींच पत्रें सेवेशीं लावून देतों. अगर परभारें हुजूर गेले तर उत्तम झालें. बुनगें कालपासून सारें स्वारींत जात आहे. जाऊं नका ह्मणून सांगितलें तरी कोणी ऐकत नाहीं. येथें वैरणीची सोय चांगलीच आहे. आणखी आठ चार दिवस कडबाच मिळेल. रस्त चहूंकडून येती. कुळथ्या तीन पायली, व जोरी साडेतीन पायली, हरबरे साडेसहा शेर, याजप्रमाणें कालची धारण. गुरमकोंडा अद्यापि झुजत आहे. मिराकडील बोलावयास आला होता त्यास कैदेंत ठेविला आहे. मीररेजानें हैदरखानाजवळ रदबदल केली कीं चीजबस्त व कबिला देखील किल्ल्यांत सांपडला, त्यास फौजसुद्धां एक दोन मजली त्या सुमारें खासा गेलां तर मोर्चे उठतात नाहीं तर फौज आह्मांसमागमें दिली तर मोर्चे उठवूं ह्मणून बोलिला. तेव्हां हैदरखान यानें सांगितलें कीं आजच्या प्रसंगीं फौजेसह बाहेर निघावयाचा मान नाहीं व तुह्मींही पुढें जावयाचें नाहीं. किल्ला व चीजबस्त गेली तरी चिंता नाहीं. दुप्पट आह्मीं देऊं. असें बोलणें झालें. त्याजवरून मीररेजा बहुत अजुर्दा आहे. निघोन जाईल ह्मणून नजरबंद चौकी आहे ह्मणून वर्तमान इकडील गांवखेड्याचे लोक बोलतात. ऐकिलें वर्तमान सेवेशीं लिहिलें आहे. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना. पे॥ छ ३ जमादिलाखर.

नं० १०३० श्री. ( २३ सप्तंबर. )

सेवेशीं+ विनंती येथील वृत्त आश्विन शु० चतुर्थी सोमवारपर्यंत स्वामीच्या कृपेकरून यथास्थित असे. विशेष. इकडील वर्तमान वरचेवर

---

१. संधि. + किल्ला दुबळ प्रांत गुरमकोंडा येथें पटवर्धनांची कांहीं फौज होती तींतील कारकुनाचें हें व या पुढचें पत्र गोपाळरावास.

सेवेंत विनंती लिहून पाठविलीच आहे. बातेरीच्या मोर्चांत धमधमा उभा करून वर दोन तोफा चढविल्या. मार धरला तो आंत चहूंकडे कारागार होऊन बहुत गर्दी उडाली. याउपर काय होईल तें कळतें. अबदुलकादर व बाळकराम यांजकडून गांवांत सैदूमियास पत्र गेलें होतें 'हे किल्ले सोडीत नाहींत. उपराळियाची आशा राहिल्यावर श्रीमंतांचे पदरीं पडून कृपा संपादणें अगर मध्यस्तास घेऊन अब्रूनिशीं निघून परस्थलास जाणें. अगर जंगेच मुख्य समजोन रहाल तरी लढाई करणें. तुमचें उत्तर जे या तीन मजकुरांतील होईल त्याप्रमाणें आह्मी यांची रुकसती घेऊन जाऊं' ह्मणून यांची चिठी गांवांत गेल्यावर आंतून तात्याराव आले. आणखी चार रोज पट्टणचें उत्तर येईपर्यंत सबुरी करा ह्मणतात. यांच्या चित्तास येत नाहीं. त्यास गांवांत लावून दिलें. बातेरीच्या तोफा लागू झाल्यामुळें आंत मोठी गजबज झाली आहे. भलती एक रफेदफे करून कौल घेतील असें चिन्ह दिसतें. परंतु निदर्शन येईल तेंच प्रमाण! सुरुंगही कित्येक तयार होत आले आहेत तेही उडवावयाची निकड होते. हे जागा इतके रोज भांडेल हा अजमास यांच्या चित्तांत आरंभीं न भरला. बसल्यावर लांबणीवर पडलें. आजपर्यंत सर्वांस मेहनत सीमेपरती झाली. लोक ठार व जखमी बहुत झाले. चारा दूर पडला. महर्गता भारीच झाली आहे. आपण शत्रूच्या तोंडावर सबंध आहांत त्याजमुळें हें काम नीटपणें चालतें व गडबडीचेंही उल्बण होत जातें. हिम्मत धरून दांतकरकिटीनें नेट धरून आहेत. श्रीमंत पुण्यवंत आहेत. त्यांच्या प्रतापें यश येईल. आपण बाळापुराकडे गेल्यावर तिकडे शत्रूचा प्रकार साराच कळला असेल. चिरंजीव राजश्री नाना व आपा येऊन पावले. भेटी झाली. आपल्या दर्शनाचे उत्कंठित आहेत. त्यांनींही पेशजी विनंतीपत्र लिहून पाठविलें आहे. स्वामीस निवेदन व्हावें यास्तव

---

१. लागू. २. युद्ध. ३. त्रिंबकरावमामाच्या.

विनंती लिहिली आहे. चिरंजीव यांनीं स्वामीकडील फर्मावीस मुतलखाद्या आणिल्या आहेत त्या घेऊन पावतील. हे विज्ञापना.

नं० १०३१ श्री. ( आश्विन शुद्ध त्रयोदशी.
२ आक्टोबर. )

सेवेशीं विज्ञापना. तागायत छ १२ जमादिलाखर भोमवारपावेतों वर्तमान यथास्थित असे विशेष. खास पोषाखाचीं सनगें पेशजी पाठविलीं तीं गमावलीं, उंटही गेला, ह्मणून वर्तमान ऐकतांच जासूद वर्तमानाकरितां सेवेशीं पाठवून पांच सहा दिवस झाले. परंतु उत्तर कांहीं आलें नाहीं. हरिहराकडे श्रीमंत राजश्री भाउसाहेब[1] यांजकडील कांबळीं जुळीचीं व सूत आलें त्याजबराबर १०० कांबळीं जुळीचीं पाठविलीं तीं आह्मीं ठेऊन घेतलीं. कांबळे लांबीस सात हात व रुंदीस सव्वादोन हात याजप्रमाणें आहेत. एकंदर किंमत सत्तावीस होन जमसेरी लिहिले आहेत. किंमतीची याद श्रीमंत राजश्री भाऊसाहेबाच्या पत्रांत आहे. घरींहून प्यादा पत्र घेऊन आला त्यासच सेवेशीं पाठविला आहे. गुरमकोंड्याचें वर्तमान तर राजश्री मानसिंगनाईक निंबाळकर यांचा उंट लष्करांत आजारी आहे त्याच्या समाचारास त्याजकडील माणूस येथून गेला होता तो काल आला. त्यानें सांगितलें कीं पहिला सुरुंग बुरजास लाविला होता तो बुरूज उडाला. त्याच बुरजावर मोर्चा सरकारचा कायम केला आहे. आंतल्यानीं बुरजाच्या आंतल्या बाजूस नवी भिंत घालून मोर्चा कायम करून आहेत. बाहेरून दुसरा सुरुंग चालत होता त्यास बाहेर मोर्चा मातबर पांच सातशें माणसांचा पडला. भिंताडाजवळ होता तो सुरुंग लाऊन उडवावा ह्मणून आंतल्यांनीं सुरुंग लाविला. सुरुंग आंतून खणीत येत असतां बाहेरून सुरुंग खणीत होते त्याजवरच आंतल्या लोकांच्या सुरुंगाचें टाळें पडलें. इतक्यांत उजेड पडला

---

१. परशुरामभाऊ.

तेव्हां आंतले लोक पळोन गेले. तेव्हां सरकारच्या लोकांनीं त्याजकडील मुरुंगांतील चार पांच तरवारा, खोरीं, कुदळी, बुधले दारुचे सांपडले ते घेऊन आले. तेव्हां आंतले लोक गडबड करून तटावरून चहूंकडून पळों लागले. हें बाहेरून लोकांनीं पाहिलें तेथें हरपनहळ्ळीकरांचा मोर्चा लागलाच होता. त्यांजकडील लोकांनीं चांगला मार धरून माणूस फार जायां केलें. व एका प्याद्यानें आंत उडी टाकून दोघां चौघांस मारून फिरोन भिंत उडोन मोर्चांत आला. त्यास एक कडें बक्षीस दिलें. उपरांतिक आंतल्यांनीं एका जासुदासमागमें चिठी लिहून पाठविली कीं हत्यारें चीजवस्तमुद्धां सोडून द्याल तर कौल द्यावा ह्मणून लिहून पाठविलें. त्याच जासुदासमागमें आंतून एक गरीबही पळून आला. 'चीजवस्त सोडीत नाहीं. हत्यारें मात्र सोडूं.' असें जासुदास उत्तर लिहून दिलें. गरीब आंतून आला त्यानें सांगितलें कीं, 'आंत लोक गडबडले आहेत परंतु हत्यार व चीजवस्त न सोडिली तर खामखा मरावें अशी कस्त आहे. गुरें व घोडीं कापून खातात. गोरगरीब फार बेजार झाले आहेत. पडझडीच्या कामास गोरगरीब लावितात. पैका टका कापड झाडून किल्ल्यावर नेलें. हांडें भांडें आहे तें विहिरींत टाकिलें, ह्मणून त्या गरिबानें वर्तमान याप्रमाणें सांगितलें राजश्री मामाजवळ.' ह्मणून नाईक निंबाळकर याजकडील माणसानें सांगितलें तें सेवेशीं कळावें ह्मणून लिहिलें आहे. वैरणीचा तोटा आहे. धारण खेप आली चहूंकडून तर तीन पायलीची होती. एक दोन दिवस खेप न आली तर अडीच सव्वादोन पायली होते. याजप्रमाणें वर्तमान. आह्मीं वर्तमानाकरितां गुरमकोंड्यास जासूद पाठविला आहे. वर्तमान येतांच सेवेशीं लिहून पाठवितों. दुबळचें ठाणें पेशजीच्या किल्लेदारास दिलें. काल किल्ल्यांत त्याचें ठाणें बसलें. चाळीस पन्नास लोक त्याजकडील आहेत. आमचा बंदोबस्त चांगलाच आहे. दरवाजेंत त्याजकडील व आह्मांकडील लोक आहेत. तूर्त आंत कारखाना आहे तसा

असल्यास फिकीर नाहीं. खुद्द किल्लेदार राजश्री त्रिंबकराव मामाजवळ आहे. त्याजकडील एक कारकून व एक बापभाऊ येथें आला आहे त्यास आह्मीं चार गोष्टी समजोन सांगितल्या. आंत कारखाना असल्यास चिंता नाहीं. असो. 'प्यादे आह्मीं श्रीमंतांचे पदरीं पडलों, श्रीमंतांचा कारखाना, तेव्हां फिकीर नाहीं. सर्व प्रकारें रावसाहेबांनीं सांभाळ करावा. भरंवसा त्यांचाच आहे. दुसरा विचार चित्तांत न आणावा.' असें बोलिले. आमचें माणून लहान मोठें दोनशें अडीचशेंपावेतों. आंत त्याचेंही पन्नासपावेतों. आह्मीं बाहेर, तेव्हां कांहीं फिकीर नाहीं. येथें धारण तीन पावणेतीन पायलीची आहे. गुडीबिंड्यास शें दोनशें बेदडे कहीवर येऊन पडणार ह्मणून बातमी चहूंकडून आली त्याजवर आज दोन दिवस कही पाठविली नाहीं. डोईभारच आणविले. बेदडे माघारे गेले ह्मणून वर्तमान आलें याजकरितां आज कही पाठवून दिली. वाटेस उंट दगावला व एका दिवसाआड कही जात होती ही बातमी राखोन कहीवर गडबड करील ह्मणून कही पाठविली नाहीं. गुडीबिंड्यास पुढें फौज असतां बेदडे येऊन ठरणार नाहींत हे अकलेच्या वाटेनें पहातां दिसतें. परंतु बेदडे आले, कहीवर पडतात, ह्मणोन लोक बोलों लागले ह्मणून पाठविली नाहीं. सेवेशीं विदित होय हे विज्ञापना.

नं० १०३२ श्रीगजानन प्रसन्न. ( ३ आक्टोबर. )

सेवेशीं विनंती येथील वृत्त आश्विन शुद्ध चतुर्दशी बुधवारपर्यंत स्वामीचे कृपेकरून यथास्थित असे विशेष. इकडील वर्तमान वरचेवर पत्राअन्वयें चित्तास येतच असेल. व एक दोन वेळां येथून सवतें लिहिलेंही होतें. गुरुमकोंड्यास हुजरात व रास्ते व आनंदराव गोपाळ व तोफखाना एकूण पांच सुरुंग खालील कोटास सुरू झाले. त्यांपैकीं हुजुरातच्या सुरुंगानें एक चौकोना मात ़र बुरूज बातेरीकडील तयास

होता तो उडविला. पंचवीस तीस प्यादे वर होते ते ठार झाले. कित्येक दडपले व जखमा लागून घायाळ झाले. एकूण चाळीस माणूसपर्यंत गांवच्यांचें मारिलें. बुरूज मोठ्या बळानें उडाला परंतु आवाज न होतां उठून बसला. दोन्हीकडील तटाची दिवाळ भपकाऱ्या-सरशी हादरून शिथील झाली. हा सुरुंग इतकें काम करीलसा भरंवसा नव्हता. नाहींतर त्याच गर्दीसरसे लोक चढले असते तर काम होऊन येतें ह्मणून लोक ह्मणतात. आंतल्यांनीं त्याच बुरुजाचे टेकडीचा आसरा धरून मारगिरीस आरंभ केला तेव्हां त्यांचा उपमर्द करावयास इकडील करोल प्यादे वगैरे बरकंदाज लोक नामी माणूस त्याच ढिगाच्या माथ्यावर ठेविलें. खालीं आंतील माणूस, वर इकडील लोक, दोन चार रोज मोठी झुमर झाली. लोक कित्येक दुतर्फा जायां व ठार झाले. आतल्यांस यांचा भरंवसा कळोन तसाच दम धरून पडल्या बुरजाच्या आंतील बाजूस पडदीची भिंत जबरदस्त घातली. एकूण त्या जागाची मजबुती अशी केली. आह्मांकडील मोर्चा बराच गेला. परंतु डोंगर माची चढ मेहनत करून बुरजाजवळ लोक. दगडी जमीन. सुरुंगाचा उपाय त्या जाग्यास नाहीं. आरबांचा मोर्चा सुरुंग बुरुजाच्या लग्यास तीन हात अंतरें आहे. माती सक्त. कजाखीनें तीन चार रोजांत सुरुंग बुरजाखालीं जाऊन तयार होईल. रात्रो बापोजी याज-कडील बातेरीच्या मोर्चाचा सुरुंग चालत होता त्यास आंतील सुरुंग भेटला. बातेरीस सुरुंग आंतून येतो, दगा होईल, ह्मणून बातमी बित्तीम कळली होती तेच सत्य झाली. त्यांच्या सुरुंगाचा सुमार पाहतां एक फाट पंचेताळीस हात. दुसरा डावेकडील सत्तावीस हात. तिसरा उजवेकडील अठरा हात. असे तीन सुरुंग तक्तपोशी मजबूद काम करून बातेरी सारी पोखरली होती! बुधले मात्र आंत घातले नव्हते. खंदकाच्या आंतील पाळीपासून आरंभ बातेरीच्या सुरुंगास केला. बाहेर न जाणो, कसें जातां कसें घडेल ह्मणून या अंदेशानें

तो बुरूज सोडून तें काम (आंतल्यांनीं) राहतें केलें. यांनीं त्याच मार्गें शेवटवर जाऊन त्यांचें द्वार होतें तें बुजावून दुसरे जागाकडून सुरुंग बुरजास चालविला तो ही आठ दहा हातावर आहे. आनंदराव रास्ते व आनंदराव गोपाळ यांच्या मेहनती बहुत. रास्त्यांचा सुरुंग आठ हातावर बुरूज टाकून आहे. तसाच आनंदराव गोपाळ यांचा आहे. त्याही सुरुंगाची खोदणी भारी. खडक हत्यार चालत नाहीं. काम भारी जातें. याप्रकारें सुरंग व मोर्चाचे प्रकार. याशिवाय पाळेगार व कडपेकर हेही आपलाल्या अनुकूलानुरूप मोर्चे बसवून आहेत. पांच सहा रोजांत सारे सुरुंग तयार होतात व बातेरीमध्यें दमदमा बांधविला त्याचीही बिलंदी किल्याचे कुसावर उंचीस येत चालली. त्याजवर तोफा ठेऊन मारगिरी करावी याजकरितां दमदम्याची तयारी योजिली आहे. आंतील लोकही मोठ्या इरेनें प्रती लढाई देतात. त्यांची लढावयाची सीमा आहे. दीड महिना झाला. गांवांतील लोक फटकर्डानें[1] व तोफानें फार मेले. गांवांत पाणी नाहीं. सर्व जिन्नस मिळत नाहींसा झाला. कच्चे पक्याचा सुमार दिसतो, परंतु प्रत्ययास येईल तेव्हां सत्य असें आहे. (आंतील लोकांस) उपराळ्याचा भरंवसा आजपर्यंत होता ते निराशा झालीसें आहे व सर्व जिन्नसांचा तुटीचा मजकूरही घडला आहे. याजमुळें आंतील हवालदिल आहेत. मीररेजानीं श्रीमंतांस लिहून तेथून त्यांचें पत्र मामांस आणिलें होतें जे, 'मीर निघोन येतील त्यांस आणवून इकडे पाठविणें.' त्यास बहुत रोजांचें होतें[2]. गुरुमकोंड्यास मोर्चेन लागले त्या अगोदर पत्र यावें, त्यास या स्थळास बसल्यावर आलें. त्याजमुळें जाबसाल त्याचा शिळा पडला आहे. त्यांत तोडमोड काढून बारा रोजांचा करार करून रेजास आणावें ऐसीं पत्रें आपलीं व किले-

---

१. बंदुकांनें. २. पत्र लिहिलें गेल्यास पुष्कळ दिवस होऊन गेले होते.

वाल्यांचीं अंतरंग बहिरंग रूपें घेऊन विश्वासू माणूस पट्टणास गेला. बारा रोज होऊन गेले. आला नाहीं. तर्केंकरून पाहतां मार तेथील चौकींत आहेसें वाटतें. दोन्ह गृहस्थ आले ते येथेंच आहेत. त्यास अद्याप गांवांतून मूस फुटली नाहीं. 'प्रस्तुत आल्या गृहस्थांपैकीं एकास पाठवून द्यावें. त्यांसी बोलोन काय तें सांगून पाठवितों' ह्मणून सांगोन आपला माणूस (आंतल्यानीं) पाठविला. त्यास यानीं उत्तर सांगोन पाठविलें जे, 'प्रयोजन कोणतें?' उगेच आह्मीं पाठवीत नाहीं. कोणी तुमचा शहाणा असेल त्याजबरोबर प्रयोजन काय तो मतलब सांगोन पाठवा, त्याचा भाव मनास आणून त्याप्रमाणें त्या गृहस्थास तुह्मांकडे पाठऊं. ह्मणोन सांगून पाठविलें. त्याचा जाब आज येणार. जिंदगी खासगत आपण व लोक हत्यारसुद्धां सोडून द्यावें, भलत्या एक ठिकाणास पोंचतें करावें, किल्ला घ्यावा, असला तर असा भाव असूं दे! हेंच किंवा काय साप विंचू आहेत (तें कळतेंच आहे!) सेनापतींच्या[1] शरीरास स्वस्थ नाहीं. आजवर ज्वरानें हैराण झाले. प्रस्तुत संधिवात प्रबळ होऊन फार श्रमतात. या स्थलास आल्या दिवसापासून सुखी नाहींत. कैबाड तीन गांवा[2] गेलें. दाणा महर्ग. पाऊस थेंब नाहीं. पावणेदोन महिने झाले. पेंच आहे. उपाय नाहीं! आपणास कळावें ह्मणून लिहिलें. पाहून पत्र लागलेंच फाडून टाकावें. हे विनंती.

नं० १०३३ **श्रीशंकर.** (आश्विन शुद्ध पौर्णिमा. ४ आक्टोबर.)

राजश्री गोपाळराव स्वामीचे सेवेशीं.[3]—

विनंती उपरी तागायत छ १४ जमादिलाखरपर्यंत वर्तमान यथास्थित

---

१. मुराराव घोरपडे यांच्या. २. गांव ह्मणजे चार कोस. कबाड ह्मणजे वैरण व लांकूड. वैरण लांकूड बारा कोसांवरून आणावें लागतें असा अर्थ. ३. त्रिंबकराव मामाचें हें गोपाळरावास पत्र.

असे. विशेष. काल राजश्री आपाजीराम यांजकडून पुंगनुराहून बातमी आली कीं टिपुसुलतान तीन हजार फौज व दोन हजार बार, एक कीं दोन तोफा घेऊन रामसमुद्राचे पश्चिमेस एल्दूर ह्मणून चंद्रोजीचा[1] गांव आहे तेथें आली. पुढें बनल्यास गुरमकोंड्याचे फौजेची कही मारावी, आगळीक करून दाखवावी, या भावें करून मदनपल्लीपर्यंत येऊन पोंहचले असतां या समयीं पाठोपाठ तुह्मीं येऊन आह्मांस लिहून पाठविलें असतें कीं 'आह्मीं पाठीवर आलों. पांच सात कोसीं-जवळ आहों. आणखीही दोन हजार फौज दुगोम शहाकरितां मात्र पाठवावी, ह्मणजे दरोबस्त (शत्रूची) फौजच बुडवितों.' ऐसें लिहिलें त्यासमयीं येतें तर आह्मीं कसे तरी मोर्चे संभाळून दोन हजार फौज त्याजवर रवाना केली असती. याप्रमाणें (त्याची) मैदानांत फौज कधींही येणार नाहीं. हा मोठा समय होता. तुह्मांकडील बातमी तर जरारे घेऊन गांठ घालावयाचे विचारांत असाल, परंतु तुमचें पत्र मात्र यावें हीच वाट आह्मीं पाहत आहों. तुह्मीं होऊन या गोष्टीचा उद्योग करून एवढी फौज जरबेंत आणिली असती तर मोठीच गोष्ट झाली असती. तुह्मांकडील इषारा येतांच येथून फौज आली असेल समजावें. परंतु येसमयीं इतकी मैदानांत आलेली फौज सोडूंच नये हा मुख्य पक्ष. आधींच या गोष्टीची बातमी राखून यावें हें उत्तम. असो. आतां तरी हें पत्र प्रविष्ट होतांच लिहिल्या प्रकारें आधीं स्वार होऊन दुरुगमल्यास पुढील रोखाप्रमाणें उजवे अगर डावें टाकून तावडतोब लिहून पाठवावें. हजार दोन हजार लोक तरी निवड करून तुह्मीं तिकडून इकडून आह्मीं एके दिवशीं गांठ घालून फौज जरबेंत आली तर हाही लौकिक तुमचा मातबरच होईल. तुह्मीं याच रखवालीकरितां तिकडे राहिला असतां याप्रकारें दोन चार हजार फौज मैदानीं येऊन कही कवाड या लष्करचें

१. हैदराचा सरदार चंद्रोजी जाधव याचा.

केल्यावर मग ( तुमची ) फौज तोंडावर ठेविली त्याचें फल काय? या समयीं रातीचा दिवस करून येऊन बेजरब गांठ घालावी आणि आह्मांस इषारा मुकरार ठिकाण दिवस लिहून पाठवावें. त्याप्रमाणें येथूनही फौज येईल. वारंवार कोणती एक गोष्ट लिहावीशी नाहीं. समयास चुकल्यास पुढें काय उरेल! याजकरितां खोलून लिहिलें असे. आपण पत्र पाठविलें तें पावलें. नेजगलाकडे टिपू आहे ह्मणून लिहिलें, परंतु मागडीकडे गेला हेंही लिहिलें तें कळलें. हें खरें कीं दरबारी बातमी येते ते खरी. बातमी ठीक येत नाहीं हेंही खरें. वरकड मजकूर लिहावयाजोगा अद्यापि झाला नाहीं. झाल्यावर लिहून पाठवूं. बहुत काय लिहिणें लोभ असो देणें हे विनंती.

पै॥ छ १६ जमादिलाखर मंदवार सहा घटका
दिवस प्रातःकाळचा.

नं० १०३४ श्रीगणराज. (४ आक्टोबर.)

चिरंजीव राजश्री तात्या यांसीं प्रती गोपाळराव गोविंद. आशीर्वाद उपरी. येथील कुशल तागायत आश्विन शुद्ध पौर्णिमा गुरुवार मुक्काम चिकबाळापूर वर्तमान यथास्थित जाणोन स्वकीय कुशल लिहीत जावें. विशेष. तुह्मीं पत्रें पाठविलीं तीं पावलीं. लिहिला मजकूर सविस्तर कळला. उत्तरें अलाहिदा लिहिलीं आहेत त्याजवरून कळेल. गुरमकोंड्याचे मोर्चांचें वर्तमान तर रेवणीस टाळीं पाडून खंदकांत उतरोन सुरुंग बुरुजास लाविले. एक हुजुरातचा सुरुंग तयार झाला तो उडविला. बुरूज पडला. परंतु आंतल्यांनीं दम धरून तेथून मार करूं लागले. एकतोंडी ह्मणून हवा न झाली. आणखी सुरुंग तीन तयार व्हावयाचे होते. तयार झाल्यावर सुरुंगास बत्ती देऊन हल्ला करावी असा प्रकार आहे ह्मणून राजश्री मामांचें पत्र आलें होतें. सुरुंगास बत्ती देऊन हल्ला केल्याचें वर्तमान आलें ह्मणजे

---

१. मिरजेस पांडुरंगरावास पत्र.

मागाहून लिहून पाठवितों. हैदरखान पट्टणासच आहे ह्मणून आवाई आहे. टिपू सुलतान चार हजार फौजेनिशीं होता. आश्विन शुद्ध पंचमीस कूच करून मलबागलावरून मागडीकडे गेला. पट्टणास जाणार ह्मणून आवाई झाली आहे. परंतु दगाबाज आहे. कोणीकडे येईल पहावें. आह्मी सावधपणें आहों. बहुत काय लिहिणें. किल्ल्यांतील व घरांतील वगैरे सर्व खबरदारी उत्तम प्रकारें आहे ह्मणून लिहिलें, उत्तम आहे. मिरजेंत पसू घोड्या असतील त्यांपैकीं सबर नसतील त्या काढविणें. शिंगरांची निगा चांगली करविणें. चिरंजीव वामनराव (इकडे) आल्यानंतर तुह्मांस नेहमीं खबर घोड्यांची घेतलीच पाहिजे. बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद.

नं० १०३९ श्री. (आश्विन शुद्ध प्रतिपदा.
९ आक्टोबर.)

राजश्री मुरारराव हिंदुराव घोरपडे मामलकत मदार सेनापती गोसावी यांसीं. सकल गुणालंकरण अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्नेहांकित माधवराव बल्लाळ प्रधान आशीर्वाद विनंती उपरी येथील कुशल जाणून स्वकीय लिहीत असलें पाहिजे. विशेष. पत्र पाठविलें तें प्रविष्ट झालें. हैदरअल्लीखान याचा मजकूर विस्तारें लिहिला, त्यांत मुख्यार्थ हाच कीं "हैदरनाईकाचें पुरतें पारिपत्य करावें ऐसा विचार होऊन इकडे फौजा छावणीस ठेविल्या. फौज छावणीस राहिली येणेंकरून शत्रूस जरब बसली. व पुढेंही जरब बसविल्यास कशी बसेल ह्या गोष्टीची मसलत येथें आह्मीं चौत्रे मातबर आहों त्यांस पुसोन राजश्री त्रिंबकराव यांणीं आपणांस लिहावी या भावें आपलीं पत्रें त्यांस आलीं. त्याजवरून त्यांनीं आह्मां सर्वांस पुसोन आपणांस लिहिणें तें

१. मुराररावास पाठविलेल्या पत्राची ही नक्कल आहे.

लिहिलें असे. मुख्य गोष्टी हैदरखानास जरब बसली. मनुष्यमात्र त्यास राजी नाहीं. यास्तव तह करावयास वकील आपणाकडे पाठविले आहेत. तहही करणें तो जरबेनें करावा. नफा करून घ्यावा. मीररेजा आदिकरून सर्व त्यास कंटाळले आहेत. हैदरखानाची प्रकृत अविवेकी. उद्दाम. घडीची गोष्टी, घडीस फेर! दाब मात्र आपले सेवकजनावर भारी. यास्तव लहानापासून मोठ्यापर्यंत. त्यास बेजार. मात्र आपण जलद भारी सरंजामानें यावें. उपरांतिक कर्तव्य तें करावें." ह्मणून कित्येक उल्लेखपुरस्सर लिहिलें त्यावरून कळलें. ऐशास आपण व त्रिंबकराव विश्वनाथ याणीं लिहिला विचार यथार्थ आहे. व करण्याचाही क्रम आपणाशीं बोलोन आलों त्याप्रमाणें कर्तव्यांत आणिला. मुहूर्तेंकरून डेरे दाखल झालों. तोफा व गाडदी मातबर सामान व फौजही भारी याप्रमाणें तरतूद केली. चारी विचार ध्यानांत असावे यास्तव सहज प्रकारें सुचल्यावरून मशारनिल्हेस लिहिलें होतें. केवळ तिकडे न यावें, पुण्यांतच हैदरखानाचा तह करावा, या भावें लिहिलें नव्हतें. तात्पर्य यवनास जरबेंत आणून पुरतें पारिपत्य करून देवब्राह्मणांची स्थापना करावी, संस्थानें सोडवावीं, हाच भाव आहे. दुसरा प्रकार सर्वथैव नाहीं. येविशीं त्रिंबकराव विश्वनाथ यांस लिहिणें तें लिहिलें आहे. मिराचा अर्थ लिहिला तर त्यांनीं दोन चार वेळां करार केला असतां आला नाहीं. त्यांचें बोलण्याचें कारण काय! (आमचें) येणें न झालें तों गुरमकोंड्याचें कार्य आपण उरकावें हें उत्तम असे. छ १९ जमादिलाखर बहुत काय लिहिणें. स्वदस्तूर हैदरखान प्रस्तुत कोठें आहे, त्याचें मानस प्रस्तुत काय आहे, आंत

---

१. त्रिंबकरावास. २. मीररेजाविषयींचा प्रकार. ३. त्यासंबंधें. ४. 'स्वदस्तुर' हीं अक्षरें नक्कल करणाराचीं. या पुढील मजकूर खुद्द पेशव्यांच्या हातचा आहे असा याचा अर्थ.

काय आहे, बाहेर दाखविण्यांत काय आहे, गुदस्तां (त्याजवळ) फौज गाडदी होते त्याजहून जास्ती आहेत किंवा कमी आहेत, हें कळवावें. यंदा त्या प्रांतीं लौकर यावें यास्तव लौकर निवणें झालें. त्यास त्या प्रांतीं येतांच आधीं कोणतें काम करावें, मग कोणतें करावें, आपल्यास सोय आधीं कोणत्या कामांत, याचा प्रकार व माहीतगारी सविस्तर त्या प्रांतची आपल्यास विशेष. यास्तव खोलून लिहावें. हे विनंती.

नं० १०३६ श्री. (आश्विन वद्य सप्तमी. ११ आक्टोबर.)

अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य राजश्री मोरोपंत स्वामी गोसावी यांसीं पोष्य आपाजी गोपाळ कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लेखन करीत असलें पाहिजे. विशेष. आपण बहुता दिवशीं कृपा करून पत्र पाठविलें तें पावोन लिहिला मजकूर सविस्तर कळला. असेंच निरंतर पत्रीं सांभाळीत जावें. इकडील वर्तमान तरी पेशजी वर्तमान लिहिलें होतें त्याज अलीकडे वर्तमान तरी राजश्री गोपाळराव गोविंद यांजकडून पत्र आलें त्यांतील मजकूर जे " राजश्री त्रिंबकराव मामा गुरमकोंड्यास मोर्चे देऊन बसले आहेत. आपण मुरुगमल्यावर आहों. बुणगें सरकारचें ठाणें पांच गांवें आहे तेथें लावून दिलें. सडे आहों. निमित्य ह्मणाल तर टिपूसुलतान व मीररेजा पांच सात हजार फौजेनिशीं बेंगळुरास आला आहे. किरकोळ सरकारचीं आहेत ठाणीं त्यांस उपद्रव करील. याजकरितां सडे होऊन मुरुगमल्यास राहिलों आहों. गुरमकोंड्यास मोर्चे बसवून महिना सवा महिना होत आला. आंत सामान भारी. पांच सहा हजार माणूस. तोफांचें भारी सामान व मिराचा कबिला

१. पत्र कोणीं कोणास लिहिलें हें कळत नाहीं.

आंत आहे. जिवाळ्याचें माणूस आंत आहे. व बाहेरील तोफा तो नांव मात्र आहे. हलक्या तीन चार शेरी. त्यामुळें जेरीस येत नाहींत. भारी तोफा असल्या तर लवकरच स्थल हस्तगत होतें. आजतागायत बाहेर दारूगोळीही नव्हती. हल्लीं शिऱ्यांहून दारू व गोळे शंभर बैल भरून आले. श्रीमंतांचें पुण्य विचित्र आहे. स्थळ लौकरच हस्तगत होईल. ठाणें आलेवर सविस्तर वर्तमान लिहून पाठवितों." म्हणून पत्रें छ १ जमादिलावलचीं छ २१ रोजीं आलीं, आपणास कळावें. छ २१ जमादिलाखर. बहुत काय लिहिणें हे विज्ञापना. राजश्री आत्माराम गोविंद यांस कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती. आपणांस दोन चार वेळ पत्रें लिहिली परंतु एकाही पत्राचें उत्तर आज तागायत आलें नाहीं याजवरून ममतेचे ठायीं किंचित न्यूनसें भासून आलें. तर ऐसें न करितां सदैव पत्रीं सांभाळ करीत असलें पाहिजे. पेशजी आपल्याकडे खासगत ऐवजाची चिठी पाठविली आहे. त्याजप्रमाणें राजश्री वल्लभ सुंदर याजकडील व राजश्री मुरलीदास याजकडील ऐवज घेऊन ठेविला आणि पत्र पाठविलें म्हणजे येथें ऐवज येथचा देणें आहे त्यास आपणावर चिठी देऊं. त्यास ऐवज देऊन कबज घ्यावें. येविशीं आपणांस लिहावेंसें नाहीं. बहुत काय लिहिणें कृपालोभ निरंतर असों दिला पाहिजे. हे विनंती.

नं० १०२७ श्रीगणराज. (कार्तिक शुद्ध. आक्टो. दु. पंधरवडा.)

अपत्यें मोरोबानें साष्टांग नमस्कार विज्ञापना. श्रीमंत दसऱ्यास गुलटेकडीवरून कूच करणार होते. इतक्यांत चतुर्थ दिवसाचा गुंता पडला अतस्तव आजपर्यंत राहिले होते. आतां तेथून गुलटेकडीहून वानवडीस येऊन राहिले. सत्वरच जेजुरीस येतील. तेथें कांहीं दिवस

मुक्काम होईल. दिवस कां घालवितात ह्मणाल तर मागें भोंसले यावयाचे आहेत. याजकरितां सावकाशी धरिली आहे. राजश्री जानोजी भोंसलेच खुद्द दहा पंधरा हजार फौजेनिशीं येणार. नागपूर सोडून निघाले. सत्वरच येतील. सगळा कार्तीक इकडे जाईलसें दिसतें. मोंगलासही बोलावणीं गेलीं आहेत. तेही येणार. मनोळी सरकारांत मागतात. कोल्हापुराहून रदबदलीकरितां कारकून श्रीमंतांकडे गेले आहेत. रदबदली चालत नाहीं. ठाणें देणें ह्मणून परिछिन्न सांगितलें. दिलें तर उत्तम. नाहीं तर तोफा लाऊन घेणार. देत नाहींत असें पुरतें कळल्यानंर फौज व तोफा राजश्री रामचंद्र नाईक याजबराबर रवाना करणार. कसें होतें पहावें. हिंदुस्थानाकडील वर्तमान अलीकडे कांहीं आलें नाहीं. अंतरवेदींतच आहेत. नजीबखान रोहिला त्याजपाशींच आहे. जाटाकडील पैशास ठाव नाहीं. मनोळी घ्यावयास, राजश्री भिवराव तोफखानेसुद्धां रवाना झाले. विदित होय हे विज्ञापना.

नं० १०३८ ( आश्विन वद्य सप्तमी.
११ आक्टोबर. )

मुरारराव घोरपडे याचें गोपाळरावास पत्र छ २१ जमादिलाखरचें.—

“ आपण फौजेनिशीं शत्रूच्या मुखावर ठांसून उभा राहिला याजकरितां गुरमकोंड्याचे परिघास बेफिकीर बसणें होऊन चौतर्फा नेट चालतें. त्यास आजपर्यंत हा प्रसंग उरकला असतां परंतु, संग्रही भारी दिवाळ तोड जेरच नाहींत. त्यामुळें सरंजामाचा प्रकार मध्यें दोन रोज कमी पडला. तदोत्तर अबदुलकादर व बालकराम यांचें येणें मिराकडून होऊन जबाब सवाल दारमदार झाला होता तो लटका पडला. अशा तीन चार प्रसंगामुळें एकास एक व्यवधान पडून गोष्ट दिर्नमेकावर[1] आली. न होन बसल्यास जागा

---

१. दिरंगाईवर.

हस्तगत करावी तरीच सर्वांचा कर्तेपणाचा ठसा व राजश्री पंत प्रधान यांचा नक्श, हा राजश्री मामांचा आशय. व सर्वांस हेच गोष्ट भूषण प्राप्त झाली आहे. त्यास आजपर्यंत बाहेरून कस्त मेहनत जसजशी करावी ते ते सर्वांनीं केली. आंतीलही लोक मोठ्या रवेसी-नेंच प्रती लढाई लढत आले. त्यास हर तरतूदीनें जागा घेतली पाहिजे यास्तव धमधमे बांधवून वरून तोफांची मारगिरी गांवांत होते व फटो-कड्यांचाही लगाव लाविला आहे. व सुरंगही चालतात. त्यास हर उपायें जेर करून शेवटीं हल्लयाचा प्रकार करावा हा निश्चय केला. हल्लयास उतावळी करितात. ते गोष्टी बे तरतूदीनें केल्यास न जाणो कसा प्रकार घडतो हा अंदेशा आहे. त्यास धमधम्यावरील मारानें व फटकडीच्या मारानें कोटांत मोठी चेंद होऊन गजबज झाली आहे. उपराळा नाहीं यास्तव गांवांतील अधीर आहेत. प्रस्तुत आंतून बोलणें लागलें आहे कीं 'किल्ला सरकारांतून आपलेकडे असावा. मध्यस्तीनें कौल द्यावा. भेटीस येतो.' जाबसाल केला कीं, हे गोष्ट न पुरवे. किल्ला सरकारचा सरकारास द्यावा. मध्यस्त विचारें अब्रू वांचवून पार व्हावें. ऐसें मामानीं उत्तर प्रतिउत्तर केलें."

नं० १०३९ (आश्विन वद्य नवमी.
१३ आक्टोबर.)

महादाजी अनंत, बाळापुरचा किल्लेदार यांचें गोपाळरावास पत्र छ २३ जमादिलाखरचें—

"चंद्रोजी जाधव व बाळाजी भिवराव दोन अडीच हजार बा[१] व गाडदी प्यादे, चाळीस पन्नास राऊत, पांच सात बाणांचे बैल जेजालासुद्धां अडचणीच्या जाग्यांत होते. ती बातमी राखून जाऊ[२]

१. इरेनें. २. बंदुका.

गांठ घातली. त्यांणीं जागा धरून बाणांच्या वगैरे शिलका करून लढाई केली तेव्हां तशींच घोडीं घातलीं. दोन अडीचशें माणूस जागांच मारिलें. बाण, जेजाला, घोडीं लुटलीं. प्यादे, गाडदी झाडींत शिरले त्यांस करोल पायउतारा करून झाडींत घातले. तेव्हां तमाम गाडदी प्यादे यांणीं हत्यारें टांकून तोंडांत तृण धरिलें. त्यांस मारिलें नाहीं. हत्यारें कडब्याप्रमाणें भारे बांधून त्यांचेच डोईवर देऊन लोकांनीं आणिले. पांच सातशें माणूस आणिलें होतें. चौकशी करून सोडिलें. कित्येक हत्यारें टाकून पळाले. चंद्रोजी जाधव व बाळाजी भिवराव सरकारांत पाडाव आले. सैदमियाचें ठिकाण नाहीं. सरकारचे फौजेंत भले लोक पंधरापावेतों घोडीं ठार झाले. पाऊणशेंपावेतों घोडीं माणसें जायां जखमी झालीं. शत्रू मादमंगल वगैरे ठाणीं टाकून पळाले. कोल्हार प्रांतांचा वेध तुटला." ह्मणून लिहिलें तें कळलें."

नं० १०४० ( कार्तिक शुद्ध.
आक्टो० द्यु० पंधरवडा. )

मोरो बल्लाळांचें गोपाळरावास पत्र.—

" श्रीमंत वांईस आले आहेत वांईहून जेजुरीस जाणार. तेथें भोंसल्याची भेटी होऊन पुढें येणार. राजश्री आपाजीराम[1] श्रीमंतांसंनिध आहेत. बनावें[2] नाहीं. मामा गुरुमकोंड्याच्या शहास गुंतले याजमुळें (श्रीमंतांची) मर्जी ठीक नाहीं. किल्ला आला तर उत्तम. नाहीं तर फजिती आहे. मोर्चे उठवावे असेंही पत्र गेलें आहे ह्मणून ऐकिलें. सत्य मिथ्या न कळे. राजश्री भिवरांव[3] तोफखाना सहवर्तमान करवीरकरांच्या तालुक्यांत आले आहेत. चिकोडी मनोळी, आदिकरून घेतात. मनोळी दिली तरी उत्तम. नाहीं तरी चिकोडी देखील घेणार.

---

१. हैदराचा वकील. २. तह होण्याचा रंग नाहीं. ३. पानसे.

श्रीमंतांची मर्जी बरीच आहे. वडिलींही श्रीमंतांची भेटी झालियावर मर्जीनुरूप वर्तणूक करावी. काल सालमजकुरीं कठीण आला आहे. नवे कर्जदार झालों. पाऊस न जाता तरी हरकमेंही निभावतों. परंतु विश्व प्रळय झाला आहे!"

नं० १०४१ (कार्तिक वद्य. नोवें. प. पंधरवडा.)

मोरो बल्लाळाचें गोपाळरावास पत्र.—

"श्रीमंतांचा मुक्काम जळगांवनजीक कोरेगांव येथें आहे. कृष्णातीरास कांहीं अनुष्ठानास प्रारंभ व्हावयाचा होता यास्तव दहा बारा मुक्काम तेथें होतें. आतां एक दोन रोजांत कूच होणार. एक वाट कऱ्हाडावरून जाणार. एक मिरज प्रांतांतून कुडचीजवळ कृष्णापार होणार. याजप्रमाणें राजश्री गोविंद शिवराम यांचें पत्र आलें होतें. त्याचप्रमाणें सोंदें बिदनुराकडे जावयाचा मनसबा दिसतो. राजश्री रामचंद्र नाईक व भिवराव तोफखाने व धारवाडची फौज एकत्र होऊन चिकोडी व कागल वगैरे अगदीं तालुका घेतला. पुढें मनोळीस जाणार. तूर्त करविरास मुक्काम आहेत. तह करावा याजबद्दल राजश्री येसाजी शिंदे व गोपाळभट येणार होते. येसमयीं करवीरवासी यांची कांहीं बाकी राहिली नाहीं. तह झाल्यावर बरें आहे. नवा जुना झाडून तालुका घेतला. पन्हाळा व कोल्हापूर दोन मात्र राहिलीं."

नं० १०४२ **श्रीगणराज.**

चिरंजीव राजश्री तात्या[1] यांसी प्रती गोपाळराव गोविंद आशीर्वाद उपरी येथील कुशल तागायत आश्विन वद्य द्वादशी इंदुवारपर्यंत मुक्काम

---

१. खासगीवाले.

नर्जाक बुधेवाडी तालुका कोल्हार येथें सुखरूप असों. विशेष. पेशजी धाकटे बाळापुराहून पत्रें पाठविलीं तीं पावून वर्तमान कळलेंच असेल. त्या अलीकडील वर्तमान तरी कांहीं बेदडे स्वार चोरीनें शें दोनशें राजश्री लिंबकराद मामांचे कहीवर जाऊन दोन तीन तट्टें व दोन तीन उंटें व कांहीं लष्करचे बैल असे घेऊन गेले. उपर राजश्री मामांचें पत्र आलें जे त्यांचे यावयाचे वाटेचे सुमारें येऊन राहणें. त्यावरून बाळापुराहून कूच करून कोल्हार प्रांतें आलों तों चंद्रोजी जाधव या प्रांतीं येऊन धामधूम करीतच होता तोही निघून गेला. आह्मीं पुंगनुरचे सुमारें येदमूर ह्मणून गांव परगणे मजकूरचाच आहे तेथपावेतों लोक अठ्ठावीस राऊत गेले होते त्यांनीं येऊन सांगितलें जे दीड कोसावर चंद्रोजी उतरला आहे. ह्मणून सांगतांच फौजसुद्धा सालकच गेलों. तो उतरला होता ती जागा बांकी. पुढें तळ्याची पाळ, मागें झाडी दाट, असे जागां उतरला होता. आह्मीं गेलों तों गोलाचा गोलच उभे राहिले. लोकांनीं घोडीं तशींच उठविलीं. त्यांची एक रंजक मात्र झाली. दोन चार बाण व एक जेजाल सुटली तों आह्मीं जाऊन पोंचतांच पळूं लागले. तशींच झाडींत घोडीं घातलीं. तिन्ही पथकांत मिळून वीस घोडीं आलीं. त्याजकडील जखमी ठार मिळून दोनशें झाले. गाडदी प्यादे असे दोन अडीच हजार होते. लष्करांत बंदुखांस कोणी पुसिलें नाहीं! बाण जेजाला सांपडल्या. खासा चंद्राजी जाधव व बाळाजीपंत कारभारी असे पाडाव आले. श्रीमंतांचें पुण्यें वडिलांचे आशीर्वादें मोठी फत्ते झाली. तुह्मांस कळावें. वरकड सविस्तर वर्तमान तीर्थरूपांचे पत्रावरून कळेल. गुरमकोंडा अद्यापि झुंजतच आहे. आह्मांकडील लोक सर्व खैर आहेत. हैदरखान बाहेर निघणार ऐसें वर्तमान आहे. बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद.

श १६९२ **हैदरअलीवर तिसरी स्वारी.** इ. स. १७७०

नं० १०४३ **श्री.** ( कार्तिक शुद्ध प्रतिपदा. १९ आक्टोबर. )

श्रीमंत राजश्री गंगाधरराऊ स्वामीचे सेवेशीं.

विनंती सेवक केसो बल्लाळ व रामचंद्र बल्लाळ गोरे साष्टांग नमस्कार विनंती येथील कुशल तागायत छ २९ जमादिलाखर पावेतों यथास्थित असे. विशेष. आपण कृपा करून पत्र पाठविलें तें पावलें. बहुत समाधान झालें. याच प्रकारें निरंतर पत्रीं सांभाळ केला पाहिजे. यानंतर इकडील वर्तमान तरी श्रीमंत राजश्री पंत प्रधान यांणीं मनोळी घ्यावयास राजश्री रामचंद्र नाईक परांजपे व तोफखान्याचे दरोगे पानसे उभयतां समागमें पांच सात हजार फौज देऊन पुण्याहून रवाना केले. कऱ्हाडाजवळ कृष्णातीरानें रांणीचे मुलखांतूनच मनोळीस जाणार. खासा वानवडीसच आहेत. आजच कार्तिक शुद्ध प्रतिपदेस कूच करून पुढें येणार. पंढरपुराकडून त्या मार्गें येणार ऐसें वर्तमान आहे. हिंदुस्थानाकडील वर्तमान राजश्री रामचंद्र गणेश फौजेसह यमुनेपलीकडे मध्येंच अडकले होते. अलीकडे आले. तूर्त कोठचा शह त्यांस नाहीं. एक जागा कोंडले होते ते फिरते झाले. तिकडे फौजा पाठवायाचे तरतूदेंत ( श्रीमंत ) होते. ते[२] यमुना उतरून अलीकडे आल्यानंतर मनसबा राहिला. मुख्य श्रीमंतांचें पुण्य समर्थ. आपणास कळावें. तिकडील सविस्तर गुरमकोंडा आल्याचें वगैरे लष्करचें सविस्तर लिहावयास लेखकास आज्ञा केली पाहिजे. बहुत काय लिहिणें कृपा लोभ असों दीजे हे विनंती. राजश्री कोन्हेरपंत व आबाजीपंत यांस साष्टांग नमस्कार विनंती. निरंतर पत्रीं संतोषवीत असावें हे विनंती.

पै॥ छ ४ रज्जब.

---

कोल्हापूरच्या राणीच्या. २. रामचंद्र गणेश.

शा० १६९२ **गुरमकोंड्याचा वेढा.** इ. स. १७७०

नं० १०४४ **श्रीशंकर.** ( कार्तिक शुद्ध तृतीया. २१ आक्टोबर. )

राजश्री गोपाळराव स्वामीचे सेवेशीं.

विनंती[1] उपरी. आपणांकडे पत्र पाठविलें तें पावोन आपण प्रत्योत्तर पाठविलें तें पावलें. गुरमकोंड्याचें काम मातबरच झालें. सर्वांनीं यंदां छावणीस राहिल्याचें फळ मोठें काम अवघ्यांचे मेहनतीनें झालें खरें. तुह्मांस पोटाचा पेंच. तुह्मीं गेल्याखेरीज अदवानीचा पैका येणार नाहीं हेंही आह्मांस कळतें. श्रीमंत तुंगभद्रा उतरल्यानंतर मग तुह्मांस निरोप होणार नाहीं हेंही खरें. परंतु त्या गोष्टीस अवकाश फार आहे. आह्मांसही बातमी आहे. इकडे कामही फारसें परंतु हैदरनाईक बाहेर निघतांच चौत्रे चौंकडे रोख सोडून गेले ( असें होईल. ) नमूद कांहीं दिवस असल्यानें लौकीक नक्ष ( राहतो ) आणि मनसब्याचे गोष्टींत आपणांस सर्वेही कळतें. तर 'या गोष्टी किती दिवस समजोन रहावें' ऐसें ह्मणाल तर मातबर पथकें रास्ते व आनंदराव ( गोपाळ ) ते तर देवास निश्चयरूप जाणार. ते येथून अगोदर पुढें रवाना करितों. ते दर्शन करून तुह्मांकडेच त्या रोखें येतील. दो चौं रोजांत आह्मींही बंदोबस्त करून तिसरे दिवशीं देवास पोंचून तीन दिवस राहून पौर्णिमा झाल्यावर तुह्मांकडे कूच करून येतों. पंचमी अजमासें आपली आमची भेटही होईल. इतके दिवस राहिल्यानें हैदर निघाला तरी फौजा सरदार ठरून नमूद राहिले हा लौकिकही बराच होईल. नक्षच लौकिकांत फार करून राखावा लागतो. पंधरा वीस दिवसांकारतां आमची भेट न होतां जाणें ममतेस उचित कसें वाटेल? यास्तव जरूर जाणोन लिहिलें असे. वद्य पंचमीस भेट होतांच निरोप निश्चयरूप देऊं. याविशीं संदेह काडीमात्र

---

१. पत्र त्रिंबकरावमामाचें गोपाळरावास.

न मानावा. सर्व प्रकारें सर्वांनीं चाकरी सेवा मेहनत जिवेंभावें श्रम करून केली त्यामुळें इतके दिवस कामें होत आलीं. मग या गोष्टीची तारीफ आह्मीं श्रीमंतांजवळ कशी न करूं! विना तारीफ सर्वांचे सेवेचा मजुरा कामें झाल्यामुळें झालाच आहे. साधक बाधक सर्व गोष्टी समजून ममतेकरून भेटी झाल्यावांचून जाणें उचीत नाहीं ऐसें लिहीत असतां जाणें आपले चित्तासही कसें प्रशस्त वाटेल याचा विवेक आपणच आपल्या मनांत केल्यास न कळेसा नाहीं. यापेक्षां वारंवार तुह्मांस लिहावयाचें काय कारण? कीं सर्वेही विचार, तोड जोड, समय, गैरसमय, नक्ष, गैरनक्ष, अवघें समजत असतां लिहावें कशास! तथापि सर्वेही खोलून समजून लिहिलें असे. तर सर्वथा थोड्या दिवसाकरितां कूच न करावें. निरोप क्षेप निक्षेप देऊं यांत संदेह नाहीं. रवाना छ १ रज्जब बहुत काय लिहिणें लोभ असों दीजे हे विनंती. पै॥ छ २ रज्जब.

नं० १०४९ (कार्तिक शु० तृतीया. २१ आक्टोबर.)

ज्ञानबा धुळप सुभेदार चिकबाळापुरचा याचें गोपाळरावास पत्र छ १ रज्जबचें.

"गुरमकोंड्यास प्रतिपदेस निशाण चढलें ह्मणून लिहिलें तें कळलें. बहुत उत्तम झालें. थोरले बाळापुरापासून पांच कोसांवर दोन हजार फौज व बार व तीन तोफा घेऊन श्रीनिवासराव बारकी आले आहेत. गुंडमगिरें माकळीदुर्गानजीक कांहीं फौज आली आहे ते घाटाखालीं दगा करितात. मदगिरी तालुक्यांतील एक दोन ठाणीं त्यांनीं घेतलीं ह्मणून वर्तमान आहे. आंबेजीरायदुर्ग पहाडी किल्ला आपण युक्तीनेंच हस्तगत केला ह्मणून ऐकिलें त्यास तथ्य वर्तमान लिहावें."

शा० १६९२ **गुरमकोंडा काबीज होतो.** इ. स. १७७०

नं० १०४६ ( कार्तिक शुद्ध चतुर्थी.
२२ आक्टोबर. )

जानराव धुळप यांचें गोपाळरावास पत्र छ २ रज्जबचें.

"टिपू सुलतान दोन हजार स्वार व चार हजार बार व कर्नाटकी प्यादे सहा हजार येणेंप्रमाणें सडी फौज घेऊन बेंगरुळाजवळ चार कोस उतरला आहे. मागाहून मीररेजाअली व परशुराम हजारी वगैरे चार हजार स्वार व बार तोफखानासहीत बेंगळुरास येणार ह्मणून लिहिलें होतें तो कानडा कागद गांवकरांनीं लिहिलेला बजिन्नस आपणाकडे पाठविला आहे."

नं० १०४७ ( कार्तिक शुद्ध सप्तमी.

**श्रीगणराज.** २६ आक्टोबर.)

चिरंजीव राजश्री तात्या[1] यांसी प्रती गोपाळराव गोविंद. आशीउपरी. येथील कुशल तागायत छ ६ रज्जबपर्यंत मुक्काम नजीक आंबोजीरायदुर्ग तालुके कोल्हार येथें क्षेम असो. विशेष. पेशजी चंद्रोजी जाधव यास मोडून मशारनिल्हे पाडाव सांपडले उपर मुद्दाम जामूद जोडी रवाना केली आहे त्या पत्रावरून सविस्तर कळेल. गुरमकोंड्याकडील वर्तमान तरी राजश्री मुरारराव घोरपडे सेनापती यांचे मार्फतीनें किल्यांतील लोक बोलीस आले. सर्व वस्तभावमुद्धां सांगूं ते स्थळीं पोंहचाऊन द्यावें असा करार होऊन तीन दिवसांत आंतील झाडून वस्तभाव काढून मिराचे कबिले व सैदूमिया ऐसे राजश्री मुरारराव यांचे डेऱ्यास आले. दिपवाळीचे प्रतिपदेस किल्ले गुरमकोंड्यावरी निशाण चढलें. किल्यांतील सैदूमिया बोलिला जे "अडीच महिने झुंजलों परंतु हैदरखानाचे वस्तु कुमक न झाली. आह्मीं कोणाचें आश्रयें झुंजावें?" असें ह्मणाले तेंही प्रमाणच. श्रीमंतांचे पुण्येंकरून गुरमकोंडा फत्ते

---

१. पांडुरंगरावास.

झाला. याच फौजांची जरब हैदरखानावर बसत गेली. श्रीमंतही भाद्रपदमासीं डेरेदाखल झाले. आणीक आठ चार दिवसांत दोन महिने होतील. परंतु जशी त्वरा निघावयाची झाली तशी स्वारीची जलदी आजपर्यंत दिसून येत नाहीं हें काय आहे? आपाजीरामही पुणेकडे हैदरखानाकडून गेला आहे. त्याचें बोलणें होतें कीं काय तें तपशिलें लिहिणें. राजश्री मामा गुरमकोंड्याहून सारी फौजसुद्धां व्यंकटेशास जाणार. आह्मीं अद्वानीकडे जातों. लोभ कीजे हे आशीर्वाद.

नं० १०४८

बाळाजी कृष्ण याचें गोपाळरावास कार्तिक वद्य १० मुक्काम करजगी येथून पत्र.--

"थोरले श्रीमंत वांईस गेले होते. सप्तऋषीस राजश्रींचें दर्शन घेऊन सांप्रत जेजुरीस मुक्काम आहे. येथें श्रीमंत राजश्री नारायण-रावजी यांचा मुक्काम आहे. फौज जमा होत आहे. राजश्री आनंदराव गोपाळ आजच तुह्मांकडे जावयास गेले. लवकरच पोंचतील."

नं० १०४९ श्री.

पु० राजश्री गोपाळराव गोविंद स्वामीचे सेवेशीं विनंती उपरी आपण छ ७ रजबचें पत्र पाठविलें तें छ ९ मिनहूस प्रविष्ट झालें. "अद्-वानीकडे लौकर गेलें पाहिजे. शिवारांत जोंधळे आहेत तोंच पैका उगवेल. नाहीं तर थोडे फौजेनेंच पैका उगवणें दिसतच आहे. याज-करितां आनंदराव रास्ते व आनंदराव गोपाळ यांस आपण पाठविणार ते लौकर पाठवावे ह्मणजे मशारनिल्हे येतांच आह्मीं अदवानीकडे जाऊं. दोन तोफा उभयतां मशारनिल्हेबरोबर पाठवाव्या. ते स्थिरते करून

---

१. साताऱ्यास महाराजांचें. २. पत्र त्रिंबकराव मामाचें.

येतील याजकरितां दोन्ही तोफा कंदकुरास पाठवाव्या ह्मणजे तेथें राऊत पाठवून आणूं." ह्मणून लिहिलें तें कळलें. ऐशास तोफांचे बैल चारणीस पाठविले होते ते आज उद्यां येतील. आमचेंही एक कूच तर परवांचे दिवशीं झालें. परंतु कामाकाजाचे गुंत्यामुळें किल्ल्याचे पूर्वेस जवळच राहिलों होतों. राजश्री मुराराव यांस शरीरीं सावकाश नाहीं यास्तव त्यांस उदईक बुधवारीं मुहूर्तें ते आह्मीं उभयतांच कूच करून चार कोसांचा मुक्काम करितों तों आपणांकडीलही बातमी येईल. विशेष गडबड नसल्यास श्रीचे दर्शनास दुसरे दिवशीं जाऊन एक दिवस दोन दिवस दर्शनास जावया येण्यास मोडतील तोंपर्यंत मुक्काम करून कूच करून पुंगनुराचे सुमारें फौजसुद्धां येत असों. मुगबागलावरून येऊं. तोफा तिकडे दोन तुह्मांकडे पाठविणार त्या नेत नाहीं. चांगली वाट असेल त्या वाटेनें मदनपल्लीचे सुमारें रवाना करूं. त्याही हळू हळू येतील. बैलांत जीव राहिला नाहीं. आपल्याबराबर आल्यावर आपण त्यापुरते बैलही मेळवितील. त्याविशीं आह्मीं लिहावेंसें नाहीं. वैर-[1]णीमुळें बैल कवडीचे मोल झाले आहेत. रवाना छ १० रजब. बहुत काय लिहिणें हे विनंती.

नं० १०५० **श्री.**

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री नागोराव[2] स्वामीचे सेवेशीं.--

पोष्य गोपाळराव गोविंद नमस्कार विनंती उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहीत असलें पाहिजे. विशेष. तुह्मीं मुजरद जासूद जोडी समागमें पत्रें पाठविलीं तीं पावोन विस्तारें वर्तमान कळलें. व आमचे जासुदासमागमें पत्राचीं उत्तरें पाठविलीं तीं व श्रीमंतांकडून

---

१. वैरणीच्या अभावामुळें. २. हा मुराररावाचा वकील.

पत्रें आलीं त्यांच्या नकला करून पाठविल्या त्या पावल्या. त्यांतील भाव समजला. तुमच्या पत्रावरून दरबारचें व तुमच्या यजमानाकडील व स्वकीय भाव लिहिल्यावरून व राजश्री शिवाजीपंतानीं अंशेंकरून सांगितलें त्याजवरून कळलें. कोणाचा विचार कसा हें समजलें आहे. मराठे तेथून लहानापासून थोरापावेतों एकत्र आहेत. समयास चुकावयाचे नाहींत. असो. छावणीचे दिवस फार करून गेले. थोडके राहिले. श्रीमंतांची गांठ लवकरच पडेल. उपरांतिक बोलणें चालणें होईल. सर्व बंदोबस्त पूर्ववत्प्रमाणें होईल. काळजी न करावी. पत्रांचीं उत्तरें विस्तारें काय लिहावीं! बोलणें चालणें तें भेटी झाल्यानंतर बोलूं. राजश्री माधवराव सदाशिव श्रीमंतांकडून अर्काटास जावयास आले आहेत; परंतु तूर्त मशारनिल्हेची रवानगी येथून झाली नाहीं. तिकडून वकील आल्यावर पाठवणें तो पाठवावा. त्यांस माहीत पेशजीपासून आहेत. त्यांसच पाठवावें असाही विचार आहे. ह्मणून लिहिलें, त्यास राजकारणाची चालना करून ठेविली असल्यास मग दुसऱ्यास पाठवावें हें युक्त नाहीं. आपल्याच हातून राजकारण शेवटास न्यावें असें असेल. असो. श्रीमंतांस रुचेल तें राजकारण पक्कें झाल्यास उत्तमच आहे. नाहीं तर विचार जाणतच आहां. हे विनंती.

नं० १०५१ श्रीगणराज. (कार्तिक वद्य. नोव्हेंबरचा प० पंधरवडा.)

अपत्यें मोरोबानें साष्टांग नमस्कार विज्ञापना. "राजश्री मामानीं गुरमकोंड्यास मोर्चे देऊन पावणे दोन मास झाले. अद्यापि कांहींच नाहीं. फार दिवस झाले. महर्गता फौजेंत कांहीं बाकी राहिली नाहीं. राजकारण होतें ह्मणून किल्ल्याजवळ जाऊन उतरले. राजकारण

---

१. मोरो बल्लाळ याचें गोपाळरावास पत्र.

नाहीं तेव्हां बलावल पाहून बसावें तें न करितां बसले. तोफा लहान. दारू गोळा नाहीं. मग बुरूज सुरूंग लाऊन उडविला. काट चालत नाहीं. आणखी सुरुंग तयार होतात. हल्ला करणार. हैदरखान पट्टणास आहे. दसरा होतांच बाहेर निघावें ह्मणून तरतूद आहे. टिपूसुलतान चार हजार फौज व तीन हजार गाडदी इतक्यानिशीं बेंगरुराहून कूच करून कोसीं दुकोसीं मजल करीत सोडेकोप तालुके नेलवगल येथें गेला. तेथून पुढें पट्टणास जावयाची आवाई घालून सडा होऊन कोणीकडे गेला ही बातमी लागली नाहीं. उमर कोठें पडला नाहीं. माणसें बातमीस पाठवावीं तीं जिवानिशींच जातात. याजकरितां बातमी तहकीक लागत नाहीं. परंतु पट्टणासच गेला असेल असें दिसतें." ह्मणून लिहिलें तें सविस्तर कळलें. गुरमकोंडा अद्याप येत नाहीं तेव्हां कठीण आहे. अगोदर अंदेशा चित्तांत आणून बसावें तें न झालें. आतां उठतां न ये. कदाचित् खासा हैदरखानच अशांत बाहेर निघाला तर मसलत भारी पडेल. हे दिवस तो निघावयाचे त्याचे नव्हेत. निघता तर मागेंच निघाला असता. न कळे! टिपूची बातमी लागत नाहीं तेव्हां वडिलीं फार सावधपणें बातमी राखोन रहावें. शत्रु कावेबाज. त्याजकडील बातमी आपणास कळत नाहीं. दगा करील. पट्टणास गेला ह्मणून भरंवसा धरूं नये. समीप जाऊन राहिलां आहां याजकरितां बहुत हुषारीनें रहावें. वडील सावधगिरीस चुकणार नाहींत परंतु सूचना लिहिली आहे. टिपूची बातमी इकडे अनवटीस आला आहे ह्मणोन आली आहे. खरें लटकें कळत नाहीं. हे विज्ञापना.

नं १०९२ श्री. (कार्तिक शुद्ध चतुर्दशी.
२ नोवेंबर.)

पु० राजश्री गोपाळराव स्वामीचे सेवेशीं. विनंती उपरी आपण पत्र पाठविलें तें प्रविष्ट झालें. " चंद्रोजी जाधव याजकडील लोक व

ठाणीं सरकारांत घेऊन ठाणीं बसवावीं याजकरितां आपले लिहिल्यावरून राजश्री मुलबागलगौडा याचे लोक पाठविले त्यांजबरोबर चंद्रोजी जाधव याचें पत्र राजश्री आपाजी गोविंद याणीं आपल्यास लिहिलें तेंच पत्र बजिन्नस आपण पाठविले व किल्ले व ठाणियांस जकीरा सामान आहे त्याची याद पाठविली व राजश्री सेनापती यांजकडे ठाणीं द्यावीं ह्मणून पेशजी लिहिलें होतें त्याजवरून मशारनिल्हेकडून भगवंत त्रिंबक लोक घेऊन पुढें आलेच होते त्यांस पुढें आपाजी गोविंद यांजकडे रवाना केलेच होते. हल्लींही राव मशारनिल्हेकडील मुकुंद कृष्ण लोक घेऊन आले त्यांसही रवाना केलेच आहेत. ठाणीं किल्ले स्वाधीन करणें ह्मणून आपाजी गोविंद यांस लिहिलें आहे त्यावरून मशारनिल्हे किल्ले व ठाणीं त्याचे स्वाधीन करितील." ह्मणून लिहिलें तें कळलें. ऐशास किल्ले ठाणीं सरकारांत घेऊन मुलबागलगौडाचे लोक ठेऊन बंदोबस्त करविला, उत्तम केलें. राव सेनापती यांजकडील मुकुंद कृष्ण लोक घेऊन आले यास आपण रवाना केल्यानंतर मुलबागलगौडाचे लोक ठाणीं किल्ले आपले सांगणेवरून स्वाधीन करितील. किल्ले ठाणीं त्यांचे स्वाधीन झालियाचें वर्तमान लिहिलें पाहिजे. जकीरा सामानाची याद पाठविली त्याजवरून कळलें. रवाना १३ रज्जब बहुत काय लिहिणें हे विनंती.

नं० १०९३ श्री. (कार्तिक वद्य प्रतिपदा. ४ आक्टोबर.)

राजश्री गोपाळरावजी गोसावी यांसी.

अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्नेहांकित महिमाजी शिंदे सुभेदार सरकार शिरें विनंती येथील कुशल तागायत छ १९ माहे रज्जब जाणून स्वकीय कुशल लेखन करीत असलें पाहिजे विशेष. बहुत दिवस आपणाकडून पत्र येऊन सांभाळ होत नाहीं तरी असें नसावें. निरंतर पत्रद्वारा सांभाळीत असावें. यानंतर पट्टणास बातमीकरितां जोडी पाठविली होती ते छ १३ मिनहूस वर्तमान घेऊन आली.

सांगितलें कीं हैदरखान खुद फौजमुद्धां बाहेर निघणार. सर्व तयारी झाली आहे. बंगळुराकडे जावयाची आवाई घालून शिऱ्यावर जावें याप्रमाणें मनसबा आहे, ह्मणोन बातमी आली. तदोत्तर काल छ १४ मिनहूस हगलवाडीकर संस्थानिक याणीं पत्र पाठविलें कीं 'हैदरखान फौजमुद्धां पट्टणाहून बाहेर निघून सोमवार पेठेंत उतरला आहे. शिऱ्यांवर खामखा येणार. तहकीक लिहिलें आलें त्यावरून लिहिलें आहे.' याप्रमाणें पत्र आलें तें बजिन्नस श्रीमंत राजश्री त्रिंबकराव मामाकडे जोडीबराबर पाठविलें. वर्तमान आपणास कळावें यास्तव लिहिलें आहे. पुढें येईल बातमी ते लिहून पाठवूं. बहुत काय लिहिणें कृपा लोभ कीजे हे विनंती. पै॥ छ २२ रजब.

नं० १०९४ L श्री.

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य राजश्री रामचंद्र नारायण गोसावी यांसी. सेवक माधवराव बल्लाळ प्रधान नमस्कार सुरु सन इहिदे सबैन मय्या व अलुफ. तुह्मीं विनंती पत्र पाठविलें तें प्रविष्ट झालें. नासिक प्रांतीं महागाई फार झाली आहे. पावसाच्या आपत्तीमुळें सर्व ठिकाणीं महागाई झाली आहे. त्यास इतर प्रांतांतील जकातीचा वगैरे बंदोबस्त होईल त्या अन्वयें तिकडीलही बंदोबस्त होईल. त्याहीमध्यें तिकडील जकात तूर्तच माफ करावी अशी तीर्थरूप मातुश्री बाईसाहेबांची[1] मर्जी असल्यास विनंती करून लिहून पाठविणें. परंतु एके ठिकाणीं माफ झाल्यास सर्वत्र माफ करावी लागेल. याप्रमाणें विनंती करून आज्ञा होईल त्याप्रमाणें लिहून पाठविणें. मर्जी असल्यास लिहावें. जाणिजे. छ १७ रज्जब बहुत काय लिहिणें. पाठविलें. छ २१ रज्जब कार्तिक.

---

१. पेशव्यांची आई गोपिकाबाई हिचा हा कारभारी.

नं० १०५५ श्रीगणराज.

अपत्यें मोरोबानें साष्टांग नमस्कार विज्ञापना. चिरंजीव राजश्री वामनराव बाबा येथून कूच करून कार्तिक शुद्ध सप्तमीस निघून मजल दरमजल यादवाडास गेले. तेथें एक दोन मुक्काम झाले. मागाहून चिरंजीव राजश्री कोन्हेरराव व राघोबा येणार होते यास्तव राहिले होते. तेही जाऊन पावले. अत:पर दरमजल जातील. 'चाळीस हजार रुपये लष्करास पाठवावयाचे ते लक्ष्मेश्वरास न पाठविणें. चिरंजीवाबरोबर पाठवून देणें.' ह्मणून आज्ञा, ऐशास आह्मीं तसेंच ह्मणत होतों. परंतु बाबा बोलिले जे आह्मी लांब लांब मजली करीत जाणार, बैल निभावणार नाहींत, ह्मणून सांगितलें त्यावरून निंबाजी जामदार बरोबर येथून आठ बैल व पंचवीस प्यादे देऊन लक्ष्मेश्वरास ऐवज रवाना केला आहे. पुढें बैल व प्यादे देऊन वडिलाकडे लावून देणें ह्मणून येविशीं राजश्री लक्ष्मण हरी यांस लिहिलें आहे त्याप्रमाणें करितील. कापड व लक्ष्मेश्वरपैकीं पंचवीस हजार होन राजश्री जिवाजीपंत मामा घेऊन राघोरामसह पाठविले ह्मणून बुनग्यांतून राजश्री वासुदेव काकांनीं लिहिलें होतें. आह्मीं उद्ईक षष्ठी गुरुवारीं कोंकणांत जावयास निघून बाहेर मुहूर्तानें राहतों. परवां निघोन पुढें जातों. पंधरा दिवस लागतील. तूर्त शरीरप्रकृति बरीच आहे. अद्यापि शक्ति नाहीं. वडिलांचे आशीर्वादें करून नि:शेष आरोग्य होईल. चिंता न करावी. इकडे पर्जन्य आजपावेतों अगदीं नव्हता. काल परवां दोन दिवस चार चार घटका बराच पडला. असाच आठ चार दिवस लागला ह्मणजे पिकें जीव धरितील. पुण्याकडे तो अगदीं नाहीं. महर्गता फार. दीड दोन पायली धारण झाली आहे. येथें एक बाजार तीन साडेतीन होते. आतां साडेचार पायली आहेत. पाऊस पडला तर स्थिति बरी आहे. हरिसत्ता प्रमाण! बहुत काय लिहिणें हे विनंती.

---

१. मोरो बल्लाळ याचें गोपाळरावास पत्र.

नं० १०५६ **श्रीगणराज.** ( कार्तिक वद्य. नोवेंबर. प० पंधरवडा. )

अपत्यें मोरोबानें साष्टांग नमस्कार विज्ञापना. श्रीमंत दहीगांवावर आहेत. तेथें चार पांच मुक्काम आहेत. कऱ्हाडावरून कोल्हापुरावरून जाणार. सोंदें बिदनूरच्या रोखें जावें अशी मसलत दिसते. वऱ्हाडांतून राजश्री बिंबाजी भोंसले गंगेवर चार हजार फौजसुद्धां आले. सत्वरच भेटी होणार. भोंसले पाठीमागें राहिले आहेत यास्तव इतके दिवस लागले. मनोळीचें ठाणें घ्यावयाबद्दल राजश्री भिवराव तोफखाने व राजश्री रामचंद्र नाईक एडुरास जाऊन राहिले आहेत. मुद्दलावींहून तोफखानाही आला. धारवाडाकडील फौजेस पत्रें गेलीं होतीं. आजला ते येऊन मिळाले असतील. चिकोडी आदिकरून घेणार. आधीं चिकोडी ठाणें घालून मग पुढें मनोळीस जाणार. तोफा लाविल्याचें अद्याप वर्तमान आलें नाहीं. बोलीही लागली आहे ह्मणतात. मागाहून येईल तें वर्तमान लिहून पाठवितों. काल वाघोली दहीगांवच्या मुक्कामाहून राजश्री गोविंदराव तात्यांचें पत्र आलें कीं, श्रीमंत मिरज तालुक्यांतून जाणार. त्यास कोणीकडून जातात पहावें. बहुतकरून इकडून जातील असें दिसतें. आह्मीं आजी कोंकणांत जाणार. श्रीमंत इकडून जातात. मुलखाची गति काय होईल पहावें! बिदनुराकडे स्वारी होईल असें आहे. विदित होय हे विज्ञापना.

नं० १०५७ **श्री.**

तीर्थस्वरूप राजश्री दादा वडिलांचे सेवेशीं.

अपत्यें मोरोबानें कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. तागायत

---

१. हें व यापुढचें अशीं दोन्हीं पत्रें मोरो बल्लाळ यानें गोपाळरावास लिहिलेलीं.

कार्तिक वद्य पंचमी बुधवारपावेतों वर्तमान यथास्थित असे. विशेष. वडिलीं आश्विन वद्य द्वादशीचीं पत्रें पाठविलीं तीं पावलीं. तालुके कोल्हार येथील मुक्कामचीं पाठविलीं तीं छ १२ रज्जबीं पावोन लिहिला मजकूर सविस्तर कळून आला. "गुरमकोंड्याचे कुमकेबद्दल चंद्रोजी जाधव व बाळाजीपंत वैदांचे कारभारी जमावसुद्धां कोल्हारप्रांतें होते. कांहीं बैद मिळवून गुरमकोंड्याकडे कही कबाडावर उपसर्ग देत होते. हें वर्तमान राजश्री मामानीं लिहितांच चिकबाळापुराहून कूच करून त्याच रोखें आलों तों अकस्मात् त्यांची गांठ एलुराहून दोन कोसांवर आग्रम येथें पडली. झाडीच्या आश्रयानें तळ्याची पाळ धरून बिकट जाग्यास राहिला होता. घोड्यांचा हल्ला न चाले. माघारे घोडीं टाकून पाय उतारा होऊन गेलों. बंदुकांच्या सलका व बाण व जेजाला असे मार मारूं लागले. तसेंच जाऊन गांठ घातली. दोन तीनशें माणूस जिवें मारिलें. जखमीही केलें. बाकींचे बंदुका टाकून तोंडीं तृण धरूं लागले त्यांस सोडून दिलें. कांहीं घोडीं सांपडलीं. चंद्रोजी जाधव व बाळाजीपंत हे उभयतां खासा पाडाव आले. कैदेंत ठेविले आहेत." ह्मणून लिहिलें तें कळलें. ईश्वरें यश दिलें. शत्रूस दाब बरा बसला. बुनग्यांतून राजश्री वासुदेव काका व आपाजीपंतानीं गुरमकोंडा हस्तगत झाला, राजश्री सेनापती यांचे विद्यमानें उतरले, मिराचा कबिला व लेंक सेनापतीकडेच तूर्त आहेत, ह्मणून लिहिलें होतें. मागाहून वडिलींही तीर्थस्वरूप नानांस पत्र लिहिलें होतें त्यावरून कळलें. दोन्ही गोष्टी चांगल्या घडल्या. आतां हैदरखान बाहेर निघत नाहीं. आणि किरकोळ फौजाही येणार नाहींत. विदित होय हे विज्ञापना.

---

१. गोविंद हरि.

श० १६९२ **पेशवे स्वारीस निघतात.** इ. स. १७७०

नं० १०९८ **श्रीशंकर.** ( कार्तिक वद्य नवमी. ११ नोवेंबर. )

राजश्री गोपाळराव स्वामीचे सेवेशीं.

विनंती[1] उपरी. छ० २२ रज्जब रविवार प्रातःकाळ दोन प्रहर दिवस. मुक्काम गोविंदराजपट्टण. वर्तमान यथास्थित असे. विशेष. हैदर नाईक खासा सारी फौज घेऊन तोफखान्यासह बाहेर निघाला. त्याचे मनांत होसकोटें चढे घोड्यांनिशीं घ्यावें. अगर शिरेंही आह्मांस तुह्मांस दूर. तेथेंही जाऊन गळां पडावें या विचारें मीर वगैरे सरदारांनीं भर देऊन बाहेर काढिला आहे. तुह्मीं फौजसुद्धां अदवानीकडे जातां हेंही बातमी पक्की त्यास कळली. तेव्हां सहजच आमची चौथाई फौज गेली, आह्मीं थोडे झालों, इतके दिवस तुह्मीं आह्मीं मेळविली फत्ते मळमळीत करून लौकिकांत ( आपणच करामत ) फार केलीसें करावें ( असा त्याचा हेतु आहे. ) जर एखादे जागा जरब बसली आणि ती जागा गेली तर सर्वांसही तोंड दाखवावयास जागा नाहीं. या प्रकारें निकडीचें वर्तमान पक्कें शंभर पत्रांचे जागा हें मानून लवकरच सावध व्हावें असें लिहून आंतील बातमी आली, त्याजवरून जरूर जाणून एक पत्र अगोदरच जासूद जोडी पाठविली आहे. आणि हें दुसरी सांडणी स्वाराची जोडीबराबर पाठविलें असे. हें पत्र दहा पत्रांचे जागां मानून आधीं कूच करून गेले असलां तरी माघारे येणें. आह्मींही उदईक कूच करून दरमजल पुंगनूर डावें टाकून घटमचे सुमारें लवकर येतों. आपली आमची भेट होईल. तों मनसब्याचा डौलही समजेल. त्याप्रमाणें नेक मसलत करणें तशी करावयास कार्यास येईल. तरी पत्रदर्शनीं दुसरा विचार न करितां आंबेजी रायदुर्गास आपण जावें. अगर गेले नसलेत तरी कूच करून ( अदवानीकडे ) जाऊंच नये. टिपू वगैरे फौज बेंगळुरास आलीच आहे.

---

१. चिठी त्रिंबकरावमामाची.

आपणच लिहून पाठविलें होतें. ते होसकोट्यास उपसर्ग करून पेट मारितील तर ती गोष्ट होऊं न द्यावी. शिऱ्यांकडे तर फार करून जाणार नाहींत. गेलेच तर त्यांचा रोख राखून रहावें. हा वेळ नाजूक, प्रसंग चुकल्यास आजपर्यंत केलें तें व्यर्थ होऊन वेडेपण सर्वांचे पदरीं येणार. याकरितां वारंवार लिहीत असों हाच प्रकार. याप्रकारें घडोन आल्यास तुमचें जाणें होणार नाहीं ऐसें मी बोललों व हें बोलणें राजश्री शिवाजीपंताशीं झालेंच आहे. त्याणींही कबूल केलेंच आहे. जरूर जाणूनच लिहिलें असे. तर प्रसंग जाणून न जाणें हें सर्वप्रकारें उचित. बहुत काय लिहिणें. लोभ असों दीजे हे विनंती. पै।। छ २६ रज्जब प्रातःकाळचा दीड प्रहर दिवस.

नं० १०५९ (२२ नोवेंबर.)

कृष्णाजी महादेव काळे याचें गंगाधररावास पत्र मार्गशीर्ष शु० ५ चें.

श्रीमंत राजश्री रावसाहेब जेजुरीचे मुक्कामीं होते त्याच मुक्कामीं भोसले यांच्या भेटी झाल्या. भोसल्याची फौज पांच हजारपावेतों आहे. अमित्राचें पारिपत्य सांग करावें असा श्रीमंतांचा कटाक्ष आहे."

नं० १०६० **श्रीरामचंद्र प्रसन्न.** (४ दिसेंबर.)

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री गोपाळरावजी स्वामीचे सेवेशीं.

पोष्य आपाजीराम[1] साष्टांग नमस्कार विनंती उपरी. येथील वृत्त तागायत मार्गशीर्ष वद्य द्वितीया भौमवारपर्यंत मुक्काम होसकोटें तालुके मुधोळकर घोरपडे. वर्तमान आपले कृपेकरून यथास्थित जाणून स्वकीय लेखन करीत गेलें पाहिजे. विशेष. बहुत दिवस झाले, आपणाकडून पत्र येऊन कुशलार्थ किमपि कळों येत नाहीं. तरी सध्या कोणे जागां मुक्काम आहे, काय वर्तमान हें सदैव लिहावें. गुरमकोंडा

---

१. अक्कलकोटकर भोसल्यांचा हा कारभारी. उपनांव गाडगीळ.

फत्ते झाल्याचें कळून बहुत संतोष झाला. यंदां श्रमसाहस फौजेवर व आपल्यावर फार पडलें. त्यास श्रीसत्तेनें एकदांची जागा फत्ते झाली इतक्यानें फार सरस झाली. वर्तमान साद्यंत आपण कृपा करून लिहावें. येथील वृत्त तरी आह्मीं व राजश्री नरसिंगराव[1] बाबा धारवाडीं होतों. इतक्यांत श्रीमंतांची आज्ञा झाली कीं, 'चिकोडी मनोळीचीं ठाणीं सरकारांत घ्यावयाचीं आहेत. हुजुराहून राजश्री भिवराव तोफखानासमेत पाठविले आहेत. तरी तुह्मीं ते एकत्र होऊन स्थळें घ्यावीं.' या प्रकारें आज्ञा झाली. त्यावरून मुदलावीस येऊन तोफखाना घेऊन एडूरमांजरीकडे गेलों. भिवराव तेथें होते ते आह्मीं एकत्र होऊन चिकोडी व ठाणीं तमाम एकसंबें व कसबा भोज, कागल वगैरे घेऊन करविरासमीप जाऊन मुक्काम केला. राजश्री रामचंद्रनाईक परांजपे व बाळोजी केशव सफरे हे व तिसरे भिवराव ऐसे हुजूरचे कार्यभागी होते. पन्हाळ्याहून भगवंतपंत व गोपाळभट आले. तह झाला. एक लक्ष दहा हजार (रुपये) सध्यां द्यावे व चिकोडी आपण घेतलीच आहे व मनोळीची चिठ्ठी द्यावी याप्रमाणें निश्चयांत येऊन नक्ताची निशा व मनोळीची चिठ्ठी घेऊन निघाले ते दरमजल मुधोळ तालुक्यांत आले. सध्यां यांचें कामकाज झालें. हे माघारे जातात. आह्मीं व धायगुडे इकडे आहों. श्रीमंतांची काय आज्ञा येईल त्याप्रमाणें वर्तणूक करूं. आपणास कळावें ह्मणून लिहिलें आहे. श्रीमंत वांई देशीं तांदुळवाडीवर कृष्णातीरीं आहेत. भोसले दोन हजार फौजेनिशीं आले. पुढें काय मनसबा होतो पहावें. कळलें पाहिजे. आपण निरंतर पत्र पाठवावें. बहुत काय लिहिणें कृपा लोभ असों दिला पाहिजे. हे विनंती.

---

१. धायगुडे.

श० १६९२ **हैदरअलीवर तिसरी स्वारी.** इ. स. १७७०

नं० १०६१ **श्री.** ( मार्गशीर्ष वद्य तृतीया.
९ दिसेंबर. )

श्रीमंत राजश्री मोरोबा आबा स्वामीचे सेवेशीं.

सेवक केसो[१] महादेव ओक. कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत छ १७ साबान मुक्काम लष्करें[२] येथें आपले कृपेंकरून सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेष. आपणाकडील बहुत दिवस पत्र येऊन वर्तमान कळत नाहीं तरी लिहावयासीं आज्ञा केली पाहिजे. विशेष. इकडील वर्तमान तरी श्रीमंत राजश्री रावसाहेब यांच्या शरीरीं समाधान नाहीं. याजकरितां श्रीमंतांची स्वारी पुण्यास जाणार. मुहूर्त सोमवारचा पुण्यास जावयाचा पाहिला आहे. तिसरे दिवशीं पुण्यास जावें ( याप्रमाणें बेत आहे. ) श्रीमंत राजश्री नारायणराव यांजबराबर फौज देऊन रवानगी त्यांची होत आहे. गुरुवारीं सतरा घटका रात्रीस मुहूर्त आहे. ते तिकडेस, खासा स्वारी पुण्यास जावें, येणेंप्रमाणें आहे. बराबर हरीपंत फडके मोरोबादादा पुण्यास व कृष्णराव बल्लाळ नारायणराव यांजबराबर जाणार. याजप्रमाणें वर्तमान आहे. आपणास कळावें ह्मणून लिहिलें आहे. सदैव पत्र पाठवीत असलें पाहिजे हे विज्ञापना.

मौजे पळूस भाऊकडील ( याबद्दलचें ) ताकीद पत्र घेतलें असे वर शिक्के झाल्यावर मागाहून पाठवून देतों. रहिमतपुरावर मुक्काम होत होता तो फत्तेपूर येथें करविला आहे. आपणास कळावें ह्मणून लिहिलें असे. कागद पत्र वरचेवर पाठवावे तर येथें माणूस नाहीं. त्यास धोंडोपंताकडेस पाठवीत असतों. कळलें पाहिजे. हे विज्ञापना.

---

१. हे पथकाकडील फडणीस. यांचे वंशज सांगलींत आहेत. २. पेशव्यांचें लष्कर.

श० १६९२ पेशवे स्वारीस निघतात. इ. स. १७७०

नं० १०६२ श्री. ( मार्गशीर्ष वद्य दशमी.
१२ दिसेंबर. )

पुं० राजश्री त्रिंबकराव विश्वनाथ स्वामी गोसावी यांसी.

विनंती उपरी. तुह्मांस येथून कच्चें वर्तमान लिहिलें असतां तुमचे पत्रांत संशयात्मक लिहिलें कीं, आमचे शरीरीं सावकाश असतां आमचें येणें होत नाहीं. त्यास या मसलती उपरोधिक नव्हत. तेव्हां निमित्याचें कारण कोणतें! स्वारीहून पुण्यास आलियानंतरी महिना पंधरा दिवसांत प्रकृत बिघडत होती परंतु बाहेर निघाल्यानंतर अधिकोत्तर प्रकृत बिघडेल हें काय कळे! जेजुरीस आल्यानंतर नित्य चहूं घटकांत प्रकृत बिघडूं लागली ते आपली आपल्यास कळूं लागली, कीं स्वारींत मेहनतीमुळें निभावणार नाहीं. तेव्हां हें करणें प्राप्तच झालें. शरीरप्रकृत ठीक असोन कोणेही कामांत चित्त लागलें तरच ठीक. नाहींतर व्यर्थ मसलत मळमळींत. ऐसें समजून वैद्याचा औषधउपाय लवकर करावा. नाहींतरी पुढें अधिकोत्तर शरीरप्रकृत ठीक राहणार नाहीं यास्तव नियमित स्थळीं औषध उपाय करावाच लागतो. तुह्मांकडे फौज व तोफखाना रवाना करून सत्वरीच पुण्यास जात असों. जर शरीरप्रकृत ठीक त्यापक्षीं तुह्मीं मनसबा लिहिला तो उचित. ज्यापक्षीं प्रकृत ठीक नाहीं त्यापक्षीं आह्मीं योजिला विचार करणें प्राप्तच आहे. हैदरखानाचा मनसबा सरळ रीतीनें लवकर करावा तर हैदरखान सरळ माणूस नव्हे. तेव्हां काय चिंता! चहूं महिन्यांनीं मसलत शेवटास जाणें ते आठ महिन्यांत जाईल! आठा महिन्यानें जाणें ते दिडा वर्षानें जाईल! त्यास हैदरखानाची मसलत दीर्घसूत्रानें केल्यास

---

१. हें व यापुढचें अशीं दोन्हीं पत्रें पेशव्यांकडून त्रिंबकराव मामास गेलेलीं आहेत. यांच्या नकला मळा दप्तरांत करून ठेविलेल्या होत्या त्याच येथें दिल्या आहेत.

उत्तम परिणाम आहे. हे फौज व तुह्मीं आहां तेथें सर्व गोष्टी लवकरच होतील. रवाना छ २४ साबान हे विनंती.

नं० १०६३ श्री. ( मार्गशीर्ष वद्य दशमी. १२ दिसेंबर. )

पु० राजश्री त्रिंबकराव विश्वनाथ स्वामी गोसावी यांसी.

विनंती उपरी. हैदरखानाचें मानस कीं मुलुख सोडावा. ते मामलत करावी. त्यास ( आह्मीं ) पांच सहा वर्षें मेहनत करून मुलुख सोडविला तो चौदा लक्ष रुपये घेऊन द्यावा तरी सरकारचे कारभार करायाचे हे मार्ग नव्हेत! आणि महमदअल्लीखानाचें मानस हेंच आहे कीं श्रीमंतांनीं घेतलेला मुलुख हैदरखानास देऊं नये. परंतु त्यास भरंवसा सरकारचा पुरवत नाहीं. चिकबाळापूर नंदिगड वगैरे घेतलेला ( पूर्वीं आह्मीं ) माघारा दिला त्याजप्रमाणें + + + + लिहिण्यांत येत आहे. हल्लींही सदरहूप्रमाणेंच लिहिण्यांत आलें आहे. हैदरखान ज्यापक्षीं सरळ माणूस आपले संस्थानीं राहून सरकार लक्षानें चालून वर्तणूक करील त्यापक्षीं त्याजवर सरकारांतून जशी चित्तांत असेल तशीच कृपा केली जाईल. ज्यापक्षीं हैदर सरळ नाहीं त्यापक्षीं हैदरखानाचे पारिपत्याचा क्रम धरिला आहे कीं, दरसाल मुलुख सोडवीत जावा. असें करितां मसलतीस दिवसगत लागली तरी काय चिंता! परंतु या शत्रूनें पारिपत्य यथास्थित केल्याखेरीज चैन पडणार नाहीं. या गोष्टीस महमदअल्लीखानही तुह्मांस अनुकूळ आहे. कारण, तुमची कायम मिजासी आहे त्यापक्षीं माधवराव सदाशिव यांसीं महमदअल्लीखानाकडे तुह्मीं रवाना केलेंच आहे. त्यास तुमचें व इंग्रजांचें बनून आल्यास अधिकोत्तरच बळ पडेल किंवा नाहीं हें

---

+ फुल्या दिलेल्या ठिकाणचीं अक्षरें नकलेंत फाटलेलीं आहेत.

सर्व विशेष तुह्मांस कळतच आहे. येथून लिहावेसें काय आहे? तुह्मांस जें सुचेल तें सरकार उपयोगी तुह्मीं करीतच आहां. रवाना छ २४ साबान हे विनंती.

नं १०६४ श्रीगणराज. (मार्गशीर्ष वद्य दशमी. १२ दिसेंबर.)

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री गोविंदराव तात्या स्वामीचे सेवेशीं.

पोष्य गोपाळराव गोविंद कृतानेक नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल तागायत छ २४ साबान मुक्काम असोडी तालुके बह्यारी वर्तमान यथास्थित जाणून स्वकीय कुशल लिहीत असलें पाहिजे. विशेष. तुह्मीं पत्र पाठविलें तें पावलें. लिहिला मजकूर कळला. संतोष झाला. इकडील वर्तमान तरी हैदरखान पट्टणांतच आहे. गुरमकोंडा किल्ला व किरकोळ ठाणींठुणीं घेतल्याचें वर्तमान कळलेंच असेल. आमचा सरंजाम जोरतलबी[2] अदवानी प्रांतीं आहे. गुदस्तांची बाकी फार राहिली आहे व सालमजकूरचा गुंता तमाच राहिला आहे. विना इकडे आल्याखेरीज कांहींच उगवणी न होय. श्रीमंत आल्यावरी मनसब्याचे दिवस, निरोप होणार नाहीं, हे दिवस रिकामे, पाहून राजश्री त्रिंबकरावमामा यांसी निरोप मागून या प्रांतास आलों आहों. येथील निकाल निघेल तसा काढून मोकळे होतों तों श्रीमंतांची खासा[1] स्वारीही येत आहे. प्रस्तुत श्रीमंतांचा मुक्काम कोणे ठिकाणीं आहे, कोणा रोखें येणार, हें सविस्तर लिहावें. बहुत काय लिहिणें लोभ असो दीजे हे विनंती.

---

१. खासगीवाले. २. जबरदस्तीनें वसूल करण्याच्या कामीं गुंतलेली. सरंजाम ह्मणजे फौज.

नं० १०६५ **श्री.** मार्गशीर्ष वद्य दशमी.
( १२ दिसेंबर )

पुं० राजश्री त्रिंबकराव विश्वनाथ स्वामी गोसावी यांसी.

विनंती उपरी. तूर्त हैदरखानाच्या जिवाळ्याचा मुलूख तर पाईन-घाट कोलारापासून आग्नेय कोणापासून दक्षिण नैऋत्य कोणपर्यंत पट्टणचे पाठीमागें. दुसरें बिदनूर प्रांत असुर्धा आहे. त्यास जिवाळ्याचा मुलुख असेल तो मारावा. जिवाळ्याच्या मुलुखास राव सेनापती (व) गोपाळराव माहीत (गार) आहेत. बिदनूर प्रांतें सरकारचें आरमार रवाना केलें आहे. आणि सावंतासही त्या प्रांतीं धामधूम करावयासीं सांगितली आहे. तेही सुंदें प्रांतीं जमा होत चालले आहेत. त्रिंबक सूर्याजीही सोंदे बिदनूर प्रांतें खुषकीहून रवाना केले आहेत. तेही लवकरच जाऊन पोंचतील. त्यास जसें बनेल तसें करून ज्यांत शत्रूचें पारिपत्य तें करावें. रवाना छ २४ साबान हे विनंती.

नं० १०६६ ( मार्ग. व. एकादशी.
१३ दिसेंबर. )

नारो बाबाजी दामले यांचें गंगाधररावास पत्र २९ साबानचें.

"श्रीमंत राजश्री पंत प्रधान साताऱ्यानजीक कृष्णातीरीं रहिमत-पुराचे पश्चिमेस चार कोस कृष्णापार आहेत. फार करून कर्नाटकांत यावयाची निकड दिसत नाहीं. खाशांचे शरीरीं समाधान नाहीं. बाजारी वर्तमान मिरज प्रांतांतून ऐनापुरास कृष्णेपावेतों खाशानीं यावें. पुढें फौजा रवाना करून आपण पुण्यास श्रीक्षेत्राकडून जावें असें बोल-तात. दुसरें परभारेंच रहिमतपुराकडून श्रीक्षेत्रास जावें, तेथून माघारें जावें,

---

१. पेशव्यांनीं त्रिंबकराव मामास पाठविलेल्या पत्राची नक्कल. २. उपद्रव न लागलेला. ३. पंढरपुरास.

हैदराशीं तह करावा, ऐसेंही बोलतात. मुख्य गोष्ट तह करून माघारे जातील हाच भाव दिसतो. भोंसले चार हजार आले ते देऊरास सहा कोस मागें आहेत. षष्ठीचा पाऊस बहूतच साताऱ्याकडे लागला, याजकरितां भेटी झाल्या नव्हत्या. एक दोन रोजांत होतील. श्रीमंतांच्याही शरीरीं आरोग्य होत आलें आहे. मिरजेकडे यंदां पाऊस कमीच लागला. कवठें तासगांव कौलापूर येथें तो पाऊस पडलाच नाहीं! माणसांस पाण्याचें कठीण पडलें, मग जनावरांस कळतच आहे! धारण सहा पायली जोरी चांगली. मध्यम साडेसहा. हरभरे सव्वातीन. तीळ तांदूळ तीन सव्वातीन. याप्रमाणें आहे."

नं १०६७ (मार्गशीर्ष वद्य. दिसेंबरचा प० पंधरवडा.)

मोरो बल्लाळाचें वामनरावास पत्र.

"बुंदीकिरें व होसकोटें व देवनहळ्ळीच्यामध्यें एक ठाणें हैदरखानाचें होतें तेथें सामानाचा जथ पाडून सरकार ठाण्यास उपद्रव करावासें (शत्रूच्या मनांत) होतें. यास्तव राजश्री मामानीं तीन दिवस मोर्चे लाऊन ठाणें घेऊन जमीनदोस्त केलें. तेथून चिकबाळापूर व नंदिगड व गणेशगड पहावयास गेले होते. तेथील बंदोबस्त करून माकळीस येऊन मोर्चे लाविले आहेत. तो किल्ला येतांच आंबेजरायदुर्गास जाणार. ह्मणून लिहिलें तें कळलें."

नं० १०६८ श्री. (मार्गशीर्ष वद्य. दिसेंबरचा प० पंधरवडा.)

सेवेशीं[1] विज्ञापना. आपणांकडील येथील मजकूर मुख्यांचे[2] चित्तांत काय आहे हें मनास आणितां आपण निघोन तिकडे[3] गेल्यामुळें यांची

---

१. त्रिंबकरावमामाच्या लष्करांतून कोणा सरदाराचें हें गोपाळरावास पत्र. २. त्रिंबकरावांच्या. ३. अदवानीकडे.

मर्जी फारच बिघडली. श्रीमंतांस चार बंद लिहून पाठविले त्यांत आपली फारच नालस्ती लिहिली. मनस्वी करणें! वाटेनें जातां हिंदुरायाचा मुलुख तमाम लुटिला त्यावरून हिंदुराव रुसोन गुत्तीस जात होते. आह्मीं व रास्ते व आनंदराव गोपाळ त्रिवर्ग जाऊन बजीद होऊन रहाविले. आजपावेतों रास्ते व आनंदराव गोपाळ यांस (मामांनीं) फारच घांसलें. आतांसे आपले मायेंत मेळवून घेतले आहेत. (त्या) उभयतांचा प्रकार ह्मणावा तर आपलें लक्ष्य राखितात ऐसें दिसून येतें. परंतु परिणामीं कसें करितील न कळे! उभयतांचे वर्तणुकेस आपण माहीतच आहां. एक राजश्री बाजीपंत अण्णा मात्र निखालसपणें आपलें लक्ष्य फारसें राखितात. हिंदुरायाचा प्रकार ह्मणावा तर तूर्त हे एका दिवशीं दो दिवशीं त्याचे घरीं जाऊन बसतात. त्यामुळें विना भावसा दिसून येत नाहीं. त्याचे मुत्सद्दी यांचें लक्ष आपलें ठायींच आहेसें दिसतें. मग परिणाम काय होईल न कळे. श्रीमंतांच्या येण्यास दिवसगत लागली याजकरितां व पुढेंही येण्याची सुरत दिसत नाहीं व गुरमकोंडा सर केल्यावरून फारच हावभरी झाले आहेत. कोणी माणूस खातरेंत नाहीं. आपण तिकडे गेलां आहां, श्रीमंतांची मर्जी नाजूक, येथील चाकरी केल्याचा परिणाम शुद्ध दिसत नाहीं, या गोष्टीचा बंदोबस्त काय करणें असेल तो करावा. येथें आल्यावर आढळलें वर्तमान सेवेशीं लिहून पाठविलें आहे. आपण व बाजीपंत अण्णा व राघो बापूजी ऐशा त्रिवर्गांच्या नांदीशीं श्रीमंतांशीं सांगोन जरबेंत आणावे हाच प्रकार फारसा दिसतो. चार महिन्यापासून अण्णास किमपि दाखला नाहीं. आपल्या अखत्यारानें मनस्वी करणें तसें करितात. मुख्यत्वें सुबराव व मल्हारपंत वाघ हेच कारभारी. मामलती विल्हेस लावणें, व संस्थानचे खंडणीचा ठराव होणें याद्‌कुद लिहिणें, त्यावर करार होणें, ती सुभरावच लिहितो. हे विज्ञापना. अण्णास दाखला

१. मुराररावाचा. २. नालस्त्या.

किमपि नाहीं. याउपर श्रीमंतांजवळ राजश्री मोरोबा आबा असतीलच. त्यांस काय लिहिणें तें लिहून आपला बंदोबस्त करावा. नाहीं तर परिणाम शुद्ध दिसत नाहीं. त्यास आपणासही परस्परें कळतच असेल. मी लिहावेसें नाहीं. हें पत्र वाचून फाडून टाकावें. लौकिकांत येथें कळल्यास आमचा परिणाम नाहीं याजकरितां पत्र वाचून विसर्जन करावें. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं० १०६९ L श्री. (पौष शुद्ध. दिसेंबरचा दु० पंधरवडा.)

तीर्थरूप मातुश्री बाईसाहेब वडिलांचे सेवेशीं.

अपत्यें माधवरावानें चरणीं मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विज्ञापना. वडिलांकडून आशीर्वाद पत्र घेऊन आला त्याणें सर्व आज्ञा सांगितली व पत्रांत आज्ञा मुख्य पथ्याविशीं, त्यास आज्ञेप्रमाणें करीत आहे. परभाराही आपल्यास विदित होईल तें खरें. जेवण औषध मोरोबा व राजेश्वरभट यांचें सांगितल्याप्रमाणें करितों. त्यांचें औषध घेत आहे तोंपावेतों त्यास निमित्त ठेऊं देत नाहीं. प्रस्तुत माझें जाणें पुण्यास होतें. परंतु प्रकृत थोडिशी बरी आहे. वडिलांचे आशीर्वादें-करून फिरावयाजोगी मात्र प्रस्तुत आहे. यानंतर दिवसेंदिवस समाधान चांगलें वाटल्यास घरास जावें, वडिलांचे सेवेशीं यावें, हेंच मानस आहे. त्यास प्रस्तुत अस्त आहे तोंवर दिवस इकडेच बहुतकरून जातील. इतक्यांत प्रकृत चांगली झाल्यास आधीं वडिलांचे सेवेशीं यावें हें मानस आहे. त्यांतही आज्ञा येईल तसें करीन. सारांश आज्ञेप्रमाणें पथ्य करितों. यंदां माझे प्रकृतीस स्वस्थ नाहीं याजमुळें मनुष्यांस फार हिसका बसला यास माझा इलाज काय? त्याहीमध्यें मामा राहिले येणेंकरून फार संभाळिलें. त्यांच्या एक दोन गोष्टी फारच चांगल्या

हित [illegible] त्यांवरच काम आहे. फौज जाते ही त्यांचेच

सांगितल्याप्रमाणें वर्तेल. आपा व मलबास[1] पाठवितों. कळावें. सदैव आशीर्वाद पत्र पाठवावयास आज्ञा व्हावी. तेणेंकरून बरा होईन. भटजीस व बाईस व स्वामीस पत्र पाठवितों हे विज्ञापना.

पै॥ छ १२ रमजान.

नं० १०७० श्रीगणराज. (पौष शुद्ध द्वादशी. २९ दिसेंबर.)

चिरंजीव राजश्री वामनरावबाबा[2] यांसी प्रती मोरो बल्लाळ आशीर्वाद. उपरी येथील कुशल तागायत छ ११ रमजान जाणोन स्वकीय कुशल लिहीत जावें. विशेष. अलीकडे तुह्मांकडून पत्र येऊन वर्तमान कळत नाहीं तर वरचेवर लिहीत जावें. इकडील वर्तमान तर श्रीमंतांचा मुक्काम रामापूर कमळापुरास झाला होता. आह्मीं व चिरंजीव राजश्री तात्या भेटीस गेलों होतों. तेथून एक मजल पुढें जातांच निरोप घेऊन घरास परवां आलों. श्रीमंतांची शरीरप्रकृत अद्याप ठीक नाहीं यास्तव उभयतां खासा माघारे पुण्यास जातात. माघ शुद्ध पंचमीचा मुहूर्त (पुण्यास जावयाचा) योजिला आहे. कर्नाटकांत राजश्री कृष्णराव बळवंत यांची रवानगी दहा हजार फौजेनिशीं झाली. ऐनापुराजवळ कृष्णा पार झाले. होनगुंदे ठाणें घालून पुढें येतात. याउपर आह्मीं कोकणांत आठ चार दिवसांत निघून जाऊं. पंधरा दिवस लागतील. कळावें. वरकड वडिलांच्या पत्रावरून कळेल. बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद.

नं० १०७१ श्रीगणराज. (पौष वद्य द्वादशी. २९ दिसेंबर.

अपत्यें मोरोबानें साष्टांग नमस्कार विज्ञापना. खासा स्वारी

---

१. आप्पा बळवंत व मल्हारराव पानशे. २. पत्र मोरो बल्लाळ याचें गोपाळरावास.

रामापुर कमळापुरास छ १ रमजानीं आली. तेथें आठ मुक्काम झाले. आह्मीं व चिरंजीव राजश्री तात्या भेटीस गेलों होतों. श्रीमंतांची भेट छ ३ रमजानीं झाली. आठ दिवस समागमें होतो. सर्व वर्तमान श्रुत केलें. प्रस्तुत प्रकृतीस किंचित् गुण आहे. अद्याप निःशेष नाहीं. यास्तव कर्नाटकांत राजश्री कृष्णराव बळवंत यांची रवानगी दहा हजार फौज देऊन केली आणि उभयतां खासा माघारे पुण्यास जाणार. माघ शुद्ध पंचमीचा मुहूर्त नेमिला आहे. आह्मीं मिरजेस यावयाविशीं श्रीमंतांस बहुतांप्रकारें विनंती केली आणि राजश्री दादा फडणीस व राजश्री गोविंदराव तात्यांस रदबदलीस घातलें होतें. त्यास श्रीमंतांनीं सांगितलें कीं, मनापासून एकदां मिरजेस यावें असें आहे. परंतु प्रस्तुत प्रकृत ठीक नाहीं. दोन मजली जावें, दोन मजली मागें यावें, ( इतकें मात्र व्यर्थ होईल ) आणि नेमिल्या मुहूर्तास सत्वर पुण्यास गेलें पाहिजे. याजकरितां तूर्त गांठ पडत नाहीं. पुढें खासा स्वारी येईल त्यासमयीं मिरज आसपास पांच गांवें राहिलीं असली तरी खामखा येऊं. याप्रमाणें संतोषेंकरून बोलिले. रामापुराहून एक मजल निंबपावेतों गेलों होतों. तेथून निरोप घेऊन छ ९ रमजानीं घरास आलों. वडिलांकडून श्रीमंतांस व राजश्री मोरोबादादांस व राजश्री गोविंदराव तात्यांस पत्रें आलेलीं प्रविष्ट करून सरकारच्या पत्राचें व राजश्री दादा व तात्यांचें उत्तर घेऊन पाठविलें आहे त्यावरून कळों येईल. श्रीमंत नरसिंहपुराकडे गेले. हलक्या हलक्या मजली करीत पुण्यास जात आहेत. राजश्री कृष्णराव यांजबराबर दहा हजार फौज व तोफखाना आहे. ऐनापुराजवळ कृष्णा पार झाले. पुढें बागलकोटावरून जाणार. होनगुंदे ठाणें घालोन पुढें राजश्री मामाकडे येतील. विदित होय हे विज्ञापना.

शा० १६९२ हैदरअलीवर तिसरी स्वारी. इ. स. १७७०

नं० १०७२ श्रीगणराज. (पौष वद्य. दिसेंबरचा दु० पंधरवडा.)

आशीर्वाद[1] उपरी. श्रीमंतांस पथ्यास भाजी पाहिजे त्यास तोंडलीं, व शेवग्याच्या शेंगा, व शेवग्याचीं फुलें, कोंवळीं वांगीं, व पुदिना कोशिंबिरीस, कढीलिंब व कोथिंबीर कोंवळीं याप्रमाणें थोडे थोडे जिन्नस सारे एका पाटींत घालोन वर केळीचें पान घालोन बांधोन डांकेनें भाजी रोजचे रोज येऊन पावे याप्रमाणें पाठवीत जाणें. तशींच जिन्नसवार फुलें व केवड्याचीं कणसें व गुलाबाचीं फुलें व चाफ्याचीं व तुळशी व बेल येणेंप्रमाणें करंडींत घालोन भाजीबरोबर डांक चौक्या चहू जागा चार ठेऊन दररोज ताजा जिन्नस येऊन पावे याप्रमाणें तरतूद करून पाठविणें. भाजी व फुलें पाठवाल तेव्हां वाटेस डांक चौक्या आहेत त्याणीं दर चौकीस पाणी शिंपडीत जावें याप्रमाणें ताकीद करून पाटींत घालून रवाना करणें. वरकड भाजीपाला पाठवाल ते बैलावरून पाठवीत जाणें. चार[2] पांच खंडी लांकडाची तरतूद असों देणें कोळसेही[3] दहा बारा गण लागतील. सूचना लिहिली आहे. श्रीमंतांस बारीक जिरग्याचे तांदूळ पीठ घालून कांडवून बारीक सडवून तांदूळ गणभर पाठवून देणें. बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद.

नं० १०७३ श्री. (पौष शुद्ध. दिसेंबर. दु० पंधरवडा.)

सेवेंक[4] रामाजी गणेश साष्टांग नमस्कार विज्ञापना. स्वामीचा निरोप

---

१. मोरो बल्लाळ यानें हें पेशव्यांच्या लष्करांतून मिरजेस पत्र पाठविलें होतें. लष्कर त्यावेळीं मिरजेपासून बारा कोसांवर आलें होतें. २. श्रीमंत कदाचित मिरजेस येतील या अजमासावर ही इशारत मेजवानीच्या तयारीची. ३. पेशव्यांचा खासा स्वयंपाक सर्व कोळशांवर होत असे त्याकरितां हे इतके कोळसे. ४. पत्र पांडुरंगरावास लिहिलेलें आहे.

घेऊन लष्करास आलों तों लष्करही रामापुरावर कमळापुरावर आलें. तों तिसरे दिवशीं श्रीमंत राजश्री आबाही आले. आबा न आल्याच्या पूर्वी दोन दिवस साहित्याची तरतूद दुमाल्यावर टाळाटाळ केली. श्रीमंतांची शरीरभावना चांगलीच आहे मर्धी समाधान नव्हतें. मिरजेंत असतां ऐकत होतों ते लटकी बातमी. आंव झाली होती. उष्णाची बाधा शरीरीं होती. आतां शरीर चांगलेंच आहे. मर्जी बरीच आहे. मिरजेस यावें, चार दिवस रहावें, असें श्रीमंतांचें अंतःकरण आहे. त्याप्रमाणें आबानीं विनंती केली आहे. यावें असें निम्मे मानस झालें. अंतःकरणीं यावें असेंच आहे. बहुतकरून येतात. मर्जी फार चांगली आहे. राजश्री त्रिंबकरावमामानीं आपणाकडून लिहावयास आळस केला नाहीं. अदवानीकडे आल्यामुळें श्रीमंतांचे चित्तीं तो राग राहिला नाहीं. मर्जी चांगली आहे. तीर्थस्वरूप राजश्री नानासाहेबांची व सौभाग्यवती मातुश्री ताई यांची शरीरभावना कशी आहे हेंही पुसत होते. श्रीमंत सहा कोसीं आल्यावर तुह्मीं यावें लागेल. येविशीं आबा आपणास लिहितील त्याअन्वयें यावें. वरकड आंतील जागाजुगा अडचण असेल ते नीट होईल. तरतुदेस गुंता नाहीं. राजश्री बाबूराव बाबास निरोप द्यावा असा आपला करार होता त्यास श्रीमंत येणार हा निश्चय. त्यापक्षीं बाबास निरोप दिल्यास चिंता नाहीं. लष्करास आल्यास सर्वस्व दान केलें. हे विज्ञापना. रागें भरतील यास्तव सविस्तर लिहिलें आहे. हे विज्ञापना.

नं० १०७४ **श्रीशंकर.** ( ३० दिसेंबर. )

श्रीमंत राजश्री दादा स्वामीचे सेवेशीं.

विनंती सेवक महादाजी अनंत कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना.

---

१. मोरो बल्लाळ. २. गोपाळरावाविषयीं वाईट ल्याहावयास. ३. गोपाळराव.

तागायत पौष्य शुद्ध त्रयोदशीपावेतों मुक्काम लष्करनजीक मास्ती सुखरूप असों. विशेष. स्वामीकडे तीन चार जोड्या कागदीं गेल्या परंतु एकही अद्यापि आली नाहीं. हैदरखान पट्टणांतच आहे. टिपूही पट्टणास गेला होता. हल्लीं बेंगळुरास आला ह्मणून लष्करांत वर्तमान आहे. कुणगलास दोन चार हजार फौज आहे. हजार पावेतों बेंगळुरास आहे. आह्मांस येथें येऊन पंधरा दिवस झाले. अद्यापि प्रथमच दिवस आहे. यजमानास चिकबाळपुरकर याची भीड भारी आहे. कोणताही जाबसाल नाहीं. शस्त्र पाणी याणीं तो तालच सोडून चालतात! येथें कांहीं बोलावें तरी चौघांमध्यें रुजवातीस आणून फजीत मात्र करावे असेंच मानस दिसतें. आह्मीं कांहींच बोलत नाहीं. हिशेब समजल्यावर मंडळी सहवर्तमान रोजगार सोडून ईश्वरइच्छेनें घडेल तें प्रमाण. श्रीमंतांकडून सांडणीस्वार येऊन चार दिवस झाले. फिरोन जाब घेऊन देशास गेले. आपण अद्वानी प्रांतास गेले ह्मणोन श्रीमंतांनीं रागेंभरून पत्रें लिहिलीं ह्मणून परस्परें ऐकतों. हल्लीं राजश्री मामानीं आपणाकडे कारकूनच रवाना केला आहे. गुरमकोंडा फत्ते झाला त्यामुळें ( मामास ) फारच गर्व होऊन मनुष्य तृणप्राय झालें आहे! राजश्री बाजीपंत अण्णा फारसे दरबारास येत नाहीं. हे विज्ञापना.

नं० १०७९ **श्रीशंकर.** ( पौष्य शुद्ध त्रयोदशी. ३० दिसेंबर. )

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री गोपाळराव स्वामीचे सेवेशीं.

पोष्य त्रिंबकराव विश्वनाथ कृतानेक नमस्कार विनंती उपरी. येथील कुशल तागायत छ १२ रमजानपर्यंत मुक्कामनजीक होसूर सुखरूप असों. विशेष. या प्रांतीं येऊन वीस पंचवीस दिवस झाले. चारा होता याकरितांच मुक्काम करून बेंगळूरपर्यंत अनेकलापासून घांटमाथा देखील कुल प्रांत कहीनें साफ केला. याउपर कित्येक गोष्टी

## ग० ११९२ पेशवे परत पुण्यास जातात. इ. स. १७७०

श्रीमंतांच्या येण्यास दिरंगाच्या परस्परें हैदरास कळल्या असतील. त्या उमेदीवर जाजती सरंजाम तयार करून बाहेर निघाला अगर एका दो दिवशीं निघेल. त्याचे मतें इंग्रज तर आपल्याकडे येतच नाहीं आणि छावणीचीच फौज जेव्हां मुलुखाचें व ठाण्यांचें पारिपत्य करणार तेव्हां याउपर बसून काय करावें. बाहेर निघावें. एकदां मुकाबला घ्यावा. श्रीनें यश दिलें तर दिलें. श्रीमंत नाहीं आले, तिकडील फौज सामील आह्मांस नाहीं जाहली, तोंच इतका उद्योग करावा. त्यास श्रीमंतीं पत्रें पुरवणीमुद्धां पांच पाठविलीं तींच बजिन्नस तुह्मांस पाहण्यास पाठवीत होतों. परंतु वाटेतिटेनें न कळे. त्यानीं याच पत्रीं सर्व येथें लिहिणें तें लिहिलें आणि फिरोन आह्मीं आणखे प्रकारें लिहून पाठवावें अशी बाकी ठेविली नाहीं. तीं पत्रें मजकूर समजण्यास जवळ असावीं याकरितां ठेऊन घेऊन नकला करून पाठविल्या असत. त्यांवरून कळेल. या पत्रांचें प्रत्योत्तर काय लिहावें ह्मणून आह्मीं अवघेच राजश्री मुरारराव यांचे डेऱ्यास गेलों. ऊहापोह बोलतां श्रीमंतीं साफच लिहिलें आणि शरीरापेक्षां कोणी एक गोष्ट अधिक नाहीं असें असतां दोन वर्षें केली मेहनत जर आह्मीं दम धरून हिम्मत बांधून केल्या मेहनतीपेक्षां अधिक मेहनत श्रम साहस करून हैदरनाईकास जरबेंत न आणिलें, तर आह्मां सर्वांची मातबरी ती काय! प्रसंगीं सर्व परीक्षा. तो प्रसंग न पडतां श्रीमंतांचें येणें झालें असतें तर सहजांत मनसबा सलाबतीनें थोड्या मेहनतीनें सिद्धीसही जाता. आधींच मुलखांत पाऊस देशींही नाहीं. ज्याचे जे सरंजाम ते पीकपाण्याचे कमतीमुळें खराब जाहले. तेव्हां सर्व गोष्टींचा ताण सर्वांस बसला इत्यादिक अवघें खरें. तथापि याप्रसंगीं श्रीमंतांस मळमळीत अगर धर सोडून लिहिणें उचित नाहीं. एक तर ते आले शरीरेंकरून श्रमी. दोन वर्षांची मसलत. अगोदर पुढें आह्मीं. आपचे वस्तु कांहीं होणार नाहीं. सेवक लोकीं उगी आज्ञा मान्य करून रहावें ह्मणून

राहतों, ऐसें लिहिलें तर हेही दुसरी चिंता त्यांसच निर्माण होऊन शरीरीं अधिकच काळजीनें अनारोग्य होईल. आह्मांसही बट्टा लागेल. पुढें होणें तें तर कालेंकरून होईल. यास्तव कसेंही संकट असो, परंतु सर्वांनीं अधिकोत्तर मेहनत एक दिल होऊन करावी. इंग्रजांचें ठीक झाल्यास फारच उत्तम. न झाल्यास खांद्यावर भाला घालून तमाम मुलुख उलथा पालथा घालूं. घांटाखालींही फौज उतरून तोही प्रांत मारून ताराज करूं! तो कोणीकडे ह्मणून धांवेल! हाच विचार आह्मां सर्वांस या कालीं उत्तम. याउपर श्रीमंतांच्या पत्रांच्या नकला करून तुह्मांकडे रवाना कराव्या आणि ठरला मजकूरही तुह्मांस लिहावा, तुह्मींही शंभर मजकूर असले तरी एकीकडे ठेऊन आधीं तयारी करून एक दिवसही विलंब न करतां स्वार होऊन हैदराकडील किल्ला मिडगीसी त्यावरून देवरायदुर्ग डावा त्याचे शेजारून लवकर बेंगळूरचे सुमारें दोन मजलीचे अंतरें यावें. आह्मींही तुह्मीं याल त्यारोखें येऊं. या उपर माहितगिरीही सर्वविषयीं तुह्मांस आहे. मातबरही आपण. भरंवसाही आह्मीं आपलाच धरितों. आणि या प्रसंगीं सर्व प्रकारें अंगेजणी[1] करून श्रीमंतीं याप्रकारें लिहिलें असतां करणें करून दाखविणें उचित असे. तुह्मीं आल्याखेरीज कोणी एक विचार आह्मीं करीत नाहीं. एक एक दिवस लक्षाचा जातो. तुह्मीं न जावें याचअन्वयें पूर्वीं पत्रें श्रीमंतांनीं आपणास आलीं होतीं तीं पाठविलीं तींही पावलींच असतील. असो. आपणही गेले. अदवानीचे गुंत्याचें कामही उरकलें. दोन्ही गोष्टी होऊन गेल्या उपर एक घटका उशीर न करितां पत्र पावतांच आधीं स्वार व्हावें. येथें या उपर त्याचे[2] येण्यास गांठ पडण्यास उशीर नाहींच नाहीं. पहिली एकंदर आवाई आह्मीं खाऊन तोंड काढिलें तर पुढें चार सहा महिने आमचें हिंडणें फिरणें जरब कशी बसेल? कार्यही श्रीमंतांचें विना जरब कसें होईल? या गोष्टी आह्मीं

---

१. पराक्रम. २. हैदराचे.

लिहाव्या असें काय! तुह्मांस सर्वही कळतच आहे. लिहावेसें काय! श्रीमंतांची मदारही आपणांवरच व आह्मां सर्वांसही भरंवसा आपला. याप्रसंगीं उचित तेंच सर्वांनीं करावें याविशीं यापेक्षां विशेष आपणांस लिहावेसें नाहीं. कोणी तरी प्रसंगास जपावें. त्याच गोष्टी बहुत दिवस राहतात. तर हें पत्र दहा पत्रांचे जागा मानून लवकर अति सत्वर यावें, यास्तव राजश्री आपाजी गोविंद आपणाकडे पाठविले असत. त्याणीं फार बोलावयाकरितां पाठविलें नाहीं. जे लिहिणें तें सर्व पत्रींच खोलून लिहिलें आहे. आधीं उत्तरें कोणे रोखें येणार तीं सांडणी स्वाराबराबर पुढें पाठवावीं. हैदरनाईकाची आंतील बातमी तर दहा बारा हजार बार व फौज ( त्यास ) राजी नाहीं. कितेकांचीं राजकारणेंही लागलीं आहेत. परंतु जरब दिवसेंदिवस बसल्यानें फारच त्यासही पेंच पडेल. इंग्रजांचें बनून आल्यास मग तर श्रीकृपेंकरून तुह्मां सर्वांस यश ईश्वर देईलच, असें तर्केंकरून वाटतें. आह्मीं तुमची मार्गप्रतीक्षा करीत असों. ही जागा बसून आसपास चारा पाणी पाहून तुमचा मार्ग लक्षून राहूं तों तुह्मींही लौकर यावें. कोण प्रसंग कसा हें कळत नाहीं. बहुत काय लिहिणें लोभ असों देणें हे विनंती.

नं० १०७६ ( ३० दिसेंबर. )

मोरो बल्लाळाचें गोपाळरावास पत्र पौष्य शुद्ध १३ चें रविवारचें.

" भोंसले श्रीमंतांबराबर आहेत त्यांसही सत्वरच निरोप होईल. श्रीमंतांच्या चित्तांत बुळबुळीत सल्ला करावयाचा नाहीं. पुरतें [illegible] करावें. यंदां आणखी फौज दहा हजार जातती पाठ[illegible] अशीच एक दोन वर्षे छावणी करावी. श्रीमंतांच्या झाल्यानंतर एकदां खासा स्वारी होऊन चांगलें मानस आहे. "

## श० १६९२ हैदरअलीवर तिसरी स्वारी. इ. स. १७७१

नं० १०७७ ( पौष्य शुद्ध त्रयोदशी. ३० दिसेंबर. )

गोविंद हरीचें गंगाधररावास पत्र १२ रमजानचें.

" श्रीमंत रामापुर कमळापुरचे मुक्कामाहून माघारे फिरले. पुण्यास जातात. कर्नाटकांत राजश्री आपा बळवंत व मलबा पानशे यांची रवानगी झाली. भोंसल्यास देशास जावयासीं निरोप झाला. "

नं० १०७८ ( पौष्य वद्य. जानेवारी. प. पंधरवडा. )

मोरो बल्लाळाचें वामनरावास पत्र.—

" कोल्हार तालुक्यांतील कामकाज उरकून राजश्री मामा बिदनुराकडे दुसरी फौज शिन्यांकडे ठेऊन गेले तर उत्तम झालें. तुह्मांस शिन्यांकडे ठेऊन जातील तर तुमची फौज थोडी, तेव्हां हैदरखान बाहेर निघून येऊन दगा करावयास चुकणार नाहीं. याकरितां दुसरी फौज ठेविल्याशिवाय गत्यंतर नाहीं. राव गेले, तुमचीच फौज ठेविली, तर खामखा शत्रू येऊन गांठ घालावयास चुकणार नाहीं. तुह्मीं सर्वांनीं याचा पक्का विचार करून राहणें. निराळे फोडून पथकांत चाकरी सांगतील ती पद्धत आजपावेतों नाहीं, पुढेंही होणें नाहीं, असें साफ सांगावें. वडिलांनीं मेळविला लौकिक तो रक्षून घरास यावें ह्मणजे लक्ष जोड पावली. हेंच देवाजवळ अहिर्निशीं मागतों. "

९ **श्रीगणपतिर्जयति.** ( पौष्य वद्य. जानेवारी. प० पंधरवडा. )

गी. तुह्मीं एकादशी शुक्रवारचें पत्र पाठविलें तें वद्य

---

राघास पत्र.

प्रतिपदा बुधवारीं अस्तमानीं सहावे दिवशीं पावलें. लिहिलें वर्तमान अक्षरशः कळलें. स्वदस्तूर एक बंद लिहिला त्याचा विचार ध्यानांत आला. हैदरखानाचा तह झाला असता तरी आपण लिहिली[1] गोष्ट करावया युक्तीस पडतें. तो प्रकार झाला नाहीं. तुह्मीं स्वकार्यानिमित्य अदवानी प्रांतें आलां, आणि परस्परेंच हा मजकूर केला, तरी एक प्रकार दिसतें. त्यानीं[2] प्रथमतः निरोप दिला. मागती लिहून पाठविलें कीं न जावें. तथापि तुह्मीं हेका धरून आलां ये गोष्टीचें विषम (श्रीमंतांस) कांहीं वाटलें असेल. असो. आल्यासारखें अदवानीचा तह विनाकजिया होऊन बिल्हेस लागला. मोठी गोष्टी झाली. असें करितां पौष मास गेला. माघ, फाल्गुन व चैत्र तीन मास उरले. स्वल्पासाठीं ऐक[3] प्रकार दाखवूं नये. त्यांसमीप जावें. चार दिवस कालक्रमणा करावी. शरीरप्रकृतीचा विचार लिहिला तो सर्व कळला. परंतु काय करावें! देश काल वर्तमानें वर्तावें लागलें. अगोदर दोन महिने शरीरप्रकृत एक प्रकार ह्मणोन एक दोन चार लिहिलीं आलीं असतीं तर श्रीमंत समीप आले होते, अनायासें चिरंजीव आबाही गेले होते, युक्ती प्रयुक्तीनें सांगावयास येतें. कार्यभागीं यांस बोध करिते, तो विचार राहिला. श्रीमंत माघारे गेले. चिरंजीव घरास आले. आजी तुमचें पत्र आलें तेव्हां चिरंजीव आबा बोलिले जे आतां हा प्रकार करितां नये. दोन वर्षें स्वामिकार्यावरी शरीराकडे न पाहतां श्रमसाहस केले, आतां थोडके दिवस उरले, यांत उतावळी केलिया मागें केलें व्यर्थ! पुढें नूतन प्रसंग होणार. दीर्घदृष्टी कार्याचा सेवक एकसमयीं केवळ शरीर स्वाधीन नाहीं ह्मणोन आला असा अ… (श्रीमंतांच्या) ध्यानांत येणार नाहीं. दुसरे मनास मानेल तें…

---

१. स्वारींतून घरीं येण्याविषयीं पेशव्यांची परवानगी मागण्या… करावमामानीं. ३. वैषम्य.

तील तें प्रमाण वाटेल. यास्तव सबुरी करावी. श्रीकृपेनें हेही दिवस सुगमच जातील. यंदाचे लोक देशास आले पाहिजेत, त्या प्रांतीं फौज राहिली पाहिजे, याअर्थी श्रीमंतांनीं फौज रवाना केला आहे. भपकर शितोळे धारवाडीं होते त्यांसही आज्ञा तिकडे जावयाची झाली. घायगुडे भोंसले मात्र धारवाड प्रांतें राहतील. श्रीमंत राहिलेसे झाले तेव्हां वकील तहाची गोष्ट न्यून बोलों लागला. तीच गोष्ट मान्य करावी तरी गुदस्तां खासा स्वारी गेली, कार्य न झालें, छावणीस फौज ठेविली; सालमजकुरीं जाजती फौज पायदळ ठेऊन शत्रु कावेसींत आणून विपुल द्रव्य साधावें तो पदार्थ न होतां थोडकें द्रव्य घेऊन घेतलीं स्थलें त्यास (परत) द्यावीं असा तह कोण्या कार्याचा? यास्तव तह न केला. पुढें छावणीची फौज व नूतन पाठविली फौज सारे एक होऊन बिदनूर प्रांतांचा तमाम मुलुख खराब करावा, यामुळें कांहीं विवेकावारी आला तरी येईल! पट्टणचा मुलुख फार करून खराबींत आलाच आहे. बिदनूर तालुका तमाम झाडी. फौजेनें जाऊन काय सिद्ध होणें कळत आहे! त्यांमध्यें शत्रुही समीप. तथापि धन्यानें प्राक्तन विचित्र! तह बनला तरी तेथें राजश्री मामासाहेबीचे करावा. नव्हे तेव्हां घरचेवर पत्रें जात येत आहेत, जाबसाल येतील त्याप्रमाणें करावें असें आहे. तुह्मींही घरास यावें. आपण बरें तर जग बरें. परंतु आह्मीं डोळे झांकून तिकडे चार महिने गुदराण करावी ह्मणून लिहिलें. हे आशीर्वाद.

नं० १०८० **श्रीगणपति.** (पौष वद्य.

जानेवारी. प० पंधरवडा.)

[1]शीर्वाद उपरी. स्वदस्तुरें तुह्मीं बंद लिहिला, कोने पिछानेदेखील

---

[1] विंद हरीचें गोपाळरावास. गोपाळरावाचा किती वाखा झाला होता माहीत नव्हतें!

तो अक्षरशः वाचून पाहिला. त्यांत स्वशरीरविषयीं केवळ अव-सान सोडून लिहिलें त्यावरून अपूर्व वाटलें. ऐशास कोणी हराम-जादेपणें घरीं राहिला असा अर्थ नाहीं. चिरंजीव वामनावरी शब्द ठेवावयास जागाच नाहीं. चिरंजीव पंढरीनाथ ह्मणाल तर लष्करच्या प्रकरणीं तो तिळमात्र खबरदार नाहीं. घोड्याचा स्वारही नव्हे. तथापि पाठवावाच तरी येथील गत काय? आह्मीं आहों नाहीं सारखे.. व्यथिस्त एका महिन्यांत चार वेळ दुखणें येतें! सदैव श्वास आहे. एक मुखेंकरून खबरदार आहों जाबसाल मात्र करावयास. बाकी कर्तृत्वाचा प्रकार नाहीं. कागदीं बाकी आहेत ते दिवस घालवितों! वेडा बागडा लेंकरू एक चिरंजीव बाळे तुह्मां-जवळ भलतसा आहे. आह्मीं साठ वर्षें चाकरी केली. अलीकडे दहा बारा वर्षें वाताचे व्यथेमुळें घरीं राहिलों. प्रस्तुत सर्व भार सरदारीचा तुह्मांवरी. संसाराचा तुह्मांवरी. तुह्मीं पंढरपुरास गेलां तरी आह्मीं तेथेंच येऊं. या कारभाराविशीं आह्मांस कांहीं गरज नाहीं! सर्वांस घाबरें करून लिहिलें यावरून अपूर्व वाटलें. तें पत्र आह्मीं कोणास दाखविलें नाहीं. तुह्मीं श्रीकृपेनें दहा अकरा महिन्यांत देशास येतच आहां. तंवपर्यंत आह्मीं स्वस्तिक्षेम असलों तर भेटीचा योग पडेल तेव्हां तुह्मांस सांगणें बुद्धिनीति ते सांगूं. प्रस्तुत तेथें चिरंजीव मंडळी आहे त्यांची मनोधारणा सर्वांची रक्षून सर्वां लोकांची मर्जी रक्षून संतोषेंकरून [illegible] घालविणें. सावध फार रहात जाणें. बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद. ज्यावरी भार पडला त्यानें सोसावें, पार पाडावें. हे आशीर्वाद.

नं० १०८१ श्रीगणर[illegible]. ( पौष वद्य.
[illegible] प० पंधरवड
कांहीं

अपत्यें वामनानें साष्टांग नमस्

---

१. गंगाधरराव. २. पत्र मोरो

बहुत बाकी राहिली आहे त्या वराता व पडल्या घोड्याबाबत मिळोन बाबत तिसा हजाराच्या वराता होतील. वरातांप्रमाणें ऐवज आपण ज्याचा त्यास द्यावा. कित्तुराबाबत ऐवज लक्ष्मेश्वराहून सोंडुरास आला आहे तो आणावयास रामजी साळोखे वगैरे राऊत पाठविले आहेत. ऐवज घेऊन येतील. राजश्री त्रिंबकराव मामा येथें आले तेसमयीं बोलणें चालणें झालें त्यांतील भाव जे, पहिली फौज आहेच व ही व राजश्री कृष्णराव बळवंत यांसमागमें फौज येते (अशी) सारीच फौज छावणीस रहावी, आणि मातबर कामें करावीं, अशीच श्रीमंतांची मर्जी आहे ह्मणोन बोलत होते. ऐशियास याप्रमाणेंच श्रीमंतांची आज्ञा आहे किंवा सहजांत बोलत होते हा भाव आह्मांस कशावरून कळावा! फौजेची रवानगी या प्रांतें झाली तेसमयीं आपण श्रीमंतांजवळ होतां. आपणास सर्वही भाव कळले असतील. गुदस्तांची फौज व सालमजकुरीं फौज आली यांसुद्धां छावणीस रहावी अशी श्रीमंतांची मर्जी असल्यास आमची फौज देशास आल्याखेरीज ठीक पडणार नाहीं हें आपण जाणतच आहांत. येविशींची पैरवी कर्तव्य ते विचारें करून करावी. याप्रसंगीं हा विचार न लिहावा, परंतु श्रीमंतांनीं आपल्यास पुण्यास बोलावूं पाठविल्यास जावें लागेल, तेव्हां समयोचित बोलून चालून घेतलें पाहिजे, याजकरितां सूचना लिहिली आहे. राजश्री कृष्णराव बळवंत अद्याप अमके जागा आले ऐसें तहकीक नाहीं. सेवेशीं विदित होय हे विज्ञापना.

नं० १०८२ श्रीगणराज. (पौष वद्य.

.... स्वदर जाने० प० पंधरवडा.)

अपत्यें ........कार विज्ञापना तागायत छ १६

...विंद हरीचें गोपाळरावास.

...गहीत नव्हतें!

रमजान गुरुवारपावेतों वर्तमान यथास्थित असे. विशेष. वडिलीं छ ७ रमजानचीं पत्रें पाठविलीं तीं परवां दोनप्रहरा पावलीं. दुसरीं पत्रें छ ११ रमजानचीं रवाना केलीं तीं काल तास रात्रीस येऊन पावलीं. लिहिला मजकूर सविस्तर कळों आला. इकडील वर्तमान विस्तारें लिहून जासूद जोडी रवाना केली आहे. येऊन पावली असेल. वडिलीं लिहिलें जें, 'शरीरीं समाधान नाहीं. अन्नावर वासना नाहीं, निजल्या जाग्यांतून उठून बसावयास दोन घटका लागतात. श्वास लागतो. शरीरांत शक्ति नाहीं. यास्तव तीर्थरूपांच्या विचारास आलिया श्रीमंतांस पत्र पाठवून लिहून आणून आह्मांकडे पाठवणें. हैदरखानाचा तो तह झाला तर असेल.' ह्मणोन आज्ञा, ऐशास आह्मीं लष्करांतच श्रीमंतांच्या भेटीस गेलों होतों. आठ दिवस समागमें होतों. त्यांची प्रकृत पाहिली त्यास गुदस्तां लष्करांत वडिलीं श्रीमंतांची शरीरप्रकृत पाहिलीच होती. हल्लीं त्याच्या दहाव्या वाट्यानें देखील ठीक नाहीं. अगदींच शरीर गळालें आहे. तांदूळवाडीच्या मुक्कामावरच बाकी राहिली नव्हती. परंतु ईश्वरी कृपा होती ह्मणोन हे दिवस पाहिले. अद्याप झालें तरी प्रकृत नीट नाहीं. कचेरीस मात्र थोडेसे येऊन बसतात. यास्तव लांब मजली न करितां हळूहळू दोन दोन कोसांच्या मजली करीत पुण्यास जात आहेत. एरवीं श्रीमंत निघाल्या दिवसास आजला बिदनुरास गांठ घातली असती. पायाच्या माणसांची व तोफांची वगैरे तरतूद चांगलीच केली होती. आणि यंदां शत्रूचें पारिपत्य खामका पुरेंच करावें असें होतें. परंतु एका शरीरामुळें साऱ्या गोष्टी राहिल्या! श्रीमंतांचे चित्तीं एक दोन वर्षें आणखी अशीच छावणीस फौज ठेऊन आपल्या शरीरास चांगलें आरोग्य झाल्यानंतर पारिपत्य करावें असा मानस आहे. यास्तव राजश्री आपाजी बळवंत यांजबराबर दहा हजार फौज देऊन तोफखानासुद्धां रवानगी झाली आहे. हुनगुंदे येऊन पुढें मामाकडे येतात. हैदरखानाचा तह अद्याप नाहीं. श्रीमंत दर मजल पुढें येते तर तह दबावाखालीं होता. माघारे फिरल्यानंतर तहास कोणती जरब बसली

ह्मणोन (त्यानें) तातडीनें सल्ला करावा? पहिल्यानें आपाजीराम इकडून गेले ते वेळेस श्रीमंत मुहूर्तानें बाहेर निघाले होते. पुढें यावयाच्या अगोदरच जाऊन तह उरकावा असें (त्याच्या मनांत) होतें. जसा माघारा फिरावयाचा डौल पाहतांच बोलेनासे झाले! श्रीमंतांच्या चित्तांत चार रुपये अधिक उणे करून मुलुख न सोडितां सल्ला करावा असा भाव होता. परंतु आपाजीराम मनोदयानुरूप बोलेना, आणि मुलुख सोडावा ही (त्यानें) आड घातली, याजकरितां ठराव न झाला. तह झाला असता तरी आह्मीं वडिलांस या ह्मणून लिहितों. मग श्रीमंतांची परवानगी न लागती. वडिलांचे शरीरीं समाधान नसतां नका येऊं असें आमच्यानें लिहवेल कीं काय? काय करावें! उपाय नाहीं! वडिलीं औषध उपाय चांगला करवून आरोग्यता झालियाचें लिहावें. आह्मीं लष्करांत असतांच हें पत्र पावलें असतें तर रुबरू[1] विनंती करावयासी ठीक पडतें. आतां लिहून पाठविल्या जाबसालच होणें कठीण! उत्तर यावयासच एक महिना लागेल. एरवीं वडिलांस समाधान नसतां या ह्मणोन लिहावयाचा गुंता नव्हता. विदित होय हे विज्ञापना. वडिलांचे शरीरीं समाधान नाहीं ह्मणोन ऐकून परम चिंता लागली आहे. उपाय करावा. आरोग्य झालियाचें वर्तमान लिहावें. वडिलांची काळजी लागली आहे. इतकें दुखणें असतां या ह्मणावें, परंतु श्रीमंत पुणेस गेले, लांब पडले, जाब यावयास एक महिना पाहिजे, यास्तव न लिहिलें. विदित होय हे विज्ञापना.

नं० १०८३ L श्री. (माघ शुद्ध द्वितीया. १८ जानेवारी.)

राजश्री रामचंद्र नारायण गोसावी यांसी.

सुरु सन इहिदे सबैन मया व अलफ. बाईसाहेबांस पत्र लिहिलें

---

१. समक्ष. २. पेशव्यांचे बंधु नारायणराव साहेब यांचें हें पत्र. यांत 'बाईसाहेब' आल्या आहेत त्या पेशव्यांच्या मातुश्री गोपिकाबाई.

आहे त्यांत पुण्यास यावयाचा प्रकार लिहिला आहे तो मातुश्रीस खरा वाटणार नाहीं. परंतु मी लटकें लिहिणार नाहीं हा निश्चय असावा. बाईसाहेबांचें येणें पुण्यास न झाल्यास तीर्थरूप राजश्री रावसाहेब गंगापुरास निश्चयें जाणार यास्तव मातुश्रींचें येणें होय तें करणें. पत्रांतील मजकूर मातुश्रीस विदित करणें. जाणिजे. छ १ सवाल.

नं० १०८४  ( पौष्य वद्य.
जाने० प० पंधरवडा. )

श्रीमन्महाराज मातुश्री जिजाबाई यांजकडून गोविंद हरीस आज्ञापत्र.

" राजश्री माधवराव पंडित प्रधान यांणीं चिकोडी मनोळी दोन्ही संस्थानें सरकारांत नजर केलीं. पौष बहुल प्रतिपदा रविवारीं मनोळींत सरकारचा जमाव जाऊन ठाणें पडलें. "

नं० १०८५  श्री.  ( माघ शुद्ध द्वादशी.
२८ जानेवारी.)

राजश्री रामचंद्र नारायण गोसावी यांसी.

सुरु सन इहिदे सबैन मय्या व अल्लफ. मातुश्रींचें येणें पुण्यास होतें कीं नाहीं हें लिहिणें. माझे वाटची बहुत विनंती करून लवकर येणें होय तें करणें. जसें बाईसाहेबांस गंगापूर सोडून यावेसें वाटत नाहीं. तसेंच आह्मांस घरीं आल्यावर बाईसाहेब नसल्यास कठीण होतें हें सर्व (त्यांस) विदित आहे. येणेंप्रमाणें विनंती करून लवकर येणें होय तें करणें. बाईसाहेबांचें येणें न झाल्यास रावसाहेब ( गंगापुरास ) येणार हा निश्चय आहे. जाणिजे. छ. ११ सवाल.

---

१. पेशव्यांचे बंधु नारायणराव यांचें पत्र. २. पेशवे.

श० १६९२ **हैदरअल्लीवर तिसरी स्वारी.** इ. स. १७७१

नं० १०८६ **श्रीगणराज.** ( ७ फेब्रुवारी. )

तीर्थस्वरूप राजश्री आबा वडिलांचे सेवेशीं.

अपत्यें वामनानें कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती येथील कुशल तागायत माघ कृष्ण अष्टमी मुक्काम नजीक देवरायदुर्ग जाणून वर्तमान यथास्थित असे. विशेष. राजश्री त्रिंबकराव मामा यांचीं पत्रें वरचेवर आलीं जे 'सत्वर यावें.' याजकरितां मजल दरमजल कूच करून छ १७ सवालीं किल्ल्याच्या दक्षिणेस दोन कोसांवर तळें आहे तेथें मुक्कामास आलों. चार सहा घटकेच्या अवकाशें राजश्री मामाच भेटीस आले. समागमें राजश्री आनंदराव गोपाळ व दौलतराव घोरपडे यांचे पुत्र व आपाजीपंत बिनी व बाजीपंत फडणीस व आनंदराव दिक्षीत तोफखाना सर्वत्र आले. भेटी झाल्या. तीर्थस्वरूप रावसाहेबांकरितां फार श्रमी झाले. 'आह्मां सर्व ब्राह्मणांमध्यें केवळ मुगुटमणि होते. ते तो आपल्या वक्रांतच गेले.' ह्मणून बहुत बहुत खेद करीत होते. एक प्रहर आमच्या डेऱ्यांत होते. संध्याकाळच्या सहा घटका दिवसास निघोन गेले. आज देवरायदुर्ग किल्ला पहावयास राजश्री त्रिंबकरावमामा आले होते. आह्मींही गेलों होतों. किल्ल्याचा लाग भाग पाहिला. हैदरखान याणें चांगला बंदोबस्त केला आहे. राजश्री मामांच्या चित्तांतील भाव किल्ला मोर्चे लाऊन घ्यावा आणि बंदोबस्त करून ठाणें ठेवावें. ह्मणजे झाडीचें तोंड फारकरून बंद होईल. (शत्रूची येथें) फौज राहून चहूंकडून उपद्रव करितात तो राहील, या अर्थे किल्ला घ्यावा हा मनसबा आहे. आज काय तो निश्चय होईल. मागाहून लिहून पाठवूं. माकळी बाळापुराजवळ आहे ती घेऊन राजश्री जानोजी धुळप यांचे स्वाधीन केली.

---

१. वामनराव गोविंद याचें मोरो बल्लाळ यांस पत्र. २. गोपाळराव मरण पावले ३. मानहानि न होतां; आपलें महत्व कायम राखून.

गुर्दीमि[illegible]ल्यास यावें ह्मणून आह्मांस पत्रें परभारीं राजश्री मामांचीं आलीं होतीं जे राजकारणही आहे त्याजवरून आह्मीं गुर्दीमिल्यानजीक आलों तों पत्रें आलीं कीं राजकारणाचा प्रकार नाहीं. प्रस्तुत कि.[1]

नं० १०८७ **श्रीगणराज.** ( माघ वद्य अष्टमी. ७ फेब्रुवारी. )

अपत्यें साष्टांग नमस्कार विनंती येथील कुशल तागायत छ २१ सवाल गुरुवार. मुक्काम नजीक देवरायदुर्ग. दोन कोस. जाणून वर्तमान यथास्थित असे. विशेष. राजश्री मुराराव घोरपडे सेनापती काल बुधवारीं प्रहर दिवसास ( आमच्या ) डेऱ्यास आले होते. भेटी झाल्या. कित्येक प्रकारें ममतापुरस्कर बोलणें झालें. तीर्थस्वरूप रायांकरितां फार श्रमी झाले. ते तो आपल्या वक्रांत गेले. ईश्वरें अनुचित केलें. होणार भावी त्यास उपाय नाहीं. ह्मणून बहुत बहुत श्रमी झाले. सवेंच माघारे गोटास गेले. त्यांच्या शरीरीं वायूचा उपद्रव फार झाला. दोन्ही गुडघे धरले. आपल्या पराक्रमानें उठवत नाहीं. बसवत नाहीं. दुसऱ्यानें धरल्याखेरीज परिणाम नाहीं. धीर धरून आमच्या डेऱ्यास [illegible]. " पूर्वीं ज्याप्रमाणें विल्हेस तुह्मीं आह्मीं उतरत होतों त्याप्रमाणें [illegible]त जावें तुह्मीं आह्मांस आह्मीं तुह्मांस आणभाक दिली या प्रकारेंच चालवावें. " ( असें बोलले. ) आज येथून कूच करून राजश्री मामांच्या गोटा लगत मुक्कामास गेलों. येथून जाण्या येण्यास लांब पडतें, ( सबब ) तेथेंच गेलों. सेवेशीं विदित होय हे विज्ञापना.

[illegible] १०८८ **श्रीगणराज.** ( ७ फेब्रुवारी.)

श्रियासह चिरंजीव राजश्री तात्या[3] यां प्रती वामनराव गोविंद

---

१. पत्र इतकेंच अपूर्ण सांपडलें. २. वामनराव गोविंद याचें गोविंद हरी स पत्र. ३. पांडुरंगराव गोविंद.

आशीर्वाद उपरी. येथील कुशल तागायत माघ कृष्ण अष्टमी मुक्काम नजीक दोन कोस देवरायदुर्ग. जाणून वर्तमान यथास्थि विशेष. राजश्री त्रिंबकराव मामांचीं पत्रें वरचेवर येत गेलीं जे स यावें, त्यावरून दरमजलीनें येथील मुक्कामास छ १७ सवालीं अडीच प्रहरा आलों. तों चार सहा घटकेच्या अवकाशें राजश्री मामा व दौलतराव यांचे पुत्र व आनंदराव गोपाळ व आनंदराव तोफखाना व बाजीपंत फडणीस व इत्यादिक इष्टमित्र सारे भेटीस आले. भेटी झाल्या. तीर्थस्वरूप रायांकरितां फार श्रमी झाले. आह्मां ब्राह्मणांमध्यें व सरदारांमध्यें मुगुटमणि होता. त्यांणीं तो आपला पाहरा गाजवून वक्रांतच गेले. ह्मणून बहुत श्रमी झाले. एक प्रहर येथेंच होते. संध्याकाळच्या सहा घटकांस निघोन आपल्या लष्करांत गेले. उपरांत राजश्री आनंदराव रास्ते दोन घटका रात्रीस आले होते. तेही बहुतच श्रमी झाले. 'श्रीमंतांची बाजू खचली. आमचा आधार सर्वस्वें तुटला.' ह्मणून फारच श्रमी झाले. चार घटका रात्रीस तेही निघून गोटास गेले. आज देवरायदुर्ग किल्ला पहावयास राजश्री त्रिंबकरावमामा गेले. आह्मींही गेलों होतों. लागभाग किल्ल्याचा पाहून आलों. राजश्री मामांच्या चित्तीं किल्ला घ्यावा ह्मणजे झाडीचें तोंड बंद होईल. फौज राहून चहूंकडे उपद्रव करितात याजमुळें ठाणें घालावें, असें मानस आहे. राजश्री मुराररात्र सेनापती काल बुधवारीं येथील मुक्कामास आले. भेटी झाल्या. प्रत्येक प्रकारचें बोलणें चालणें मायाममतेचें झालें. सवेंच दोन घटकेच्या अवकाशें आपल्या गोटास गेले. तुह्मीं नेहमीं वडिलांजवळ बसत जाणें. तेणेंकरून उत्तम आहे. जेणेंकरून वडिलांस संतोष तें करीत जावें. वरकड इकडील वर्तमान वडिलांचे पत्रावरून कळों येईल. बहुत काय लिहिणें हे विनंती.

---

१. गोविंद हरीजवळ.

नं १०८९ श्री. ( १० फेब्रुवारी. )

अपत्यें अनंतानें दोन्ही कर जोडून शिर साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील कुशल वर्तमान तागायत माघ वद्य एकादशी रविवारपर्यंत वर्तमान यथास्थित असे. विशेष. वडिलीं वरचेवर पत्रें पाठविलीं तीं पावलीं. लिहिलें वर्तमान सविस्तर कळलें. असेंच निरंतर आशीर्वाद पत्र पाठवून सांभाळ करावा. इकडील वर्तमान लिहावें तरी आज एक महिना तीर्थस्वरूपें कैलासवासी कनकगिरीस आले. तेथील पत्रें आलियापासून ' रांत कोणी अन्न सुरक्षितपणें खाल्लें नाहीं. पौष वद्य चतुर्दशीस कनकगिरीच्या मुक्कामचीं पत्रें दोनप्रहरा आलीं. दुसरीं पत्रें गजेंद्रगडच्या मुक्कामचीं तिसरे प्रहरीं आलीं. तिसरीं पत्रें यादवाडच्या मुक्कामचीं संध्याकाळच्या चार घटका दिवसास आलीं. चौथीं पत्रें कुडचीच्या मुक्कामचीं संध्याकाळीं आलीं. ऐशीं चार पत्रें दोन प्रहरांत आलीं. तोपर्यंत इतकी अवस्था भारी असें कोणास कळलें नाहीं. दुसरे दिवशीं घरास यावें तरी अमावास्या, मंगळवार, मासांत, याकरितां कसबे हैसाळावरी मुक्काम केला. आणि सांगोन पाठविलें कीं तुळेचें साहित्य श्रीसंगमास[३] करावें. त्यावरून संगमीं तुळेचें साहित्य केलें. आणि प्रतिपदेस मिरजेस यावयाचा मुहूर्त दहा घटका दिवसास पाहून ठेविला. त्या नंतर दोन घटका रात्र राहिली तेव्हां तात्या सामोरे जावयासीं निघोन गेले. वड्डीच्या वोढ्यावरी गेले तों सूर्योदयापूर्वी वड्डीवर आले. त्यांस आपला मृत्यु समीप आलासा मनांत समजून निकड करून आले. दहा घटकांचा मुहूर्त टाकून चार घटकांत मिरजेंत आले. उभयतां वडिलांची भेट घेतली, तेव्हां दुखणें भारीसें कळलें! इतकें दुखणें भारी, परंतु ( त्यांनीं आपण होऊन ) कोणास दर्शविलें नाहीं.

---

१. पत्र वामनरावास लिहिलेलें आहे. लिहिणारा अनंत हा एक कारकून व आप्त. २. गोपाळराव. ३. कृ ' व वारणा यांचा संगम हरिपूर येथें होतो तेथें.

आपला मृत्यु समीप आला परंतु हिम्मतीच्या गोष्टी सांगाव्या, कोणी भेटावयासीं आले तितक्यांशीं ओळखून भेटी घेतल्या. तदोत्तर संगमासीं तुळा करावयासीं जात नाहीं ह्मणून सांगितलें. येथेंच साहित्य करावें ह्मणून सांगितलें. त्यावरी येथेंच सर्व साहित्य करून तृतीया भृगुवारीं तुळा करावीसा करार झाला. वरकड दैवी औषधी उपाय करावयास लागलों तों संध्याकाळ झाला. तेव्हां सर्वप्रायश्चित्त घावयाचा आग्रह करूं लागले. कोणी नाहीं ह्मगत होते परंतु फारच आग्रह पाहून द्वितीयेस करावेंसें करून साहित्य केलें. सारी रात्र चांगले होते. दोन तास रात्र राहिली तेव्हां पथ्याचें घालून सूर्योदयास प्रायश्चित्तास प्रारंभ केला. 'लौकर करणें' ह्मणून आपणच फार निकड करून आपल्या मुखें मंत्र ह्मणून ब्राह्मणांस दक्षिणा आपल्या हातें दिली. गोदानें होऊन तीर्थ व गंगोदक पोटांत घेतांच प्राण व्याकूळ झाला. इतकें सारें आपल्या धीरें केलें परंतु आपला अंतकाल समीप आला असें कोणाजवळ बोलले नाहींत. वरकडही कोणती गोष्टी बोलले नाहींत. सहा घटका दिवस आला तों काल झाला. तेसमयीं ज्याप्रमाणें धरणीकंप होतो तो न्याय झाला! तें दुःख कोठवरी लिहावें! याप्रमाणें मरणाची अवस्था झाली. ते ज्ञानी पुरुष! आपण घाबरेपणीं सांगितलें तरी उभयतां वडिलांस[1] श्रम होतील याकरितां कांहीं बोलिले नाहींत. मरण त्यांस कळोन आपणांस बोलावूं निकडीनें पाठविलें. आपणही गेलों येणेंकरून उत्तम गोष्ट झाली. न जातां तरी ते कांहीं लष्कर टाकून येत नव्हते. आणि तेथें मृत्यु पावते! लोकांत जवन्य होतें कीं त्यांचे इतके (आप्त) असोन कोणीं आले नाहींत असें होतें. परंतु कांहीं वाईटांत बरें होतें त्या निमित्य चुकलें! येथें आपल्या घरीं आले त्यामुळें त्यांचें

---

१. वडील व मातोश्री यांस ह्मणजे गोविंद हरी व सत्यभामाबाई यांस.

उत्तरकार्य दानें वगैरे सांग झालें. दहा दिवसपर्यंत भास्करपंत आपानीं केलें. सपिंडी आपानीं केली. आबा कोंकणांत गेले होते ते नववे दिवशीं आले. कैलासवासी यागीं तो आपलें चांगलें करून गेले. कोणाचें वाईट ह्मणून घेतलें नाहीं. लोकांत असा दम ठेऊन गेले कीं, 'गोपाळराव आणखी वांचते तरी काय करिते!' अशीं इभ्रत ठेऊन गेले. परंतु जे मागें राहिले त्यांच्या दुःखास पारावार नाहीं. इतकें दुःख असून वडिलीं जो विवेक केला आहे तो ब्रह्मादिकीं होणार नाहीं. ज्याप्रमाणें वडिलीं विवेक केला त्याप्रमाणें आपण करावा. आपण जितका दम धरून उमेदीनें कैलासवासी राव यांचें नांव लौकिक झालें आहे तसेंच राखून सर्वांनीं असावें. येणेंकरून वडिलांचें दुःख परिहार होईल. जितके क्लेश आपण मनांत आणितील तितकें दुःख वडिलांस अधिक होईल. दुःख तो परिहार होणें ऐसे पुरुष नव्हते! परंतु मृत्युलोक आहे, यास कोणाचा उपाय नाहीं! आपलें शरीर अशक्त, जितका खेद मनांत येईल तितकी शक्ति हीन होईल. आपण तो क्षत्रियधर्म आचरीत आहेत. वारंवार दुःख मनांत आणिलें तरी आपले पदरीं लक्षावधि जीव आहे इतक्यांचा सांभाळ करावा लागतो. अशा करितां सर्व दुःखाचा त्याग करून वडिलांस धैर्याचीं पत्रें लिहावीं. वरकड राव कैलासवासी ज्या ज्या प्रमाणें संस्थानिक वगैरे भले लोक यांजवरी ज्या ज्या प्रमाणें कृपा करीत होते त्या त्या प्रमाणें करावी. तेणेंकरून आपल्या तेजाचा प्रादुर्भाव विशेष होईल. वडील कैलासवासी याणीं तो आपलें तेज आपलेपाशीं ठेऊन सर्व निरवानिरव करून कैलासवासी झाले. श्रीमंतांसही दुःख बहुत झालें. वर्तमान कळतांच चार दिवस दरबार व चौघडे बंद केले होते. याप्रमाणें थोरथोरांस या प्राण्याचीं दुःखें झालीं ते आह्मी घरच्यांनीं कशीं विस-

---

१. गोपाळरावाचा सर्वांत धाकटा चुलता. २. गोविंद हरी याणीं.

रावी? परंतु विवेक करावा. राजश्री नारो आपाजी यांस श्रीमंतांनीं समाधानार्थ पाठविले होते. येथें येऊन माघारे गेले. यानंतर वडिली पत्रीं आज्ञा केली होती कीं, विहीर वगैरे व चौकीदाराबरोबर रुपये व कित्येक मजकूर लिहिले होते त्यास या घोळामुळें सर्व राहिलें. आमची खोली बाहेरील मात्र मोडली. परंतु आतां सर्व राहिलें. याप्रमाणें वर्तमान आहे. बहुत काय लिहिणें लोभ कीजे हे विज्ञापना.

नं० १०९० श्रीशंकर. (फाल्गुन शु० तृतीया. १७ फेब्रुवारी.)

राजश्री वामनराव स्वामीचे सेवेशीं.

विनंती[2] उपरी. परवांचे दिवशीं छबीना पथकाचे रखवालीस पाठविला. येथें लिहिल्याप्रमाणें हमेषा आपले गोटाचे रखवालीस छबीने पाठवीत जावें असें सर्वांस लिहितों. त्याप्रमाणें सर्व छबीने आपले गोटाचे रखवालीचे हमेषा करीतच आहेत. थोर छबीन्याची पाळी ती चौ दिवसां येते. ती आल्यावर ते दिवशीं करावीच लागते. सर्व आहोंच. तितक्यानींच समजोन करणे तसें करावें लागतें असें असतां काल (आह्मीं) चिठ्ठी पाठविली होती त्याचें उत्तर झालें कीं 'आह्मी काल छबीना केला' त्यास हे दिवस मेहनत पडावयाचे. त्यामध्यें वरकडांपेक्षां आपणास तर अधिक मेहनत केली पाहिजे. कारण कीं वरकडांप्रमाणें आपण नाहीं. वरकडांचे जागां आह्मीं उपरोध करितों. तहीं उपरोध करून करितात. त्याप्रमाणें आपले जागां प्रकार आह्मीं उपरोधच करीत नसतां कालचें उत्तर ठीक न झालें. असो. आज बातमी आली आहे कीं, तिसरे प्रहरीं भैरवदुर्गाजवळ गागडीहून कूच

१. तुळसी बागवाले २. चिठी त्रिंबकराव मामाची.

करून सरंजामसमेत खासा (हैदर) आला. येथून सहा सात कोस होईल. तेव्हां आज छबीने हजार पांचशें स्वारपावेतों लोक पाठवावे. आपल्याच गोटासमोर दोन टोळ्या पाठवाव्या. पुढें कोस दोन कोस रान सोडवावें. याप्रमाणें जरूर करावें. उदईक दहावा दिवस येथें मुक्काम झाल्यास, याकरितां उद्यां कूच करून दोन तीन कोस मैदानांत जाऊन मुक्काम करणार. त्यास आज सावध रहावें हें उचित. छबिन्याची जागा सोईची आज दोनप्रहरां हुजरे पाठवून पाहून ठेवावी. ते जागा छबिना पाठवावा. कोणी मातबर छबिन्याच-रावर द्यावा. आज जरूर सावधता करावी. वर्तमान आल्याप्रमाणें सुचविलें असे. हे चार दिवस त्याचे समीपता तों मेहनत दिवस रात्र पडेल तशी सर्वांस केलीच. पाहिजे. रवाना छ १ माहे जिल्काद हे विनंती.

नं० १०९१ **श्रीगणराज.** (२३ फेब्रुवारी.)

चिरंजीव राजश्री वामनरावबाबा यांसी प्रती मोरो बल्लाळ आशीर्वाद उपरी येथील कुशल तागायत फाल्गुन शुद्ध नवमी मंदवार जाणून स्वकीय कुशल लिहीत जावें. विशेष. तुम्हीं माघ कृष्ण सप्तमी बुधवारचीं पत्रें नर्शाक देवरायदुर्ग येथील मुक्कामाहून पाठविलीं तीं छ ४ जिल्कादीं पावोन लिहिला मजकूर सविस्तर कळला. " राजश्री त्रिंबकरावमामा व राजश्री मुराररराव घोरपडे व आनंदराव गोपाळ व मंडळीसुद्धां भेटीस आले होते. भेटी झाल्या. कित्येक माया ममतेचें बोलणें झालें. तीर्थस्वरूप रायांकरितां बहुत कष्टी झालें. आम्हांसही चार गोष्टी विवेकाच्या सांगून फिरोन आपल्या डेऱ्यास गेले. देवरायदुर्गास मोर्चे देऊन किल्ला घ्यावा आणि ठाणें ठेवावें असें मामांचें मानस आहे. माकळीचा किल्ला मामानीं घेऊन घुळपांचे हवालीं केला." म्हणून लिहिलें तें कळलें. तीर्थस्वरूपरायांविशी राजश्री मामा व सेनापती श्रमी झाले,

ऐशास त्यांचा लौकिक तमाच होता ह्मणोन कष्टी झाले. त्यांच्या पग क्रमास जोडा नव्हता, परंतु ईश्वर सत्तेस उपायच नाहीं! वारंवार खे केल्यानें होणें काय! गेली गोष्ट येत नाहीं. तुह्मीं अतःपर घाबरे : होतां अवसान धरून तीर्थस्वरूप राजश्री नीलकंठराव व तुह्मीं व चिरं जीव राजश्री भाऊ एकविचारें राहून मामांच्या मर्जीनुरूप वांकडें दिसे न देतां हरएक गोष्टीनें बहुत सावधपणें रहात जावें. कामाकाजांत उतावळी न करावी. तुमचे शरीरही अशक्त आहे. चिरंजीव भाऊची उतावळी फार! सबुरीनें विचार पाहून कर्तव्य तें करीत जावें. अहो- रात्र काळजी तुमचीच आहे. मामांचा मजकूर सर्व तुह्मांस समजलाच आहे. तिन्ही पथकांत फोडून चाकरी सांगितलिया न करावी. ती पद्धत पहिल्यापासून नाहीं. ज्याप्रमाणें वडिलांची पद्धत आहे त्याप्रमाणें वक्रानें रहावें. येविशीं तुह्मांस लिहावेसें नाहीं, परंतु सूचना लिहिली आहे. श्रीमंतांची मर्जी एक प्रकारची. त्यांत प्रसंग मागाशीं पडला आहे. त्यांचा कारभार एक प्रकारचा आहे. आजवर वांकडें दिसों दिलें नाहीं. आतां दिवसही थोडकेंच राहिले. भलत्या एक गोष्टीनें पेंचांत आणतील यास्तव वारंवार लिहावें लागतें. ज्या गोष्टीनें वक्र राहून व्यंग न दिसे ते गोष्टी कराव्या. श्रीमंतांची शरीरप्रकृत प्रस्तुत बरीच आहे. आह्मीं जें लिहिणें तें वरचेवर मोरोबा दादांस वरचेवर लिहीत असतो. आह्मांस श्रीमंतांचें बलावणें आलिया जाऊं. हिंदुस्थानाकडील कांहीं नवल विशेष वर्तमान अलीकडे आलें नाहीं. वसईप्रांतीं शामलानें[1] धामधूम मांडली आहे याजकरितां थोडीबहुत फौज व तोफखाना व गारदी कांहीं असे देऊन राजश्री गोविंद शिवराम यांस वसईस श्रीमंतांनीं रवाना केले. वरकड अधि- कोत्तर लिहावयाजोगें नाहीं. पेशजी सांडणीस्वाराबराबर व जासूद

१. जंजिऱ्याचा हबशी याने.

जोडी त्याजवर रवाना केली आहे. त्यांजबराबर सविस्तर वर्तमान लिहून पत्रें पाठविलीं आहेत तीं पावलींच असतील. त्याजवरून सर्व भाव कळले असतील. कित्तूरबाबत ऐवज आणावयास सोंडुराम राऊत पाठविले आहेत ह्मणून लिहिलें, ऐशास आजला ऐवजही येऊन पावला असेल. राजश्री बापूजी नारायण यांजकडे अदवानीबाबत हवाल्याचा ऐवज यावा, त्यास येथून वसुलातीस राजश्री अंताजीपंत देवधर यांस रवाना केले. शिनापा नाईकांस चाळीस हजारांचा हवाला पेशजी दिलाच आहे त्याप्रमाणें ऐवज पावला असलिया उत्तम. नसलिया बापूजीपंतास ताकीद करून ऐवज नाईकास प्रविष्ट करणें ह्मणून मशारनिल्हेस सांगून ठेविलें आहे. वरकड हसेबंदीप्रमाणें वसूल घेऊन इकडे पाठवीत जाणें ह्मणून सांगितलें आहे, त्याप्रमाणें करितील. प्रस्तुत हैदरखान कोठें आहे आणि याणीं पुढील कर्तव्याचा विचार काय योजिला आहे हें लिहावें व "सालमजकुरीं नवीन फौज श्रीमंतांनीं राजश्री कृष्णराव बळवंत यांजसमागमें पाठविली आहे ती व गुदस्तांची मिळोन आणखी सालमजकुरीं छावणी करून मातबर काम करावें अशी श्रीमंतांची मर्जी आहे ह्मणून राजश्री मामा[1] बोलत आहेत. त्यास हें बोलणें श्रीमंतांपासून आहे किंवा मधलेंच आहे. तुह्मांस सर्व भाव समजला असेल. छावणीस रहावयाचा प्रकार झाला तर आमची फौज देशास आल्याविना ठीक पडणार नाहीं हें आपणांस समजतच आहे. श्रीमंतांनीं तुह्मांस बोलावूं पाठविलें तर जावेंच लागतें तेव्हां हा मजकूर श्रीमंतांशीं बोलून पक्का विचार करावा." ह्मणून लिहिलें तें कळलें. ऐशियास छावणीस रहावयाचा प्रकार राजश्री मामाच बोलतात असें नाहीं. आह्मीं श्रीमंतांचे भेटीस गेलों होतों तेव्हांच छावणीचा प्रकार श्रीमंत बोलत होते. तेव्हांच रावें छावणीस राहणार नाहींत असें

---

१. गोपाळराव.

श्रीमंताजवळ स्पष्ट बोललों होतों. त्याजउपर राव गेल्यानंतर फौज घरास आल्यावांचून ठीक पडणार नाहीं असें लिहून राजश्री बापूदादांस पत्रें पाठविलीं त्याचें उत्तरही मळमळीत आलें आहे. आ त्यांस वरचेवर पत्रें लिहून पाठवीतच आहों. आह्मांसही सु प्रकार पुढें छावणी कदाचित झाली तर कसें करावें याचा विचार करून लिहावा ह्मणून पेशजी तुह्मांस पत्रें पाठविलीं आहेत तीं प असतील. त्याचें उत्तर तुह्मीं तेथील रंगानुरूप लिहून पत्रें रवाना असलीं तर येऊन पावल्यानंतर कळेल. आह्मीं आणखी मो दादास लिहून पाठवितों. त्यांचा जाबसाल काय येतो तोही क आणि श्रीमंतांनीं आह्मांसच येणें ह्मणून पत्र पाठविलें तर आह्मीं ज आहों. श्रीमंतासही विनंती करूं कीं, 'राव गेले. असा प्र घडला. तेव्हां घरास फौज आल्याविना अवसान बसणार नाहीं असेंच बोलणार. याप्रमाणें बोलल्यावांचून निर्वाह नाहीं. हरिसत्ता प्रमाण. इकडील वर्तमान तर आह्मीं वरचेवर लिहीतच अ तुह्मीं कोणे विशींची काळजी न करितां शरीरप्रकृत ठीक राखून क भागाचे ठायीं बहुतच सावध रहावें. अनाळसें[1] इकडे पत्रेंही पाठ जावीं. तुह्मांपैकीं थोडी बहुत बाकी आहे त्याच्या वराता व पड घोड्यांचे मिळोन वीस हजार रुपयेपावेतों वराता होतील ह्म लिहिलें तें कळलें. त्यास सालमजकुरीं तो पाऊस नाहीं, नापि झालें, याजमुळें पैसा वसूल होत नाहीं. खर्च तर रहात नाहीं. मोठा पेंचच आला आहे. उपाय नाहीं! लोकांस तर दिल्यावां चालत नाहीं. असो. तुह्मीं पडल्या घोड्यांचे व तकूबपैकीं मिळून व हजार रुपये पावेतों वराता कराल त्याप्रमाणें ज्यांचा त्यांस ऐवज प्र करूं. नालबंदीचा मोठा पेंचच आहे. मागील कर्जें थोडथोडें वा

---

१. आळस न करितां.

येत होतों, त्यास छावणीमुळें नवें कर्ज झालें! दुसरें पाऊस गेला, नापीक झालें, सबब पैका मुलखांत वसूल होत नाहीं. नवें कर्जही मिळावयाचें नाहीं. असा पेंच मोठाच येऊन प्राप्त झाला आहे. यांत हरिसत्ता प्रमाण! राजश्री गोविंद शिवराम मुंबईस गेले होते ते माघारे पुण्यास आले. वसईकडे मात्र दीड हजार गाडदी आणि बाळाजीपंत दामले असे गेले आहेत. कळावें बहुत काय लिहिणें हे विनंती.

नं० १०९२ श्री. ( २४ फेब्रुवारी. )

चिरंजीव राजश्री बाळासाहेब यांसी प्रती वासुदेव धोंडदेव. आशीर्वाद विनंती येथील कुशल तागायत फाल्गुन शुद्ध दशमी पावेतों यथास्थित असो. विशेष. आपण छ १३ सवालचें पत्र पाठविलें तें पावलें. लिहिलें वर्तमान कळलें. रावसाहेबांसारखे पुण्यश्लोक कोणी नाहीं. परंतु आमची अदृष्टें खोटीं! याजमुळें रावसाहेब आह्मांस नाहींसे झाले. डेरा थोरला मुदपाकचा व संध्येची राहुटी, सारावेळ मरकऱ्या, हें नजरेंत येतें; त्यासमयीं संकटें प्राप्त होतात तीं कोठवर लिहावीं! क्षणक्षणा 'गणराजा'चे कागद दृष्टीस पडतात, परम दुःख होतें! वडिलांसही मोठें दुःख झालें. वहिनीस आकाशाची कुऱ्हाड पडली. रावसाहेबांचे चित्तांतील उमेद काय होती आणि दैवानें कसें केलें! सारें क्षणभंगुर केलें! आमच्या उमेदी मोठ्या होत्या आणि त्याजप्रमाणें कृपा करीत होते तें सर्व आपणांस दखलच आहे. कोणवेळेस काय देतील हें कळतच नव्हतें. बरें असो! आतां रावांच्या मागें त्यांचेच पुण्य विशेष चालेल. आपण व तात्या व बाबासाहेब उमेदीचे असतां चिंता काय आहे! बाबांचे शरीरप्रकृत पहिलेप्रमाणें आहे. दुसऱ्यानें कांहीं तिळमात्र खात नाहींत. खाले तर दुप्पट जाचतें. असें असतां दुखण्यानें शरीर

---

१. गंगाधरराव गोविंद. २. गोविंद हरी ऱ्या. ३. गोपाळरावाची बायको सरस्वतीबाई हांस. ४. तात्या व बाबा=पांडुरंगराव गोविंद व वामनराव गोविंद.

अशक्त असें दाखवीत नाहींत. फौजेंत चालतात. सर्वांशीं रायांप्रमा बोलोन सांभाळून नेतात. मेहनत भारी चाकरीचुकरीविशीं अंगें करितात. दम चांगला आहे. प्रसंगीं आपण असतां तर उपयोगी पडते बरें असो. यंदां ईश्वरइच्छेनें छावणी न झाली तर भेटी होईल आणि सर्वांस भेटलेनंतर कांहीं दुःख विसर पडला तर न कळे हें दुःख जिवांतजीव आमच्या आहे तों विसरावयाचें नाहीं! पर लौकिकार्थ मात्र राहील. असो. बाळासाहेब, रावसाहेबामुळें आम्हां तेज फार होतें तसें आपण चालवितील. ते गोष्ट विशेष होती रावसाहेब असतां छावणी झाली तरी घरचें स्मरण होत नव्हतें. आत नित्य असें वाटतें कीं मिरजेस जावें असें वाटतें. ती रोषणाई तो संतोष आतां कांहींच नाहीं असें सर्वांच्या चित्तीं वाटतें. आम आहेत ते ( आम्हांस इकडे ) छावणीस ठेवणार नाहींत, परंतु छावणी झाली तर फौज राहतां कठीण दिसतें. लोक फार अजुर्दे आहेत रावसाहेबामुळें साऱ्यांच्या शक्ति गेल्या आहेत. आपली भेटी होईल तो सुदिन! येथील मनसबा पाहतां मामांची मनदेवता मात्र लवते कोणतेंही होत नाहीं. फौजा चाळीस हजार जमा झाल्या आहेत तोफा वीस पावेतों आहेत. नित्य कहीचीं तट्टें शेंपन्नास जात आहेत सर्व श्रीमंतांचें पुण्य समर्थ आहे. आपण सदैव पत्रीं सांभाळीत असावें सविस्तर वडिलांचे पत्रावरून कळेल. बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद

नं० १०९३ ( फाल्गुन शुद्ध दशमी
२४ फेब्रुवारी.

वामनरावांचें पांडुरंगरावास पत्र ८ जिल्कादचें.—

"राजश्री मामांनीं बिदनुराकडे जावयाचा मनसबा केला आहे. कडू

१. गोपाळराव मेल्यामुळें.

बाणावरावरून शिवमोग्याचे रोखें जाणार. बिदनूरच्या झाडींत गेल्यावर झाडीच्या आसऱ्यानें हैदरखान गडबड करील तर न कळे. "

नं० १०९४ ( २७ फेब्रुवारी. )

पांडुरंगरावाचें गंगाधररावास फाल्गुन शुद्ध १३ भौमवारचें.

" श्रीमंत राजश्री दादासाहेब यांजकडे मुत्सद्दी सिद्धटेकावरून गेले होते. तेथून बोलून चालून आले. उभयतां श्रीमंतांचें समक्ष बोलणें व्हावें तें झालें ह्मणजे दादासाहेब गूढस्थलींहून[1] निघणार. सात लक्षांची जहागीर व त्रिंबक ( किल्ला ) द्यावा ऐसा मनसबा आहे. येथील गृहस्थ नेले त्यांची मुक्तता[2] उत्तम प्रकारें झाली. तीर्थरूप भाऊंच्या शरीरीं वाताचा उपद्रव झाला होता त्यास उतार पडल्याचें लिहिलें तेणेंकरून समाधान झालें. भाऊंचे शरीरीं तुमचे लिहिण्यावरून पहातां कांहीं बाकी राहिली नव्हती. ईश्वरें कृपा केली. "

नं० १०९५ ( २८ फेब्रुवारी. )

पांडुरंगरावाचें वामनरावास पत्र फाल्गुन शुद्ध १४ बुधवारचें.

" राजश्री मामा घांटावर आले. बेंगळूरचा प्रकार व तुमच्या मामाच्या भेटी झाल्या वगैरे वर्तमान विस्तारें सर्व कळलें. श्रीमंत थेऊरावरीच आहेत. भोंसल्यास निरोप झाला. ते माघारे गेले. श्रीमंत राजश्री दादासाहेब थेऊराच्या मुक्कामीं पुण्याहून आले होते. उभयतां श्रीमंतांच्या भेटी होऊन माघारे पुण्यास गेले. ( दादासाहेब ) आनंदवल्लीस जाणार आहेत. "

---

१. पेशव्यांचे तुळते. २. कैदेतून.

नं० १०९६ श्री. (फाल्गुन वद्य द्वितीया.
३ मार्च.)

राजश्री वामनराव स्वामीचे सेवेशीं.

विनंती[1] उपरी. आपण काल छबिन्यास गेलां होतां त्याप्रमाणें आज फौजसुद्धां अस्तमान झाला नाहीं तोंच जाऊन श्रीरंगपट्टणाच्या ठाण्याचा बंदोबस्त करवावा. आह्मीं भोजन करून तोफा लागू करावयास जागा पहावयाकरितां गेलों. वरकड फौज व निशाण येथेंच ठेविलें असे. सर्व फौज कालपासून असुदी नाहीं तथापि प्राप्त झाला विचार जरूर सर्वांनीं केलाच पाहिजे. त्यास नरसिंगराव धायगुडे व गाईकवाड यांसही आपणांकडे जावयास सांगितलें आहे तेही कालचेसारखे येतील. रवाना छ १९ जिल्काद. हे विनंती.

नं० १०९७ श्री. (फाल्गुन वद्य द्वितीया.
३ मार्च.)

विनंती[2] उपरी. राजश्री सखाराम हरी बातमीस मेलकोटेकडे गेले होते. (त्यांनीं) थेट हैदरखानाच्या लष्करापर्यंत जाऊन कही लुटिली. उंटें व तट्टें व पांच सात हजार बकरीं वळवून गोटाच्या आसपास कोसाच्या अंतरें भाल्यांस पासोड्या बांधोन मातबर फौज आली अशी दिखाई देऊन आनंदराव तोफखाने व भवानजी जाधव यास वाट तीट पहावयास पाठविलें. चेन्नगिरीस अघाडीस, पश्चिमेस मेलकोटा, येणें-प्रमाणें (हैदर) उतरला आहे. तोंडाशीं झाडी मात्र थोडी थोडी आहे. डावे उजवे बाजूस मैदान मातबर आहे. सखाराम हरी यांज-बराबर फौज मातबर असती तर काम पोक्तें झालें असतें. बातमीस

---

१. चिठी लिंबकराव मामाची. २. ही चिठी वामनरावास कोणी लिहिली आहे कळत नाहीं.

तीनशें राऊतासहीत गेल्यासारखें त्यांनीं काम अखत्यांत करून माघारे नागमंगलास येऊन गांव मारून तलफ करून मनस्वी लुटिलें. हैदरखानाच्या गोटांत नगारे होऊन गडबड झाली. एक दोनी तोफाचे बार झाले. तेथें राहिल्यास निभाव नाहींसा पाहून माघारे चार पांच कोस बेळुरास आले. तंव इकडून गायकवाडाची फौज हजार दीड हजार सामील झाली. तेथें थांबून राजश्री मामास पत्र पाठविलें जे भारी फौज पुढें पाठवून आपणही यावें. असें लिहिलें आहे. आपणास परस्परें मामा लिहितील. आपणही फौजेस ताकीद करून तयारींत असून मामा लिहितील त्याप्रमाणें करितील. सूचना कळावी ह्मणून जलदीनें चिठी लिहिली असे. येथें मुरुव्यांखेरीज सर्वत्र सिद्ध झाले आहेत. चार सहा घटिकेंत निघतील. विदित होय हे विनंती. राजश्री मामाही अरुणोदयाचे सुमारें निघणार. सध्यां पांच हजार फौज निवडक पुढें पाठवितात. लौकर जाईल. हे विनंती.

नं० १०९८ श्रीगणराज. ( फाल्गुन वद्य षष्ठी. ६ मार्च. )

राजश्री वासुदेव काका व शिवाजीपंत स्वामी गोसावी यांसीं.

विनंती[1] उपरी. आह्मांस काल राजश्री त्रिंबकराव मामानीं हैदरनाईकाचे पश्चिमेस छावणीस पाठविलें त्यास पट्टणचे रस्त्यावर चंद्रोदय पावेतों होतोंच. चंद्रोदय झाल्यावर निघून मागांनीं जागा उभे रहावयास सांगितली होती त्या सुमारें आलों. परंतु ती जागा रात्रीची समजली नाहीं. तसेंच चंद्रोदयीं पट्टणचे रस्त्यास आलों. हैदरनाईकाची कही भरून आणावयासी गेली होती ती माघारी गोटास येतांना कहीची

१. चिठी वामनरावाची वासुदेव धोंडदेव पटवर्धन शालिकर व शिवाजीपंत झोसकर यांस.

पिछाडीची गांठ पडली. पन्नास तट्टू सांपडलें. बैलही सांपडले. उंटें पांच सहा सांपडलीं. तीं घेऊनच चंद्रायपट्टणची बारी उतरून सिद-गट्टें नजीक बसवंतगड येथें मुक्काम केला. दोन अडीच प्रहर दिव-सास राजश्री आनंदराव गोपाळ येऊन पोंहचले. रात्रौ फार हैराण लोक झाले ह्मणून येथें आज मुक्काम केला आहे. पट्टणाचा रस्ता तोफा जाण्याजोगा रस्ता नीट केला आहे. पट्टणास जावयाची आवाई फार दाट आहे. त्याचे लष्करचे दोन चार जण सांपडले त्यांनीं सांगि-तलें. आनंदराव गोपाळ आह्मांकडे येतांना त्यांस वाटेस दोन बेदडे सांपडले. त्याणीं सांगितलें कीं खासा हैदरनाईक पायउतारा होऊन तोफा व बाणदार व गाडदी वगैरे दहा वीस हजार जमात घेऊन गोटाबाहेर निघाला. उपरांत काय समजला तो मागती गोटांत गेला असें वर्तमान सांगितलें. त्यास तुह्मीं बहुत खबरदारीनें रातबिरातचें राहणें. आह्मीं प्रातःकाळीं तयार होऊन त्याचे लष्कराजवळ जाऊन उभे राहतों. आणि संध्याकाळीं रहावयास पट्टणचे रस्त्यावर येतों. कहीचीं त्यांचीं माणसें सांपडलीं तीं सात जण पाठविले आहेत. दोन चार दिवस ठेऊन घेऊन मग सोडावीं. तुह्मीं जानू बाबा याजबराबर पत्रें पाठविलेलीं पावलीं.

नं० १०९९ श्रीशंकर. (फाल्गुन वद्य षष्ठी. ६ मार्च.)

राजश्री वामनराव गोविंद स्वामीचे सेवेशीं.

विनंती[१] उपरी. आजचा विचार फार डोंगरांत हिंडून पाहतां फार चांगला योजोन आला आहे तो प्रकार सर्वही राजश्री शिवाजी बाबाजी याणीं आपले नजरेनें पाहिला. मशारनिल्हे सांगतां कळों येईल. आमचे सर्वांचे विचारें मी दुसरी जागा पाहिली आहे

१. चिठी लिंबकरावमामाची.

त्या जागा रातींतूनच तोफा नेऊन सूर्योदयींच मारगिरी करावी. त्या जागाचे कारागिरीनें फार करून (त्याचें) लष्कर खराब होईल. श्रीमंतांचा पुण्यप्रताप आमचे सर्वांचे मस्तकीं! आज रात्रौ सारेच फौजेनें जावें. हजार दीड हजार स्वार मात्र पट्टणचे वाटेवर ठेवावे. खिंडीची वाट आहे. त्या वाटेनें पळूं लागला तर तुह्मांकडे बातमी पोंचवावी. व आह्मांकडेही पोचवावी. नाहीं गेला तर इकडील मारगिरी दहा तोफांची होईल तेव्हां फार करून खराबी होईलच. ऐसेंच वाटतें. ईश्वरीसत्ता प्रमाण! करितां होईल तसें करावें यास्तव निश्चयेंकरून लिहिलें आहे. लिहिलेप्रमाणेंच जरूर करावें. आज रात्रौच चंद्रोदयीं उद्या दिवसाचे छबिन्याचेही लोक कुल तुह्मांजवळ जावें याप्रमाणें करावें. निश्चयेंकरून लिहिलें आहे. रवाना छ १८ जिल्काद हे विनंती.

नं० ११०० **श्री.** (फाल्गुन वद्य अष्टमी.
८ मार्च.)

अपत्यें वामनानें विनंती येथील वर्तमान तागायत छ २० जिल्काद मुक्काम नजीक मेलकोटें चार कोस मोतीतलाव. वर्तमान तर छ १९ जिल्कादीं हैदरखान मेलकोट्याहून कूच अवसीच्या चार घटका रातीस करून पट्टणचा रस्ता धरून चालला. आह्मीं चंद्रायपट्टणचा रस्ता जावयाचा ह्मणून मातबर फौजेनिशीं आह्मीं व राजश्री आनंदराव गोपाळ व नरसिंगराव घायगुडे व गायकवाडांचें पथक इतक्यानिशीं होतों. पट्टणाच्या रस्त्यास चौकीस राजश्री माणको बल्लाळ दोनशें राउतानिशीं ठेविला होता. आह्मीं राहिलों होतों तेथून पट्टणचा रस्ता चार कोस होता. पट्टणाच्या वाटेस व राजश्री मामासाहेब फौजेनिशीं

---

१. पत्र गोविंद हरीस लिहिलें आहे. नमस्कार न लिहिण्याचें कारण चुलतबंधु नीलकंठराव लढाईंत ठार झाला त्याचें सुतक हें होय.

राहिले होते त्यास तीन कोसांची तफावत होती. पट्टणच्या वाटेच्या बारींतून शत्रु बाहेर आला तों राजश्री माणकोपंत यांस चाऊल कळतांच राजश्री विठ्ठल शिवदेव यांस राजश्री मामांकडे जलद पाठविलें कीं हैदरखान जातो. तेव्हां फौजा तिकडून तयार होऊन वरचेवरी आल्या. राजश्री मामा व तोफखाना मागाहून निघाला. आह्मांस वर्तमान कळावें तर चार कोस राऊत येऊन पोंचले नाहींत. तोफांचे आवाज बारीच्या बाहेर आल्यावर. आमच्या राऊतांची चाऊल पाहून (त्यानें) तोफा सोडिल्या. आवाज आह्मीं ऐकतांच जलद निघोन सूर्योदयास या तळ्याजवळ येऊन पोंहचलों. आमचे फौजेची हिरीरी झाली. आगीचें बळ भारी, तोफांचे मार व गाड्यांचे बुरूजबंदीचा मार अतिशय, घोडीं माणसें जायां फारी झालीं. आगीचा मार सोसवेना तेव्हां जरा सरोन उभे राहिलों. इतक्यांत हुजरांतही आली त्याणीं तोंड लाविलें. परंतु आगीपुढें हत्यार लागलें नाहीं. तेव्हां तेही माघारे सरोन राहिले. तोफा यावयास सहा घटका दिवस आला तोंपावेतों फौजांनीं जागा जागा अडविला. तोफा येत तों तीन कोस आला. पुढें पट्टण दोन कोस राहिलें. पट्टण जवळ करावें हा मनसबा (त्याचा) होता. इतक्यांत तोफा सरकारच्या येऊन पोंहचल्या. तोफा लागू होतांच गच्चीमध्यें गोळे पडूं लागतां घाबरा झाला. आह्मीं अघाडीकडे तोंड लावून बेजरब घोडीं घातलीं. दुगदारीकडून हुजरातनें तोंड लागलें चहूंकडून येलगार झाला परंतु अघाडीचा मोहरा आह्मीं मुरडितांच डोंगराच्या आसऱ्यास गेला. तेव्हां तोफा सांडवून आराळ्यांत शिरतांच त्याचा मोड झाला. लुटून फस्त झाला. तोफा व हत्ती वगैरे सर्व सलतनत लुटली. राऊत आठ नऊ हजार होते ते लुटले. आमच्या तीन गोटांत मिळून दोन हजार पावेतों अजमासें घोडीं आलीं. उरेंही कोणा कोणास सांपडलींच. तीन पथकांचीं मिळोन घोडीं +

शा० १६९२ **मोतीतलावाची लढाई.** इ. स. १७७१

नं० ११०१ **श्री.** ( फाल्गुन वद्य दशमी. १० मार्च. )

चिरंजीव राजश्री तात्या यांसीं प्रती वासुदेव धोंडदेव. विनंती उपरी. येथील कुशल तागायत छ २२ जिल्काद पावेतों यथास्थित असे. विशेष. आपण पत्र पाठविलें तें पावलें. लिहिलें वर्तमान कळलें. पत्रीं कितीएक मजकूर दौलतीविशीं वगैरे लिहिला त्यास आपण असतां चिंता काय आहे! रावसाहेबांचें पुण्य व वडिलांचा आशीर्वाद विचित्र आहे. छ १९ जिल्कादीं मौजे मेलकोटेचे मुक्कामीं हैदरखानाची लढाई प्रातःकाल चार घटका रात्रीपासून होऊं लागली ते तिसरा प्रहर दिवसपावेतों होत होती. पांच सहा कोस लढाई होत आली. निदान हैदरखान पट्टणांत जातो, दीड कोस पट्टण राहिलें, असें जाणून फौजांची निकड झाली. त्याजमध्यें आपलीं तीन पथकें अघाडीस निशाणाजवळ उठलीं. तोफखान्याचा आराबा खाऊन आंत गेले आणि गाड्यांच्या बुरजांशीं हत्यार लागलें; असें सारे फौजानीं पाहून हुजुरातची निकड झाली. पिछाडीस हुजरात, अघाडीस आपली फौज, इतर पथकें बाजूनीं याप्रमाणें जागां जागां हल्ला झाली. तेच क्षणीं हैदरखानाचा मोड झाला. सडा पळून पट्टणांत गेला. कांहीं निदानचें माणूस होतें तें डोंगराचे आसऱ्यास जाऊन मारामार करूं लागलें. ते समयीं निकड झाली तेव्हां नीलकंठराव दादा गोळी लागून ठार पडले. मानसिंग नाईक निंबाळकर व निंबाजी सेकले व सखो चवडो, रायापा सावले, ( असे ) नीलकंठरायाकडील आठ नऊ असामी ठार झाले. येणेंप्रमाणें त्या जाग्यास झुंज झालें. भाऊ व वामनरावबाबा जवळच होते. शिपाई-गिरीची शर्तच केली. हरबाअण्णानें चांगली कराचली मारली. फौजेंतील मराठी माणूस होतें त्यांतून कोणी कराचली करणेविशीं

---

१. पांडुरंगराव.

चुकला नाहीं. पंचवीस हजार माणूस गाडदी व बारा हजार फौज पन्नास तोफा येणेंप्रमाणें एक घटकेंत सत्यानाश त्याचा झाला. श्रीमंतांचें पुण्य विचित्र याजमुळें सारे फौजेंत आपले फौजेचा लौकिक विचित्र झाला. मामासही फार संतोष झाला. परंतु एक नीलकंठरावानें घर बुडविलें! रावसाहेबामागें नीलकंठरावानें जास्ती लौकिक केला, परंतु सर्वांस सोडून गेला! वृद्धापकालीं आपास परम दुःख झालें तें कोठवर लिहावें! बाबांचें अवसान चांगलें आहे. सर्वांनीं मिळोन रावसाहेबामागें नांवलौकिक चांगला केला. कळावें ह्मणून लिहिलें आहे. सविस्तर वृत्त बाबांनीं लिहिलें आहे त्याजवरून कळेल. आह्मीं ( त्यांचे ) मर्जीशिवाय चालत नाहीं. कोंकणचें वर्तमान फार दिवस कळत नाहीं. मर्जीस आलिया समाचार घेऊन वर्तमान लिहावें. भेटी अंतीं सविस्तर कळेल. बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद.

नं० ११०२ श्री. ( १० मार्च. )

श्रियासह चिरंजीव राजश्री आबा यांसी प्रती गोविंद सखदेव आशीर्वाद उपरी येथील कुशल तागायत फाल्गुन बहुल दशमी रविवार मुक्काम मोतीतलाव नजीक पट्टण जाणून स्वकीय कुशल लेखन करावयासीं आज्ञा निरोपिली पाहिजे. अलीकडे आपणाकडून पत्र न आलें. काय निमित्य कीं न कळे! असें न करावें. सदैव आलिया समागमें पत्र पाठवीत असावें. यानंतर इकडील राजकीय वर्तमान तरी श्रीमंतानीं राजश्री त्रिंबकरावमामा यांस बिदनुरास जाऊन बिदनूर घ्यावें हा मनसबा लिहून पत्रें आलीं. त्यावरून बिदनूरचा रोंख धरून लष्कर चाललेवरी हैदरखान पट्टणांत होता त्यास बिदनुरास जातात, बिदनूरचा रोख, समजोन आपण तयारी करून बाहेर निघाला. तो मागडीच्या

---

१. त्रिंबक हरि. २. मोरो बल्लाळ.

झाडीच्या आसऱ्यानें आला. तों आपलें लष्कर पुढें कडपेचे सुमारें येऊन तेथें मुक्काम झाले असतां हैदरखान याणें एक दोन वेळ तयारी करून येऊन या लष्करावरी छापा घालावा ह्मणून एक दोन वेळ समीप झाडींत येऊन पाहिलें, परंतु इकडील फौज भारी व छबीने वगैरे बंदोबस्त फार आहे हें कळोन माघारा जात जाई. मैदानरानांत आपला घाव चालत नाहीं तेव्हां बिदनूरचे झाडींत शिरलेनंतर छापा घालावा या मसलतीनें भारी सामान गाडदी वीस हजार, व प्यादे दहा हजार, शिवाय फौज सात आठ हजार, शिवाय तोफा तीस चाळीस, व बाणांचे उंट पन्नास, जेजाला, रेखले, वगैरे लढाईचें सामान घेऊन आला. आमचें लष्कर तुरीकिऱ्यावरी येऊन मुक्काम झाला. तेथून दरमजल बिदनुरास जावें हा मनसबा निश्चय झाला. तों हैदरखान मागडीहून कूच करून मेलकोट्यास मुक्काम करून राहिला. हें वर्तमान बातमी आलियावरी मामानीं बातमीस हजार दोन हजार फौज रवाना केली तों दुसरी बातमी मेलकोट्यास आला तहकीक हे आली. त्यावरून बिदनूरचा रोख सोडून त्याजवरी जाऊन गांठ घालावी हा सिद्धांत करून फाल्गुन बहुलद्वितीया मंदवारीं आमचीं तीन पथकें व आनंदराव गोपाळ व घायगुडे व गायकवाड यांची फौज व हुजरात पांच सात हजार फौज बळवंतराव मेहेंदळे यांचे पुत्रासमागमें हुजरात देऊन पुढें दोन प्रहर रात्रीस रवाना केले. वीस कोसांची तफावत. सड्या फौजा रवाना झाल्या त्या अडीच प्रहर तीन प्रहरास येऊन पोंहचल्या. अघाडीस आमचीं तीन पथकेंच होतीं. व गायकवाड व हुजरातपैकीं थोडे बहुत लोक आले होते. त्याचे गोटावरी फौज चालोन गेली. हैदरखान सभोंवता डोंगरझाडीचा आसरा करून राहिला. रान अडचण फार, तरी गोटापावेतों घोडीं[1] लोकांनीं चालविलीं. तों त्याची फौज तयार

---

१. घोडेस्वार.

होऊन आली व तोफा व बाणही घेऊन आले. परंतु लोकांनीं चालून घेऊन त्याचे फौजेंतील दोन तीनशें घोडे त्या दिवशीं पाडाव आणिले. इकडील घोडें माणूस जखमी व ठार फार झालें. त्यावरी फौजा माघारे सरकोन निघाल्या. त्यावरी अस्तमान होत आला. उपरांतिक दक्षिण-भागीं पट्टणास जावयाचा मार्ग. त्या मार्गें निघोन जाईल. त्याजकडील तिकडे तोंडावरी आमचीं तीन पथकें व नरसिंगराव घायगुडे इतकी फौज पाठविली. कृष्णराव बळवंत वगैरे उत्तरेकडे राहिले. तों अस्तमानास मामा वरकड फौजेनिशीं येऊन पोंहचले. फौज येऊन उभी राहिली पाहून हैदरखान आपल्या तोफा दहा पंधरा घेऊन आपण बाहेर निघोन इकडील फौजेवरी तोफांची मारगिरी केली. फौजा सरकोन तफावतीनें राहिल्या. सरकारच्या तोफा लांब मजल यामुळें येऊन पोंचल्या नाहींत. दुसरे दिवशीं (आमच्या) तोफा येऊन नागमंगलावरी राहिल्या. सोमवारीं चतुर्थीस तोफा दाखल झाल्या. त्याचे गोटावरी तोफा लावावयास टेंकडीवरी जागा पाहून तेथें मंगळवारीं पंचमीस चार पांच तोफा वरी चढवून सायंकाळचे चार घटकास तोफांची मारगिरी त्याचे गोटावरी केली. गोळे लागू होऊन त्याचे गोटांत फार खराबी झाली. हैदरखान मुक्काम करून राहिला. जागा अडचण. परंतु तोफांची मारगिरी व सभोंवते कोसीं दोन कोसीं माल झाडी. नाहीं तरी मैदान. पट्टणाकडून रस्त आंत यावी तरी येत नाहीं. आसपास फौजा पश्चिम भागीं झाडी होती तिकडे चार दिवस फौज नव्हती त्यामुळें थोडीबहुत कही त्या रोखे त्याची भरून जात होती. त्यास त्या मार्गें निघून बिदनूरचे मार्गें जाईल याजकरितां आमचीं तीन पथकें व घायगुडे व गाईकवाड यांची फौज (व) आनंदराव गोपाळ यांस तिकडे रहा-वयाकरितां रवाना केले. त्या दिवशीं पट्टणचा रस्ता सोडून पश्चि-मेकडे फौजा गेल्या त्या दिवशीं कहीचीं तट्टें व उंटें सांपडलीं. कही बंद झाली. रस्त पोंहचत नाहीं तेव्हां तेथें निभाव होणार नाहीं (असें

त्यास झालें.) त्याचे लष्करांत रुपयास तीन शेर पीठ रागीचें याप्रमाणें धारण झाली. याजकरितां निघोन पट्टणास जावयाचा मनसबा करून पट्टणच्या रस्त्यानें चालिला. त्यास आमच्या फौजा पश्चिम भागीं गेल्या, इकडील मार्ग खालीं, निघोन गेलियास बातमी कळणार नाहीं, याजकरितां बातमीस राजश्री माणकोपंत यांजसमागमें तीन चारशें लोक देऊन पाठविले होते व त्रिंबकरावमामानींही बातमीस कांहीं फौज पाठविली होती. हैदरखान निघाला ही खबर त्यांस कळतांच तेथें माणकोपंत होते व मामाकडील लोक सामील करून घेऊन आपण व ते मिळून त्याजवरी गडबड केली. बहुल सप्तमी बुधवारीं आवशीचे प्रहर रात्रीस बाहेर निघाला. यांची त्याची गांठ पडली तों दोन प्रहर रात्र राहिली. तेव्हां त्याणें तोफा मारल्या. तों आमची फौज पश्चिमेकडे चार कोसांवरी होती. तोफांचे आवाज ऐकतांच राजश्री बाबा व नीलकंठरावजी व भाऊसाहेब व सर्व सरदार फौजेची तयारी करून निघाले ते जलद येऊन उजाडावयास हैदरखानासीं गांठ पडली. गोट सोडून दोन कोसांवरी फौजांची चिकाटी बसली. मामा उत्तरभागीं होते तेही तयार होऊन आले. भोंवते एलगार हिरिऱ्या बहुत केल्या. परंतु आगी फार. घोडें माणूस तोफांचे व बाणांचे मारगिरीखालीं फार जायां होऊं लागलें. हैदरखान याचे चित्तीं पट्टण समीप करावें. पळच्यास पोंचवावें हा त्याचा मनसबा होता. तों सरकारच्या तोफा येऊन पोंहचल्या. त्याचा गंज होता तेथें सरकारच्या तोफा लागू झाल्या तेव्हां हैदरखान पेंचांत आला. पुढें जाणें निभाव नाहीं पाहून निकडीस आला. डोंगर मातबर होता त्याचा (त्यानें) आश्रय केला. तेव्हां दुमदारीस मामा होते. आपल्या फौजा उजवे बाजूस होत्या त्या नीट अवाडीवरी जाऊन बाबासाहेब व नीलकंठरावजी व भाऊसाहेब यांणीं मोठी आंगेजणी करून चालोन

---

१. रिकामा.

घेतलें. सरदार लोकांनीं जातीनिशीं आंगेजणी केल्यावरी लोकांनीं कोणी कमी केली नाहीं. रावसाहेबांमागें लौकिक रहावा हीच सर्वांची उमेद व रावसाहेबीं लोक चांगले पदरीं बाळगिले त्याचें सार्थक उत्तम झालें. सर्वांनीं निकर्ष उत्तम करून बेजरब घोडीं घातलीं. तेसमयीं त्याचा मोड झाला. अवाडीचे लोक बहुत मारले. हैदरखानाकडील मातबर सरदार मीररेजा व मीरफैजुल्ला व लालामिय्या व बक्षी वगैरे सरदार पांच सात पडले. लष्कर तों तमाम बिलकुल लुटलें गेलें. हत्ती, नगारे, निशाणें, तोफा, व सर्वही जागांच लुटिलें. लोक फार मारले गेले. दातीं तृण धरलें त्यांस कोणी मारिलें नाहीं. युद्ध तुंबळ घोरांदर झालें. श्रीमंत थोर पुण्यवंत! त्यांस ईश्वरें महद् यश दिल्हें. खासा हैदरखान व टिपू त्याचा पुत्र मोड झाला तेसमयीं जलदी करून डोंगर चढून वरी गेले. पलीकडे रान खालीं पाहून घोडेवरी बसून उभयतां पळून दहा वीस स्वारांनिशीं पट्टणास जाऊन पोंहचले. याप्रमाणें वर्तमान झालें. युद्धांत नीळकंठरावजी यांसीं गोळी उरांत लागून तेच क्षणीं घोड्यावरी देहविसर्जन झालें. अनुचित गोष्ट झाली. त्यांचे मृत्यूपुढें इलाज नाहीं. मोठा घात झाला. ईश्वरी कर्तृत्वास मनुष्ययत्न नाहीं. नीळकंठरावजी मोठें रत्न होतें. रावसाहेबांमागें त्यांचा सर्वांस भरंवसा व वडील ते होते. परंतु ईश्वराचे चित्तास न आलें! रावसाहेबांचें एक थोर दुःख. त्याचा परिहार नाहीं तों ईश्वरें हें दुःख निर्माण केलें! तीर्थस्वरूप राजश्री आपा व सौभाग्यवती मातुश्री आकाबाई यांस थोर दुःख झालें. दुःखास पारच नाहीं. दुःखांत दुःख आणखी सर्वांसच झालें. निरुपाय गोष्ट. उपाय नाहीं. विवेक करून दुःख परिहार करावें. नीळकंठराजी यांणीं स्वामिकार्यावरी आपलें सार्थक

१. गोपाळरावामागें. २. ही त्यावेळची बातमी पुढें खोटी ठरली. मीररेजा वगैरे सरदारांपैकीं या लढाईत कोणी ठार झाला नाहीं.

केलें. त्यांची कीर्ति झाली. त्रिंबकराव मामा फारच श्रमी झाले. वरकड युद्धांत जखमी ठार लोक झाले त्यांची नांवनिशी यादी अलाहिदा बाबानीं लिहिल्या आहेत त्यावरून कळेल. बहुत काय लिहिणें लोभ असों दिजे हे विनंती.

नं० ११०३ (फाल्गुन वद्य दशमी.
१० मार्च.)

वासुदेव धोंडदेव यांचें गंगाधररावास पत्र २२ जिल्काद मु० मोतीतलावाचें.

" हैदरनाईकाचें झुंज असें कधीं झालें नाहीं. पंचवीस हजार गाड्याची एक सिलक होई तेव्हां गगन गर्जत असे! या प्रसंगीं नीलकंठराव, भाऊ, बाबा, या तिघांनीं व लहानापासून थोरांनीं मोठी शर्त केली. परंतु नीलकंठराव याजमुळें हर्षभंग झाला! ईश्वरें मोठा घात केला. नीलकंठरावानीं अंगें कराचली मारिली ती शर्त कोठवरी लिहावी! आणि या फौजेचा लौकिक रावसाहेबांमागें मातबर झाला. पागेस घोडीं चाळीस आलीं. व तिन्हीं गोटांत शिलेदारांकडे दोन हजार घोडे आले."

नं० ११०४ श्रीगणराज. (चैत्र शुद्ध.
मार्च. दु० पंधर०.)

राजश्री शिवाजीपंत स्वामी गोसावी यांसी.

विनंती उपरी. काल कहीबराबर आह्मांकडील राजश्री गोविंदपंतमामासमागमें चार पथकांपैकीं तीन हजार राऊत देऊन पाठविले होते. त्या

---

१. चिठी वामनरावाची शिवाजी बावाजी हैसकर यांस. शिवाजीपंत पटवर्धनांकडून वकिलीकरितां त्रिंबकरावमामाजवळ हल्लीं होता.

वाटेस रस्तेची गांठ पडली. म्हैसूरचे रस्त्यानें दोन अडीचशें बैल व दोनशें गाडदी व बाणदार व बेदडे असे होते. तों आकस्मिक कहीची गांठ पडली. रस्त लुटून फस्त केली. गाडदीही कांहीं लुटिले. कांहीं पळून म्हैसुरास गेले. दाणा हरजिन्नस होता. सुपारीही होती. आह्मीं राहिलों आहों येथून आठ कोसांवर लुटलें. कळावें. आजी सायंकाळीं उंटें व तट्टें ऐसें येथें पाठवणें ह्मणजे कहीबराबर लावून देऊं. तेथील राऊतही उंटाबराबर देणें. दाणेकरी यासही ताकीद करून इकडे पाठविणें. राजश्री कृष्णापा नाईकाचे कागद कधीं रवाना केले तें लिहिणें. रंगराव दुर्गकराकडील गेले होते ते आले कीं नाहीं याचें (तुह्मीं) कांहींच लिहिलें नाहीं. येथें लोक बोलतात कीं सल्लयाची बोली लागली. त्यास काय बोलतात तें लिहिणें. रस्तेचें वर्तमान राजश्री मामासही सांगणें. पहिलेसारखीं माणसें आंतील या तोंडीं सांपडत नाहींत. नदीतीरानें जातात. हे विनंती.

नं० ११९५ श्री. (चैत्र वद्य द्वादशी. ११ एप्रिल.)

राजश्री वामनराव स्वामीचे सेवेशीं.

विनंती[1] उपरी. आपण पलीकडे फौजेंत गेलांच असाल. फौजेंत जाऊन पलीकडे फौज पाठविण्याचा मजकूर लिहून पाठवूं ह्मणून आपण काल सांगितलें होतें त्याजवरून जासूद पाठविला असे. तरी काय निश्चय केला तें लिहिलें पाहिजे. तुह्मांकडील फौज सरदार कधीं जाणार व इकडून कही कधीं पाठवावी तें लिहिलें पाहिजे. रा। छ २९ जिल्हेज. माहीतगार जानोजी रवीराव दहा स्वारांनिशीं तुह्मांकडे पाठविले आहेत. हे तुह्मांकडील फौज घेऊन जाऊन सात आठ

---

१. चिठी त्रिंबकरावमामाची.

कोसांवर मुक्काम करवितील. आजच फौज जात असल्यास उत्तर पाठवावें. इकडील लुगारे व कही तिकडे पाठवून देऊं. ते हे एके जागां मुक्काम करून राहतील. उदईक पुढें पांच सात कोस गेल्यास मुबलग दाणा भरोन मागती मुक्कामास येतील. त्यानंतर नदी उतरून फौजमुद्धां कही परवांचे दिवशीं श्रीरंगपट्टणाचे पश्चिमेस उतारास पहिला मुक्काम होता त्याचे वरते दोन कोसांवर उतरोन येतील. तेच दिवशीं पूर्वेकडील फौज उतरोन नदीचे अलीकडे येईल. या प्रकारें विस्तारें बोललों आहें. तर उत्तर पाठविलें ह्मणजे इकडीलही तयारी करवूं. जानोजी रवीराव जेऊन मागाहून चहू घटकांत येणार. चिठी पुढें पाठविली असे. उत्तर पाठवावें. हे विनंती.

नं० ११०६ श्री. (चैत्र शुद्ध. मार्च. दु० पंधर०.)

विज्ञापना. आज कूच करणार ह्मणून लिहिलें होतें, त्यास गायकवाड कूच करून गेले होते त्यांस रागें भरून दुसऱ्या जागां जाऊन राहिले होते तेथून आणून (मामानीं) पहिल्या जाग्यावरी उतरविलें. आह्मांकडे सांडणीस्वार पाठविला कीं, तुह्मीं कूच कराल तर न करणें. त्याजवरून आज मुक्कामच झाला. प्रातःकाळीं गोळे गोटांत आले. अलीकडे तोफ सुटत नाहीं. उदईक तोफखान्याचा गोट डोंगराजवळ आणविणार आहेत. देवळाकडून गोळे चांगले पट्टणांत जातील असें ध्यानांत आणून गोट तोफखान्याचा मात्र डोंगराकडे आणणार. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

---

१. चिठी शिवाजीपंताची वामनरावास.

नं० ११०७ श्रीगणराज. ( चैत्र शुद्ध.
मार्च. दु० पंधरवडा. )

राजश्री शिवाजीपंत स्वामी गोसावी यांसीं.

विनंती[1] उपरी. तुह्मीं चिठी पाठविली ती पावली. लिहिलें वर्तमान कळलें. आज ह्मैसूरपर्यंत तलावा करून आलों. पट्टणचे दक्षणेस रहावें त्यास पाणी नाहीं. पट्टणाजवळ रहावें तर पाणी आहे, परंतु गोळ्यांच्या मारांत आहे. यास्तव पट्टणचे पूर्वेस पाण्याचा झील आहे, तेथें आज राहिलों आहों. पट्टणचे पश्चिमेस स्वार पांचशें पाठविले होते त्यास त्याजकडील प्यादे गाडदी चाळीस पन्नास सांपडले ते तोडिले. दोन चार धरून आणिले. आज रात्रौ हजार स्वार ह्मैसूरपावेतों पाठवून ह्मैसूरचे सभोंवते तलावा करून येतील. तुह्मीं रायदुर्गकराचा मजकूर लिहिला तो कळला. आह्मीं इंदुवारीं येतों. राजश्री गामांची चिठी पाठविली ती पावली. माणूस पाठविला त तो आंत लावून दिला. काल उतारानें आलों तेव्हां त्यांणीं गोळे टाकिले, परंतु कोणास लागला नाहीं. दुसरा उतार पट्टणचे मागें होता तेथें गेलों होतों. त्याचे प्यादे गारदी उताराजवळ आले होते ते मोडून गोटांत घातले. एक घोडी आह्मांकडील संताजी सोनवलकर याजकडील जखमी झाली. चिरंजीव राजश्री भाऊकडील प्रातःकाळीं थोरात येणार आहेत त्यांजबराबर चांदणी एका उंटावर घालून पाठवून देणें. बहुत काय लिहिणें हे विनंती. जखमी यांखेरीज मोजेनें कोणी लोक राहिले असतील त्यांस ताकीद करून लावून देणें. तपेलें एक तीन शेराचें पाठवावें. हे विनंती.

नं० ११०८ श्री. ( चैत्र शुद्ध.
मार्च. दु० पंधर०. )

विज्ञापना. दोनप्रहरानंतर हैदरखानाकडील तोफेचे गोळे येऊन

---

१. चिठी वामनरावाची शिवाजीपंतास. २. पटवर्धनांचा गोट ज्या कारकुनाच्या ताब्यांत होता त्याची ही व या पुढची चिठी वामनरावास.

राजश्री मुराररात्र घोरपडे यांचा गोट पोटीं घेऊन गोळे गायकवाडाचे गोटांत आमचे पिछाडीस पडूं लागले. दोन माणसें ठार झालीं. दोन चार जायां झालीं. आमचें राहणें या जाग्यास होत नाहींसें दिसतें. कूच करावें किंवा न करावें तें लिहावें. गोळा चौदा शेरी आहे. आमचे उजवे बाजूस गोटाशेजारीं गोळे पडतात. प्रातःकाळीं कूच करून राजश्री कोन्हेरराव याचे गोटा पलीकडे जाऊन राहतों. रहावें किंवा न रहावें तें लिहावें. राजश्री कृष्णापानाईक व शिवाजीपंत राजश्री राव सेनापतीचे गोटास गेले आहेत. विदित होय हे विनंती.

नं० ११०९ श्री. (चैत्र शुद्ध.
मार्च. दु० पंधरवडा.)

विज्ञापना. आपण संतु बरात्याबराबर चिठी पाठविली ती पावोन लिहिला मजकूर कळला. 'काल तलाव्यास फौज गेली होती त्यास पायींचीं माणसें केमळाचे भारे हैसुराकडून घेऊन येत होते. आमच्या फौजेची गांठ पडली. कांहीं तोडिले. कांहीं माणसें आणून कान कापिले. बैल तट्टें नव्हतीं.' ह्मणून लिहिलें तें कळलें. आमचे उजवे बाजूस ढालांचे बराबरीस तोफखाना राहिला. ढालांचे बराबरीस ढाला उभ्या केल्या. डेरे पूर्वेकडे दिले. आमचे उजवे बाजूस उमाट (?) मोडक्या गांवाजवळ होतें तेथें गोळे येतात याजकरितां सरोन पूर्वेकडे राहिले. तोफा राजश्री मुराररायाच्या मोर्चाकडे नेऊन लागू संध्याकाळच्या करणार. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं० १११० श्री. (चैत्र शुद्ध.
मार्च दु० पंधरवडा.)

विज्ञापना. मामास सहजांत पुसल्यासारखें केलें. त्याणीं उत्तर केलें कीं, दुसरी फौज पाठवावी असें आह्मीं बोलिलों होतों, परंतु मदुरास

---

१. ही व या पुढची अशा दोन्ही चिठ्या शिवाजीपंताच्या वामनरावास.

फौज पाठविली आहे ती फौज आल्यावरी सोय करावयास येईल. तूर्त आपण आहां तसेच असल्याखेरीज तिकडील बंदोबस्त राहत नाहीं. याप्रमाणें बोलिले. कही रात्रौ पट्टणांतून बाहेर जाऊन रात्रौ फिरोन माघारी येते ह्मणोन राजश्री मामाजवळ सांगणारांनीं सांगितलें त्याजवरून आपणांस चिठी त्यांणीं परभारेंच पाठविली आहे ह्मणून आह्मांजवळ सांगत होते. चिठी आपणांकडे आलीच असेल. छ २४ जिल्कादचीं पत्रें श्रीमंतांकडून जासूद जोडीबराबर आलीं. जासुदास सांडणीस्वार मिरजेजवळ भेटले ह्मणून सांगत होते. पत्रांत हिंदुस्थानचें माल वर्तमान लिहिलें आहे जे, इटावाचा किल्ला राजश्री रामचंद्र गणेश यांणीं घेऊन दिल्लीस आले. सरकारचे झेंडे दिल्लीस उभे केले. पातशाहा बसविणार. पन्नास लक्ष रुपये नजर बोलतात. हे पावणा करोड घेऊं ह्मणतात. पावणा करोडीवर ठराव होईल तेव्हांच बसवितील. सारांश तिकडे फौजेचा नक्ष मोठा झाला ह्मणून लिहिलें आहे. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं० ११११ श्रीशंकर. ( चैत्र शुद्ध. मार्च० द्रु० पंधर०. )

विज्ञापना. आपण पत्र पाठविलें तें पावलें. प्रातःकाळीं मी चिठी सेवेशीं लिहिली आहे. आज ( मला मामा ) निरोप देणार आहेत. देतील तेव्हां खरा! मामा तलाव्यास गेले आहेत. तोफाही नेऊन लाविल्या. पांच सात बार केले. रात्रौ अमित्राकडील तोफा बाहेर येऊन चाळीस पन्नास तोफा बाण शंभर पावेतों सोडिल्या. परंतु लष्करांत गोळे बाण येऊन पावले नाहींत. मामाही फौजसुद्धां बाहेर निघाले तों ते माघारे गेले. काली येतांना मार्गांतून उंट पंचवीसपावेतों बेदडे स्वारांनीं नेले. राजश्री बाजीपंतअण्णा यांचीं पांच उंटें भरलींच गेलीं. येणेंप्रमाणें

१. शिवाजी बावाजीचें वामनरावास पत्र.

वर्तमान आहे. येथून निरोप झालियास आज्ञेप्रमाणें सेवेशीं येतों. सेवेशीं विदित होय हे विज्ञापना.

नं० १११२ (चैत्र शु० चतुर्थी. २० मार्च.)

राजश्री वामनराव स्वामीचे सेवेशीं.

विनंती[1] उपरी. आपली फौज काल तळावियास गेली होती त्याप्रमाणें आज तळावियास लवकर फौज पाठवावी. रवाना छ ३ जिल्हेज. शपतपुरस्कर सर्वांस सांगोन दोन चारशें माणूस जरूर जखमी करवावें. ही गोष्ट जरूर करावी याविशीं निक्षून सांगावें. लवकर तुह्मीही फौज रवाना करून भोजन करून सकाळचे सहा घटकांत आह्मांकडे यावें. लवकर आल्यास लवकर अवघे येतील. राजश्री राव सेनापतीही येतील. हे विनंती.

नं० १११३ श्री. (चैत्र शुद्ध. मार्चाचा दु० पंधर०.)

विज्ञापना[2]. आपण चिठी पाठविली ती पावली. 'रस्त येत होती ती लुटली. कांहीं गाडदी व बैद पळोन ह्मैसुरास गेले' ह्मणून लिहिलें तें सविस्तर कळलें. उत्तम गोष्ट. 'चित्रदुर्गास राजश्री रंगराव गेले होते त्याजकडील मजकूर काय' ह्मणोन लिहिलें, त्यास त्याजकडून अद्यापि पत्र आलें नाहीं. सांडणीस्वार येथून जाऊन आठ दिवस झाले तोही अद्यापि आला नाहीं. रायदुर्गास पत्रें दशमी भोमवारीं रवाना केलीं. राजश्री नागोजीराव जाणार, आज उद्यां ह्मणतां चार

---

१. त्रिंबकरावमामाची वामनरावास चिठी. २. शिवाजी बावाजीची वामनरावास चिठी.

दिवस झाले. शेवटीं जातील असा भरंवसा नाहीं. 'सलूचाचा प्रकार लोक बोलतात, येविशींचें काय तें मनास आणून लिहावें' ह्मणोन लिहिलें, त्यास अद्यापि इकडे बोलणें चालणें नाहीं. कायताचे विद्यमानें राजकारण आहे. परंतु श्रीमंतांकडून पत्रें आल्याशिवाय कोणती गोष्ट बोलत नाहीं. पैक्यावर सल्ला याणीं केला तरी हैदरखान विल्हे लाऊं देणार असें आहे. राजश्री महादाजीपंतास निरोप झाला. उद्ईक जातात. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं० ११९४ श्री. (चैत्र शुद्ध. मार्चाचा दु० पंधर०.)

विज्ञापना. राजश्री नागोजीराव यांचा व सेनापतींचा जरा रुसवा झाला होता. शेवटीं निखालस बोलणें चालणें झालें. वीस हजार कर्ज नवें द्यावेसें करून गोडी झाली. रायदुर्गास आज जाणार. राजश्री सेनापतीची व कृष्णाप्पा नाइकाची भेट करावी ह्मणोन राजश्री मामांनीं आह्मांस सांगितलें, त्याजवरून आज भेट करवितों ह्मणोन सांगितलें आहे. नागोजीराव पाठवितील तेव्हां घेऊन जाऊं. चित्रदुर्गेकर चैत्र शुद्ध पंचमीस निघाले. दशमीस हिरुरास आले. मजल दरमजल येतात. सांडणीस्वार हिरुराहून काल येथें आला. दोन तीन दिवसांत संस्थानीक येऊन पोंहचतील. कळावें. हैदरखान यांणीं दोन तोफा पुढें आणून ठेऊन गोटावर गोळे टाकिले त्यांतील एक तोफ फुटली ह्मणोन बातमी आली. आपणाकडे (शत्रूकडील) कांहीं राऊत पळोन आले ह्मणोन वर्तमान आहे. किती आले तें लिहावें. इकडे दहा राऊत पळोन आले. वरकडाचा बंदोबस्त केला ह्मणून राऊत आले हे सांगत होते. हैदरखान याची दोन हजार फौज व

---

१. शिवाजी आपाजीची वामनराकास चिठी.

कांहीं गाडदी घांटाखालीं आहेत ते ( त्यानें ) पट्टणास आणविले आहेत. म्हैसूरचे वाटेनें आज उद्यां येणार म्हणून पट्टणाहूनच बातमी पक्की आली आहे म्हणोन राजश्री मामांनीं सांगितलें. ऐशियास जपोन त्या सामानास बुडविलें म्हणजे लोकांस थोडीं सांपडतील, नक्ष होईल, म्हणोन राजश्री मामानीं सांगितलें. आपणासही चिठी राजश्री मामा परभारीं लिहितील. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं० १११९ श्रीगणराज. ( चैत्र वद्य. एप्रिल १० पंधर० )

राजश्री शिवाजीपंत स्वामीस.

विनंती[1] उपरी. लष्कर कूच होतें हें वर्तमान सर्वत्र जनमुखें झालें. आमचें येथें राहणें हें काय उपयोग? शामराव गोपाळ आले होते तेही गेले. तेव्हां कूच होईल यास्तव राजश्री मामाचे कानावर घालून बलाऊं पाठविणें. नदीस पाणी कालच्याहून अधिक आहे. वैरण कालपासून अगदीं मिळत नाहीं. दाणाही येत नाहीं. आणि फौज राहणें काय उपयोग? यास्तव परिछिन्न तुह्मीं तिकडे जाऊन त्यांचे कानावर घालून उदईक प्रातःकालीं आह्मांस चिठी पाठविणें. काल कहीचीं तट्टें दहा वीस गेलीं. लटकें राहून एखादें दिवशीं गडबड करून घ्यावी हें काय! तथापि विशेष प्रयोजन राहणेचें नाहीं. राजश्री मामाची चिठी आली त्यांत मामानीं लिहिलें आहे म्हणोन लिहिलें, असो! तेव्ह कांहीं बोलले नसतील, मग तुह्मीं काय ऐकून सांगाल? तुह्मीं चिठी पावतांच राजश्रीकडे जाऊन त्यांचे कानावर घालून ज्या गोष्टीनें आह्मांस तिकडे बोलावीत तें करणें. येथें

---

१. बामनरावाची शिवाजी बावाजीस चिठी. २. हैदराकडून आलेल्या वकिलाचें हें नांव.

याउपरी सडे राहणें कांहीं अधिकोत्तर आहे असें दिसत नाहीं. वैरण परिच्छिन्न मिळत नाहीं. त्यांचे मतें गोटांत नच यावें असें असलें तरी नदीवर तरी येऊन राहूं. तिकडील तरी वैरण आणवूं! काय तें लिहिणें. उजाडतां उत्तर पाठविणें. बहुत काय लिहिणें हे विनंती. अत:पर इकडे राहणें सोईचें नाहीं आणि नदीसही पाणी दिवसेंदिवस अधिक येतें. तरी लिहिलेप्रमाणें राजश्री मामास विचारून चिठी पाठविणें. हे विनंती.

नं० १११६ श्री. (चैत्र शुद्ध तृतीया. १९ मार्च.)

राजश्री वामनराव स्वामीचे सेवेशीं.

विनंती[1] उपरी. नदीपलीकडे तळाव्यास दोन हजार फौज पाठवावयाविशीं तुह्मांस काल लिहिलें होतें त्यावरून आज प्रात:काळीं राजश्री परशुरामपंतभाऊ फौजसुद्धां गेले. याचप्रमाणें उदईक दोन अडीच हजार स्वार बरोबर एक खासा देऊन पहांटे चार सहा घटका रात्रीस पाठवावे. ताकीद सायंकाळीं करावी. रवाना छ० २ जिल्हेज. हे विनंती.

नं० १११७ श्री. (चैत्र शुद्ध. मार्चाचा दु० पंधर०.)

विज्ञापना[2]. काल आपण म्हैसुराकडे गेला होतां, तळावा करून आलां, माणसें सांपडलीं त्यांस शासन केलें, येणेंकरून मामा फारच संतोषी झाले. आपण लिहिलें होतें कीं, पट्टणच्या पश्चिमेकडून वैरण

१. चिठी त्रिंबकराव मामाची वामनरावास. २. चिठी शिवाजी बावाजीची वामनरावास.

वगैरे जात असते. त्याजवरून काल रात्रौ फौज तयार करून आमचा मुक्काम प्रतिपदेच्या तळावर होता त्या पलीकडे कावेरीस दीड कोसावर उतार आहे, कहीवाले जात होते, त्या उतारास रात्रौ कही गेली. कहीवाले येऊं द्यावे आणि तोडावे, दोन प्रहरपावेतों राहून फौजेनें यावें, याप्रमाणें आपण लिहिल्यावरून बंदोबस्त केला. राजश्री आपाजी विनीवाले व भापकर व चार तोफा येणेंप्रमाणें मदुरास गेले. तेथें कैद राहात असतात. तो गांव घ्यावयाकरितां आवशीच्या प्रहर रात्रीस फौज व तोफा गेल्या. सल्लयाचा नाद तिकडून आहे, परंतु श्रीमंतांच्या पत्राचें उत्तर आल्याशिवाय बोलूं नये याजकरितां (मामानीं) ओढून धरिलें आहे. श्रीमंतांनीं सल्ला करावा ह्मणून लिहिलें तरी सल्ला होइल. हैदरखान सल्ला करणार असें आहे. राजश्री मामानींच याप्रमाणें सांगितलें. राजश्री कृष्णापानाईक याची ढाल व तेगा राजश्री मामानीं पाठविला तो नाईकास दिला. मिरजेची पत्रें आपण अद्यापि पाठविलींच नाहीं! विस्मरणेंकरून राहिलीं असतील! आज तरी पाठवावीं. उदईक राजश्री नागोजीराव रायदुर्गास जाणार. सेवेशी श्रुत होय हे विज्ञापना.

नं० १११८ श्रीगणराज. (चैत्र शुद्ध. मार्चाचा दु० पंधर०.)

अपत्यें वामनानें[1] साष्टांग नमस्कार विनंती. रायदुर्गकर कृष्णापा नाईक आह्मांकडेच पाडाव आला. व तीर्थस्वरूप कैलासवासी रावसाहेबांचा[2] याचा मोठा स्नेह. राजश्री मामांच्या हातीं द्यावा तर तेंही संकट. श्रीमंत यांची अब्रू घेऊन चार रुपये घेणार. अशी श्रीमंतांची मर्जी

---

१. वामनरावाचें गोविंद हरीस पत्र. २. गोपाळरावाचा.

गुदस्तांपासून आहे हें समजलें होतें. यास्तव चार रुपये कबूल करून गुंता उरकिला. चित्रदुर्गकर गुदस्तां श्रीमंतांसमागमें चार महिने सामानसुद्धां फिरोन सेवाचाकरी चांगली करून ममता संपादून घेतली होती. सालमजकुरीं त्यांस आणावें ह्मणून श्रीमंतांचीं पत्रें राजश्री मामास आलीं त्यांजवरून कारकून व पत्रें संस्थानिकाकडे गेलीं परंतु ते आले नाहींत. त्यांचे कांहीं जाबसाल होते याजकरितां त्यांनीं राजश्री पुरुषोत्तम तमाजी व रंगो तमाजी यांस पाठविले. त्या संस्थानची मध्यस्ती तीर्थस्वरूप कैलासवासी रावसाहेब यांचे विद्यमानची. उभयतां आले हे आह्मांकडेच आले. राजश्री मामाची प्रकृत एक प्रकारची. मध्यस्तींत मन घातल्याखेरीज दुर्गकरांचा संतोष नाहीं. तेव्हां मन घालावें लागलें. त्यांजकडील चार जाबसाल होते ते बोलूनचालून यादीबुदी ठरावून त्यांस आणावयास रंगो तमाजी यांस पाठविलें. त्यांस जाऊन आठ दहा दिवस झाले. संस्थानिकानीं पांच हजार प्यादे व दोन हजार फौजेनिशीं यावें येणेंप्रमाणें ठरलें आहे. तेही सिद्धच होते. दुर्गाहून निघाले असतील. सत्वरच येतील. रेजाअलीखान तिमस्तां व गुदस्तां श्रीमंतांकडे हैदरखानाकडून वकिलीस आला होता तेव्हांपासून श्रीमंतांच्या लक्षांत होताच. नलवागलांत आजपावेतों होता. हैदरखान लुटल्याची बातमी कळतांच वस्तभावसुद्धां थोरल्या बाळापुरास जाऊन तेथें वस्तभाव ठेऊन शिऱ्यांस आला. राजश्री मामाकडे येणार. त्याजवर श्रीमंतही कृपा करितील. काली पेशजी इंदुवारी कृष्णापा-नाईक रायदुर्गकराची व मामाची भेटी करून कैदेतून मोकळें केलें त्यांनीं आपलें सामान आणावयास कागद लिहिले आहेत. सामानही येईल. सेवेशीं विदित होय हे विज्ञापना.

---

१. फौज.

नं० १११९ श्री. ( चैत्र शुद्ध.
मार्च. दु० पंधर०. )

विज्ञापना.× राजश्री मामानीं आपणास पत्र दिलें तें पाठविलें आहे. हैदरखान याणीं बातेरी नदी अलीकडे बांधिली होती त्या बातेरीवर दोन तोफा बारा शेरी ठेऊन गोळे लष्करावर टाकितो. गोळे बाजारांत व डावे बाजूस पडतात. असे गोळे येऊं लागल्यानें बाजार व डावी बाजू सरोन अलीकडे रहावी लागेल. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं० ११२० श्रीशंकर. ( चैत्र शुद्ध.
मार्च. दु० पंधरवडा. )

सेवेशीं विज्ञापना. श्रीमंत राजश्री भाऊकडील राऊत मोतीतलावाकडे कालच गेले. स्वामीकडील राऊत सिद्ध आहेत, मी तेथें यावें ह्मणजे राऊत देऊन रवाना करून देऊं, ह्मणून आज्ञा, त्यासीं श्रीमंत राजश्री मामांचा कारभार—मनांत एक, बोलण्यांत एक! काली कब्बाडास तट्टें पाठवूं नको ह्मणोन सांगितलें आणि निरोप तो दिला नाहीं! आमचे तर्फेचा गुंता बोलणें चालणेचा राहिला नाहीं. असो. थोर आहेत. आज उद्यां दोन दिवस बोलत नाहीं. गुरुवारीं नमस्कार करून येथून निघून सेवेशीं येतों. काली रात्रीस हैदरखान यांजकडील दोन तोफा घेऊन येऊन डावे बाजूकडे माथावर लागू करून गोळे मारिले. डावे बाजूकडे लष्करांत गोळे येऊन पडले. दोन चार माणसें जायां झालीं. सरकारच्याही तोफा बहुत झाल्या. फुकट गोळे! दारू मात्र खर्च केला! उजवे बाजूस तोफखाना, तेथून गोळे मारिले. निष्कारण चार घटका मारागिरी झाली. चहूंकडून फौजा बाहेर निघाल्यावर ते निघोन गेले. कळावें. स्वामी तीन कोसां-

---

× चिटी शिवाजी बावाजीची वामनरावास. १. चिठी शिवाजीपंताची वामनरावास.

वर एकीकडे राहिले आहेत हें युक्त दिसत नाहीं. आज कूच करून इकडे यावें हें माझ्या मतें उत्तमसें दिसतें. यांत स्वामीची मर्जी. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं० ११२१ श्री. (चैत्र शुद्ध. मार्चाचा दु० पंधर०.)

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री आबा स्वामीचे सेवेशीं.

पोष्यं नागोराव[1] श्रीनिवास. कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती येथील कुशल चैत्र शुद्धपावेतों मुक्काम लष्करानजीक श्रीरंगपट्टण. जाणोन स्वकीय कुशल लेखनीं संतोषवीत जावें. विशेष. आपण अलीकडे एक दोनदां पत्रें पाठवून इकडील परामर्ष घेतला त्यावरून बहुत संतोष झाला. इकडील अर्थ लिहून मुजरद जासूद जोडी राजश्री राव सेनापती याणीं आपणांकडे पाठविली होती त्यांजबरोबर आह्मीं सविस्तर पत्रें राजकी व स्वकीय अर्थ विशदें कित्येक लिहून पत्रें पाठविलीं होती. जोडी येथून निघून गेली. रायदुर्ग व चित्रदुर्ग या दोन संस्थान तालुक्यांचे गढींच्या संधींत कोलपाल गांव आहे. अडचणीची जागा. अशांत सोबत बरीच होती, परंतु फाशेपारधी याणीं सोबतीचें दहा वीस माणूससहीत जासूद जोडी मारिली. त्या चोरांस रायदुर्गकरानी पत्ता लावून धरून कैद केलें. एकूण जोडी आपणाकडे येऊं न पावली त्यामुळें इकडील अर्थ कांहींच अवगत न झालें. राजश्री वामनरावबाबा व राजश्री नीलकंठराव व राजश्री भाऊ यांस घेऊन देवरायदुर्गासमीप या सैन्यास येऊन पावलों. राजश्री राव सेनापती व राजश्री त्रिंबकराव मामा आदीकरून सर्वत्र सरदारांनीं डेऱ्यास येऊन राजश्री त्रिवर्गांची भेटी घेऊन गेले. श्रीमंतांचीं पत्रें पेशजीं आलीच होतीं.

---

१. नागोराव हा मुरारराव घोरपड्याचा वकील. त्याचे हे मोरो बल्लाळास पत्र.

त्या मुक्कामीं आणखी आली जे, 'सर्वोत्कर्षेकरून बिदनुराकडे जावें. कस्त मेहनत सर्वत्रांनीं करून तें स्थान घ्यावें.' ह्मणून लिहून पाठविलें त्याप्रमाणें करून बिदनुराकडील रोख धरून तुमकुरासमीप (त्रिंबकराव मामा) आले. राजश्री कृष्णराव बळवंत फौज व तोफखानासहीत येऊन पावले. तितक्यांत हैदरखान यानें छाप्याची गडबड करावी ह्मणून आपली फौज व बरोबर गाडदी तोफा घेऊन भैरवदुर्गासमीप आला. परंतु धैर्य न पुरवतां माघारा गेला. तुमकुराहून सर्वत्र सरदारांनीं त्याजवर रोख देऊन कूच करून तुरवीकेरेस येऊन पावले. तों हैदरखान मेलकोट्यास येऊन पुढें बिदनुराकडे जावें ह्मणून पावला. हे बातमी यांस कळून सडी फौजेनिशीं राजश्री मामा व राजश्री त्रिवर्ग[1] व रास्ते वगैरे सरदार येऊन त्यास घेरून चौगिर्द केलें. हैदरखानास बाहेर निघूं न देणें, तत्राप निघाल्यास पट्टण समीप, तिकडे जाईल, येविशींचा बंदोबस्त करावा, त्यास मातबर फौजेनिशीं मातबरानींच रहावें, ह्मणून राजश्री त्रिवर्गांस सरकार काम आलें. त्याप्रमाणें मान्य करून (त्रिवर्ग पटवर्धन) फौजेनिशीं पट्टणच्या मार्गें चौकी मुस्तकीम करून राहिले. तों हैदरखान छ १८ जिल्कादीं रात्रौ आपली फौज दहा हजार बार व गाडदी वीस हजार प्यादे शिवाय तोफा पन्नास वगैरे सरंजाम बाण हत्तीसहीत जंगी सामानानिशीं लढत पट्टणास जावें ह्मणून निघाला. हे बातमी राजश्री त्रिवर्गांस कळून जलद राजश्री मामास वर्तमान कळविलें. आणि हैदरखानासही एकाएकीं जाऊं न देतां अडविलें. तों मागाहून हुजरांत वगैरे सरदारनिशीं मामाही येऊन पावले. परस्परें मैदानांत लढाई झाली तो अर्थ राजश्री बाबानीं आपणांस लिहिलाच असेल. त्याजवरून अवगत झालें असेल. त्या प्रसंगीं राजश्री त्रिवर्गांनीं जातीनिशीं व फौजेनिशीं आंगेज फार सरस केली. सर्वत्र सरदा-

---

१. वामनराव, नीलकंठराव व परशुरामभाऊ हे त्रिवर्ग पटवर्धन.

रानींही मेहनत केली. बेजरब चोडीं चालून हैदरखान याची फौज सलतनत सर्वत्र बुडवून गारत केली. ऐन लढाईच्या मुन्यास (?) सरकार कामावर राजश्री नीलकंठराव दिवंगत झाले. अशांत राजश्री उभयतांनीं[1] हिम्मत न टाकितां सरकार काम करून शत्रूस जरब भारीच पोंचविली. खुद्द हैदरखान अब्रूची वाड टाकून निघून गेला. नीलकंठरावजी स्वामीकार्यावरी गेले. त्यांसही हा लोक परलोक या दोहों लोकीं कीर्तिरूप झालें. परंतु प्रपंच रीतीनें सर्व इष्ट मैत्र व वडिलांस बहुत खेदास कारण झालें. राजश्री दादांमुळें[2] तीर्थरूप राजश्री नाना व सौभाग्यवती मातुश्री ताई श्रमी आहेत त्याचप्रमाणें राजश्री आपांस व सौभाग्यवती मातुश्री बाईस शोक अपार झाले. अशास कोणाचा उपाय काय! सदैव आह्मांस राजश्री दादांची ममता व कृपा आठवितांच फार श्रम होतात. त्याचप्रमाणें नीलकंठरावजी लोभ करीत होते. आह्मांस फार वाईट वाटलें परंतु यत्न काय! येथें राजश्री उभयतां व राजश्री कोन्हेरराव यांचें समाधान केलें. आपणास तो राजश्री दादा व नीलकंठरावजीमुळें खेद अनिवार झाले आहेत. यांत सर्वत्रांस धैर्य देऊन त्यांचा नांवलौकिक यथास्थित राखून अभिवृद्धि करावयाचा भार आपणांकडे आहे. आपण विवेकी होऊन सर्वांस विवेक सांगावा. येविशीं विशेष लिहावेसें नाहीं. लढाईच्या गर्दीत त्याजकडील सरदार वगैरे पाडाव आणिल्याचा अर्थ राजश्री बाबाच्या पत्रावरून कळलाच असेल. राजश्री कृष्णापा नाईक रायदुर्गकर पाडाव राजश्री बाबाकडे आले त्यांजवर श्रीमंतांची बेमर्जी. अशांत दादांच्या व त्यांच्या ऋणानुबंधावर लक्ष देऊन राजश्री बाबानीं व आह्मीं राजश्री मामास उचित रीतीनें सांगून श्रीमंतांची कृपा होय व संस्थानचें त्यांचें कल्याण ज्यांत आहे तोच अर्थ योजून मार्ग काढिला आहे. परभारें आपणास

---

१. वामनराव व परशुरामभाऊ यांनीं. २. गोपाळरावामुळें.

बाबांच्या लिहिल्यावरून कळेल. आमचे जासूद पावते तरी खासगत आह्माकडील समग्र अर्थ आपणास कळता. सांप्रत तांतड फार झाली व पेशजी नीलकंठरावजीनीं व बाबानीं संकलित लिहिलें सांप्रत त्याहावयास सांगितलें. आपणास बाबा लिहितील. आह्मीं तूर्त यजमानाजवळ किसनपुरीं आहों. मामानीं चित्तापासून ममता प्रारंभिली आहे. हे विनंती.

नं० ११२२ श्री. (चैत्र शुद्ध. मार्च. दु० पंधरवडा.)

तीर्थस्वरूप राजश्री दाजी वडिलांचे सेवेशीं.

अपत्यें वामनानें कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती येथील कुशल तागायत चैत्र शुद्ध मुक्काम श्रीरंगपट्टण जाणोन वर्तमान यथास्थित असे. विशेष. हैदरखानाची फौज लुटली. खासा पट्टणास पळोन गेल्यावर पत्रें पाठविलीं तीं पावलीं असतील. त्यावरून विस्तारें कळों येईल. प्रस्तुत फाल्गुन वद्य दशमी सोमवारीं पट्टणाच्या पश्चिमेस कुल फौजेनिशीं उतरलों. सात आठ मुक्काम झाले. राजश्री त्रिंबकरावमामा शहराभोंवता तळावा करून तोफा लावाव्या याजकरितां रान घेऊन आलेवर किल्लयाच्या पूर्वेस राजश्री मामा तमाम फौजेनिशीं शुद्ध प्रतिपदेस येऊन उतरले. अस्तमानीं तोफा लागू मुहूर्तें केल्या. हैदरखानानें बातम्या बळावून तोफांची मारगिरी चांगलीच केली. नित्यानीं गोळागोळी होती. हैदरखान पट्टणांत मोडून आल्यावर तीन चार हजार स्वार व गाडदी नागवून आलेले त्यांना बंदुका देऊन व किल्लयांतील लोक असे सारे मिळोन दहा हजारपर्यंत जथ पडला. याणीं तोफा लागू केल्या. त्यांचे गोळे राजवाड्याजवळ उतरतात. शहरांत फलमास तांदुळ दीड शेर.

---

१. लिहिणाराचा चुलत बंधु पुरुषोत्तम कृष्ण पटवर्धन मंगळवेढेकर.

कुळथ्या तीन चार शेर. पीठ दोन तीन शेर. रागी पांच शेर येणेंप्रमाणें धारण आहे. तहाचा प्रकार कांहीं बोलों देत नाहीं. किल्ल्याच्या दक्षिणेस म्हैसूरच्या मार्गावर आह्मांबरावर राजश्री आनंदराव गोपाळ व नरसिंगराव धायगुडे व गायकवाड ऐसीं तीन पथकें नेमून दिलीं. आह्मीं व ते सारे सड्या फौजा होऊन चैत्र शुद्ध षष्ठी भृगुवार रोजीं भोजनोत्तर गेलों. त्या मार्गें कही येते त्याचा बंदोबस्त करावा, कदाचित् आंत गवताची तंगचाई याजकरितां आंतील फौजेस निरोप देईल तर तो मार्ग रोखून रहावें, याजकरितां त्या मार्गावर गेलों. दिवसा तळावा करून रहावें. +

नं० ११२३ श्री. ( १८ मार्च. )

चिरंजीव राजश्री तात्यासाहेब यांसीं प्रती वासुदेव धोंडदेव आशीर्वाद. विनंती येथील कुशल तागायत चैत्र शुद्ध द्वितीया पावेतों मुक्काम श्रीरंगपट्टण यथास्थित असे. विशेष. आपणांस पेशजी लढाईचीं पत्रें पाठविलीं तीं पावलींच असतील. त्या अलीकडे वर्तमान तरी वर्षप्रतिपदेचे मुहूर्तें पट्टणास मोर्चे लाविले आहेत. हैदरखान खासा व टिपूमिय्या व मीरफैजुल्लाखान आठ दहा हजार गाडदी व दोन हजार फौज येणें-प्रमाणें सामान आहे. बाहेर येऊन लढावें ही कस्त राहिली नाहीं. पट्टणांत तोफा मातबर आहेत. परंतु लढाईत ( आह्मांस ) तोफा चाळीस पंचेचाळीस सांपडल्या त्या फार चांगल्या आहेत. पुढें होईल वृत्त मागाहून लिहितों. हल्लीं कोंकणांत पाठवावयाकरितां लाखोटा पाठविला आहे ह हरकसा प्रविष्ट होय असें करावें. नीलकंठराव यांस आज बारा दिवस झाले. सर्व दानें ब्राह्मणांस दिलीं. कावेरीतीरीं उत्तरकार्य सांग झालें. ब्राह्मणांस दक्षिणाही विपुल दिली. कळलें पाहिजे. प्रस्तुत राजश्री भाऊसाहेब व बाबा व कोन्हेरराव, विनोबा, हरबाअण्णा व बाळ आह्मीं उभयतां सारी मंडळी क्षेमरूप आहों. बाबांचें शरीर मेहनतीमुळें

फार कृश आहे. एक वेळ भोजन पूर्ववत्प्रमाणेंच होतें. विदित होय. सारांश यंदां छावणी झाली तर फौजेचा बखेडा होईल. लोक कोणी रहात नाहीं ह्मणोन आपले जागां बोलतात, अर्थी पाहतां राहणार नाहीं असें दिसतें. निदान सात आठशें स्वार असामधणी राहिले तर फार थोडके राहून स्वरूप रहात नाहीं. एक वेळ घरीं जाऊन आबांची व यांची भेटी व सारा बंदोबस्त झाल्याविना ठीक होणार नाहीं. आणि चेंगटाशीं गांठ आहे. तो आहे तो सर्वांस ठाऊक आहे. असें असून रावसाहेब नीलकंठराव उभयतां कैलासवासी न होते तर छावणीस रहावयाचा संतोष असता. त्याचप्रमाणें फौजही दिलगीर आहे. फौजेचें कामकाज चांगलें झालें तर कोणास बक्षीस देणें अगर चार रुपये अधिक आगळे खर्चावे त्याचप्रमाणें समजोन थोडेबहुत बाबा देतात. परंतु आपली आबाची बाबांची त्रिवर्गीची गांठ पडून देणेंचा प्रकार उमजेल तो फार उपयोगी पडेल. सर्व जाण आबा व आपण असा. छावणी न व्हावी असें सर्वांचें मानस आहे. छावणी झालेनंतर पुढें ईश्वरइच्छा प्रमाण आहे! कळलें पाहिजे. बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद. लोकांकडे देणें घेणें आहे त्याची काळजी न करावी. फडशा होतेसमयीं सारा गुंता उरकून घेतों. राजश्री संताजी मोहिते यांजकडे रुपये येणें त्याचें कसें काय केलें तें लिहावें. राजश्री गुजाजी शिंदे हैसाळकर यांजकडे सरकारचे पांचशें रुपये येणें होते ते त्यांणीं आपणाजवळ देऊन पावती आणिली आहे. आपणाजवळ पांचशें चार रुपये मशारनिल्हेनीं दिले ते मुद्दल पांचशें व व्याजापैकीं चार येणेंप्रमाणें पथकाकडे जमाखर्च करवावा. बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद.

श० १६९३ हैदरअलीवर तिसरी स्वारी. इ. स. १७७१

नं० ११२४ श्रीगणपति. ( चैत्र शु० पंचमी. २१ मार्च. )

पुरवणी राजश्री त्रिंबकराव विश्वनाथ स्वामी गोसावी यांसीं.—

विनंती उपरी. मनसुबीयाचा प्रकार—कर्तव्यता कोणती करावी, तद्‌विषयींचें उत्तर अलाहिदा पुरवणींत लिहिलें आहे त्याजवरून कळेल. सारांश तुह्मींच पट्टणाजवळ राहून जप्ती करावी असा अर्थ नाहीं. दहा हजार फौज व एक सरदार पट्टणासमीप ठेविलियानें तो हैदराचे प्रयत्न दूर करील. जप्ती करील. पैकाही घेईल. तुह्मीं राहिली फौज घेऊन बिदनुरास जावें. तुमच्या दबावानेंच बिदनूर हस्तगत होईल. कदाचित् बिदनूर झाडीची जागा, बळ धरिलें तरी कुलठाणीं तुह्मीं घ्यावीं. दोन महिनेचा अवकाशही आहे. ठाणीं मजबूद करावीं. पांच हजार फौज ठाण्यांच्या उपराळियास ठेऊन तुह्मीं पट्टणास गेलां तरी सोईस पडेल. एकून दोन्हीही कामें होतात ऐसें बुद्धीचे वाटेनें दिसतें. तुह्मीं तिकडे आहां, तिकडील राजकारणें, मनसुबा, कर्तव्याकर्तव्य, करणें न करणें, हें सर्व तुमच्या चित्तींही येत असेलच. तात्पर्य हैदराचे कलीजे बेंगरूळ, पट्टण, बिदनूर हे तीन जागे. त्यांत बेंगळूर ( येथें तर ) चारा दाणा नाहीं, पाणीही तसेंच, जागा मजबूद. यास्तव तो तूर्त राहिला. पट्टण तों सर्व प्रकारें बळकट. बिदनूर झाडीनें अवघड. आवईनें घेतां सोपें. यास्तव बिदनूरचें कार्य करणें करण्यास सोय वाटते. यांत तुमच्या विचारें उचित असेल तें पाहूनच कर्तव्य तें करावें. करालच. बिदनूर सध्यां अल्पायासें साध्य होईल. फुरसत पडली आहे. (शत्रूची फौज ) जमालियावर अवघड पडेल हे सर्व बारीक बारीक रीतीनें भाव चित्तांत आणून करावें. जाणिजे. छ ४ जिल्हेज. बहुत

---

१. मूळ पत्र पेशव्यांचें त्रिंबकराव मामास होतें, त्याची ही नक्कल परशुरामभाऊचे हातची आहे.

काय लिहिणें (खास दस्तुर) सारांश पट्टणास तुह्मीं न गुंतावें. सोईस आल्यास कांहीं फौज एक सरदार चवकीदाखल पांच सात हजारानिशीं ठेवावा. तुह्मीं बिदनुरासच परिछिन्न यावें. बिदनूर दोन महिनेंत घ्यावेंच घ्यावें. दुर्गवाल्यास सामील करून घ्यावें. कदाचित् पट्टण हैदरखानसुद्धां रिकामें पडेल. पुढें बळावेल. याचे प्रकार सविस्तर लिहिलेच आहेत. तत्रापि एक एक पक्ष उणा होत चालिला असतां अशी काय शक्ति त्याजमध्यें! तथापि दोन महिन्यांत बिदनूरचें कार्य झाल्यावर इकडे कांहीं मजबुदी झाली तर तुह्मांस अगाध पडणारही नाहीं. यास्तव सर्वथैव बिदनुरासच जावें. पट्टणास न गुंतावें. हे विनंती.

नं० ११२९ श्री. (२६ मार्च.)

चिरंजीव राजश्री बाळासाहेब यांसी प्रती वासुदेव धोंडदेव. आशीर्वाद उपरी. येथील कुशल तागायत शुद्ध दशमीपावेतों मुक्काम श्रीरंगपट्टण यथास्थित असे. विशेष. अलीकडे आपणाकडून पत्र येऊन वर्तमान कळत नाहीं. ऐशास येणारा माणसासमागमें पत्र पाठवून संतोषविलें पाहिजे. इकडील वर्तमान तरी हैदरखान दहा हजार गाडदी व दोन हजार स्वार व टिपूमिया, मीरफैजुल्लाखान येणेंप्रमाणें पट्टणांत आहेत. बाहेर साऱ्या फौजा आहेत. नित्य दोनशें तीनशें तोफांचे गोळे दोहीकडील होतात. दक्षिणेचे मार्गें कावेरीचे पार आमची फौज व आनंदराव गोपाळ येणेंप्रमाणें आहेत. पश्चिमेस रास्ते उतरले. पूर्वेस हुजुरात व मुरारराव घोरपडे तोफखाना बुनगेंसुद्धां आहेत. महागाई फार झाली आहे. तांदूळ एक पायली. जोरी दोन पायली. कुळथी दोन पायली. साळी ८।१ हरबरे ८८१। गूळ ८८।।।. तेल ८८२।।. दूध ८८२।।८८३ लोणी ० माळवें ० येणेंप्रमाणें आहे. गवत लांबोन दोन मजलीवरून चेन्नापट्टणचे मार्गें येत आहे. आठा चौ रोजां महा-

गाई व गवत नाहीं याजमुळें फौजा उठोन जावयास लागतील. मोठी मसलत पडली आहे. हैदरखान राज्यांतील मादर++ आहे तो सल्लाही करणार नाहीं. पाऊसकाल समीप आला आहे. कदाचित् मोर्चांनी निकड करावी तर एक वेळ एक जागां जाऊन दोन तीनशें तोफ सुटत आहे. त्याजमुळें मोर्चे चालत नाहींत. हे दुरोन गोळे मारितात ते कारागार होत नाहींत. जागा अवघड. दोहींकडून कावेरीचा प्रवाह आहे. दगड भारी आहेत. येणेंप्रमाणें वर्तमान आहे. आपण सदोदित पत्र पाठवून सांभाळीत जावें. लोकांकडे देणें येणें आहे त्याची यादी मागाहून लिहितों. कोंकणचीं पत्रें पाठविलीं आहेत हीं पावतीं होऊन जाब आला पाहिजे. बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद.

नं० ११२६ श्री. ( २६ मार्च. )

चिरंजीव राजश्री तात्यासाहेब यांसी प्रती वासुदेव धोंडदेव आशीर्वाद. विनंती. येथील कुशल तागायत चैत्र शुद्ध दशमी पावेतों मुक्काम श्रीरंगपट्टण यथास्थित असे. विशेष. अलीकडे आपणांकडून पत्र येऊन वर्तमान कळत नाहीं. ऐशास आलिया माणसासमागमें सविस्तर वृत्त लिहीत असलें पाहिजे. इकडील वर्तमान तरी हैदरखान मोडून आला तो पट्टणांत आहे. हे बाहेर आहेत. दिवसांमध्यें शेंदोनशें गोळे उभयपक्षीं सुटतात. आंतून कोणी सलुचाची गोष्ट बोलत नाहीं. राजश्री मामाहही ( वेढ्यास ) बसोन विचार पडला आहे. वैरणी दोन मजली वरोन येतात. दाणा जोरी ८८= कुळथी ८८= हरभरे ८८१।. तांदूळ ८८१८।।।. तूप ८८।९८।।. तेल ८८=।।. मीठ ८८१।. गूळ ८८।।।८८१. सांबे ८८१. भाजीपाला ० येणेंप्रमाणें धारण आहे. आठ पंधरा दिवस धारण खातील. उपरांत सहजच उठोन जावें लागेल. हैदरखानही दोन महिने सल्ला करीत नाहीं. उपरांत पाऊस पडेल तेव्हां सहजच चार मास गल्ला राहिला. पुढें बाजत बरसात घडेल तें खरें!

वरकड नवल विशेष बाबासाहेबांचे पत्रीं लिहिलें असले त्याजवरून विदित होईल. जखमी लोक झाले व ठार घोडीं जखमी व ठार त्यांची याद अलाहिदा पाठविली आहे त्याजवरून कळेल. आह्मीं आपले आज्ञेप्रमाणें श्रीमंत कैलासवासी रावसाहेबांचे मर्जीप्रमाणें वर्तणूक करून होतों. प्रस्तुत बाबासाहेबांचे मर्जीप्रमाणें वर्तत आहों. कृपा करितात. हल्लीं कोंकणचीं पत्रें पाठविलीं आहेत. प्रविष्ट करावीं. विदित होय. हे आशीर्वाद.

नं० ११२७ श्री. (चैत्र शुद्ध त्रयोदशी.
२८ मार्च.)

राजश्री वामनराव स्वामीचे सेवेशीं.

विनंती[1] उपरी. आपण राजश्री शिवाजी बाबाजीस पत्र पाठविलें तेथें लिहिलें कीं हैदरखानाकडील दोनशें बैल कही हैसूरचे दक्षिणेकडे भरून येत होती ते लुटून आणिली. त्याजवरून तेच चिठी मजारनिल्हेनीं पहावयास पाठविली त्याजवरून कळलें. अशास इतके दिवस फौज समीप नव्हती याजमुळें हैदरखानाची कही रानबिगत चोरी छपीनें जात होती. याजकरितां समीप फौज ठेऊन याचप्रमाणें एक दोन जागां कही लुटून पट्टणांत पोहचूं दिली नाहीं ह्मणजे सहजांत दहशत खाऊन कही बाहेर जाऊं येऊं पावणार नाहीं. येविशींचा बंदोबस्त जरूर झाला पाहिजे. नवल विशेष लिहावेसें नाहीं. असता मजकूर तर लिहिला असता. रवाना छ ११ जिल्हेज हे विनंती.

नं० ११२८ श्री. (चैत्र वद्य.
एप्रिल १० पंधरवडा.)

विज्ञापना[2]. गायकवाडाची फौज व नरसिंगराव धायगुडे व आपाजी-

---

१. चिठी त्रिंबकराव मामाची. २. पत्र शिवाजी बावाजीचें वामनरावास.

पंत बिनीवाले मदुरास गेले होते त्यास पांच सात तोफांचे गोळे सुटतांच (तेथील लोक) कौलास आले. ठाणें बसलें. चेन्नापट्टण वगैरे आणखी ठाणीं घ्यावयास जाणार होते. सल्लयाचे बोलीचें सेनापतीकडे सूत्र आहेच. राजश्री मामाकडेही आहे. परवांपासून शामराव गोपाळ यांणीं रास्ते यांजकडे (आणखी सूत्र) लाविलें आहे. माधवराव देशपांडे इंदापुरकर रास्ते यांजकड आहेत. शामराव नरसिंगपुरचे. एकास एक सोईरेधायरे, यास्तव माधवराव यांणीं रास्ते यांजकडे सूत्र आणिलें. ब्राह्मण बातेरी अलीकडे येऊन माधवराव यांसीं बोलून गेला आहे. शामराव आल्यावरी भलता प्रकार तोडमोडीचा व्हावा, त्यास श्रीमंताकडील पत्रें आल्याखेरीज राजश्री मामा आपल्या तर्फेनें बोलत नाहींत. आह्मीं (त्रिंबकराव मामास) काल सांगितलें "सूत्र लागते त्यास (त्याची) अनास्था करूं नये. बोली चालीवर घालावें. (मुलुखगिरीचे) दिवस एक महिना राहिले. श्रीमंतचें उत्तर येईतों बोलण्याचालण्याची चालना करावी. इतक्यांत श्रीमंतांचें पत्र आलें ह्मणजे त्याअन्वयें सल्ला करावा. श्रीमंतांची मर्जी सल्ला करूंच नये असें झालें तरी—इतक्या पैक्यावरी बोलत नाहीं. भारी बेरीज घेऊं—ह्मणावें. आणि तो डाव कोठपावेतों बोलतात हें मनास आणावें. ठराव झाल्यापासून पैका घेण्यास निःशेष मास पक्ष लागणार. दिवस किती राहिले आहेत?" असें बोलिल्यावरी (त्यांनीं) उत्तर दिलें कीं, 'सांडणीस्वार आज उद्यांत येतील. व कोणाचे विद्यमानें काय बोलतो हेंही अतःपर मनास आणितों.' असें उत्तर दिलें. तिकडील कहीविशींचा बंदोबस्त आपण करीतच आहां. परंतु चार दिवस मेहनत पडेलच. मेहनत करून कही आंत जाऊं न पावे असा बंदोबस्त केल्यानें फार उपयोगी सर्व गोष्टीस पडेल ह्मणोन बहुता प्रकारें लिहावें ह्मणोन आह्मांस सांगितलें. आज संध्याकाळचे अथवा उदईक तिकडे राजश्री मामा येणार आहेत. तोफखान्याचें

कूच होऊन डोंगराजवळ येणार. पहिला तोफखाना होता तेथें रास्ते रहावयास जाणार. आमचा मुक्काम येथेंच आहे. राजश्री देवराय याणीं घोड्याचा मजकूर सांगितलाच असेल. आज्ञा झाली तरी दाण्याचा पैका घेऊन घोडें हवालीं करूं राजश्री मामांनीं एक दोन वेळां आह्मांस सांगितलें यास्तव लिहिलें आहे. देवजी चोपडे यांजकडे उंट सांपडला त्याजविशीं राजश्री कृष्णराव तोफखान्याची व सखाराम हरी यांची चिठी आली ती पाठविली आहे. आह्मीं जाबसाल केला परंतु गहाणाचा आहे. किंमत देऊं ह्मणतात. त्यांस पुसोन पहावें. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना. लढाईंतील जखमी व ठार घोडीं माणसें यांच्या यादी दरबारांत आणविल्या त्यांजवरून तीन पथकांच्या यादी व सरतेरीज दिलें. राजश्री बाजीपंत अण्णानीं पाहिलें. ह्मणत होते जे 'याप्रमाणें घोडीं व माणूस ठार दुसरे यांजकडील नाहीं. घोड्यांचा पेंच तुह्मांवरी भारी पडला.' जखम्यांतील पंचवीस पावेतों मरतील ह्मणून सांगितलें. राजश्री मामा सारे फौजेच्या यादी आकारून दाखवून पुण्यास पाठविणार, त्यांत आह्मांकडील जाया ठारविशीं आगळीक आमची आहे (असे लिहिणार!) हे विज्ञापना.

नं० ११२९ (चैत्र वद्य.
एप्रिल प० पंधरवडा.)

शिवाजी बावाजीचें वामनरावांस पत्र.

त्रिंबकरावमामाकडे काल गेलों होतों नित्य जात असतों पुण्याहून पत्रें अद्यापि आलीं नाहींत आलीं ह्मणजे जसा मनसबा करावयाचें ठरेल तसें होईल. आपाजीपंत व भापकर गेले होते ते मदुराअलीकडे सहा कोसांवर एक ठाणें होतें तें घेऊन आले. मदुरा व चेनापट्टण घ्यावयास चार तोफा व पांच हजार फौज आज जाणार आहे. मामानीं सांगितलें आहे कीं लक्ष्मणपंतास (लक्ष्मेश्वराच्या मामलेदारास) पत्रें पाठवून

हजार पांचशें प्यादे जे मिळतील ते आणवावे. मी बोललों कीं पत्रें जाऊन प्यादे यावयास महिना दीड महिना अवकाश पाहिजे. ते येत-पर्यंत कदाचित् तहाचें बोलणें उरकेल. मग प्याद्यांचा रोजमुरा कोण देईल? त्यावर मामा बोलिले कीं, 'तह ठरला तरी प्याद्यांचा रोजमुरा आपण चाकरीस ठेविल्यापासून झाल्या दिवसांचा देऊन टाकूं.' याक-रितां स्वामींनीं लक्ष्मेश्वरास राजश्री लक्ष्मणपंतास प्याद्यांकरितां जरूर पत्र पाठवावें.

नं० ११३०

(चैत्र वद्य.
एप्रिल प० पंधरवडा.)

गोविंद हरीचें वामनरावास पत्र.

"चिरंजीव आबानीं पुण्यास रामाजी गणेश पाठविले आहेत. तुम-च्याच आगमनाचा प्रकार सुचविला होता. व राजश्री मोरोबा दादा-सही सुचविलें होतें. त्याचा[1] अर्थ कीं "राजश्री त्रिंबराव मामानीं नेट धरून साहेब कामास गुंतले असतां नामी सरदारानीं कसें यावें? बोढींत बोढ करून रहावें. पूर्वीं त्यांनीं लौकिक संपादिला. प्रस्तुत यांणींही सेवा शर्तमर्दीनें केली. हेंही श्रीमंतांच्या प्रत्ययास आलें असतां शह सोडून येऊं नये." असे भाव राजश्री रामाजीपंतीं दर्शविले आहेत. विचारें पाहतां ते गोष्टी यथार्थच. परंतु शह कांहीं पांच सात महि-न्याचा नव्हे. दोन महिन्याचा शह. त्यांत चैत्र गुदरला. वैशाखही गुदरल्यादाखलच आहे. इतक्यांत कांहीं विवेक झाला तर उत्तम. न होय तेव्हां (श्रीरंगपट्टणास) बसोन लष्करची खराबी करून (मामा) तेथेंच बसतील असा अर्थ नाहीं. तेथें बसून साध्य नाहीं. त्याजपाशीं[2] कांहीं फार फौज नाहीं. तेव्हां त्याणें चळवळ कशी करावी! सहजच

१. आह्मीं सूचना केल्यावर श्रीमंतांचें उत्तर झालें त्यांतील तात्पर्य. २. हैदरापाशीं.

राजश्री मामासाहेबांस रहावयाची आज्ञा असली तर राहतील. नवी फौज आहे. जुन्यापैकीं कांहीं ठेऊन घेणें तर घेतील. तुह्मांस परिच्छिन्न निरोप देतील असा विचार दिसतो."

नं० ११३१ श्रीगणपति. (११ एप्रिल.)

श्रियासह चिरंजीव पंढरीनाथ× तात्या व राजश्री गंगाधरराव यां प्रती परशुराम रामचंद्र. आशीर्वाद. उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहीत जावें. विशेष. मिरजेहून वडिलांचीं[1] पत्रें आलीं त्याजवरून सविस्तर कळलें. इकडील वर्तमान तरी लढाईचें व तीर्थस्वरूप राजश्री नीलकंठरायाचें[2] वर्तमान पेशजी पत्रें पाठविलीं आहेत त्याजवरून कळलेंच असेल. ईश्वरें मोठा घात केला. ते तो स्वामी कार्यावरी पडोन उत्तम गतीस गेले. पुण्यपुरुष होते. उत्तम काल झाला. परंतु आह्मां सर्वांस दुःखार्णवीं घातलें! तीर्थस्वरूप दादांचे[3] मागें सर्व प्रकारें रायाचा आधार होता तें श्रीचे चित्तास न आलें! आह्मांस परदेशी केलें आणि वृद्धापकाळीं वडिलांसीं दुःख दिलें! इलाज नाहीं. जें जे कालीं भोगणें असतें तें भोगल्याखेरीज चुकत नाहीं. होणार तदनुसार झालें. इलाज काय आहे! आह्मीं विवेक करितों. आणि वडिलांचे मागें वडिलांचा नक्ष (आमचे हातून) श्री दाखवील तो खरा! तुह्मीं विवेक करावा. वडिलांचें चित्त शांतवन करावें. एकावर एक दुःखाचे पर्वत येऊन पडतात! काय करावें! विवेक करावा. वडिलांचें उत्तरकार्य यथायुक्त चिरंजीव रांघोबा[4] करवीं केलें. मागानीं पट्टणास तोफा लाविल्या आहेत. आह्मांस व राजश्री आनंदराव गोपाळ यांस पट्टणचे दक्षिणेकडे पाठविलें आहे हें सविस्तर वर्तमान तीर्थरूप राजश्री

× पंढरीनाथ तात्या व पांडुरंगराव गोविंद एकच. १. गोपाळरावांचे. २. नीलकंठरावाचा. ३. नीलकंठरावाचे. ४. हा नीलकंठरावाचा मुलगा.

नानांचे पत्रावरून कळेल. आतां तात्या ! आबा ( व ) आपण मिळोन जेणेंकरून ( आमचें ) घरास येणें घडे आणि वडिलांची भेट होय तें करावें. तेणेंकरून सरदारीचाही बनाव होईल. नाहीं तरी मग फजीति आहे ! श्रीसत्ता प्रमाण. उपाय करणें. बहुत काय लिहिणें लोभ असों दीजे हे आशीर्वाद.

सेवेशीं चिंतामण रामचंद्र साष्टांग नमस्कार. इकडील वृत्त श्रीमंतांनीं लिहिलें आहे त्याजवरून विदित होईल. ईश्वरें मोठा घात केला. उपाय नाहीं. होणार चुकत नाहीं. आपण विवेकी आहां. विशेष काय लिहिणें हे विनंती.

नं० ११३२ **श्रीगणराज.** ( ११ एप्रिल. )

श्रियासह चिरंजीव राजश्री पंढरीनाथ तात्या यांसीं प्रती वामनराव गोविंद[1] आशीर्वाद उपरी. येथील कुशल तागायत चैत्र वद्य द्वादशी मुक्काम श्रीरंगपट्टण जाणोन वर्तमान यथास्थित असे. विशेष. इकडील वर्तमान तर फाल्गुन वद्य सप्तमी गुरुवारीं हैदरखान याची लढाई झाली. शत्रु पराभवातें पावोन खासा पंचवीस स्वारांनिशीं पट्टणास गेला. रात्रीं टिपू गेला. हें वर्तमान तपशीलवार पेशजीच्या पत्रीं लिहून पत्रें पाठविलीं तीं पत्रें पावलींच असतील. त्यावरून विस्तारें वर्तमान कळों येईल. तदनंतर फाल्गुन वद्य दशमी पट्टणच्या पश्चिमेस किल्ल्यास लगत कावेरीच्या पाण्यावर मुक्कामास आलों. पांच सात मुक्काम झाले. राजश्री त्रिंबकरावमामानीं शहराभोंवता तलावा करून लाग भाग पाहिला. संवत्सर प्रतिपदेस कूच करून किल्ल्याच्या पूर्वेस उतरलें. आह्मीं तेथेंच राहिलों होतों. राजश्री मामानीं किल्ल्याच्या

---

१. गोविंद हरीच्या.

उत्तरेस तोफा लागू केल्या. रात्रंदिवस छबिन्यास फौजा उभ्या असतात. प्रतिपदेस रात्रीं फौजेवर हैदरखानानें तोफा व बाण टाकून गडबड केली. रात्रीचा गोट मामाचा आवळून होता. त्यांच्या यांच्या तोफांचे जाबास जाब उतरले. तोच मुहूर्ते करार होऊन द्वितीयेस किल्लयास तोफा लागू केल्या. तोफांचे गोळे राजवाड्याजवळ जाऊन किल्लयांत पडतात. हैदरखान बातेऱ्या बळावून शहराचा बंदोबस्त करून राहिला. तहाचा प्रकार तिळांश बोलत नाहीं. तूर्त किल्लयांत जमाव स्वार तीन हजार व गाडदी झुजांत मोडून आलेले चार पांच हजार व किल्लयांतील लोक मिळोन दहा बारा हजारपर्यंत गाडद्यांचा जथ पडला आहे. (त्याजवळ) देशींचे स्वार आहेत. ते तळाव्याचें निमित्य करून बाहेर येतात त्यांपैकीं एकटे दुकटे निघोन (इकडे) येतात. असें आहे. किल्लयाच्या पश्चिमेस होतों तेथें तीर्थस्वरूप नीलकंठरायाच्या दशेचा गुंता उरकोन शुद्ध तृतीया मंगळवारीं राजश्री मामाजवळ आपल्या विल्हेस उतरलों. आह्मांस किल्लयाच्या दक्षिणेस ह्मैसूरचा मार्ग रोधून रहावयाकरितां समागमें राजश्री आनंदराव गोपाळ यांची फौज दिली. षष्ठी गुरुवारीं सड्या फौजेनिशीं नेमिलेलीं पथकें व आमची फौजसुद्धां भोजनोत्तर गेलों. ह्मैसुराकडून रस्त येणार व कही किल्लयांत ते आणितात याजकरितां किल्लयाचे दक्षिणेस ह्मैसूरच्या मार्गावर तळावा करून आहों. शहरांत रुपयास रागी पांच शेर, तांदूळ दीड शेर, कुळथ्या चार साडे चार शेर, येणेंप्रमाणें धारण आहे. आमच्या लष्करांत धारण सव्वादोन पायली, कुळथ्या व रागी बारा तेरा पायली, तांदूळ चार पांच शेर, तूप अडीच रुपये शेर मिळत नाहीं! गूळ सव्वाशेर रुपयाचा. धारण याप्रमाणें आहे. तृणाचें संकट. दहा बारा कोस कहीस जातात. गवत मिळत नाहीं. घरावरील कैंबळ आणितात. बैदे[1] तट्टें पाडून नेतात. वस्तीनें[2] कही येत असते.

---

१. कानडी पेंढारी. २. एकमजली नव्हे. वाटेंत वस्ती करून.

राजश्री मामांनीं शहाचा प्रकार केला पण मुख्य तृणावांचून घोडीं गुरांची सोय नाहीं. असा प्रकार झाला आहे. त्यांत घडतां घडेल तें प्रमाण! वरकड साद्यंत तपशीलवार तीर्थस्वरूपांच्या पत्रावरून कळों येईल. एका चिंतार्णवीं होतों तों भगवंतें हें दुसरें निर्मिलें! तीर्थस्वरूप नीलकंठरायांनीं उत्तम लोक जवळ केला. परंतु वृद्धापकाळीं उभयतां तीर्थस्वरूपांस दुःखसागरीं घातलें! आह्मांस कोणेविशीं चिंता नव्हती. तीर्थस्वरूपांच्या[1] मागें चाकरी व प्रवास असा ( नीलकंठरायानीं ) कळों दिला नाहीं. त्यांचा आमचा ऋणानुबंध तितका! काय करावें! ईश्वरी इच्छेस उपाय नाहीं. श्रीसत्ता तेंच प्रमाण. आह्माविशीं कांहीं काळजी न करणें. शरीरप्रकृतही बरीच आहे. बहुत काय लिहिणें लोभ असों दीजे हे आशीर्वाद. राजश्री शहाजी भापकर यांजकडे दोन हजार रुपये येणें तो ऐवज वसूल करावा ह्मणून पेशजीं लिहिलें होतें, त्यास मशारनिल्हेकडे कारकून पाठविला होता. त्यास ऐवज येथें मिळाला नाहीं. पुण्यास राजश्री हरी बल्लाळ मोवनी यांजवर चिठी लिहून दिली ती पाठविली आहे. राजश्री बापूजी बल्लाळ यांजकडे पाठवून ऐवज घ्यावा. हे आशीर्वाद.

नं० ११३३ श्री. ( चैत्र वद्य. एप्रिल ५० पंधरवडा. )

× राजश्री त्रिंबकरावमामाची छावणी झाली. छावणी न करितां इलाज नाहीं. ( शत्रु तर ) तह एकंदर करीत नाहीं. रुपया भारी देईना, लबाडीस आला आहे, यास्तव छावणी करणें प्राप्तच झालें. येथील माणसें पुढें रहावयाचीं नाहींत यास्तव माणसें आणवावीं. आह्मांपाशीं रवाना करून द्यावीं. चिरंजीव राजश्री वामनराव व भाऊ खुशाल आहेत.

---

१. गोपाळरावाच्या. × हें कोन्हेररावाचें त्र्यंबक हरीस पत्र.

छावणीचा प्रकार दिसून आला तर चिरंजीव बाळोंची रवानगी अमावास्या झालेवर एक दो दिवसांत करितों. तोंपर्यंत पत्रें आलें तर सर्वही येतों. आह्मांविशीं काळजी न करावी. अवसान सोडीत नाहीं. वडिलांचें पुण्य समर्थ आहे. सेवेशीं विदित होय हे विज्ञापना.

नं० ११३४ श्री. ( चैत्र वद्य अमावास्या.
१९ एप्रिल. )

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री त्रिंबक हरी स्वामी गोसावी यांसी.

पोष्य माधवराव बल्लाळ प्रधान नमस्कार विनंती उपरी येथील कुशल जाणोन स्वकीय लिहीत जावें. विशेष. नीलकंठराव हैदरखानाच्या युद्धांत निधन पावले. ईश्वरें मोठें अनुचित केलें. तुह्मांस वृद्धापकालीं दुःखाच्या कोटी झाल्या. ईश्वरी तंत्रास उपाय नाहीं. ज्या कालीं जें होणार तें अवश्यमेव होतें. तथापि नीलकंठरायांनीं अरिसमरीं नीट सन्मुख होऊन स्वामिसेवेवर जीवित्व तृणप्राय करून देहविसर्जन केला. 'मृत्युंचापि सुरांगनाः' हेंच लक्ष त्यांचें. तद्योगें तसेंच घडलें. झाल्या गोष्टीचे श्रम केल्यास श्रमाची सार्थकता येत नाहीं. एतद्विषयीं विवेकच प्राधान्य आहे. तुह्मीं विवेकी आहां. विवेक करून परिमार्जन करावें. नीलकंठरायांनीं सर्व प्रकारें सार्थकच केलें. अतःपर श्रम न करावे. जाणिजे. छ २९ जिल्हेज. सुरु सन इहिदे सबैन मय्या व अल्लफ. बहुत काय लिहिणें. हे विनंती.

पै।। छ ७ सफर सन्न मजकूर.

---

१. रघुनाथराव नीलकंठ याची. हा पत्र लिहिणाराचा पुतण्या. २. सर्व फौजेस परत येण्याविषयीं श्रीमंतांनें पुण्याहून पत्र.

शा० १६९३ **हैदरअलीवर तिसरी स्वारी.** इ. स. १७७१

नं० ११३५ **श्री.** ( वैशाख शुद्ध तृतीया.
१८ एप्रिल. )

श्रीमंत राजश्री आबा[1] स्वामीचे सेवेशीं.

विनंती सेवक रामाजी[2] गणेश साष्टांग नमस्कार विज्ञापना येथील कुशल तागायत छ २ मोहरमपावेतों स्वामीच्या कृपेकरून वर्तमान यथास्थित असे. विशेष. इकडील वर्तमान पेशजीच्या पत्रीं लिहिलें आहे त्याजवरून सर्व कळेल. अलीकडील वर्तमान तर लष्करचीं पत्रें येऊन दोन तीन रोज झाले. राजश्री मामानीं लिहिलें होतें कीं, पट्टणास मोर्चेबंदी केली आहे. नदी उतरून दक्षिणेच्या अंगें श्रीमंत राजश्री वामनराव बाबा मंडळीसुद्धां व हरी गोपाळ यांचें पथक ऐसे नेहमीं चौकीस ठेविले आहेत. शुक्रवार पेठेकडून सरकारच्या तोफांचा मार होत आहे. आंत गोरगरीब फार आहेत. धारण महाग झाली आहे. त्यामुळें आंतील लोक गलबलले आहेत. कुगार ( ? ) लोक आंतून फार पळून येत आहेत. असा मजकूर आंतील आहे. हैदर-खान यानें बोलीचा संदर्भ लाविला आहे. पन्नास[3] साठपर्यंत बोलत आहे. मुलुख घेतला तो राहून[4] पन्नास साठ देऊन तह करावा असें बोलत आहे. मामाच्या लिहिल्यांत 'फार जेर झाला आहे यामुळें त्वरीतच फडशा व्हावा' असा प्रकार आहे. श्रीमंत राजश्री बाबा मंडळीसुद्धां दोन महिने आणवावे. मागील लोकांचा नालबंदीचा व मेल्या घोड्यांचा फडशा करून पुढील नालबंदी आपल्या हातून

---

१. मोरो बल्लाळ. २. पटवर्धनांचा एक कारकून. ३. पन्नास साठ लक्ष रुपये-पर्यंत खडणी. ४. राहून कोणाकडे? पेशव्यांकडे कीं हैदराकडे? कारण मुख्य नड आतां खंडणीच्या रकमेची नव्हती. पेशव्यांचा आग्रह जिंकिलेला मुलूख सोडावयाचा नाहीं व हैदराचा आग्रह मुलूख परत मिळाल्याशिवाय तह करावयाचा नाहीं, अशी स्थिति होती.

देल्यानें लोकांचा आळा बसेल. मग जिकडे आज्ञा होईल तिकडे जाण्यास गुंता नाहीं. ऐसे कित्येक प्रकार बारीक मोठे दादांशीं बोललों. त्यास श्रीमंतांची मर्जी कीं, हैदरखान पट्टणांत कोंडला आहे तेव्हां त्याचा कोणी एक प्रकार होणें तो त्वरितच होत आहे. गांवींचे सरदार आजच आणिल्यानें ठीक दिसत नाहीं. जरीकरितां हैदरखानाचा फडशा थोड्याच दिवसांत झाला तर मग भारी फौज छावणीस रहावयाचें प्रयोजन नाहीं. त्यास याचा विचार आठ पंधरा दिवसांत कळतच आहे. मग आज्ञा कर्तव्य तें करूं. येविशींचा मजकूर श्रीमंतांनीं पत्रीं लिहिला आहे त्यावरून कळेल. काल सांडणीस्वार श्रीमंतांनीं मामाकडे रवाना केला. पैक्यावर ठराव झालिया करावा अशीही मर्जी आहे. भारी खंडणी झाली तर करावी असाही मजकूर आहे. श्रीमंतांनीं आपणास बलावण्याविशीं पत्रें लिहिलीं आहेत व राजश्री मोरोबा दादांनीं पत्र लिहिलें आहे तें अशीं पत्रें पाठविलीं आहेत त्यांवरून कळेल. राजश्री दादांच्या मतें तात्यांसही आणावें असें आहे. तीर्थस्वरूप राजश्री आपांस सरकारचें पत्र आहे व दादांचेंही आहे तें सरकारचे मातबर गृहस्थाबरोबर एक दोन रोजांनीं रवाना करितों. श्रीमंतांची शरीरभावना आहे तशीच आहे. दरबार होत नाहीं. कोणाचा सवालजाब होत नाहीं. शरीरांत विकृत, चित्त स्वस्थ नाहीं, पुण्यांत राहणें गोड वाटत नाहीं, मर्जीस येतें तेव्हां बाहेर निघावें, कोणाचें फारसें ऐकूं नये, अशी क्षणभंगुर मर्जी झाली आहे. द्वितीयेस दादांच्या बागेंत डेरे दिले आहेत. पंचमीस डेऱ्यास येणार. तेथें आपण व हरीपंत

---

१. पेशव्यांचे कारभारी मोरोबादादा फडणीस यांशीं. २. लौकिकाचे. ३. मोरोबांनीं पुण्यास येतांना बरोबर पांडुरंगराव तात्यांसही आणावें. ४. मोरोबादादा फडणीस यांच्या.

तात्या याशिवाय दुसरें नये कामास, अशी आज्ञा झाली आहे. असा प्रकार झाला आहे. मातुश्री बाई[2] गंगापुराहून आल्या. श्रीमंत राजश्री धाकटे राव[3] व राजश्री गोविंदपंत तात्या सामोरे गेले आहेत. पंचमीस शहरांत येणार. वरकड मजकूर मागाहून सविस्तर लिहितों. श्रीमंत राजश्री भाऊंनीं[5] पत्रीं लिहिलें होतें कीं, वैशाखी पौर्णिमेपर्यंत वाट पाहून मग उठोन येतों असा प्रकार लिहिला होता. त्यास न कळे तुह्मांस लिहिलें यामुळें उठोन येतील. यास्तव त्यांस स्वामींनीं लिहावें कीं, 'श्रीमंतांनीं आह्मांस बलाविलें आहे. आह्मीं पुण्यास जातों. तेथें गेलियावर तुह्मांस लिहिणें तें लिहूं. तोंपर्यंत उतावळी करूं नये.' ऐसें लिहावें. स्वामींनीं तो लिहिलें असेल, परंतु सुचला मजकूर लिहिला आहे. श्रीमंतांची मर्जी एक प्रकार झाली आहे. आजपर्यंत दम धरिल्या मग उतावळी करितील यास्तव विनंती लिहिली असे. हीं पत्रें पावलियावर निघावयास दिवसगत करूं नये. सत्वरच निघोन यावें. पुढें पर्जन्यकाल समीप आला. येथें येऊन भेटी घेऊन चारी जाबसाल लढ्याचे असतील ते समक्ष उलगडून घेतले ह्मणजे जाण्यास विलंब पडणार नाहीं. राजश्री गोविंदराव[6] चिंतामण येथें आले. राजश्री दादांची भेटी झाली. आपली व दौलतरावांचीं पत्रें दिलीं. थोडें बहुत त्यांजकडील बोलणेंही झालें आहे. आपण आलियावर सर्व गुंते विल्हे लागतील. बहुत काय लिहिणें लोभ असों दीजे हे विज्ञापना.

नं० ११३६ श्री. ( २४ एप्रिल. )

चिरंजीव राजश्री बाळासाहेब यांसीं प्रती वासुदेव धोंडदेव. आशी-

---

१. फडके. २. पेशव्यांची आई गोपिकाबाई ३. भावी पेशवे नारायणराव. ४. खासगीवाले. ५. परशुरामभाऊनीं लष्करांतून. ६. हा मोरोबा पटवर्धनांच्या शिफारसीनें पुण्यास गेलेला दौलतराव घोरपड्याचा कारकून.

वाद विनंती येथील कुशल तागायत वैशाख शु० १० पावेतों मुक्काम सिदगट्टे यथास्थित असों. विशेष. आपण पत्र पाठविलें तें पावोन लिहिलें वर्तमान कळलें. हैदरखानाचा मोड होऊन पट्टणांत गेला. सर्वेच सरकारच्या फौजाही जाऊन पट्टणास मोर्चे लाविले. सव्वा महिना मोर्चे होते. पांच सात रोज सल्लयाची बोली ( त्यानें ) लाविली होती. राजश्री आनंदराव रास्ते यांचे विद्यमानें "पंचेचाळीस लक्ष रुपये तीन[1] सालें खंडणी देतों. त्यांत दोन चार ( लक्ष ) सूट[2] द्यावी. कां ह्मणावें तर आपली सारी सलतनत लुटली गेली. एका घोड्यानिशीं आह्मीं व टिपूमिया मात्र पट्टणांत आलों. तोफा, फौज, दारू गोळी, जामदारखाना, हत्ती, पागा, झाडून दौलत बुडाली. आपणांत पैसा द्यावयास ताकत राहिली नाहीं. गुरमकुंडा वगैरे वीस लक्षांचा तालुका गुदस्तां ( आह्मांपासून तुह्मीं ) घेतला. सालमजकुरीं निजगल वगैरे कावेरीपासून तालुका खराब झाला. असें असतां पंचेचाळिसांवर जाजती पैसा कसा मिळेल? सालमजकुरीं खंडणीची रयात करावी." असें मादर++पणाचें बोलणें बोलत होता. श्रीमंतांचे मर्जीजोगें बोलोन खंडणी चढ लावावी हें त्याचें मानस नाहीं. असें जाणून अक्षतृतीयेचे मुहूर्तें पट्टणाहून कूच करून माघारे मोतीतलावाचे मुक्कामीं लष्करें आलीं. ज्यापक्षीं सल्ला नाहीं तेव्हां तमाम ठाणीं घ्यावीं, या उद्देशें पट्टणचे पूर्वेस राजश्री नरसिंगराव घायगुडे व आपाजी बिनीवाले वगैरे मिळोन पांच हजार फौज मदूर चेनापट्टण वगैरे त्या प्रांतीं ठाणीं असतील तीं घ्यावीं ह्मणोन फौजा पाठविल्या. राजश्री मामा व सारी फौज सिदगट्टे, चेनराजपट्टण ( वगैरे ) कावेरीचे लगत ठाणीं कोडगांचे[3] सरदेचे आंगें आहेत तीं घ्यावीं. कोडगाचें राजकारण आलें आहे तेंही सिद्ध करावें. आणि

---

१. तीन सालें मिळून. २. माफी. ३. कोडग ह्मणजे कुर्ग. तेथील राजासही हेंच नांव पुढील वाक्यांत दिलें आहे.

मग कडूर, बाणावर, संकरापट्टण, तरीकिरें हीं ठाणीं घ्यावीं. चिकनाईकनहळ्ळी, तुरविकिरें, कडप, हगलवाडी, देवरायदुर्ग हीं राजकारणें झालीं आहेत व त्या प्रांतांत ठाणीं बसणार. बुध्याळांत ठाणें पेशजीच बसलें. प्रस्तुत चित्रदुर्गेकर पांच हजार प्यादेनिशीं आला आहे. समयोचित माणूस पार्यीचेंही विपुल आहे. रायदुर्गकरही दोन हजार प्यादेनिशीं येणार. सारा बंदोबस्त करून मग बेंगरुळास मोर्चे लावावे. अर्काटाहून महमदअल्लीचेंही सामान तयार झालें आहे. तें आल्यास मग कामच झालें. येणेंप्रमाणें मनसबा दिसतो. घडेल तें पहावें. आमचीं तिन्हीं पथकें सालमजकुरीं देशीं आल्यास उत्तम होईल. छावणीच झालिया पैका विपुल लागेल. आपले तालुक्यांत सालगुदस्त पाऊस दरोबस्त नाहीं. पिकें बुडालीं. तेव्हां रयतेकडून पैकाही झडत नाहीं. दोहींकडून संकट आहे. छावणीस रहावें तेव्हां दरमाहे रुपये ५०,००० लागतील. तपशील :—

८,००,००० सालमजकूर फौजेची व शागीर्द पैशा पागा नालबंदी रुपये सन इहिदे.

१५,२५,००० छावणी झाली तर पैका तपशील. दरमाही सालमजकूर.

६,००,००० रोजमुरा दरमाहे रुपये ५०,०००

८,००,००० नालबंदी फौजेची.

१,२५,००० पैडलीं घोडीं १५०

१५,२५,०००

---

१. मद्रासच्या इंग्रजांची फौज. २. लढाईत आपल्या पथकांतील घोडीं ठार होतील त्यांच्या मालकांस नुकसानीबद्दल द्यावयाचे रुपये. लिहिणारानें दीडशें घोडीं पडतील असा फक्त अंदाज केलेला आहे.

श० १६९३ **पट्टणचा वेढा उठतो.** इ. स. १७७१

येणेंप्रमाणें पैका अदमासें. यांत लाखपन्नास अधिक उणें. असा पैका लागल्या मसलत केवढी पडेल! आमचे खर्चाचे अजमास आह्मीं लिहिले याजप्रमाणें भाऊ व नीलकंठराव यांचे, असें ह्मणतां छावणी कठीण पडेल! बाबासाहेब व भाऊ व कोन्हेरराव त्रिवर्ग एक चित्तानें करणें तें व जाबसाल करीत आहेत. सारी मंडळी खैर आहे. पुढें होईल वृत्त तें मागाहून लिहितों. आपण सदैव पत्रीं सांभाळीत असावें. बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद.

नं० ११३७ **श्रीगणपतिर्जयति.** ( वैशाख शुद्ध. एप्रिल दु० पंधरवडा. )

आशीर्वाद उपरी. तुह्मांस कोडगास आणावयाकरितां पाठविले होते, परंतु कोडग न आले, माघारे गेले, त्याचा मजकूर विस्तारें लिहिला तो कळला. ' तिकडून येऊन पेरपट्टणास मोर्चे लावले. मागाहून राजश्री मामाही आले. दों चहू दिवशीं ठाणें ( हातीं ) येईल. ' ह्मणून लिहिलें तें कळलें. ठाणें घेतलें असेल. ' महिमाजी शिंदे याजवरी देवरायदुर्गकर यानीं येऊन छापा घातला. शिंदे यांस धरून नेलेचा प्रकार लिहिला तोही कळला. प्रस्तुत कोणे ठिकाणीं काय मसलत होत आहे तें सविस्तर लिहावें. सालमजकुरीं छावणी होणार नाहीं, तुमचें येणें होईल, असें ह्मणत होतों. परंतु तो प्रकार घडतां दिसत नाहीं! याउपर तुंगभद्रा वगैरे नद्या भरतील. मग येण्याचा प्रकार कळतच आहे! शिंदे यावर छापा पडला. तो पळाला किंवा कोणी धरून नेला किंवा ठार झाला हें वर्तमान तहकीक नाहीं. तोफा संभाळून लोकांनीं शिऱ्यांस नेल्या, उत्तम गोष्ट झाली. महिमाजी शिंदे यांचा मनसबा पोक्त नाहीं! शत्रूचीं ठाणीं समीप असून उगेच आले! होणारासारखी

१. गोविंद हरींचें वामनरावास पत्र.

बुद्धि झाली! बहुधा निघोन गेले असले तर बरें! राजश्री मामासाहेब तेथें आले, या उपरी स्थळ लवकरच हस्तगत होईल, ह्मणोन लिहिलें, उत्तमच आहे. स्थलें घेऊन राजश्री मामासाहेबानीं पुढें मनसबा काय केला न कळे! राजश्री आपाजीराम पुण्याहून पट्टणाकडेच गेले. तुह्मांस कळलेंच असेल. श्रीमंतांस पट्टणाहून कूच झाल्याचीं पत्रें राजश्री मामासाहेबांचीं आलीं असतील त्यांचीं उत्तरें काय लिहिलीं तें कळत नाहीं. इतकी फौज रहावयाचें कारण नाहीं. कार्याकारण फौज ठेऊन वरकड फौजेस निरोप द्यावा असें श्रीमंतानीं लिहिलें किंवा कसें? तुह्मांस निरोप द्यावा ह्मणून लिहिलें असलें तर एकाएकीं देणार नाहींत. नसलें लिहिलें तर कळतच आहे! श्रीपंढरीनाथ श्रीमंतांचे ह्रदयीं संचरोन आज्ञा लिहितील तें प्रमाण! गुदस्ताची नालबंदी देणें, पुढें रोजमुरे यांची बेगमी, गुदस्तांचीं घोडीं व सालमजकूरचीं घोडीं, ह्मणतां द्रव्य विपुल होतें. लज्जारक्षक श्रीभगवान् आहे. लोकांवरी तिलप्राय शब्द नाहीं. निरोप मागतील त्यांस द्यावाच लागेल. समाधानें राहतील ते राहतील. काळजी कोठवर करावी! बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद.

नं० ११३८ श्रीगणपतिर्जयति. (वैशाख शुद्ध. एप्रिल दु० पंधरवडा.)

आशीर्वाद उपरी. तुह्मीं पत्रें पाठविलीं तीं चैत्र वद्य १२ स पावलीं. लिहिलें वर्तमान सविस्तर कळलें. त्या अलीकडे पत्रें रवाना केलीं असलीं तरी या आठ रोजांत येतील. "पट्टणास तोफा लागू केल्या त्यामुळें आंतील लोक चलबिचल झाले, महगता आंत फार झाली, चौंकडून वाटाही बंद केल्या, कही कबाड आंत जाऊ पावत नाहीं,

---

१. गोविंद हरीचें वामनरावास पत्र.

बोलीचाही संदर्भ लागला आहे," ह्मणोन श्रीमंतांचे दरबारीं वर्तमान आहे. आजीपावेतों रफेदफे होऊन तेथून कूच झालेंच असेल. नसल्यास भलता एक प्रकार वैशाख पौर्णिमेपावेतों (होईल.) दाणा वैरणीचा तोटा असतां पट्टणावरी दीड महिना लष्करानें तवई सोसून कहव (?) केले ही गोष्ट भारीच झाली. श्रीकृपेनें तह झाला असिला तरी उत्तमच झालें. तह न होई त्यापक्षीं राजश्री मामासाहेब आणखी किती दिवस दम धरतील न कळे! लष्कराची सोय पाहतील. कदाचित् साहेब कामावरीच दृष्टि देऊन दम धरतील तरी अखेर वैशाख राहतील. पुढें तो राहणें होणार नाहीं. चैत्र वैशाख दोन महिन्यांत फार करून घोडें मरेल! पर्जन्यकाळ, धान्य महाग, तृणास ठिकाण नाहीं, तेव्हां सहजच निघतील! मुख्य गोष्ट शहावर बसले असतां लोकांस तो सोडतां नये. ज्याणें निघावें त्याणेंच बदनामीस पात्र व्हावें! चाकरी करून शरमिंदे व्हावें यांत कांहीं लौकिक नाहीं. आह्मीं श्रीमंतांस कितेक प्रकारें विनंती पत्र लिहिलें होतें त्याचें उत्तर आलें त्याची नक्कल व राजश्री मोरोबादादा यांचे पत्राची नक्कल पाठविली आहे. श्रीमंतांनींही त्यांस परस्पर लिहिणें तें लिहिलेंच असेल. परंतु ते शहवर असतां हर कोणास उतावळी करतां कामा नये हें सर्वांस कळोन गेलेंच आहे. शह सोडून निघालियावरी फार फौजेचा प्रकारच नाहीं. कार्याकारणें नवी फौज ठेवतील. आपणही राहणार तरी राहतील. तह झाला तरी गुंताच नाहीं. येविशीं चिरंजीव आबानीं लिहिलें आहे त्यावरून कळेल. चिरंजीव श्रीपतराव यास बरें वाटत नाहीं यामुळें तेही श्रमी. प्रस्तुत तुळा केल्या उपरी कांहींसा उतार आहे. चिरंजीव श्रीपतरायाच्या दुखण्यामुळें भवचक्रीं पडल्यासारखी सर्वांची गत झाली आहे. कांहींच सुचेना! सर्वांचा सूत्रधारी चिरंजीव आबा. त्याचें चित्त स्वस्थ नाहीं तेव्हां पुढें कसें होईल या चिंतार्णवीं पडोन श्रीस प्रार्थना करितों जे, श्रीपतरायास

आरोग्य व्हावें. पौर्णिमेचा धोका. पंधरा दिसां चढ होत असतो. पौर्णिमा टळली ह्मणजे कांहीं चिंता नाहीं. वांती तिडीक प्रस्तुत राहिली आहे. पौर्णिमा टळली ह्मणजे श्रीकृपा झाल्याच दाखल आहे. बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद.

पै।। छ २२ मोहरम. नवमी बुधवार. वैशाख कृष्ण.

नं० ११३९ श्रीगणपति. ( १० मे. )

अपत्यें[1] परशुरामानें दोनी कर जोडून साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत वैशाख वद्य एकादशी वर्तमान यथास्थित असे. विशेष. अलीकडील वर्तमान तर आह्मांस फौजसुद्धां कोडेंग[2] येणार होते त्यास आणावयास पाठविलें. दोन मचला कावेरीतीरीं बसवापट्टण आहे तेथपावेतों गेलों कोडगही तिकडून आला. उदईक भेटीचा योग घडावा तों कूच करून माघारा गेला. काय समजून गेला हें देव जाणे! मग आह्मीं माघारे आलों. मामांचे मोर्चे चेनरायपट्टणास लागले होते. आठ दिवशीं घेतलें. आह्मीं नरसिंहपुराजवळ येऊन मुक्काम केला हें वर्तमान मामास कळल्यावर तोफखाना पाठविला, आणि नरसिंगपुरचे ठाण्यास मोर्चे लावावयास सांगितलें. त्यांजवरून मोर्चे लाविले. मामाही मागून तिहीं रोजीं आले. चार रोजीं येईलसें दिसतें. राजश्री महिमाजी शिंदे शिरेंहून दोन तोफा पांच सहाशें प्यादे व शेंपन्नास स्वार असे जमा होऊन हैदरनाईकाचें ठाणें शिरें अलीकडे पांच सहा कोसांवर होतें त्यास मोर्चे लाऊन बैसले. ही बातमी देवरायदुर्गकरांस गेली आणि पांच चारशें लोक पाठवून मोर्चांवर त्यांनीं आवाई घातली. आवाई होतांच शें दोनशें प्यादे व स्वार व खासे महिमाजी बावा तयार होऊन पुढें गेले. त्यांची यांची लढाई झाली. महिमाजी बावांचा मोड

---

१. परशुराम भाऊचें त्रिंबक हरीस पत्र. २. कुर्ग प्रांतचा राजा.

झाला. दहा वीस घोडीं मोडून नेलीं. खासा निघून मेला किंवा पाडाव झाला हें तथ्य कळलें नाहीं. तोफांजवळ कारकून प्यादे होते त्यानीं तोफा मुकाब्यानें जुंपोन शिऱ्यांस सांभाळून घेऊन आलियाचें वर्तमान आलें आहे. वडिलांस कळावें. वरकड छावणी तो सारे फौजेची झाली. लोभ असावा हे विज्ञापना.

नं० ११४० श्री. ( १८ मे. )

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री मोरोबा आबा स्वामीचे सेवेशीं.

पोष्य लक्ष्मण हरी कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती येथील कुशल तागायत जेष्ठ शुद्ध चतुर्थी पावेतों वर्तमान यथास्थित असे. विशेष. अलीकडे आपणांकडून पत्र येऊन समाचार कळत नाहीं तरी सविस्तर लिहावें. इकडील वर्तमान तरी लष्कर श्रीरंगपट्टणावरून मोर्चे उठवून कूच करून चेनरायपट्टण घेऊन संकरापट्टणाकडे आलें. तें घेऊन चेनगिरीकडे येणार ऐसें वर्तमान आहे. राजश्री महिमाजी शिंदे शिऱ्यांहून बरोबर हगलवाडीचा राजा घेऊन चेलूर बिदरीस जाऊन मोर्चे देऊन राहिले होते. इतक्यांत त्यांजकडील[1] बैद येऊन यांजवर पडून महिमाजी शिंदा व हगलवाडीचा राजा वगैरे दोन तीन असामी धरून घेऊन गेले. चिमणाजीपंत थत्ते वगैरे पळोन आले. याजप्रमाणें तहकीक वर्तमान आलें. राजश्री बापूजी नारायण याजकडील ऐवजा-करितां कारकून व प्यादे पाठवून निकड कळेल त्यारीतीनें केली त्याजवरून तूर्त आठ हजार रुपयेचा ऐवज मात्र आह्मांजवळ आला आहे. बाकीस निकड पाहिजे तसी केली आहे. आठ हजाराचा ऐवज मिरजेस पाठवा ह्मणाल तरी पाठवून देऊं. राजश्री श्रीपतराव[2] यांचे शरीरीं समाधान नव्हतें त्यास अलीकडे आरोग्य झालेचें वृत्त लिहावें.

---

१. शत्रूकडील. २. ज्यास पत्र लिहिलें आहे त्याचा हा मुलगा.

ज्येष्ठ अखेर पावेतों ऐवजाचा झाडा करितों ह्मणून राजश्री बापूजीपंतानें लिहिलें आहे. हिशेबाचें काम चालीस लाविलें आहे. आपणास कळावें याजकरितां लिहिलें असे. बहुत काय लिहिणें लोभ असों दीजे. हे विनंती.

नं० ११४१ श्री. ( ३१ मे. )

श्रीमंत राजश्री कोन्हेरराव स्वामी गोसावी यांसी.

आश्रित रामचंद्रभट वाटवे आशीर्वाद. विनंती उपरी येथील क्षेम तागायत ज्येष्ठ कृष्ण तृतीया जाणोन स्वकीय लिहीत असावें. विशेष. वैशाख शुद्ध अष्टमीस घरास आलों. आपणांस आलेचें वृत्त लिहावें तरी संतोषावह कांहींच नाहीं. सर्व उमेद आमची राहिली. बरें! आपण पत्र पाठवून परामर्श केला. उचित आहे. उभयतां कैलासवासी राव[1] यां पाठीमागें परामर्श करणार आपणच आहेत. आमच्या जन्मार्जित पराक्रम होता तो क्षणमात्रें नाश पावला. आतां कालाचे दिवस. हरकशी आयुष्यमर्यादा पूर्ण करावी. एवढेंच पुढें भगवत्सत्तेनें होईल तें खरें. दोन्हीं स्थळीं[2] उभयतां दंपतीस वृद्धापकाळीं शोक प्राप्त झाला. उपाय नाहीं. तेही विवेकी. कालहरण करीतच आहेत. आह्मीं सदैव वाड्यांत जाऊन विवेकांच्या गोष्टी सांगत असतों. चार महिने ग्रामांतरास जात नाहीं. आपण चिंता न करावी. सर्व दुःख एकीकडे ठेऊन दुप्पट उमेद धरून कार्यभाग करावा हें आपणास उचित आहे. आजपर्यंत देशास याल हा भरंवसा होता. परंतु छावणी होते काय न कळे. वडिलांचा वृद्धापकाल. भेट होती तर उत्तम होतें. पण निरुपाय मनसबेस उपाय नाहीं. आपण काय करितील! कैलासवासी राव होते त्याहीपेक्षां लोकांची मनोधारणा रक्षावी. सर्व

---

१. गोपाळराव व नीलकंठराव. २. कुरुंदवाड व मिरज येथें.

कारकूनमंडळी आपले ममतेस लावून ममतेचें जाळें करून सर्वांस बंधन करावें. तेणेंकरून स्वशरीर सुख पावेल. चार दिवस उत्तम प्रकारें काल हरण होईल. आपण यापूर्वी कार्यभाग करीतच आलां आहां. हल्लींही कराल. अगाध नाहीं. चित्तांतील शोक विसर्जन करून पडेल तो प्रसंग उरकाद्या. एतद्विषयीं मी लिहावेसें काय आहे! आपण सर्वज्ञ आहेत. बहुत काय लिहिणें हे विनंती.

हेच पत्रीं राजश्री गुंडोपंत व राजश्री मैराळपंत यांस आशीर्वाद. लिखितार्थ परिसीजे. आह्मीं यात्रेहून घरीं आलों हें वृत्त कळोन आपण पत्रीं लेख केलाच होता. उचित आहे. वरकड वृत्त राजश्री रघुनाथरावजींचे पत्रावरून कळेल हे आशीर्वाद.

नं० ११४२ श्री. (३१ मे.)

श्रीमंत राजश्री रघुनाथराव[1] स्वामीचे सेवेशीं.

आश्रित रामचंद्रभट वाटवे याचे अनेक आशीर्वाद. विनंती उपरी येथील कुशल तागायत जेष्ठ वद्य तृतीया जाणोन कुरुंदवाडीं यथास्थित असों. विशेष. आह्मीं यात्रेहून आलेचें वर्तमान ऐकून पत्र लिहिलें तें पावून परम समाधान झालें. आह्मीं दक्षिण यात्रेस गेलों होतों. हरकशी निभावणूक करून तंजावरपर्यंत आलों. तेथें अल्प किंचित् वर्तमान ऐकिलें. पुढें त्रिचनापल्लीस जाऊन वृद्धाचलावरून अरुणाचलास फाल्गुन वद्य द्वादशीस आलों. तेथें सायंकाळीं वाटसरू दोघे ब्राह्मण मिरजेहून आले होते त्यांस सहजांमध्यें देशचें वर्तमान विचारलेवर "माघ शुद्ध पूर्णिमेस मिरजेस होतों (असें सांगून) कैलासवासी रायांचें[2] वर्तमान सांगितलें. खरें लटकें ह्मणावें तर पत्तेवार दाखले सांगितले. नंतर सत्य भासलें. आह्मीं प्रवासामध्यें सर्व प्रकारें रायाचे

१. रघुनाथराव नीलकंठ कुरुंदवाडकर. २. गोपाळरावाच्या मरणाचें.

लौकिकावर होतों. त्यांचे पराक्रमावर आह्मांस किती एक लोक मानत होते. त्यांचें वर्तमान या प्रकारें ऐकिलें. पुढें अवसान धरणेचा मजकूर कळतच आहे! पुढें देवस्थानें आणखी पहावीं हा हेतु होता परंतु आह्मांस धैर्य न होई आणि समागमें यात्रा होती त्यानीं प्रथमतः कागदपत्रावरून कार्य होत होतें तें सुख पाहिलें होतें. पुढें ज्याचे नांवचे कागद तोच प्रकार ऐसा झाला ह्मणून तेही गळाठले. समागमींचीं चाकर माणसें तींही अवसान न धरीत. असें पाहून माघारे आलों. श्रीव्यंकटेशाहून कडपेवरून गुत्तीस आलों. तेथें नीलकंठरावजींचें वर्तमान ऐकिलें! प्रवासामध्यें नाना प्रकारें उभयतांचें वर्तमान ऐकोन क्लेश झाले. पत्रीं कोठवर लिहावें! आपणास तो दुःख उभयतांचें पर्वतप्राय झालें. ज्याचा पुरता भरंवसा होता ते अर्धे मजलीस सोडून गेले असें घडलें! परंतु साहेब चाकरी आणि युद्धामध्यें सन्मुख मृत्यु आला. ते सूर्यमंडळ भेदून गेले. बहुत यश मिळविलें. परंतु आपलें छत्र होतें तें एकाएकीं नाहींसें झालें. दुःख तो थोर. त्याहींमध्यें सर्वांनीं विवेक केला पाहिजे. विवेककरून शोक किमपि न करितां धीर देऊन वडिलांचा संतोष रक्षावा यांत थोरपणा आहे. येथें आह्मीं वडिलांस बहुत विवेकोपदेश करीतच असतो. त्याणींही बहुतच धैर्य धरिलें आहे. शोक थोर पडला त्यास उपाय नाहीं. राजश्री कोन्हेररावजी हल्लीं आपणास वडिलच आहेत. चार महिने काल क्रमून वडिलांचे यावें. बहुत काय लिहिणें लोभ करावा हे विनंती.

नं० ११४३ श्री. ( १० जुलई. )

चिरंजीव राजश्री तात्यासाहेब व बाळासाहेब यांसी प्रती वासुदेव धोंडदेव आशीर्वाद विनंती येथील कुशल तागायत अधिक आषाढ वद्य त्रयोदशी वावेतों मुक्काम किल्ले गडणगड. यथास्थित असे. विशेष. आपण पत्र पाठविलें तें पावलें. लिहिलें वर्तमान सविस्तर कळलें.

लोकांकडे ऐवज येणें त्याचें व्याज लिहिलें नाहीं ह्मणून लिहिलें, त्यास सालें लाविलीं तेथें चालत्ये बोलीस व्याज लिहिणें आहे. कदाचित् लिहिलें नसलें तरी दर सद्दे तिहोत्र्याप्रमाणें व्याज झाडून घ्यावें. कमी न घ्यावें. इकडील वर्तमान तरी लष्करें बेंगळुराहून कूच करून बाणावरास आलीं. बाणावरापासून तीन कोस गर्डणगड आहे. हैदराचें ठाणें. तें घ्यावें ह्मणोन चाकरी आली. तोफखाना व आपलीं तीन पथकें छ २३ रबिलावलीं किल्ले मजकुरास आलीं. छ २४ रबिलावलीं हल्ला झाली तेव्हां कानोबा व आपाजी दामोदर वगैरे पंधरा असामी जखमी झाले. छ २४ रोजीं मामांचेही मोर्चे आले. ते दिवशीं हल्ला झाली तेव्हां एक तबक घेऊन दुसरे तबकास लोक लागले. निभावणी न पडे. (आंतील) प्यादे यानीं दम धरून मारूं लागले. अवघड जाग्यास निशाण गेलें. तेव्हां वेंकटराव कोनकर, डोंगरोजी सेडगे, रघोजी कदम, वगैरे मिळोन अकरा असामी ठार झाले व पन्नास जखमी. त्यांत पांच सातजण जेर आहेत. पुढें किल्लयाचे चार तट राहिले होते. किल्लयास मोर्चे बसले. हे घेतलेशिवाय उठत नाहीं हें आणोन किल्लेदार यानें अवसान सोडिलें. छ २९ रोजीं सल्ला झाला. प्यादे हत्यारें घेऊन सोडिले. येणेंप्रमाणें मातबर झुंज झालें. कीर्तिसिंग शिरके आजारी पडून आजच मृत्यु पावले. भाऊकडील चाळीस पन्नास जखमी व दोन असामी ठार. कोन्हेरराव यांजकडील दहा बारा जायां झाले. येणेंप्रमाणें फौजेचा नाश होऊन गेला. किल्ला चांगलाच आहे. कानोबा व आपाजी दामोदर खैर आहेत. आपली मंडळी सारी क्षेमरूप आहेत. राजश्री रामराव सेडगे याची घोडी पडली तिच्या रुपयांकरितां एक दिवस अडविलें होतें. अडीच हजार रुपये नीलकंठी खाशाचे घोडीचे दिले. व तीन घोडी शिलेदारांची होतीं तीं पागेपैकीं दिलीं. पुढें पागेचींच घोडी पडल्या घोड्याचे ऐवजीं देणार याकरितां लोक अड खातात. रोखच रुपये द्यावयाचा पंथ पहिल्यानें

घातला, आतां पागेचीं घोडीं देणार, तेव्हां लोक अड खातात. खेरीज होईल वर्तमान मागाहून लिहितों. जानूची रवानगी ( कोकणांत ) केली ह्मणून लिहिलें तें कळलें. सर्वस्वें आपण कृपा करीत आहां त्याजप्रमाणें सांभाळीत गेलें पाहिजे. सविस्तर भेटीअंतीं निवेदन होईल. बाबासाहेबास वरचेवर स्वदस्तुरें कच्चें वर्तमान लिहून पाठवीत जावें. राजश्री गंगाधरपंत फडणीस यांची रवानगी बाळासाहेब येतील तेव्हां करून द्यावी. ते भाद्रपदमासीं पुण्यास जाणार, सहकुटुंब जाणार, ह्मणून पत्र आलें आहे. त्याशिवाय कसें चालेल? त्यास यंदा पाठवावें. धारण जोरी ॥१। कुळथी. तांदूळ ॥१। तूप ॥१ तेल ॥१। गूळ ॥= दूध ॥४॥० हळद ॥१॥॥० हरभरे ॥॥॥० येणेंप्रमाणें आहे. श्रीरामेश्वरीं धनुष्यकोटी सागर होता त्या पलीकडे तीन कोस माघारा गेला. वाळवंट रिकामें पडलें आहे. बसवापट्टण तालुक्याचे गांव राजश्री लक्ष्मण हरी याणीं साठ घेतले. सालमजकुरीं छाप्पांत वेंकटीकर पाटील हैदरखानास घेऊन आला होता यास्तव तो गांव आह्मीं सालमजकुरीं लुटून फस्त केला. दाणादुणा लूट सांपडली. पुढें चेनगिरीस जाऊन चेनगिरी घेतली ह्मणजे बसवापट्टण तालुका सारा अम्मल बसेल. उदईक कूच करून चेनागरीस चालिलों. आपणास कळावें ह्मणून लिहिलें आहे. बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद.

नं० ११४४ **श्रीगणराज.** (अजमासें चैत्र शुद्ध. मार्च द्दु० पंध०.)

अपत्यें पांडुरंगानें साष्टांग नमस्कार विज्ञापना........थेऊरचें पत्र[1] राजश्री रामाजी गणेश साठे यांचें श्रीमंतांचे लष्करांतून आलें तेंच बजिन्नस वडिलांकडे पाठविलें आहे त्याजवरून कळेल. श्रीमंत राजश्री

---

१. पत्र पांडुरंगरावाचें वामनरावास.

दादासाहेब यांस थेऊरास आणिले आहेत. वडिलांस कळावें. भोंसले आणि श्रीमंतांच्या भेटी जाल्या. श्रीमंतांनीं बहुमान हत्ती व कंठी मोत्यांची भोंसल्यांस दिली. याउपरी निरोप घेऊन जातील. पेशजीच्या पांच उंटाशिवाय आणखी दोन उंट व दोन तट्टे व गाडी ( श्रीमंतांनीं भोंसल्यास ) दिली. दादासाहेबांस समजावून त्रिंबकचा किल्ला व सात लक्षांची जहागीर दिली. कर्नाटकांत जानयाची फौज व घोरपडे नारायणरावजी असे महादेवावर आहेत. केवळ जावयाचा करार नाहीं असें इचलकंर्जीचें पत्र आहे. आणखी ( वर्तमान ) आलेनंतर मागाहून लिहितों. बहुत काय लिहिणें हे विज्ञापना.

नं० ११४९ श्रीगणराज. ( वैशाख वद्य सप्तमी किंवा चतुर्दशी. ६ किंवा १३ मे. )

श्रियासह चिरंजीव राजश्री पांडुरंगराव तात्या यांसी प्रती मेघश्याम[1]राव कृष्ण आशीर्वाद उपरी येथील कुशल तागायत वैशाख बहुल + दुवार यथास्थित जाणून स्वकीय कुशल लिहित असावें. विशेष. राजश्री जानोजी भोंसले श्रीक्षेत्राहून[2] निघोन गेलेवरी कांहीं दिवस निंबाळकरांचे मुलखांत होते. तेथून निजामअलीकडील सरदार धौशा ह्मणून आले त्यानें भेटीस बलाविलें यास्तव गेले. भेट घेऊन येतांच काय गत झाली ती न कळे, एकाएकीं मृत्यु पावले. तुह्मांस कळावें ह्मणून लिहिलें. धौशा व तहवारजंग दोन सरदार नबाबाकडील आले त्यांत धौशाची भेट होतांच अंगाची आग होऊन डेऱ्यास येतांच मृत्यु पावले. जानोजी बावा थोर मनुष्य होते. होणार यास उपाय नाहीं.

---

१. मंगळवेढ्याहून पांडुरंगरावाचे चुलत बंधु मेघश्यामरा[illegible] लिहिलेलें. २. भोंसले थेउरास पेशव्यांची भेट घेऊन पंढरपुरास गेले व[illegible]थून मोंगलाईत निंबाळकरांचे जहागिरींत गेले होते.

आपणास कळावें यास्तव लिहिलें आहे. यानंतर लष्करें फिरलीं ऐसी बोली आहे + आलें असेल. लिहून कळवावें. श्रीक्षेत्र पंढरीस आपण लिहिलेप्रमाणें वीस खंडी जोरीनें पेव घालविलें. भरती होत आहे. वरकड पागेच्या बेगमीचा गल्ला हरबरे जोंधळे आपण लिहिलें अजमासें घ्यावया लाविले आहेत. कळलें पाहिजे. बहुत काय लिहिणें लोभ कीजे हे आशीर्वाद.

नं० ११४६ (२८ मे.)

शिवाजी बाबाजीस लक्ष्मण हरीचें पत्र ज्येष्ठ शु० १५ चें.

"मामांच्या लिहिण्याप्रमाणें व वामनरावबाबांचे लिहिण्याप्रमाणें तरतूद करून येथून काल दोनशें चवदा माणूस नवीन ठेऊन रवाना केलें आहे. आणखी राजश्री कृष्णाजीराव सुर्वे रत्नागिरीकर शंभर माणसांसह मामांचे कौलावरून येथें आले आहेत यांसही पाठविलें आहे. यांचा जामिनाचा प्रकार तर नंदिगडास यांचा भाऊ चाकरीस आहे. जामीन देतील. यांची दहा रुपये शेऱ्याची सनद आहे. ऐशियास यंदां त्या प्रांतीं महागाई फार आहे याकरितां यांची नेमणूक कांहीं अधिक करून कालक्षेप नीट चाले असें करावें."

---

१. हैदराशीं तह होऊन कर्नाटकचीं लष्करें. + जेथें फुल्या आहेत तेथलि अक्षरें मूळपत्रांत फाटून गेलीं आहेत. २. लक्ष्मेश्वराहून. ३. दर प्याद्यास दरमहा दहा रुपयांचा शेरा हा जबर दिसतो. कारण हा शेरा निवडक आरब व रोहिले वगैरे नांवाजलेल्या शौर्याच्या परदेशी मनुष्यांचा क्वचित् असे. या पत्रांत आलेला सुर्वे याची जमात हेटकऱ्यांची होती. याचा भाऊ नंदिगडास आपल्या जमातीनिशीं होता त्या जमातींतसुद्धां हेटकरीच असतील. हेटकऱ्यांचा नेहमींचा शेरा चार, पांच, व प्रसंगविशेषीं सहा रुपयांचा असे.

नं० ११४७ **श्रीगणराज.** ( ज्येष्ठ वद्य. जून ५. पंधर. )

अपत्यें[1] वामनानें साष्टांग नमस्कार विज्ञापना. वडिलीं लिहिलें जे " श्रीमंतांच्या शरीरीं प्रस्तुत आरोग्य आहे. पंधरा वीस दिवस पोटांत तिडीक उठत नाहीं. राजश्री मोरोबादादा फडणीस यांच्या बागेंत (श्रीमंत) राहिले आहेत, तेथून थेऊरास जाणार, ह्मणोन पुण्याचें पत्र आलें त्यांत लिहिलें होतें " ह्मणोन लिहिलें, उत्तम गोष्ट झाली. (श्रीमंत) सर्वांचें छत्र (आहेत.) भगवंत कृपाच करील. चिंता नाहीं. आमचें लक्ष श्रीमंतांच्या आरोग्यतेच्या वर्तमानावर होतें तों वडिलीं लिहिलेवरून संतोष झाला. कोडगकर[2] आले नाहींत. ते झाडींतील राहणार. त्यांच्या विचारास काय आले न कळे! राहिले. ऐरगुरकर संस्थानिक राजश्री कृष्णापा नाईक रायदुर्गकर यांच्या विचारें आले. भेटी झाली. राजश्री त्र्यंबकरावमामानीं संस्थानिकास हत्ती दिला. बेकूरचें ठाणें त्यांचे स्वाधीन करावयाची मसलत होती तोंच आह्मी निघोन इकडे[3] आलों ठाणें स्वाधीन केलें न केलें याचा प्रकार कळला नाहीं. बेकूरावर राहिले तेव्हां ठाणें त्यांच्या स्वाधीन करून येतील असें वाटतें. राजश्री आपाजीराम बेकूरच्या मुक्कामीं आले. राजश्री मामांचें त्याचें बोलणें होऊन ते पट्टणास गेले. सोळा दिवसाचा वाईदा करून गेले आहेत. काय करून येतील पहावें. सर्वांचें लक्ष तेथें[4] आहे. ईश्वर इच्छा ते घडोन येईल! राजश्री मामांच्या चित्तीं तो छावणीच करावी. परंतु ईश्वर सूत्रास उपाय नाहीं. घडतां घडेल तें प्रमाण. संक्रापट्टण घ्यावयाची मसलत होती परंतु (मामा) बेकूरावर

---

१. पत्र वामनरावाचें मोरो बल्लाळ यास मिरजेस. २. कुर्गचा राजा. ३. पट्टण सोडून कुर्गच्या बाजूस. कुर्गकरास आणण्याकरितां मामानीं पटवर्धनांस पाठविलें होतें. ४. तह होण्याकडे.

राहिले होते तेथें पर्जन्य बहुत झाला यामुळें स्थळ ध्यावयाचें दिसत नाहीं. कडूर बाणावर या रानांत रहावें, पर्जन्य थोडा याजकरितां, असा मनसबा आहे. संक्रापट्टण केवळ पर्जन्याचें घर, रात्रंदिवस घराच्या बाहेर कोणी निघत नाहीं, असें लोक ह्मणतात तेव्हां तिकडे जाणार नाहींतसें दिसतें[1].

नं० ११४८ L श्री. (आषाढ शुद्ध पौर्णिमा. २६ जुलई.)

राजश्री रामचंद्र नारायण गोसावी यासी.

नमस्कार. सुरु सन इसन्ने सबैन मय्या व अल्लफ. तुह्मीं पत्र पाठविलें तें पावलें. मूर्तीविषयीं लिहिलें त्यास माझे चित्ताजोगा रंग झाल्याउपर पाठवून देतों. पर्जन्य काळचे दिवस. रंगास ऊन पाहिजे. एवढ्यास्तव थोड्याशा अवकाशानें तयार करून रवाना करीन. येणेंप्रमाणें मातुश्रीस विनंती करावी. गंगापुरास दक्षणावर्तशंख आहे तो आह्मांस पूजेकरितां पाहिजे तर मातुश्रीजवळ विनंती करून आज्ञा झाल्यास माफजतीनें पाठवून देणें. मर्जी पाहून विनंती करून उत्तर पाठविणें. जाणिजे. छ १३ रबिलाखर. मातुश्रीच्या प्रकृतीचें वृत्त वरचेवर लिहीत जाणें. बहुत काय लिहिणें.

नं० ११४९ श्री. (श्रावण शुद्ध चतुर्दशी. २४ आगष्ट.)

राजश्री रामचंद्र नारायण गोसावी यांसी.

सुरुसन इसन्ने सबैन मय्या अल्लफ. तेथें विनोबा व डेरा आहे

---

१. पत्र इतकेंच अपूर्ण सांपडलें. २. पत्र पेशव्यांचें आपल्या आईच्या कारकुनास. त्याचप्रमाणें पुढचें नं० ११४९ चें.

त्यानें प्रयोजन येथें असे तरी उंटावरी घालून येथें पाठवून देणें जाणिजे. छ० १३ जमादिलावल.

नं० ११५० श्री. ( १ आक्टोबर. )

श्रीमंत राजश्री मोरोपंत आबा स्वामीचे सेवेशीं.

पोष्य शिवाजी बाबाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती येथील कुशल तागायत भाद्रपद कृष्ण अष्टमी भौमवासर मुक्काम नजीक अमरनूर तालुके श्रीरंगपट्टण येथें स्वामीच्या कृपेकरून वर्तमान यथास्थित असे. विशेष. आपण कृपा करून पत्र पाठविलें तें प्रविष्ट होऊन लिहिला मजकूर कळला. "दुसालां मिळोन खर्च भारी झाला. आदा नाहीं. मागील साठ हजार रुपये कर्ज लोकांचें देणें आहे. यास्तव तिकडे काय जमा साधली ती लिहून पाठविणें." ह्मणोन लिहिलें, त्याजवरून कलमवार तपशील संस्थानचा लिहिला आहे त्याजवरून कळेल. ईश्वरकृपेंकरून कर्जही फिटेल. चिंता न करावी. "(आमचीं) खासगत कामें स्मरण धरून करावींत. स्वार्थावर नजर न द्यावी." ह्मणोन लिहिलें, ऐशियास आह्मीं दोन छावण्या केल्या या स्वार्थासाठींच केल्या असा आपल्या लिहिण्यांतील भाव! आह्मीं बक्षीस पावलों! असो. ज्या संस्थानापासून बक्षीस पांच रुपये घेऊं त्या संस्थानापासून आपला जाबसाल विल्हे लाविल्याखेरीज श्रीमंत राजश्री बाबांचें[1] देखील विल्हे लाऊन घेणार नाहीं! राजश्री मामांचा कारभार जो कावेर्शीत[2] न ये तो येईल त्यासमयीं चार रुपये जास्ती साधून घेऊं. चिंता नाहीं. रायदुर्गकर गरीब आहेत. आगेंमागें ऐवज येईल. सलुचाचा प्रकार पेशजी राजश्री आपाजीराम यादी ठरावून घेऊन गेला त्याप्रमाणें हैदरखान यानीं मान्य केलें नाहीं ह्मणून मशारनिल्हे

---

१. वामनरावांचें. २. ताब्यांत.

चिठी घेऊन आले. आकार[1]नामक मनुष्य कसे आहेत हें आपणांस ठाऊकच आहेत. सल्लयाचा बनाव बसतां कठीण! ( हैदर ) सालमजकूर खेरीजकरून चाळीस लक्ष ( देईन ) ह्मणतो! कांहींच नाहीं ताळ! एकवेळ एक बोलावें, एकवेळ एक बोलावें, असें त्याचें ( धोरण ) आहे. श्रीमंत आल्याखेरीज ठरतां दिसत नाहीं. होईल वर्तमान तें मागाहून लिहून पाठऊं. तीर्थस्वरूप राजश्री मोरोपंतदादा तीर्थस्वरूपापासून रिकामे घरीं बसले आहेत. आपणास तिगस्तां जातांना विनंती केली. आपणही मान्य केलें. कसेंहीकरून सोय काढितों अशी आपली आज्ञा झाली होती. त्याजवरून वडिलांस पत्रें आह्मीं पाठविलीं होतीं. वडील आपणाकडे गेले होते. आपण कांहींच सांगितलें नाहीं! असो. आतां तरी कांहीं सोय करून जरूर द्यावी. रसदही देतील. मनापासून आपण सोय करून देतों ह्मटल्यास करून द्यालच. नाहीं ह्मटल्यास कांहींच नाहीं! चित्तापासून कराल तेंच होईल. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना. शिवाजी थोराताकडील वगैरे मजकूर राजश्री भास्करपंतास लिहिलें आहे. विनंती करितील. उत्तर सांगावें. त्याप्रमाणें लिहितील हे विज्ञापना.

नं० ११९१ **श्रीगणराज.** ( १३ अक्टोबर. )

तीर्थस्वरूप राजश्री मोरोपंतआबा वडिलांचे सेवेशीं.

अपत्यें वामनानें साष्टांग नमस्कार विनंती येथील कुशल आश्विन शुद्ध पंचमी मंदवासर मुक्काम नजीक चंद्रायपट्टण येथें वडिलांचे आशीर्वादें करून सुखरूप असों. विशेष. वडिलीं छ० ९ जमादिलाखरचें पत्र पाठविलें तें पावोन लिहिला मजकूर कळला. बारगीर करकंबेहून आले त्यांची नालबंदी व रोजमुरा देऊन पाठविले ते येथें

---

१. आपाजीराम ( हैदराचा वकील. )

येऊन पावले. षट्‌गृहप्रीत्यर्थ जप येथें करविला. दानें व शांति तेथें करावी. यादी पाठविली आहे त्याप्रमाणें करावें." ह्मणोन लिहिलें, त्यास दानें व शांति आपण लिहिल्याप्रमाणें करितों. श्रीमंताकडील वर्तमान, व श्रीमंत राजश्री नारायणरावसाहेब कोरेगांवावर आहेत, नगरच्या सुमारें श्रीमंत येणार, तिकडेच धाकटे श्रीमंत जाणार, ह्मणोन लिहिलें तें कळलें. श्रीमंत आजपावेतों नगरच्या सुमारें आलेच असतील. पुण्यास कापड आणावयास उंटें पाठविलीं ह्मणोन लिहिलें, उत्तम आहे. नवीं उंटें खरेदीकरून पाठविणें ह्मणून लिहिलें आहे त्याप्रमाणें हर तरतूद करून सवंग महाग जशीं मिळतील तशीं घेऊन जरूर पाठवावीं. "वेद० राजश्री महादेवभट खाडीलकर व विठोबा आचारी यांस पुढें पाठवावें तरी चिरंजीव राजश्री बाळासमागमें कोणी पाहिजेत याजकरितां ठेऊन घेतले. चिरंजीवासमागमें पाठवितों." ह्मणोन लिहिलें तें कळलें. उत्तम आहे. चिरंजीवासमागमेंच पाठवावें. "लोकांपासून व्याज घेतलें नाहीं. एकदम वराता आल्या याजकरितां देण्यास अवकाश नाहीं. त्यांनीं सावकारापासून ऐवज घेऊन आमची (व सावकारांची) गांठ घातली. अशा-मुळें व्याज कोणास पडलें असलें तरी न कळे ह्मणोन लिहिलें" त्यास लोकाच्या नालबंदीचा ऐवज गुदस्तांचा सालमजकुरीं देविला, लोक आह्मांजवळ दुसरे छावणीस राहिले, असें असतां आपण व्याज घेतलें नाहीं, सावकारांनीं परभारें घेतलें, लोकांस फळ काय? एकदम वराता झाल्या, त्यास ऐवजाची ओढ असल्यास जसा मिळेल तसा घेऊन द्यावा होता. पतीस अंतर पडतें. आह्मांकडे ज्यांचे ज्यांचे बोभाट आले आहेत त्यांस आह्मीं सांगितलें कीं 'व्याजाचे ह्मणोन तुह्मांसपासून रुपये घेतले असतील ते माघारे देऊं. चिंता न करणें' ह्मणून समाधान करून सांगितलें. छावणीमुळें लोक बुडाले. असें असतां व्याजाचे हिसके बसों लागल्यास त्याणीं काय [illegible]ावें? लोकांस ऐवज दिला व द्यावयाचा आहे त्याचा तपशील लिहिला तो कळला. लोक नवे ठेविले

त्यांत करोल ठेविल्याचा मजकूर लिहिला तो कळला. चांगले माणूस ठेविल्यानें कामावर पडेल. करोलांचा भरणा तुटला होता. चांगले ठेविले हें उत्तमच आहे. हिशेबाकरितां पुण्यास जावें लागतें ह्मणोन लिहिलें, ऐशियास ( सरकारचा ) कारकूनच येऊन बसला आहे. त्यापक्षीं गेल्याखेरीज गत्यंतर नाहीं. इकडील वर्तमान तर देवरायदुर्ग बहिरव-दुर्ग व उत्तरीदुर्ग घेतल्याचा मजकूर पेशजी लिहिलाच आहे. त्या अलीकडील वर्तमान तर नागमंगलास आल्यावर ( तेथील लोक ) कौलास आले. ठाणें सरकारचें घातलें. देवलापूर दुकोसीचें ठाणें होतें. तें आह्मीं घ्यावयास गेलों होतों. ठाणें घेतलें. दोनचार मुक्काम नागमंगलास झाले. तेथून कूच करून दोन मजलींनीं या मुक्कामास आलों. किकेरीचें घेतलें ठाणें. पाडून टाकणार. नारायणगड मेलकोट्याजवळ आहे तो किल्ला घेऊन पाडून टाकणार. सल्ल्याचा प्रकार तरी—राजश्री आपाजीराम आले होते त्यापासून आजपावेतों लष्करांतच होते. ठरावांत कोणती गोष्ट न ये. ठाण्याठुण्यांचा लढा भारी. शेवटीं त्यांच्या बोलण्यांत आलें आहे कीं, पट्टण तालुकियाच्या जवळ ठाणीं घेतलीं तीं दरोबस्त आह्मीं सोडावीं. चिकबाळपूर नंदिगडची श्रीमंतापाशीं रदबदली करावी. मान्य केल्यास उत्तमच. नाहीं तरी पुढें कृपा संपादून घ्यावी, तेच कृपा करून देतील. मोंगलाकडील अठ्ठावीस लक्षांचा फडशा परभारें करून पावती आणून द्यावी. सालमजकूर खेरीजकरून सरकारचे साठ लक्ष रुपये द्यावे. हैदरखान यांनीं भेटीस यावें. घांटाखालीं जावयाचा मनसबा केल्यास जमेतसुद्धां समागमें यावें. येणेंप्रमाणें बोलण्यांत येऊन राजश्री आपाजीराम निरोप घेऊन आजच गेले. आठ दिवसांत यावेंसा करार आहे. सदरीलप्रमाणें निश्चयांत आल्यास येतील. नाहीं तरी येऊं नये. येणेंप्रमाणें येथून निक्षूनपणें सांगितलें आहे. घांटाखालीं जावयास यावयाचें ( हैदर ) मान्य करणार नाहींसें दिसतें. त्यापक्षीं सल्ला होत नाहीं. कार्तिकमासीं बिदनूराकडे जावें असा

गनमत्रा आहे. आश्विनमासांत काय तें कळेतें. श्रीमंतही येतीलसें दिसतें. या मुक्कामास आलों त्या दिवशीं मागाहून तोफा व तोफाचे गाडद येत असता बेदड्यानीं दाटी करून पंचवीस पावेतों बैल तोडिले. तोफखान्याकडील राजश्री जनोपंतास जखम भारी लागली आहे. सखारामपंत बाबा फडणीस यास जरा जखम आहे. आणखी दहापाच माणूस जखमी झालें. घोडीं पंचवीस पावेतों पाडून त्यांनीं नेलीं. सदाशिव पंताचा तटू पडथळाचा ताटवाट्या वगैरे वस्तभावसुद्धां गेला. कडपे करांचें पथक दुमदारीस होतें तें आल्यावरी हत्ती व तोफ सांभाळून आणिली. दोन गाड्या तोफखान्याकडील नेल्या. बुनग्याचीं पडथळें दहापांच गेलीं. तोफांजवळ राऊत चाळीसपन्नास होते. बेद पांचसातशें आले होते. हत्ती त्यानीं न्यावा असेंच होतें, परंतु कडपेकर मागाहून आले ह्मणून हत्ती राहिला. नाहींतर वाईट गोष्ट झाली असती. ओझ्यास उटें तों पाहिजेत. येथें घ्यावीं तर तीनशें चारशें रुपये पडून उपयोगीं पडत नाहीं. यास्तव आपण जरूर तिकडेच जीं मिळतील तीं उटें घ्यावीं. आणि चिरंजीवाची रवानगी त्वरेनेंच करावी. बिदित हे य हे विज्ञापना

चिरंजीव श्रीपतराव यास आशीर्वाद. सदरहू पत्र पाठवीत जाणें हे आशीर्वाद.

राजश्री आपाजीपंत स्वामीस नमस्कार. विनंती उपरी. तुह्मी घराहून आला, उत्तम गोष्ट झाली हे विनंती. चिरंजीवाबराबर तुह्मीं येणें. हे विनंती.

नं० ११६२ श्री. ( आश्विन वद्य दशमी.
२ नोवेंबर. )

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री गोविंद हरी
स्वामी गोसावी यांसी.

शा० ११९३ **तहाची शुष्क वाटाघाट.** इ. स. १७७१

पोष्य माधवराव बल्लाळ प्रधान. नमस्कार. विनंती उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहीत जाणें. विशेष. राजश्री विठोजी चव्हाण हिंमतबहादर यांजकडे गांव वि०

१. मौजे करनाळ परगणे सांगली हा गांव कुरणमुद्दां पालखीचे सरंजामांत आहे.

१. कसबे डिगरज प्रांत कागल हा गांव सरंजामांत आहे.

१. मौजे सोनी कसबे मनेराजुरी हा गांव दरोबस्त इनाम.

———

३. एकूण गांव तीन. त्यास किल्ले मिरज येथील किल्ल्यांत चाकरी करून दोन गांव जहागीर अनुभवावी. एक गांव इनाम. त्यास चाकरी करितात आणि गांवचा भोगवटा घेतात. ऐसें असतां तुह्मीं गांवासंबंधें खर्चास मागतां ह्मणोन मशारनिल्हेकडील वकिलांनीं हुजूर विदित केलें. त्यास चाकरी करीत असतां खर्चास रुपये मागावयास कारण काय? तरी सुदामत गांव मशारनिल्हेकडे चालत आल्याप्रमाणें चालविणें. बोभाट येऊं न देणें. जाणिजे. छ० २४ रज्जब सु० इसन्ने सबैन मय्या व अल्लफ. बहुत काय लिहिणें हे विनंती.

नं० ११९३ **श्रीगणराज.** ( १६ नोवेंबर. )

तीर्थस्वरूप राजश्री आपा[1]

वडिलांचे सेवेशीं.

अपत्यें वामनानें चरणावर मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील कुशल ता॥ कार्तिक शु० १० मुक्काम मायसमुद्र तालुके श्रीरंगपट्टण जाणून वर्तमान यथास्थित असे. विशेष. इकडील वर्तमान तर

---

१. त्र्यंबक हरी कुरुंदवाडकर.

हैदरखानाचा सल्याचा मजकूर परिछिन्न राहिला. चंदावरास महंमद अलीखान यांणीं मोर्चे बसविले आहेत ह्मणोन (तेथील) राजानीं लिहिलें होतें त्यावरून राजश्री त्रिंबकरावमामा फौजसुद्धां त्यांच्या कुमकेस गेले. जातांना चेनपट्टणास मोर्चे बसविले. एक दोन रोजांत चेनपट्टणचा गुंता उरकोन मजल दरमजल जातील. ते जातपर्यंत या आवईनें मोर्चे उठवून (महंमदअली) विवेक करितील. विवेक केल्यानें त्यांस सामील करून हैदरखान याचें पुरतें पारिपत्य करावें हा मनसबा करून बसरेहळ्ळीवरून ते तिकडे गेले. आह्मीं या प्रांतीं राहिलों. समागमें राजश्री नरसिंगराव घायगुडे व भापकर व कवडे व बडे हीं चार पथकें मिळोन दीड हजार राऊत व तीन तोफा दोन अडीचशें गाडदी येणेंप्रमाणें सरंजाम करून घेऊन येथील मुक्कामास आलों. गरुडगड व देवरायदुर्ग, मुरकीकेड, बहिरवगड, उत्तरगड, नागपुरी, हीं स्थळें राखून आह्मीं रहावें (असें ठरलें आहे.) हैदरखान जोर बेजोर येऊन ठाण्यांस उपद्रव करितो. अन्न अर्थ नाहीं. त्यांतही कांहीं ताकद राहिली नाहीं. प्रस्तुत धारण दाण्याची दोन अडीच पायलींची आहे. सेवेशीं विदित होय हे विज्ञापना.

नं० ११९४ श्री. (१६ नोवेंबर.)

चिरंजीव राजश्री गंगाधर बाळ यांसी प्रती वामनराव गोविंद आशीर्वाद उपरी येथील कुशल तागायत कार्तिक शु० १० मंदवासर मुक्काम मायसमुद्र तालुके श्रीरंगपट्टण. वर्तमान यथास्थित जाणून स्वकीय कुशल लिहित जाणें. विशेष. तुह्मीं मिरजेहून कार्तिक शु० १ चें मुहूर्तें निघालांच असाल. पौर्णिमेच्या सुमारें तुंगभद्रातीरास याल ह्मणोन वडिलांनीं लिहिलेंच होतें त्या अन्वयें तुमचें येणें झालेंच असेल. राजश्री रामोराम व रायोहरी यांसमागमें तुह्मांस पत्र पाठविलें होतें कीं,

'कनकगिरीहून रायदुर्गास येणें तों तुह्मांकडे पत्रें पाठवितों.' असें लिहिल्यानंतर मनसबा झाला जे राजश्री त्रिंबकरावमामा चेनापट्टणच्या मुक्कामावरून कूच करून अर्काटच्या घांटमाथा[1] जावयास गेले. या प्रांताच्या उपरोळ्यास[2] फौज पाहिजे. याजकरितां आह्मीं राहिलों. तोफा तीन व आमच्या पथकाखेरीज नरसिंगराव धायगुडे व राजश्री शहाजी भापकर, कवडे व बडे मिळोन दोन हजार फौज आहे. व चित्रदुर्गकरानीं दोन हजार राऊत व सहा हजार प्यादे पाठवावे येणें-प्रमाणें करार आहे. राजश्री पुरुषोत्तम[3] तमाजी व शंकराजी राम चित्र-दुर्गास गेले आहेत त्यांस जाऊन आठ पंधरा दिवस झाले. संस्थानीक बाहेर निघालेच असतील. राजश्री देवराव आज रवाना केले आहेत. संस्थानीक आठ दहा दिवसांत येऊन सामील होतील. आह्मीं राजश्री त्रिंबकरावमामांचा निरोप घेऊन बसरेहळ्ळीच्या मुक्कामावरून कूच करून चार चार कोसांच्या मजली करून चार मजली आलों. तुरविकिरें व गागडी नागपुरी या रोखें तूर्त राहूं. तों तुह्मीं फौजसुद्धां येऊन सामील व्हाल व चित्रदुर्गकरही येतील. जथ पडेल. पहिला सुमार तुह्मास लिहिला होता तो सुमार आतां राहिला. तुंगभद्रा गलगना-थाजवळ उतरोन हरपनहळ्ळी तालुक्यांतून चित्रदुर्ग उजवा टाकून बुकापट्टणच्या सुमारें येणें तों वरचेवरी पत्रें तुह्मांस पाठवितों. परंतु पत्र पावल्यावरी मधीं मुक्काम न करितां मजल दर मजल येणें. पुढें पत्रेंही वरचेवरी तुरविकिरें याच्या सुमारें पाठविणें. फार त्वरेनें येणें. चित्रदुर्गकर आह्मांकडे येणार त्यांच्या तालुक्यांतून तुमचें येणें होणार, ऐशियास त्यांजकडील कारकून अथवा कोणी तुह्मांकडे येईल तेव्हां

---

१. अर्काटाकडे ज्या घांटानें जावयाचें त्या घांटाच्या माथ्यावर. २. या प्रांतांत आमचीं ठाणीं आहेत त्यांच्या कुमकेस. ३. हे दोघे चित्रदुर्गकराचे कारभारी.

राऊत गांव खेड्यास रखवालीस देऊन तालुक्यास उपद्रव तिळमात्र लागों न द्यावा. त्यांचा आमचा स्नेह घरोबा. त्यांत विरुद्ध न ये ती गोष्ट करावी. आणि जलद लिहिले मार्गे येणें. बहुत काय लिहिणें. वरचे-वर पत्रें पाठवण्याचा सुमार लिहून पाठवूं. हे आशीर्वाद.

नं० ११९५ **श्रीगणराज.** ( ४ दिसेंबर. )

चिरंजीव राजश्री गंगाधरबाळ यांसी प्रती वामनराव गोविंद.

आशीर्वाद उपरी येथील कुशल तागायत कार्तिक कृष्ण त्रयोदशी बुधवासरे मुक्काम नजीक हानहळ्ळी वर्तमान यथास्थित असे. विशेष. नारायणगड चंद्रायपट्टणापलीकडे सहा कोस आहे. तेथें हैदरखान यांजकडील दोन तीन हजार फौज व चार हजार गाडदी येणेंप्रमाणें व तीन तोफांनिशीं दग्यानें आले. माचीचीं दहावीस माणसें त्यांणीं मारिलीं. किल्ल्यावरी (ल लोकांनीं) सावध होऊन मार दिला तेव्हां सरोन पाण्यावर राहिले आहेत. ही बातमी येतांच सड्या फौजेनिशीं नारायणगडास गेलों. बुनगें हिगळवाडीकडे पाठविलें. बुनग्यांत राजश्री गोविंदपंतमामा व कारकून ठेऊन गेलों. तुह्मीं लांब लांब मजली करून फारच जलद येऊन पोंहचणें. कापड मागाहून येईल. तुह्मीं सत्वर येणें. बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद.

नं० ११९६ L **श्री.** ( कार्तिक वद्य त्रयोदशी.
४ दिसेंबर. )

राजश्री रामचंद्र नारायण गोसावी यांसी.

सुरुवन इसन्ने सबैन मय्या व अल्लफ. मध्य कौमुदीतील पद्धलिंगें यांचें प्रयोजन आहे तर सत्वर पाठवून देणें. जाणिजे. छ० २६ साबान. बहुत काय लिहिणें.

## श० १६९३ त्रिंबकरावाची पाईन घांटावर स्वारी. इ. स. १७७१

नं० ११९७ श्री. ( ११ दिसेंबर. )

अर्पत्यें[1] धोंडो अनंत व भिकाजी अनंत साठे. साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत मार्गशीर्ष शु० ९ तुंगभद्रानजीक आठ कोस हरपनहळ्ळी येथें सुखरूप असों. विशेष. हरिहर दहा कोसावर राहिलें व खालीं गलगलनाथही सात आठ कोस. मध्येंच हरपनहळ्ळीच्या मुलखांत नदीस उतार चांगला, कमरे इतकें पाणी, याजकरितां हे वाटेनें उतरोन पार झालों. लष्कर हिगलवाडी बुध्येहळाजवळ आहे. आह्मीं आजपासून आठवे दिवशीं लष्करास जाऊन मिळतों. राजश्री त्रिंबकरावमामा घांटाखालीं गेले त्यांस चंदीचा वेढा उठवावा लागतो. त्यास फिरंगी[2] मामास पंधरा लाख रुपये देतो. मामा तीस लाख रुपये मागतात. हें वर्तमान राजश्री लक्ष्मण हरीकडे सावकारी लिहून आलें आहे. हे विज्ञापना.

नं० ११९८ श्री. ( मार्ग० शुद्ध. दिसेंबर प० पंधर० )

अर्पत्यें[3] साष्टांग नमस्कार विज्ञापना. वडिलीं लिहिलें कीं, 'तुह्मीं निराळे फुटून राहिलां आहां. साहेब काम उचित आहे, परंतु शत्रु निशाचर, दगेखोर. दुसरें, तोफा जवळ. भारी पाय गुंता आहे. सरकारचीं ठाणीं सात आठ कोसीं आहेत. दुर्गकर येणार या भरंवशावर तुह्मीं एकी जागां दोन तीन मुक्काम करून राहिलां तर तुह्मीं थोडके आहां. चेनगिरीकडे हैदरखानाचे लोक जमा झाडीच्या आसऱ्यानें आहेत. हे ( पट्टणाकडून ) कांहीं सामान मिळोन रातबेरात दगा करील.

---

१. वामनरावास मिळण्यासाठीं गंगाधरराव गोविंद मिरजेहून कांहीं फौजेनिशीं कर्नाटकांत गेले त्यांबरोबरच्या या दोघां कारकुनांचें गोविंद हरीस पत्र. २. अर्काटच्या नबाबाच्या तर्फे मद्रासकर इंग्रज. ३. वामनरावाचे गोविंद हरीस पत्र.

शा० १६९३ त्रिंबकरावाची पाईन घांटावर स्वारी. इ. स. १७७१

खेड्यापाड्याच्या बातमीचा इतबार नाहीं. एक जागां दोन दिवस न राहतां भारी आटाळा संभाळून राहत जावें. छबीना + चित्रदुर्ग-करांच्या पाठीमागें असतां छापा आला यास्तव कोणाचा इतबार न धरतां चहूंकडील बातमी ऐकोन रात्रीनें बहुत सावध रहावें.' ह्मणोन तीर्थस्वरूप राजश्री आपानीं लिहावयास सांगितलेवरून लिहिलें तें कळलें. ऐशियास वडिलीं लिहिल्याअन्वयें एक जागां दोन मुक्काम न करितां राहत असतों. रोजिना कूच कोसी दुकोसी करून चहूंकडील बातमी आणोन छबिन्याचा बंदोबस्त चांगला करून रानमैदान जागा कुषाद पाहून तळें पाठीसीं घेऊन मुक्काम करवितों. जडभारी सामान जवळच आहे. चित्रदुर्गकर राजा खासा छ० १४ रमजानीं येऊन संतीसेलुरच्या मुक्कामीं दाखल झाला. त्यापाशीं सामान सात हजार प्यादे, दीड दोन हजारपर्यंत स्वार, एकूण नऊ हजार व बाणाचें व जजालांचें साहित्य सारें चांगलेंच आहे. राजाही आमच्या लक्षांतच आहे. आह्मीं या प्रांतीं राहिलों ह्मणोन सामान घेऊन खासा आला. आणखी कोणी रहाते तर राजा सामान घेऊन येत नव्हता व सामानही येत नव्हतें. पहिल्यापासून लक्षांतच आहेत. चिरंजीव राजश्री बाळास एक महिना पाठविनां येत नाहीं ह्मणोन लिहिलें तें कळलें. उत्तम केलें. राजश्री हरी गोविंद यांजबरोबर लोक शिगरें व कापड व उंटें वगैरे कारखाना देऊन रवानगी करून दिली त्यास छ० १५ रमजानीं संतीसेलुरच्या मुक्कामीं येऊन दाखल झाले. उंटें पाठविलीं, मोठी गोष्ट झाली. राजश्री लक्ष्मण-पंताकडे बाकीचे दहा हजार होन व बापूजी नारायण यांजकडील ऐवज राजश्री हरीपंत घेऊन आले त्याची याद अलाहिदा पाठविली आहे

---

१. अवजड सामान. २. मागें हैदराचा छापा आला होता त्यास अनुलक्षून हें लिहिणें. ३. थोरले बंधु त्रिंबक हरी यांनी. ४. मोकळी. ५. सलोख्यांत. ममतेंत.

त्यानवरून कळोन येईल. 'धारण सात पायलींची. पिकें बरींच आहेत.' ह्मणोन लिहिलें, उत्तम झालें. गरीबें त्रासलीं होतीं! ईश्वरी कृपा झाली तेणेंकरून सर्वत्रांस अन्न झालें*

नं० ११५९ L श्री. ( मार्ग० शु० त्रयोदशी. १९ दिसेंबर. )

तीर्थरूप मातुश्री बाईसाहेब वडिलांचे सेवेशीं.

अपत्यें नारायणरावानें चरणावर मस्तक ठेऊन साष्टांग नमस्कार विज्ञापना येथील वर्तमान तागायत छ० १२ रमजान पावेतों सुखरूप असों. विशेष. वडिलांकडून बहुत दिवस पत्र येऊन वर्तमान कळत नाहीं. तर कृपा करून निरंतर आशीर्वाद पत्र पाठवावयास आज्ञा केली पाहिजे. इकडील वर्तमान तर प्रस्तुत नगरावर मुक्कामच आहेत. वरकड विशेष लिहावेसें नाहीं. तीर्थरूपांची प्रकृति उत्तम आहे. प्रस्तुत बापाजी पुराणीक ( मला ) कौमुदी सांगत असतात. लवकरच षड्लिंगें ह्मणतों. जाहल्यावर सेवेशीं लिहीन. कौमुदीची पोथी वाईट आहे एवढ्यास्तव तेथें रामचंद्रपंतापाशीं अथवा भटजीपाशीं असल्यास पाठवून द्यावी. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं० ११५९ श्रीगणराज. ( मार्ग० शु०. दिसें. प० पंध०. )

अपत्यें पांडुरंगानें साष्टांग नमस्कार विज्ञापना. राजश्री भिका-

---

१. पेशव्यांचे बंधु नारायणराव यांचें त्यांच्या आईस पत्र. २. पेशव्यांची. ३. नारायणराव पेशवे कौमुदी शिकत होते! यावेळीं यांचें वय पंधरा वर्षांचें होतें ४. हें व पुढलें नं० ११६० चें हीं दोन्हीं पत्रें पांडुरंगराव गोविंद यांनीं त्र्यंबक हरी कुरुंदवाडकर यांस लिहिलीं आहेत.

शा० १६९३ त्रिंबकरावाची पाईन घांटावर स्वारी. इ. स. १७७१

जीपंत साठे यांचें पत्र आलें त्यांतील मजकूर लिहिला तो कळला. राजश्री हरीपंत व भिकाजीपंत मिळोन दोन हजार फौज मिळाली आहे. हरपनहळ्ळीचे मुलखांत तुंगभद्रा उतरून पलीकडे गेले. ' राजश्री त्रिंबकरावमामा घांटाखालीं गेल्याचा मजकूर लिहिला तो सविस्तर कळला. श्रीमंत कोणे ठिकाणीं आहेत तें वर्तमान लिहिणें ' ह्मणोन आज्ञा ऐशियास राजश्री रामाजीपंत यांनें पत्र येऊन तीन चार दिवस झाले. श्रीमंत गंगातीरीं आहेत. भोंसले भेटीस येणार आहेत. त्यांच्या भेटी झाल्यानंतर मनसबा ठरेल तो खरा. तीर्थस्वरूप राजश्री बाबांकडील पत्रें अगर लष्कराहून अलीकडे कोणी आला नाहीं. तीर्थस्वरूप राजश्री आबा मार्गशीर्ष वद्य २ च्या मुहूर्तें कोकणांत जावयास निघोन वाड्यांत येणार. दोन तीन दिवस येथें राहून कोकणांत जातील. बहुत काय लिहिणें हे विज्ञापना.

नं० ११६० श्रीगणराज. (पौष व० १३. १ फेब्रुवारी.)

×अपत्यें पांडुरंगानें साष्टांग नमस्कार विनंती. श्रीमंत पंतप्रधान सिद्धटेकावर आहेत. तेथेंच आठ पंधरा दिवसांत भोंसल्याच्या भेटी होतील. भेटी जाहल्यावर पुढें मनसबा होईल तो लिहून पाठवूं. श्रीमंतांची प्रकृति तूर्त बरी आहे. उदईक तीर्थस्वरूप रावसाहेबांचें वर्षश्राद्ध आहे. वडिलांस कळावें. बहुत काय लिहिणें हे विनंती.

नं० ११६१ श्रीगणराज. (मार्गशीर्ष शु०. दिसेंबर. दु० पंधर०.)

तीर्थस्वरूप राजश्री आबा वडिलांचे सेवेशीं.

अपत्यें वामनानें साष्टांग नमस्कार. नारायणगडचा बंदोबस्त करून

---

१. हे देवधरी पटवर्धनांचे कारकून. २. वामनरावाकडील. ३. मोरो बल्लाळ.
× हें स. १७७२ तलें पत्र येथें चुकून लागलें आहे.

आलों आणि आपणाकडे पत्रें पाठविलीं, तदोत्तर राजश्री त्रिंबकरावमागा-कडून पत्रें आलीं कीं " आह्मीं घांटाखालीं उतरलों. चंदावरचा सल्ला चार सालां बत्तीस लक्षांवर ठरला. ते[1] वेढा उठवून चेनापट्टणास गेले. आतां त्यांस अनुकूल करून घेऊन हैदरखानाच्या पारिपत्यास आणावें हा मनसबा आहे. त्यास टिपूही घांटाखालीं आला आहे. न जाणों, महमदअलीखानाचें व त्याचें सूत्र असल्यास घांट बंद करितील याकरितां तुह्मीं पत्रदर्शनीं घांटमाथा येणें. " ह्मणोन आह्मांस लिहिलें व कारकून व पंचवीस स्वार व हरजी शिंदे व जानोजी नाईक यांस पाठविलें. त्यावरून जावयाचा मनसबा करावा तों राजश्री रामचंद्र त्रिंबक यांचें पत्र चेनरायपट्टणाहून आलें कीं, ' नारायणगडास पांच हजार पांचशें माणूस ( शत्रूकडील ) येऊन पाणी बंद करून मोर्चे लाविले आहेत. किल्ल्यावरी पाणी नाहीं. सत्वर येणें. नाहींतरी किल्ल्यावरील लोक मारिले जातात. ' ह्मणोन लिहिलें, त्याजवरून चिरंजीव राजश्री भाऊ व तीर्थस्वरूप राजश्री कोन्हेरराव व नरसिंगराव धायगुडे व भापकर व कवडे यांस पाठवावयाची तजवीज करून होनहळ्ळीवरून सारेच कूच करून नारायणगडाच्या रोखें आलों. तेथून सड्या फौजा पुढें आल्या. आह्मीं कूच करून मुगेहळ्ळीपाशीं राहिलों. पुढें फौजा गेल्या. त्यांणीं किल्ल्याखालीं पहिल्याप्रमाणें करोल वगैरे पायउतारा होऊन गेले. तों त्यांनीं पाणी सोडून झाडींत शिरले. तों संध्याकाळ झाला. किल्ल्यावरील लोकांस बलावून हिम्मत दिली कीं, ' आज संध्याकाळ झाला. ते झाडींत शिरले. उद्यां येऊन पारिपत्य करूं. चिंता न करणें. ह्मणोन सांगोन अलीकडे आले. तों ( शत्रूही ) झाडींतून किल्ल्याखालीं आले. पाणी बंद केलें. झाडी फार. घोडीं घालावयास जागा नाहीं. तेव्हां संध्याकाळीं तीन कोस माघारे येऊन

---

१. अर्काटचा नबाब.

ऊन राहिले. तदोत्तर दुसरे तिसरे दिवशींही गेले. थोडीं घालावयास ोय पडली नाहीं. त्यांजकडील पायीचें माणून पांच हजार व झाडी ाग. कांहीं उपाय नाहीं. किल्ल्यावरील पाणी सरोन निरुपाय गोष्ट ाली. चित्रदुर्गकर होसदुर्गास आले, तेथें पांच सात मुक्काम केले, पुढें ्शीं येतील न कळे, पाईच्या माणसाखेरीज झाडींत लाग नाहीं, ाजकरितां त्यास आणावयास राजश्री शिवाजीपंतास पाठविले त्यांणीं ाऊन बुद्धिहाळाजवळ (चित्रदुर्गकरांस) गांठिलें. तेथून लांबलांब ाजली करून तिसरे दिवशीं आह्मांपाशीं आले. श्राद्धाचा गुंता उरकून आह्मींही मोकळे झालों होतों. राजाची व आमची भेटी झाली. ्यांजकडील निम्में सामान (व) राजश्री पुरुषोत्तमपंत समागमें घेतले. ोफा बुनग्यांत होत्या याजकरितां राजास बुनग्यांत ठेविलें. आणि आह्मीं रातोरात चिरंजीव राजश्री भाऊकडे गेलों. तेथून सारेच मिळोन किल्ल्याकडे गेलों. दुर्गकराचें सामान व लोक येऊन पावले नाहींत (तोंच) किरकोळ वगैरे फौजेंतील पायउतारा करून दोहों तिहींकडून येलगार करून मारमार केली. त्यांणीं बाण सोडिले. इकडील चार पांच माणूस जखमी झाले. त्यांजकडील पांच सात माणूस जखमी झाले. इतक्यांत संध्याकाळ झाला तेव्हां दोन कोस माघारे येऊन उतरलों. दुर्गकराचें सामान येऊन पावलें. दुसरे दिवशीं जाऊन निकड करून पारिपत्य करावें, दुर्गकरांचें सामान व करोल पुढें करून पाठीवर फौज येणेंप्रमाणें जाऊन पारिपत्य करावें, असा निश्चय केला. व त्यासही समजलें कीं 'पाईचें माणूस फार आलें. आतां निकड करितील.' असें समजलें. तेव्हां रातों पळोन मेळकोट्याहून पट्टणास गेले. आह्मीं दोनप्रहरीं किल्ल्याखालीं गेलों. दोन दिवस किल्ल्यावर पाणी अगदीं नसतां हिम्मत धरून झुंजले. पाण्याशिवाय किल्ला कामाचा नाहीं. पाणी वर भरावें तरी आह्मांस राजश्री मामाकडे जरूर जाणें. याजकरितां किल्ल्याचे लोक खालीं उतरून तोफा बांगडी फोडून टाकिल्या. जंबुरा

चिडी होता तो व जेजाला व किरकोळ जकीरा उतरून आणिला. दारू वाईट होती ती जाळिली. रात्रीं जुन्या जकीऱ्याच्या होत्या त्या जाळून तीन कोसांवर येऊन राहिलों. दुसरे दिवशीं बुनग्यांत आलों तों राजश्री मामाकडून पत्र आलें त्यांत पहिल्याप्रमाणें निकड नाहींशी दिसोन आली व आह्मीं तिकडे गेल्यानें ठाणीं राहणार नाहींत, असें समजोन त्यांजकडे पत्रें निकडीनें पाठविलीं आहेत. उत्तरें येत तों उत्तरीदुर्गच्या आसऱ्यास राहणार. तिकडे बलाविलें तरी तिकडे जाऊं. नाहींतर संकरापट्टणाकडे येऊं. विदित होय हे विज्ञापना.

नं० ११६२ **श्रीगणराज.** (मार्ग० शु०. दिसें० दु० पंधरवडा.)

अपत्यें वामनानें साष्टांग नमस्कार विनंती. राजश्री त्रिंबकरावमामांनीं[1] पत्र पाठविलें त्यांतील मजकूर काय आहे कीं, जगदेव वगैरे बारामहाल[2] कडपेकराचे वाटणींतील हैदरखान यांणीं घेतला तो सोडवितों. जगदेव वगैरे तीन किल्ले घेतले. वरकड घेतों. महंमद अलीखान याच्या तालुक्यास उपद्रव करीत नाहीं. त्यांजकडील कागदपत्र सांडणीस्वार येत असतात. राजश्री माधवराव जाधवराई यांचींही पत्रें येतात. मनसबियास अनुकूल होतील असा भाव आहे. राजश्री कृष्णराव[3] आपा कोईंबित्तूराकडे गेले होते ते आह्मीं एक जागां दोन चार रोजांत होतों. ह्मणून लिहिलें आहे. पहिल्याप्रमाणें निकड नाहीं. महंमदअली व टिपू एक होतील तेव्हां भारी मनसबा पडेल ह्मणून आह्मांस येणें ह्मणोन लिहिलें होतें, आतांही न येणें ह्मणोन तर लिहिलें नाहीं. पहिल्याप्रमाणें निकड नाहीं यानकरितां दुसऱ्या पत्राची वाट पहात आहों. दुसरें पत्र त्यांचें येईल त्याप्रमाणें करूं. चित्रदुर्गकराचें सामान सात

---

१. मोरो बल्लाळ यास पत्र. २. हें प्रांताचे नांव. ३ कृष्णराव बळवंत मेहेंदळे.

हजार प्यादे व दीड हजार फौज आहे. सामान चांगलें आहे. वडिलीं लिहिलें कीं "कोणेविशींची काळजी न करणें. खर्चासही पाठविलें आहे. आणीक लागेल तर लष्करांत ऐवज घेऊन वरात करणें." त्याप्रमाणें करण्यांत येईल. श्रीगजानन कृपा करील. (श्रीमंतांचें) बहुत भाग्य आहे आणि पुण्य विचित्र आहे. कोणे गोष्टीविशीं काळजी करीत नाहीं. विदित होय हे विज्ञापना.

नं ११६३ L श्री. (माघ वद्य पष्ठी. २४ फेब्रुवारी.)

राजश्री रामचंद्र नारायण गोसावी यांसी.

सुरुसन इसन्ने सबैन मया व अल्लफ. मातुश्री बाईसाहेबांची आज्ञा होती कीं षट्‌लिंगें कौमुदी ह्मणावी. त्यास आज्ञेप्रमाणें षट्‌लिंगें जगन्नाथभट यांजजवळ ह्मटलीं. अर्थ मात्र समजून पुरता घ्यावयाचा आहे. तोही लवकर होईल. जाहल्या विनंती लिहीन. येणेंप्रमाणें विनंती करणें. वरकड सविस्तर वृत्त लिहून पाठविणें. जाणिजे. छ० १९ जिल्काद.

नं० ११६४ श्रीगणराज. (फाल्गुन शु० ८. १२ मार्च.)

श्रियासह चिरंजीव राजश्री तात्या यांसीं प्रती वामनराव गोविंद. आशीर्वाद उपरी येथील कुशल तागायत छ० ७ जिल्हेज मुक्काम नजीक शिवगंगा जाणोन वर्तमान यथास्थित असे. विशेष. राजश्री त्रिंबकरावमामा घांटाखालोन वरते आल्याचें वर्तमान पेशजी लिहिलें आहे त्यावरून कळलेंच असेल. त्यांचा मुक्काम बेंगरूळापलीकडे तीन कोसांवर दहा बारा दिवस होता. आह्मांस बेंगरूळच्या व मागडी किल्ल्याच्या-

१. नारायणराव (पेशवे यांचे बंधु) यांचें आपल्या आईच्या कारभाऱ्यास पत्र.

मध्यें यावें म्हणून लिहिलें होतें. त्यावरून त्यांच्या लिहिल्याअन्वयें आह्मीं सडे येऊन राहिलों. बुनगें घेऊन चिरंजीव राजश्री भाऊ काकोळ तालुका बाळापूर येथें राहिले. आह्मीं राजश्री मामाकडे पत्रें पाठविलीं त्यांचीं उत्तरें आल्यावर आह्मीं निघोन बुनग्यांत आलों. राजश्री मामा तिकडून आमच्या मुक्कामाच्या वोढ्यावरच मुक्कामास आले. छ० ५ जिल्हेजीं भेटी झाल्या. डेऱ्यास आले होते. तीर्थरूप कैलासवासी नानां व सौ० मातुश्री ताईकरितां फार श्रमी झाले. चार सहा घटका राहून आपल्या डेऱ्यास गेले. काल तेथेंच मुक्काम केला. आज कूच करून येथील मुक्कामास आलों. चिरंजीव राजश्री भाऊच्या शरीरीं समाधान नव्हतें. औषधउपाय करून आरोग्यता जाहलियाचें वर्तमान पेशजी लिहिलें होतें. प्रस्तुत वाटेचा उद्भव होऊन आंव पडूं लागली. त्यास आंवेच्या उपशमनाकरितां औषधउपाय केले परंतु गुण नाहीं, तेव्हां वाट पाहविली. वाट सरली याजकरितां आंवेचा उपद्रव झाला असें जाणोन वाटेचा उपाय करीत आहों. गुण दिवसेंदिवस पडेल. चिंता नाहीं. लक्ष्मेश्वरचा माणूस पत्रें घेऊन आला होता त्याबरोबर पत्र संकलित लिहिलें आहे. मागाहून सविस्तर वर्तमान राजकी लिहून जासूद जोडी पाठवितों. चिरंजीव राजश्री भाऊस दिवसेंदिवस उत्तम प्रकारें (आरोग्य) होत आलें. दोन दिवस वाट सरली होती. आतां त्याचाही उपद्रव राहिला. पेशजी बहिरवदुर्गाचे मुक्कामाहून राजश्री तरवारसिंग याचे जासुदांसमागमें पत्रें पाठविलीं तीं पावलींच असतील. तीर्थस्वरूप आबा श्रीमंतांकडे गेलेनंतर तुह्मीं पत्रें रवाना केलीं असतील. एक दोन दिवशीं तींही पावतील. आह्मीं मुद्दाम जोडी एक दोन दिवसां रवाना करितों. मार्गेंच रवाना करावी, परंतु आठ दिवस राजश्री

१. यापूर्वी गोविंद हरी बारला होता व त्याची स्त्री. ताई सती गेली होती.

मामाकडील वर्तमान कळेल आणि भेटी जाहल्यानंतर सविस्तर कळेल ह्मणून जामूद ठेऊन घेतले होते. आणखी दोन दिवसी सविस्तर वर्तमान लिहून जोडी रवाना करतों. बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद.

नं० ११६९ श्रीगणपति. ( फाल्गुन शु० ८. १२ मार्च. )

अपत्यें परशरामानें दोनी कर जोडून साष्टांग नमस्कार विनंती येथील कुशल वर्तमान तागायत छ० मजकूर पावेतों वडिलांचे आशीर्वादेंकरून सुखरूप असों. विशेष. वडिलांस बहुत प्रकारें चार पांच बंद पत्र लिहिलें आहे. छावणीस न राहण्याचें कारण, तीन वर्षे घर सोडल्यास झालीं. तीर्थरूप मातुश्री महायात्रेस गेली होती ती जाऊन आल्यास एक वर्ष झालें. तिचा वृद्धापकाळ. आणि तीर्थरूप नाना, ताई, राव उभयतां, गेले. तसेंच माधवराव अण्णाही गेले. या शोकेंकरून फारच चिंताग्रस्त होऊन ( मातोश्री ) एक वेळ भेट व्हावी हाच मार्ग चातकन्यायें लक्षीत बसलीं आहेत. पर्जन्यकाळीं मातुश्रीच या प्रांतास येऊन भेट घेऊन जाणार होती. परंतु तीर्थरूप नाना ताई हीं सर्व शोकार्णवीं पडलीं होतीं. मातुश्रीनींच येऊन भेटून जावें हें ठीक दिसणार नाहीं यास्तव मीच वडिलांस लिहून न यावयाचें केलें. चार महिने राहिले आहेत, तेव्हां वडिलाचे आशीर्वादेंकरून निभावून सर्वत्र एक वेळ सर्वांची भेट घेऊं हीच इच्छा करीत बसलों. परंतु वडील गेले! बरें! होणारास इलाज नाहीं. आणखी एक दोन पत्रीं

१. परशुराम भाऊचें मोरो बल्लाळ यास पत्र २. नाना = गोविंद हरि ताई = गोविंद हरीची स्त्री सत्यभामाबाई. उभयतां राव = गोपाळराव व नीलकंठराव. ३. गोपाळरावाच्या व नीलकंठरावाच्या मरणामुळे. ४ चुलता गोविंद हरि.

## श० १६९३ त्रिंबकराव परत म्हैसुराकडे येतो. इ. स. १७७२

पर्जन्यकाळीं लिहिलें होतें कीं, तुह्मीं सडे येऊन मातुश्रीस भेटून हिशेबाचे लढे आहेत ते समजून लवकरच पंधरा दिवसांत माघारें जाणें. त्यास तेसमयीं दुसरी छावणी. आह्मीं राहिलों. आतां हजार बाराशें स्वार छावणीस राहतां मोठें संकट पडेल. आणि तीर्थस्वरूप राव व नीलकंठराव गेले असतां मी उभयतांस तीर्थरूप राजश्री कोन्हेरराव व बाबा यांस रानांत टाकून घरास यावें हें बरें दिसलें नाहीं. ज्यांस दुःखें ते राहिले आणि आह्मीं रिकामे याणीं घरास येऊन मागती त्यांस मुख दाखवावें हें तो सर्वथैव अनुचित! आणि मी घरास गेल्यावर आमचे पथकांतील लोक तो छावणीस राहणारच नाहींत. आणि उभयतांकडीलही फार तर हजार दीड हजार राहते. सर्व अपेश मजवरच येतें. आपण तसाही शब्द ठेवितां. लौकिकही एक प्रकारचा दिसता. आणि मागें राहिले असते त्यांस चाकरी स्वरूपानुसार येती ते न घडती. तेव्हां दरबारींही बदनाम व्हावें, आजपर्यंत वडिलीं मेळविलें तें सर्व जातें, असें चित्तांत आणून राहिलों. तीर्थस्वरूप नानानीं[1] दोन चार वेळ पत्रें पाठविलीं कीं 'तुमचें येणें घडतें तर बरें होतें. मातुश्री श्रमी होतात. परंतु इलाज काय?' असें ते लिहीत गेले तेव्हां मी कसें यावें हें सर्व आपणास समजत आहे. तीर्थस्वरूप राजश्री बाबाच्या[2] मर्जीस आपण वाकब आहांच. शिलेदार व पदरचे कारकून व शागीर्दपेशा आदिकरून सर्व राजी आहेत हें आपणास कळतच असेल. एक छावणी. बहुत दिवसाचे सोबती. मागें तेसमयीं वडील नाना घरीं होते ते शब्द ठेवितील यास्तव चार महिने हरकसें बाबांचे मर्जीप्रमाणें लोकांनीं ऐकिलें. पुढें छावणीचा प्रकार घडल्यास त्या पथकांतील लोक तो फारच छावणी करितील!! गुदस्तांपासून लोकांनीं ताळ टाकिला. चाकरी ऐकत नाहींत. यांची मर्जी, त्यांचें करणें, एक मिळत नाहीं.

---

१. गोपाळराव. २. वामनरावबाबांची.

लोक वैशाखाची इच्छा करितात. जरकरितां तसाच प्रसंग घडला तर लष्करांत लोक आमची फजिती करितील! आजपर्यंत सरदारीचा भ्रम होता तो अगदींच जाईल यास्तव येथें फजिती करून घ्यावी ते भरल्यांतच घरास यावें! बाहेरील लौकिक रक्षावा. एक श्रीमंतांची मात्र अवज्ञा होईल त्यामुळें ते अवकृपा करितील तें उत्तम! कां ह्मणाल तरी वडिलांनीं (श्रीमंतांचे) दौलतीसाठीं बहुत श्रम करून लौकिक संपादिला. त्याचे मागें श्रीमंतानीं त्यांचें कांहीं चालविलें नाहीं असा बदलौकिक त्यांचाच होईल! आह्मांस कोणी वाईट ह्मणणार नाहींत. आह्मीं वडिलांमागें कांहीं चाकरी केली नाहीं असेंही जाहलें नाहीं! राजश्री मामानीं जी चाकरी निकडीची अथवा कशीही सांगितली ती कबूल केली. कळेल त्या रीतीनें बजाऊनही आणिली. हैदर याच्या दोन लढाया वडिलांमागें झाल्या त्यांनही आह्मीं लौकिक गमाविला असें नाहीं. सालमजकुरीं आह्मांस या प्रांतास ठेऊन (मामा अर्काटाकडे) गेले असतां आह्मीं राहिलों. कळेल तशीं ठाणीं राखिलीं. मामा घांटा खालीं गेले ते फजीत पावोन मात्र आले! आह्मांस कांहीं तुमचें आशीर्वादेंकरून बदनाम झालें नाहीं. असें असतां श्रीमंतांनीं अवकृपाच केली तरी ते थोर आहेत. त्यांचे पदरीं बहुत आहेत. त्यांचें चालवितात. आह्मींही चाळीस पन्नास वर्षांचे चाकर. आजपर्यंत वडिलांनीं एक-निष्ठपणें सेवा केली. आमची सर्वांचीही उमेद तशीच आहे. असें असतां आमचाच लाभकाल अन्नाउदकाचा तुटला असला तरी इलाज आहे असा अर्थ नाहीं! श्रीमंतानींही सर्व लोकांची अनुपत्ती पहावी. आह्मांवर कमाला कोणे प्रकारचा हें ध्यानांत आणून दोन महिने कृपा करोन चालविलें आणि पुढें उमेदवार करून आज्ञा केलिया मामनीं हजीरच आहों. परंतु सालमजकुरीं छावणीस राहणें अथवा हजार दोन हजार फौज ठेऊन सालमजकुरीं उभयतां चिरंजीव गेले आहेत त्यांस ठेऊन तुह्मी येणें ह्मटल्यास देखील अनुकूल पडणार नाहीं. मिरजेतील

चिरंजीवांस तुह्मीं वाकबच आहां. किती चाकरी करून जाल (?) करितील! तसेच तुमचे चिरंजीव तो सदाचिर्लीच (?) आहेत. मन मानेल तशी वागणूक करितात. कोणाचें सांगणेंही त्यांचे बुद्धीपेक्षां अधिक आहे असें नाहीं. सर्व अर्थ येथील आपल्यास कळावें यास्तव फार लिहिलें आहे. आता! मजवर कृपा करून एकवेळ 'देशास येणें' असें आज्ञापत्र पाठविणें ह्मणजे फारच मेळविलें! पुढें आपण वडील आहेत. सर्व अर्थ समजतील, तदनुसार करावें. जर करितां हें न होय आणि आपलें पत्र रहावेंच या भावें आलें तरी आपली अवज्ञा करून देशास येतों. येथें तीर्थस्वरूप राजश्री बाबा व कोन्हेरराव यांचे चित्तीं रहावें असें झालें तरी राहोत. परंतु आपण कांहीं राहत नाहीं. आणि हे छावणीस राहिले आणि मीच यांस टाकोन घरास आलों तरी फिरोन सरदारी कशी करीन? वडिलांमागें त्यांचें निशाण राहील तेथें राहून सेवा करावी ते गोष्ट न झाली (तर) आपले संसारतापत्रयामुळें उठोन आल्यास मागती छावणींतील लोकांस मुख दाखविणें, हें तो फारच अनुचित! तेव्हां परभारेंच सर्व सल्तनत[1] घेऊन श्रीमंतांचे चरणावर नमस्कार करून सर्व त्यांचें त्यांच्या हवालीं करून देशांतरास जावें असें होईल असें आहे. आणि मीच देशास जावें असा आग्रह केला असतां वरकड मंडळीच आधीं छावणीस राहणार नाहींत. 'सर्वही येऊं. श्रीमंतानीं कृपा केली तरी सर्वत्रांवर, आणि रागही केला तरी सर्वत्रांवरच.' असें होईल. कदाचित् आपलें पत्र न आलें आणि दैवयोगेंकरून तसें घडलें तरी त्याचाही प्रकार लिहिलाच आहे. परंतु असें घडणार नाहीं. तीर्थस्वरूप राजश्री कोन्हेरराव यांचे चित्तीं तो जरूर देशास जावें, वडिलांची भेट घ्यावी, असेंच आहे. (मग) तीर्थस्वरूप राजश्री बाबाच राहतील असें कसें घडेल? तेव्हां सर्वही उठोन येऊं! तेव्हां हें

१. फौज, दौलत.

पत्र लक्ष पत्रांचे जागां मानून याची पैरवी करावी. नाहींतरी आह्मांवर बोल नाहीं. आह्मीं चैत्र अखेरपावेतों येथें आहों. वैशाख शुद्धपक्षीं राहोन सल्ला नाहीं तवपावेतों असें झाल्यास रहात नाहीं. येतों. येतों हें सत्य. दुसरें पत्र याउपरी या मजकुराचें पाठवीत नाहीं. आपण कळेल त्याप्रमाणें बंदोबस्त करावा. येथें कांहीं सलुख[1] होत नाहीं असें दिसतें. आपणांस कळावें. आबा! एक वेळ तुह्मीं आह्मांस आडांतून काढणें. पुढें ऋणानुबंध अन्नोदकाचा असेल त्याप्रमाणें घडोन येईल. परंतु एक वेळ श्रीमंत कृपा[2] करीत असें करावें. नच करीत तरी दैव-नुसार होणें तें होईल! परंतु छावणीस आमची फौज अथवा कोणी एक रहात नाहीं हें त्यांस समजावें. वैशाखमासीं घरास येतों. लज्जारक्षक श्री आहे, वडिलांचें पुण्य आहे. फारशी फिकीर करीत नाहीं. फार लिहिलें ह्मणून राग न करावा. सर्व आपल्यास समजावें यास्तव लिहिलें आहे. याउपरी जसें कळेल तसें करावें. बहुत काय लिहिणें कृपा कीजे हे विनंती. हें पत्र दुसरेचे दृष्टीस न पडे तसें करावें.

नं० ११६६ श्री. (फाल्गुन शु० ८.
१२ मार्च.)

तीर्थस्वरूप राजश्री आबा वडिलांचे सेवेशीं.

अपत्ये परशरामानें दोनी कर जोडून साष्टांग नमस्कार विनंती येथील कुशल तागायत छ० जिल्हेज पावेतों आपले आशीर्वादेंकरून सुखरूप असों. विशेष. अलीकडे आपण कोकणांतून स्वाराबरोबर पत्र पाठविलें त्याजवर फिरोन पत्र येऊन वर्तमान कळत नाहीं. ऐसें नसावें. सदैव पत्र पाठवून तिकडील साकल्यार्थ वर्तमान लिहून संतोषवीत जाणें. यानंतर इकडील वर्तमान तरी माघ शु० १ स

---

१. तह हैदराशीं. २. लष्करांतून परत घरीं या अर्थी आज्ञा देण्याची कृपा.

मजला ज्वर येऊं लागला. मस्तकावर फारच भार होऊन पांच सात दिवस फारच हैराण झालों. तों तोंडास कांहीं उपद्रव होऊन गळा सुजला. वाचा बंद व्हावयाचा प्रकार झाला. तों श्रीकृपें-करून एक वैद्य चांगला मिळाला. त्याणीं औषधी उपाय करून, कांहीं गोदानें, म्हैसदान, जप ब्राह्मणांकडून करविलीं त्यानें आरोग्य झालें. पंधरा वीस दिवस अगदीं स्नान राहिलें होतें. चोरे पाणी घेतलें. शिवरात्रीचे दिवशीं पंचगव्य घेतलेचा दिवस समाधान होतें. तों मागती दुखणें फिरलें. आंव पडूं लागली. तीन चार दिवस फारच वेग. नित्य पंचवीस तीस वेळां याप्रमाणें होऊन शरीर फारच क्षीण झालें. उप-रांतिक उतार पडला. प्रस्तुत ती व्यथा थोडीशी राहिली आहे. लौक-रच आरोग्य होईल. अद्यापि स्नान केलें नाहीं. दोन चार दिवसांत स्नानही करितों. वडिलीं फिकीर न करावी. सर्व वडिलांचे आशीर्वा-देंकरून क्षेम होईल. इकडील वर्तमान तरी आह्मांस राजश्री त्रिंबकरावमामा इकडे ठेऊन घांटाखालीं गेले ते घांटावर आले. त्यांची आमची गांठ पडली तें वर्तमान सविस्तर तीर्थस्वरूप राजश्री बाबानीं लिहिलें आहे त्याजवरून कळेल. आपण पेशजी लिहिलें होतें कीं पुण्याहून वर्तमान आलें कीं 'मामास सलुखाविशीं निकडीचीं पत्रें गेलीं आहेत. लौक-रच सलुख होऊन सारेच देशास याल. तसें न होय तरी आपणही पुण्यास जात आहों.' त्यास तें वर्तमान सत्य. मामास पत्रें आलीं आहेत. 'नंदीगड चिकबाळापूर देखील देऊन पन्नास लक्ष रुपयांची निशा करून घेऊन सलुखाचा गुंता उरकोन छावणीस न राहणें' परंतु येथील प्रकार पाहतां आपाजीराम पट्टणाकडून—फार दिवस झाले—आले आहेत. बोलीचा मजकूर तरी बेरीज मात्र आहे. परंतु "चार लक्ष रुपयांचें जवाहीर व वीस हत्ती दोन लक्ष रुपयांचे ध्यावे. एकोणीस लाख रुपये रोख देतों." येणेंप्रमाणें पंचवीस तूर्त देणार त्याचा फडशा. बाकी पंचवीस राहिले त्याची निशा आपणच देईन. चार

महिनेची हसेबंदी, याप्रमाणें सोळा महिन्यांत पंचवीस (लक्षांचा) झाडा करीन. गड कोट किल्ले दुर्ग (तुह्मीं घेतलेले परत) द्यावे याप्रमाणें बोलतो. हें कसें बनेल? याचा विचार श्रीमंतांस राजश्री मामानीं लिहिला आहे. तेथील आज्ञा येईल त्याप्रमाणें करितील. परंतु राजश्रींचे मतें कांहीं सलूख करून देशास यावें हें नाहीं. कां त्यांनीं यावें! चाळीस हजार फौज, तोफखाना, वगैरे सरंजाम श्रीमंतांची दौलत येथें तशी आहे. नित्य राग रंग नाच हाच प्रकार. घरीं आल्यास हें कोठें आहे! बरें, घर तरी नीट ह्मणावें तरी तेंही नाहीं! असो. त्याचा प्रकार आह्मांस कशास पाहिजे? आपलें वर्तमान तरी आपण कोंकणांतून आल्यावर माघ वद्य ६।७ स पुण्यास जाणार ह्मणोन लिहिलें होतें, त्यास जाणें असलें तरी आजला पत्रेंही आलीं असतीं. तेव्हां असें कांहीं झालें नाहींसें दिसतें. तीर्थस्वरूप राजश्री कोन्हेररावजी यांचे कन्येचें लग्न फाल्गुन शु० ३ चें होणार होतें यास्तव वडिलानीं आपल्यास ठेऊन घेतलें असेल. इकडून कोन्हेरराव यांचें येणेंही झालें नाहीं त्याजवरून आपण राहिलां हा निश्चय आह्मीं केला. लग्न झालियावर पुढें फाल्गुनी पौर्णिमा समीप आली. तो तिथि उरकोन फाल्गुन वद्य पक्षीं कदाचित् आपण निघाले असतील. अथवा प्रतिपदेचा मुहूर्त नाहींच असला तरी हीं पत्रें आपणास मिरजेतच पावतील. जर करितां सलुख होऊन देशास सर्वांचें येणें झालें तरी फार चांगलें झालें. येथें सलुख न होय आणि पुण्यांतच श्रीमंतांनीं सलुख करून फौज देशास बलाविली तरी तो सर्वांस गुरु एकादश स्थानीं आला असें होईल!! परंतु तो प्रकार कांहीं दिसत नाहीं. येथील अधिकारी राजश्री मुरारराव घोरपडे सेनापती यांचें अनुमतें चालणार. त्यांचे विचारें सलुख, श्रीमंतांचें कल्याण व्हावें, हें किती आहे हें आपण जाणतच

---

१. त्रिंबकरावाच्या. २. कोन्हेरराव यांचे वडील त्र्यंबक हरि.

आहां. जरकरितां हैदर याचें पारिपत्यच करावें असें असतें तरी घांटाखालीं पांच महिने मनसब्याचे दिवस ते व्यर्थ कशास घालविते? आज पांच महिने याच रानांत बेंगरूळ अथवा बिदनूर या स्थळीं मेहनत करिते तरी हीं स्थळें हस्तगत होतीं. असो! होणार तदनुसार बुद्धिही झाली! परंतु आमचा मात्र तरणोपाय दिसत नाहीं. पहिले वर्षी तीर्थस्वरूप रोव कैलासवासी होते तेव्हांच छावणीस राहणेंविशीं किती संकट पडलें! परंतु पहिलें वर्ष होतें, कसेंही गेलें. तों वडिलांचा काळ माघमासीं झाला. पुढें युद्ध झालें. श्रीमंतांस महत् यश आलें. परंतु तीर्थस्वरूप नीलकंठराव श्रीमंतांचे कामास आले. वडील सर्व गेले. पुढें छावणीचा प्रकार आला. तेव्हां आपणास बहुत वेळ लिहिलें कीं, "एक वेळ पुणेंस जाऊन जेणेंकरून आमचें येणें देशास होय तें करणें. वडिलांची आमची भेट होईल." परंतु चिरंजीवाचे दुखण्यामुळें आपलें जाणें न झालें. आणि आपण श्रीमंतांस विनंती पत्रें पाठविलीं व रामाजी गणेशही पाठविले. परंतु आमचें तापत्रय चित्तांत न आणतां मनसब्यावरच दृष्टि देऊन छावणीसच रहावें अशीच ( आपली ) मर्जी! असो. उभयतां वडील गेले. मागें सर्वांस दुःख झालें. उभयतां तीर्थरूप मातुश्री यांची भेट न झाली. वडिलांमागें उठोन यावें तरी तेंही एक प्रकार दिसतें. एक वर्ष तरी त्यांचे मागें सरदारी करावी असें चित्तांत आणून श्रीकृपेनें छावणीहून घरास जाऊं, सर्वांची भेट होईल. हीच इच्छा करून राहिलों. तो सर्वांचें छत्र वडील उभयतांही गेले. भेटीचाही योग न घडला. जन्मांतर तसेंच यास इलाज नाहीं! आतां मागती तेच विवंचना आली. आपलें ( पुण्यास ) जाणें न झालें. अगोदर चार

---

१. त्रिंबकराव व मुरारराव. २. गोपाळराव हयात होते तेव्हां. ३. गोपाळरावाचा. ४. मोतीतलावाची लढाई. ५. लढाईत पडले. ६. परशुरामभाऊनीं हें ज्यास पत्र लिहिलें आहे त्या मोरोबाचा मुलगा श्रीपतराव. ७. गोपाळराव व नीलकंठराव. ८. नीलकंठरावाची व त्याच्या आईबापांची? ९. गोविंद हरि त्याची स्त्री.

दिवस जाणें होतें ह्मणजे एक दोन वेळ युक्तिप्रयुक्तिनें (श्रीमंतांस) सांगोन हरकसेंही छावणीहून सुटका करितां. आतां आपणास श्रीमंतांसंनिध जावयास चैत्र मास पौर्णिमा (लागेल) अथवा अगोदर जाणें झालें असल्यास प्रतिपदेचे सुमारें झालें असेल. गेल्यावर आठ चार दिवस आगतस्वागत होऊन पुढें हिशेबाचा लढा पडणार. असे कित्येक पेंच आहेत. वैशाखमासीं आपण पत्रें पाठवितील कीं 'श्रीमंत कृपा करीत नाहींत. छावणीस फौज ठेवावी असें मानस!' त्यास घरचा प्रकार तसा घडला. सरंजामाचा तरी प्रकार तुह्मांस कळतच आहे. दोन छावण्या मिळून नवेंच आमचेच फौजेस कर्ज चार पांच लक्ष रुपये झालें. जुने लोकाचें देणें त्यास ठिकाणच नाहीं. इतक्या कर्जाचें कारण काय ह्मणाल तरी ईहिदेंत[1] सरंजामानें (उत्पन्न) काय आलें तें आपण हिशेब पाहिले आहेत, समजलेंच असेल. छावणीमुळें बारमाही खर्च काय बसेल हेंही कळेलच. असो. त्याचा विस्तार लिहावयाचें कारण नाहीं. तसीच उभयतांचे[2] सरंजामाची गत. आणि दुःखें त्यांचीं तेच जाणतात! आपण सरंजामास व संसारिकास माहीतच आहां. आतां तीर्थरूप राजश्री आपा कुरुंदवाडीं बहुतच श्रमी होतात. तशीच मातुश्री तासगांवीं श्रमी होतात. मिरजेंत माल वडील श्रम पावत होते ते गेले! आपण ह्मणतील, "काय करावें! श्रीमंतांची मर्जी एक प्रकार झाल्यास रागास येतील. सरंजाम काढितील. वडिलामागें लौकिक एक प्रकारचा दिसेल तें ठीक नाहीं. छावणी करावी. लौकिक मिळवावा." ऐशास कर्जदार झालों नांवासाठीं. आतां पुढें कोणी कर्जही देणार नाहीं. आपण ह्मणतील कीं 'खर्चाची काळजी न करावी,' तेणेंकरून परिणाम लागणार नाहीं. लोक छावणीस राहणार नाहींत. यांतच हैराण आहेत. तेव्हां राहून नांवासारखी चाकरी मांगतील ती

---

१. इहिदे सबैन मय्या व अलफ. (म. ११७०।७१.) २. वामनराव व कोन्हेरराव यांच्या.

करावी तें होणार नाहीं. तेव्हां तरी स्वरूप राहणें कठीण. त्यापेक्षां अगोदरच निकाल काढून देशास यावें हेंच उत्तम. घर संसारही कळेल, वडिलांचें दर्शन होईल, दोन महिनेनंतर मागतीं (इकडे येण्यास) सिद्धच आहों. आतां राहणें हे गोष्ट सर्व प्रकारें अनुचित. यास्तव श्रीमंतांस विनंती करून पत्र पाठवावें. व श्रीमंतांनींही 'बहुत दिवसांचे सेवक. यांजवर कसाला व कितेक प्रकारचे पेंच' हें समजोन त्यांनीं पत्र द्यावें. नच देत तरी आह्मांस येणें तो जरूर, याजमुळें जसें श्रीनें निर्मिलें असेल तसें होईल! आपणास कळावें यास्तव विस्तारें लिहिलें आहे. आपलें कांहीं जाणें लौकर होऊन तेथील पत्र समयास येतें असा प्रकार तो घडतच नाहीं. आह्मांस तो येणें जरूर. यांत श्री पार पाडणार! सरंजामपैकीं ऐवज ह्मणावा तर अद्यापि कित्तूरचा ऐवज वडिलांकडून यावयास हिसका. तसेच दुसाला इहिद्दे इसन्ने सुरापुरचे ऐवजास ठिकाणच नाहीं. अदवानीचा सालमजकूरचा ऐवज अद्यापवर कांहींच नव्हतें, परंतु देवजीपंत याजकडील पत्रें आलीं होतीं (कीं,) दिपवाळीपर्यंत झाडा होय असा ऐवज नबाबानीं[1] देविला आहे. परंतु अद्यापि निशेचा[2] प्रकार दिसत नाहीं. त्यांजकडेही पत्रें पाठविलीं आहेत. काय उत्तर येतें न कळे. आपण 'सल्ला होऊन यावयाचेंच होईल' ह्मणोन कदाचित् लिहितील, श्रीमंत दुराशेस गोंवून आषाढमासीं छावणीचा डौल दाखवितील, अथवा आषाढमासीं येणें ह्मणोन आज्ञा करितील, त्यासमयीं नद्यांस पाणी येईल, एवढें लष्कर कसें उतरेल हें आपण चित्तांत आणावें. मामास परभारें लिहितील तर तो कांहीं आषाढमासावांचून निरोप देणार नाहीं. ते फजितीच होईल! कृपा करून पत्र देतील तर पाठवावें. नाहीं तरी आह्मीं चैत्र अखेर झाल्यावर आपणापाशीं आलों असें समजावें. या मजकुराचें दुसरें

१. अदवानीच्या नबाबानें. २. हमीचा, खात्रीचा.

पत्र लिहीत नाहीं. पत्र लक्ष पत्तांचे जागा मानून आह्मीं आलों असें समजोन तेथील रदबदल झाल्यास करणें. नाहीं तरी आह्मीं येत आहों. बहुत काय लिहिणें कृपा कीजे हे विनंती.

नं० ११६७ श्रीगणराज. (२१ मार्च.)

अपत्यें कोन्हेरीनें साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत फाल्गुन वद्य २ गुरुवार मुक्काम उत्तरीदुर्ग येथें वडिलांचे आशीर्वादेंकरून वर्तमान यथास्थित असे. विशेष. अलीकडे वडिलांकडून पत्र येऊन वर्तमान कळत नाहीं असें नसावें. राजश्री मामानी भेटी मौजे बेत परगणे चाळापूर थोरलें येथें झाली. घांटाखालीं गेले होते तेथें कांहीं सजलें नाहीं. येथें राजकारण सलुचानें चालवून बनितलें, परंतु अद्यापि राजश्री आपाजीरामाचे विचारास आलें नाहीं! पेशजी आपाजीराम बोलत होता तें बोलणें येथें आणविल्यापासून राहिलें. सविस्तर वर्तमान चिरंजीव राजश्री बाबांनीं लिहिलें आहे त्यावरून कळेल. तहाची बोली जेव्हां ठरत नाहीं तेव्हां छावणीचा प्रकार दिसतो. त्यास मजला साफ कांहीं राहणें नाहीं. सरदारी राहिली तरी उत्तम. न राहिली तरी उत्तम! प्राक्तनीं असेल तसें होईल. राहून काय होणार! तीर्थरूपानीं भेटीस्तव या असें दर आशीर्वादपत्रीं लिहितात. परंतु वडिलीं लिहिलें होतें कीं 'न येणें.' त्यावरून लग्नास देखील आपले आज्ञेवरून आलों नाहीं. याउपर राहणार नाहीं. वडिलांस कळावें ह्मणून लिहिलें असे. इकडील सविस्तर उभयतां

---

१. पत्र मोरो बल्लाळ यास लिहिलेलें आहे. तारीख मितीवरून घातली आहे. पत्रांतील मितीस गुरुवार पडावा तो न पडतां जंत्रींत शनिवार दिला आहे. २. हा हैदराचा वकील. ३. बाप त्रिंबक हरी यानें. ४. तुह्मीं. ५. वामनराव व परशुरामभाऊ.

श० १६९३ हैदराशीं तह. इ. स. १७७२

चिरंजीव लिहितील त्यावरून कळेल. सेवेशीं विदित होय हे विज्ञापना. चिरंजीव राजश्री श्रीपतराव यास आशीर्वाद. सदैव पत्र पाठवीत जाणें हे आशीर्वाद. चिरंजीव राजश्री भाऊस[1] समाधान नव्हतें. त्यास अलीकडे समाधान झालें. थोडे दिवसांत स्नानही करितील. कळावें ह्मणून लिहिलें असे. हे विज्ञापना.

नं० ११६८ श्रीगणपति. (फाल्गुन वद्य. मार्च. दु० पंधर.)

अपत्यें पांडुरंगानें साष्टांग नमस्कार विज्ञापना. आज भौमवारीं लष्करचीं पत्रें ११ जिल्हेजचीं आलीं त्यांत वडिलांचे नांवाचे लखोटे होते ते पाठविले आहेत त्यावरून सविस्तर कळेल. पत्रांतील अर्थ राजश्री मामांस श्रीमंतांचीं पत्रें गेलीं कीं 'सल्ला हरकसाही करून लौकर येणें' अशीं पत्रें गेलीं आहेत. व हैदरखान याजकडून आपाजीराम आला आहे त्याच्या बोलण्यांतील भाव "पन्नास लक्ष रुपये द्यावे. त्यांत दोन लक्षांचे हत्ती व चार लक्षांचे जवाहीर व एकोणीस लक्ष रुपये रोख, येणेंप्रमाणें तूर्त पंचवीस द्यावे. बाकी पंचवीस लक्ष राहिले त्याचे चार हप्ते करावे. सवासहा लक्ष रुपयांचा एक हप्ता याप्रमाणें चौ हप्त्यांनीं द्यावे," असें सल्याचें बोलणें होत आहे. तीर्थस्वरूप राजश्री भाऊंचे शरीरीं मागती आंवेची पीडा झाली होती, आतां उपशमन आहे. कळावें बहुत काय लिहिणें हे विज्ञापना.

नं० ११६९ श्री. (३ एप्रिल.)[2]

तीर्थस्वरूप राजश्री आबा वडिलांचे सेवेशीं.

अपत्यें श्रीपतीनें दोनी कर जोडून शिर.... .... विज्ञापना तागायत

---

१. परशुरामभाऊस. २. पांडुरंगराव गोविंद याचें त्रिंबक हरीस पत्र.

फाल्गुन वद्य अमावास्या पावेतों सुखरूप असों विशेष. वडील गेल्यानंतर तीर्थस्वरूप राजश्री आपांस बरें वाटत नाहीं ह्मणून एकाएकीं तीर्थस्वरूप राजश्री भास्करपंत आपास चिठी आली. तसेंच तीर्थस्वरूप निघोन कुरुंदवाडास गेले तों तीर्थरूपांस वमन पांच सात वेळ झालें होतें व शौचास वीस वेळां गेले; आणि जीव कासावीस होऊं लागला ह्मणून वडिलांनीं प्रायश्चित्त दिलें. व दोन तीन गोदानें झालीं. तों तीर्थस्वरूप राजश्री तात्यांनीं दोन राऊत समाचारास पाठविले ते माघारे सहावे तासीं आले त्यांजबरोबर राजश्री महादाजीपंतानीं लिहिलें कीं प्रायश्चित्त व दानें केलीं ह्मणून लिहून पाठविलें. तेव्हां येथून वडील निघाले तों तिकडून राऊत आला कीं तीर्थरूपांचें प्राणोत्क्रमण झालें ह्मणोन सांगावयास आला तों त्याची व वडिलांची भेट लक्ष्मीपासीं झाली. तेव्हां तसेच निघोन गेले तों त्यांची यांची भेट कृष्णेवर झाली. अकस्मात् मोठा घात झाला. आदले दिवशीं सांजेस मळ्यांत गेले आणि माघारे आले. आणि रात्रीस स्नान केलें, आणि संध्या केली. देवांस फुलें वाहिलीं. रात्रीस चार तासपावेतों वेदमूर्ति राजश्री रामचंद्रभट वाटवे व वडील बुद्धिबळें खेळत होते. आणि वेदमूर्ति घरास गेलेवर वमन व ढाळ झाले. उदय ( सूर्योदय ) झाल्यावर प्राणोत्क्रमण झालें. तीर्थस्वरूप आकाबाईस बरें वाटत नव्हतें ह्मणून काळजी करीत होतों ती एकीकडे राहिली आणि वडील कैलासवासी झाले! होणारास उपाय नाहीं. मातुश्रीही पहिल्याप्रमाणेंच आहेत. ईश्वर एकेक संकटें घालितो!

---

१. त्र्यंबक हरि कुरुंदवाडकर. हे पत्र लिहिणाराचे चुलत आजे. २. भास्कर हरि यांनीं. भास्कर हरि ऊर्फ भास्करपंत आपा हेही पत्र लिहिणाऱ्याचे चुलत आजेच. ३. महादाजी बल्लाळ हा कुरुंदवाडकरांचा कारभारी. ४. पांडुरंगराव तात्या हे पत्र लिहिणाराचे चुलत चुलते. ५. मिरजेहून कृष्णेच्या घांटावर जातांना लक्ष्मीच्या देवळापाशीं. ६. मयत त्रिंबक हरि. ७. त्रिंबक हरीची स्त्री.

वडिलांचा काल चतुर्दशीयुक्त अमावास्या गुरुवारीं देवाज्ञा झाली. वरकड तीर्थरूपानीं लिहिलें आहे त्याजवरून कळेल. येथून लष्करासही पत्रें गेलीं आहेत. आपणास कळावें ह्मणून लिहिलें आहे. वडिलांनीं जातांना आज्ञा केली होती त्याप्रमाणें वर्तणूक करितों. देवापाशीं हें झाल्यानंतर तीर्थस्वरूप राजश्री तात्या आज्ञा करितील तेव्हां जातों. राजश्री आपाजीपंताचे आज्ञेप्रमाणें वर्ततों. तीर्थस्वरूप बाईचे शरीरीं समाधान उत्तम प्रकारें झालें. वडिलांनीं कांहीं चिंता न करावी. राजश्री भास्करपंताचे शरीरीं सावकाश उत्तम प्रकारें झालें. येथें येऊन बसत असतात. तीर्थस्वरूपांशीं आज्ञा झाली तर वडिलांस तेरदाळपैकीं तीन हजार रुपये देणें ह्मणून लिहिलें; त्यास वडिलांची आज्ञा झाली नाहीं व कोणी मागावयास आलें नाहीं. आलें ह्मणजे आज्ञेप्रमाणें तीन हजार रुपये तेरदाळपैकीं देतों आणि पावती घेतों. बहुत काय लिहिणें हे विज्ञापना.

नं० ११७० श्री. ( २० एप्रिल. )

चिरंजी राजश्री कोन्हेरराव व रावोबा यांसीं प्रती सालूबाई आशीर्वाद येथील कुशल तागायत चैत्र वद्य ३ सोमवार जाणून स्वकीय कुशल लेखन करीत जावें. विशेष. तीर्थस्वरूप आपा गेले. तुह्मांवर सारे कसाले एक वेळच पडले! निरुपाय गोष्टीस उपाय काय! विवेक करून अवसान धरावें. तीर्थरूप मातुश्री अक्का थकतच दिवसेंदिवस चालली. तुमची एकवेळ भेटी होती ह्मणजे बहुत उत्तम होतें. भेटी होईल

---

१. पांडुरंगराव तात्यांनीं. २. नरसोबाच्यावाडीस सुतक संपल्यावर सेवेकरितां जाईन. श्रीपतरावास कांहीं वायूचा झटका येत असे त्याच्या परिहारार्थ ही देवसेवा. ३. पांडुरंगराव तात्यास. ४. ही गोविंद हरींची मुलगी सर्व भावंडांत थोरली, ही बालविधवा होती.

तो सुदिवस! बहुत काय लिहिणें लोभ असों दीजे हे आशीर्वाद. सौभाग्यवती ठकूबाईचा आशीर्वाद. अपत्यें सौभाग्यवती कुसाबाई नमस्कार. सदैव आशीर्वाद पत्रीं साभाळावें. हे विनंती.

नं० ११७१ श्री. ( १८ मे. )

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री शिवरावजी
स्वामीचे सेवेशीं.

पोष्य हरी लक्ष्मण कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती उपरी येथील कुशल तागायत वैशाख वद्य २ पावेतों मुक्काम लक्ष्मेश्वर वर्तमान यथास्थित असे. विशेष. लष्करचें वर्तमान तर राजश्री आपाजी दामोदर काल लष्कराहून येथें आले. त्यांची स्त्री निवर्तली ह्मणोन लग्नाकारितां घरीं[3] गेले. त्याणीं वर्तमान सांगितलें जे हैदरअलीखानाचा तह झाला, ऐन खंडणी पन्नास लक्ष व दरबार खर्च दहा लक्ष एकूण साठ लक्ष रुपयांवर करार झाला. तूर्त अठ्ठावीस लक्ष रुपये द्यावे, बाकी बत्तीस लक्ष रुपये राहिले ते सावकारीं खिस्ती करून द्यावी, याप्रमाणें करार झाला तों राजश्री आपाजीराम वकील यांजकडून करारांत कांहीं अंतर आलें ह्मणून चौकींत बसविलें. त्या मध्यस्थींत राजश्री आनंदराव रास्ते व राजश्री मुरारराव घोरपडे मध्यें येऊन करार झाला. अठ्ठावीसपैकीं तूर्त दोन लक्ष रुपयांचें जवाहीर व एक लक्ष ऐन हस्तीं, एकूण तीन लक्ष रुपयांचा ऐवज लष्करांत येऊन पोंचला. बाकीची निशाही होईल. ऐवजाचा करार झाला ह्मणजे लष्कर देशी येणार. याप्रमाणें वर्तमान सांगितलें. कळलें पाहिजे. लष्करचीं पत्रें आलीं ह्मणजे वर्तमान गनिम्नर लिहून पाठवितों. बहुत काय लिहिणें लोभ असों दीजे हे विनंती.

---

१. उपनांव करमरकर. २. मिरजेस.

शा० १६९४ **हैदराशीं तह.** इ. स. १७७२

नं० ११७२ **श्री.** ( ज्येष्ठ शुद्ध ४.
९ जून. )

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री मोरोपंतआबा स्वामीचे सेवेशीं.

पोष्य लक्ष्मण हरी साष्टांग नमस्कार विनंती येथील कुशल तागायत छ ३ रबिलावल पावेतों वर्तमान यथास्थित असे. विशेष. आपला निरोप घेऊन निघालों तो छ० १ रबिलावलीं पो। मजकुरास पावलों. लष्करचें वर्तमान तरी राजश्री भाऊनीं लिहिलें होतें कीं, हैदरखानाचा तह झाला. कांहीं ऐवज आला आहे. बाकीचे ऐवजाची निशा झाली ह्मणजे लष्कर देशास फिरणार. राजश्री तात्यानीं ऐवजाकरितां लिहिलें होतें त्यास आह्मीं येऊं तों चिरंजीवानें सोळा हजार होन व अदवानीचा ऐवज ऐसा रवाना केला होता. मिरजेस पावला असेल. येथील वसूल यंदा बाकी फार राहिली आहे. त्यास आह्मीं आल्यावर वसुलास लाविलें आहे. वसूल होतां होईल तों करितों. बहुत काय लिहिणें लोभ असों दीजे हे विनंती.

नं० ११७३ **श्रीगणराज.** ( १६ जून. )

चिरंजीव राजश्री कोन्हेरराव व बाबा व भाऊ यांसीं प्रती मोरो बल्लाळ आशीर्वाद उपरी येथील क्षेम तागायत ज्येष्ठ वद्य अष्टमी भौमवार मुक्काम पुणें वर्तमान यथास्थित असे. विशेष. तुह्मांकडील वर्तमान अलीकडे कांहींच कळत नाहीं. मोठी चिंता लागली आहे. श्रीमंत वद्य पंचमीस वाड्यांत आले. काल सप्तमीस राजश्री सखारामपंतास कारभार सांगितला. श्रीमंत राजश्री दादासाहेब आनंदवलीहून आले. वाड्यांत राहिले. कळावें. सल्ला झाला ह्मणून तुमचीं पत्रें आलीं त्या अलीकडे गांवांत लोक बोलतात कीं सल्ला बिघडला. तुमचीं तो पत्रें येत नाहींत.

---

१. हरिहरचे मामलेदार. उपनाम लागू. २. परशुरामभाऊनीं.

सल्ला बिघडला तेव्हां छावणीच होईल असें दिसतें. आह्मीं तुमच्या येण्याविशीं संधान करावें तरी सल्ला झाला ह्मणून आजपर्यंत पत्रें होतीं यास्तव न केलें. आतां करावें तरी श्रीमंतांची शरीरप्रकृत ठीक नाहीं याजमुळें कारभाराची गोष्ट कोणीच बोलत नाहीं. कारभारी नवे झाले यांस पुसावें तरी कसें न कळे. तुह्मीं राजश्री मामांशींच बोलून तेथूनच निरोपाचें साधन करावें. अतःपर येथून होणें राहिलें. विस्तारपूर्वक मागाहून लिहून पाठवूं. तुह्मीं देशास न पुसत आल्यानें हे[1] जप्ती करितील. कर्जदार झालों. चिंता करून काय होणें! ज्या काळीं जें होणें तें होईल! तुह्मीं उतावळी केली तरी संकट पडेल असें आहे! बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद. पत्र कोणासीं न दाखवावें. फाडून टाकणें. हे आशीर्वाद.

नं० ११७४ श्रीगणराज. ( २८ जुलई. )

तीर्थस्वरूप राजश्री मोरोपंत आबा वडिलांचे सेवेशीं.

अपत्यें वामनानें कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती. येथील कुशल तागायत आषाढ कृष्ण १३ भौमवासर मुक्काम इटगें तुंगभद्रा उत्तरतीर. वर्तमान यथास्थित असे. विशेष. आह्मीं व राजश्री लक्ष्मणराव रास्ते व राजश्री नरसिंगराव धायगुडे येणेंप्रमाणें येथें तुंगभद्रा उतरावयास आलों. राजश्री लक्ष्मणपंतास टोकरे जमा करावे ह्मणून लिहिलें होतें. त्याजवरून मशारनिल्हेनीं तेरा टोकरे जमा केले, त्यांपैकीं राजश्री अण्णाकडे[2] सहा देविले. आह्मांकडे तीन व चिरंजीव राजश्री भाऊकडे दोन व चिरंजीव राजश्री रावोबाकडे एक व धायगुडेकडे एक, येणेंप्रमाणें वांटून दिले. नदीस पाणी पोटींच होतें. दोन दिवसा आह्मां चौघांकडील झाडून उतरले. (नंतर) सारेच टोकरे अण्णाकडे दिले. आज उद्यांत त्यांचेही झाडून उतरतील. हे बागडकोटाकडे जातात. आह्मीं रामदुर्गो-

१. पेशवे जहागिरीचा मुलूख जप्त करितील. २. रास्ते लक्ष्मणराव.

जवळ मलप्रभा उतरावयास येतों. कळावें. इकडील वर्तमान आपणांस समजलें असावें ह्मणजे तेथें जाबसालास ठीक पडेल यास्तव लिहिलें आहे. तीर्थस्वरूप राव लोकसहीत तुंगभद्रेवरून मिरजेस गेले. आह्मीं इकडे आलों. राजश्री त्रिंबकरावमामांची आमची भेटी झाली. रायाचें वर्तमान ऐकून फार श्रमी झाले. पुढें बोलणेंचालणें व कर्तव्याचे विचारें निखालसपणें बोलिले. त्याप्रमाणें यंदा चैत्रमासपावेतों गोडपणेंच चाललें. कारभारसंबंधें बोलणेंचालणें होत होतें त्याचें वांकडें दुतर्फाही नव्हतें. संस्थानचीही जाबसाल आमच्या विद्यमानें झाला तो कारभार शेवटास गेला. हैदरखान याचे खंडणीचा ठराव झाल्यानंतर तीर्थस्वरूप राजश्री कोन्हेरराव यांच्या निरोपाचें पुसिलें जें ' ( यांच्या ) मातुश्रीस बरें वाटत नाहीं, याजकरितां शेंपन्नासानिशीं निरोप द्यावा. ' त्यास तें त्यांच्या मर्जीस न ये ! तेंही एकीकडे ठेऊन आज उद्यां ह्मणतां सारा वैशाख ( कोन्हेरराव ) राहिले. ज्येष्ट शुद्धांत निरोप घेऊन त्यांस व बुनगे लोकांस निम्मेस निरोप द्यांवा ह्मणोन परवानगी घेऊन लावून दिले. निम्मेच्या अजमासास राहतां राहतां लोक कमी राहिले, परंतु असामघणी फार करून राहिले आहेत. ज्येष्ठ मासांत हैदरखानाकडील पैका आला. पौर्णिमेस कूच झालें ते तुमकूरच्या नजीक आलों. पुढें मजल दरमजल यावें त्यास हिसका बसला. राजश्री लक्ष्मणराव अण्णाचें व मामांचें विरुद्ध आलें त्याचा विस्तार पेशजी लिहिलाच आहे. हैदरखानाच्या बोलीचालींत पहिल्यापासून खुद्द मामा व सेनापती उभयतांच्या विद्यमानें ठरलें. शेवटीं निभावणीस पाहिजे तेव्हां अण्णा झाले. कराराप्रमाणें निभावणी करावी ती न केली, सबब कजिया झाला. शेवटीं आह्मीं चौघांनीं सांगितलें कीं, आपण वचन दिल्याप्रमाणें निभवावें. वचन देतेसमयीं विचार करावा होता. अथवा चौघे सरदार श्रीमं-

---

१. गोपाळराव. २. कर्नाटकांतील संस्थानापासून खंडणी घेण्याचा.

तांच्या पदरचे आह्मीं लहान मोठे होतों ( त्यांस ) असें वचन द्यावें किंवा न द्यावें हें पुसिलें नाहींत. वचन दिलेंत. आतां नाहीं ह्मणणें हें युक्त नाहीं. कराराप्रमाणें निभवावें. त्याजवरून शेवटास गेलें. कराराप्रमाणें गुंता उरकला. बोलाचाली झाली होती त्याजकरितां अण्णाच्या डेऱ्यास मामानीं येऊन चार गोष्टी बोलून समाधानें संतोषेंकरून निरोप द्यावा ती गोष्ट न झाली. सेनापतीखेरीज पान हालत नाहीं! त्यांच्या विचारें चौघे सरदार रुष्ट झाले, वांकडें दिसलें, तिनकें बरेंच! त्याचीं साधनें मामास सांगावीं, त्याप्रमाणें मामांनीं चालावें, असेंच दोन वर्षे चाललें. आह्मीं वांकडें कां मानावें! परकी[1] असोन कच्चें पक्कें घरचें बाहेरचें सर्व त्यांस समजावें, तोडमोड मनसबा होणें तो त्याच्या विचारेंच व्हावा, तेव्हां श्रीमंतांची आज्ञा मामास असेल ह्मणूनच त्यांच्या विचारें चालत होते. ( असें आह्मीं समजत होतों. ) अण्णाची शेवटीं समजावीस नच केली. आह्मांकडील प्रकार—मध्यस्थींतील जाबसाल चित्रदुर्ग ( संस्थानाचा ) सर्व प्रकारें श्रीमंताच्या लक्षाखेरीज ( संस्थानिक ) तिळतुल्य नाहीं. दोन वर्षे सेवा चाकरी ( त्यानें ) उत्तम प्रकारें केली. एरंडकिरें श्रीमंतानीं देवविलें त्याप्रमाणें राजश्री मामानीं यादीवर दिलें लिहून व आह्मांकरवीं वचन देविलें कीं खामखा वचन देऊन घेऊन देतों. त्यास दोन वर्षे ( तें ठाणें ) ध्यावयास मोठ्या मनसब्यामुळें मुवत्ता झाला नाहीं. सल्लयाचें शेवटास गेल्यानंतर आह्मीं पुसिलें, एशियास 'घेऊन देतों' याप्रमाणें पहिल्यापासून बोलतच होते. तोफखान्याची रवानगी झाली तेव्हां तोफखानेवाल्यांस यादी हेच लिहून दिली कीं, "एरंडकिऱ्यांवरून जाणें, ठाणें घेणें आणि दुर्गकराचे हवालीं करणें. ठाणें घेणें न झालें तरी मुक्काम करून राहणें, तों आह्मीं येतों."

---

1. परकी मुरारराव घोरपडे सेनापति.

याप्रमाणें बोलून चालून दुर्गकरांस सांगोन ठरलें. तोफखान्याचें कूच होऊन शिऱ्यांवरून ती वाट सोडून तुंगभद्रातीरास तोफखाना गेला! आह्मीं बोलिलों कीं तोफखान्याची आपण वाट सांगितली ती चुकली. ते गेले. तेव्हां एरडकिऱ्याचें काम आपल्या मनांत करावयाचें नाहीं. आह्मा-जवळ सांगितलें एक, तोफखानेवाल्यांस एक, आणि परभारें लाऊन दिला! तेव्हां ( मामानीं ) शपथ वाहिली कीं, "आह्मीं एरडकि-ऱ्यावरून जावें, येरडकिरें घ्यावें, अथवा मुक्काम तेथें करून रहावें, असें सांगितलें असतां गेले! तोफखाना गेला ह्मणोन चिंता नाहीं. तोफा तीन ( आह्माबरोबर ) आहेत. राजश्री सेनापतीच्या तोफा आहेत. एरडकिऱ्याचा मजकूर काय! खामखा घेऊन देतों." असेंच बोलत. शिऱ्यांजवळ आले. मध्यें दोन तीन वेळां आमचें रुबरू बोलणें झालें कीं, "एरडकिरें मनापासून घ्यावयाचें असल्यास तैसेंच सांगावें. नाहीं तरी तसेंच सांगावें. नाहीं तरी एक पंचाईत झाली, उद्यां दुसरी होईल. घरास जावयाचे दिवस. आह्मांस चौघे वाईट ह्मणतील तें कशास पाहिजे! दुर्गकरास निरोप द्यावा. पुढें जातांना ( ठाणें ) घेतलें तरी उत्तम. नाहीं तरी पुढें घ्यावयास अगाध नाहीं." तेव्हां बोलिले कीं, "श्रीमंतांचें वचन, तुमचें आमचें वचन, गुंतलें. सेवा चाकरी त्यांणीं चांगली केली. त्यांस खट्ट करून लावून द्यावें हें ठीक नाहीं. घेऊन देतों. त्यांचा संतोष करून निरोप देऊं. शिऱ्यांअलीकडे आल्यावर ( आह्मीं पुनः ) पुसिलें. एरडकिऱ्यांजवळ गेल्यानंतर नाहीं ह्मणाल अथवा सरकारांत ठाणें घालावें ह्मणाल तरी त्यांचा स्वरूप नाश. ( ठाणें ) न घेणें अथवा निकाल काढून सरकारांत ठेवणें तरी यांस निरोप येथूनच द्यावा. तेव्हां बोलिले कीं, परिछिन्न घेऊन देतों. एरड-किऱ्यांपासून एक मजलीवर आल्यावर एक प्रकार दिसोन आलें. कृष्णा-पैनाईकासी खलबत करूं लागले. सेनापतीची चिठ्ठी यांजकडे यावी,

---

१. तऱ्हेवाईक वागणूक. २. रायदुर्गचा संस्थानिक यांसी.

यांची चिठ्ठी त्यांजकडे, असें होतां होतां शेवटीं बोलूं लागले कीं, मोर्चे लावावयाचे दिवस नाहींत. 'ठाणें ध्याल ह्मटल्यास मरोन जाऊं' असें रायदुर्गकर ह्मणतात. अशा गोष्टी पाल्हाळाच्या बोलूं लागले. स्वरूप नाश दुर्गकरांचा करावा, ठाणें न द्यावें, असें दिसोन आल्यानंतर आह्मीं कूच केलें. मागाहून दुर्गकरांनीं कूच केलें. तेव्हां मध्यस्थीस राजश्री कृष्णरावअप्पा व आनंदराव गोपाळ व नरसिंगराव घायगुडे आले. बोलणें चालणें झालें. "मोर्चे लावावयाचे दिवस नाहीं. कसेंही करून ठाणें घेऊन तुमच्या हवालीं करितों. श्रीमंतापाशीं गेल्यावर त्याच्या कानावर घालून दुर्गकरांकडे देऊं. गुंता नाहीं." याप्रमाणें (मामांनीं) हातावर हात वचनाचे विद्यमानें मारिला आणि सांगितलें कीं दोन कोसांवर मुक्काम करून राहणें. ठाणें आलें ह्मणजे आनंदराव गोपाळ यांच्या हवालीं तुमच्या हातें करितों. त्यांची चिठ्ठी आली कीं, ठाणें आमच्या हवालीं झालें ह्मणजे कूच करून यावें असा करार. त्याप्रमाणें आह्मीं मान्य करून मजलीस गेलों. दुसरे दिवशीं मामांनीं कूच करून येरडकिरें टाकून जावें (असा बेत केला.) मध्यस्थांनीं जातांना सांगितलें. मामाची चिठ्ठी संध्याकाळीं आली कीं, (लष्करची) रव तुमच्या गोटावरून पडली असेल असें वाटत होतें ह्मणून चिठ्ठी न पाठविली. उद्दिक तुह्मीं कूच करून यावें. त्यांत जावसालाचा प्रकारच नाहीं. दुसरे दिवशीं ठाणें पहावयास गेले. मोर्चे लावितों असें ह्मणत होते. शेवटीं बोलों लागले कीं, 'वामनरायाची फौज फारकरून गेली. वरकड कोणी मन घालीत नाहींत. मोर्चे लावावयास सोय पडत नाहीं. ठाणें अवघड आहे!' गोटास आल्यावर सेनापति व कृष्णाप्पानाईक यांचीं व मामांचीं खलबतें झालीं. शेवटीं ठाणें सरकारांत ठेवावें असा निश्चय करून ठाणें सरकारचें घालून आपण कूच करून हयग्रीवेवरी गेले. आह्मांकडे कांहीं एक चिठ्ठी पाठविली नाहीं. 'कूच झालें, तुह्मी येणें,' असेंवा प्रकार

कांहीं एक नाहीं! गेल्याचें वर्तमान येतांच आह्मीं कूच करून बहिरव-तिपीजवळ आलों. त्यांस आह्मांस तीन कोसांचें अंतर होतें. त्या दिवशीं व दुसरे दिवशींही चिट्टी पाठविली नाहीं. कोणी पाठविला नाहीं. तेव्हां आह्मीं कूच केलें ते गोरसमुद्रास आलों. राजश्री अण्णा ( यांची ) समजावीस ( मामानीं केली ) नाहीं. त्याणीं नमस्कार सांगोन पाठविला कीं दस्तक नदीस द्यावें. तेव्हां 'उत्तम' ह्मणोन दस्तक दिलें. तेव्हां ते कूच करून आमच्या वाटेच्या सुमारें आले. राजश्री नरसिंगराव घायगुडे याणीं तावरहल्लीच्या घांटचें दस्तक घेऊन इकडेच आले. राजश्री आनंदराव गोपाळ मुष्टुरापाशीं उतरावयास गेले. कोणाचेंही समाधान नाहीं. गोरसमुद्राच्या मुक्कामीं रास्ते व घायगुडे आह्मांपाशीं आले. तेथून एकमजल आल्यावर चित्रदुर्गेकर संस्थानिकांस ( आह्मीं ) निरोप दिला, आणि मजल दरमजल येथें आलों. ( मामानीं ) राजश्री रंगो तमाजी यांसीं बोलून चालून चित्रदुर्गकराकडे बहिरवतिपीच्या तळावर पाठविले होते कीं, वामनराव रुसल्यास सरकारचे चाकर आहेत. देशीं समजतील. तुह्मीं यावें, निरोप घ्यावा. ते गेल्यास चिंता नाहीं. तुह्मीं संस्थानिक. तुह्मांस पेंच फार आहेत. तरी ते कूच करून पुढें गेल्यानंतर +

नं० ११७९ श्री. ( ज्येष्ठ वद्य. जून. ३० पंधर०. )

अपत्यें केशवानें व निऊबानें साष्टांग नमस्कार विज्ञापना. तागायत काल सायंकाळीं राजश्री बाळाजीपंत फरासखाने यांजकडे लष्करचीं पत्रें छ १० माहे रबिलावलचीं आलीं त्यांतील मजकूर सलुख झाला. पैकाही

---

१. मोरो बाबाळ यांजबरोबर पुण्यास गेलेल्या दोघा कारकुनांचें हें पांडुरंगरावास पत्र.

२. कर्नाटकांतील लष्करांतून. ३. हैदराकडून खंडणीचा पैका.

हातास आला. एक दोन दिवसांत मुहूर्त करून कूच करून दरमजल देशास येतील. श्रीमंतांची शरीरप्रकृति आहे त्यांमध्यें बरीच आहे. १कारनामक कारभारी झाले त्यापासून दरबार होत असतो. प्रातःकाळच्या चार घटका व सायंकाळचा एक प्रहर होत असतो. कामेंकाजें लोकांनीं होतात. परंतु कारभारी यांचें आमचें कसें ठीक पडेल पहावें! राजश्री मोरोबादादा पंढरपुरास जाणार याप्रमाणें वर्तमान आहे. निघाले तरी अमावास्या होताच निघतील. राजश्री मुधोजी भोसले यांची व निजामअल्लीकडील धौशा ह्मणून सरदार दहा हजार फौजेनिशीं त्या प्रांतीं होता त्याची लढाई झाली. यांनीं त्यास मोडून लुटून फस्त केलें. तोफा तेवीस व हत्ती पंचवीस व घोडी पांच हजार सरकारांत यांस सांपडलीं. याप्रमाणें मजकूर झाला तो लिहिला आहे. वर्तमान खरेंच आहे. दुसरा मजकूर जानोजी भोंसले यांची बायको नागपुराकडे होती तिनें आलजपुरचा सुभा आपमरणें करून मरतांच तें शहरही तिनें घेतलें. या प्रकारचें वर्तमान आहे. अधिकोत्तर लिहावें असें नाहीं. बहुत काय लिहिणें लोभ कीजे हे विज्ञापना.

---

१. सखारामबापू.

# हिंदुस्थान प्रांतीं दुसरी स्वारी.

माधवराव पेशव्यांच्या कारकीर्दीत हिंदुस्थान प्रांतीं पहिली स्वारी इ. स. १७६६ सालीं दादासाहेबांनीं केली. त्या स्वारीचें वर्णन मागें या पुस्तकांत यथास्थित आलेंच आहे. तिजपासून विशेष फायदा न झाल्यामुळें इ. स. १७६९ त भोंसल्यावरची दुसरी स्वारी समाप्त झाल्यावर ही दुसरी स्वारी हिंदुस्थान प्रांतीं पाठविली. हिजवर रामचंद्र गणेश कानडे हा मुख्य सरदार व विसाजी कृष्ण बिनीवाले त्यांना कारभारी नेमण्यांत आला होता. तुकोजी होळकर व महादजी शिंदे हे स्वारींत हजर असून त्यांपैकीं प्रत्येकाबरोबर पंधरा पंधरा हजार फौज होती. रामचंद्र गणेश व विसाजीपंत यांच्या खास पथकाची पांच हजार व हुजरात पंधरा हजार फौज होती. एकंदर पन्नास हजार फौज जमा झाली होती. हे सर्व स्वार होते. याशिवाय पायदळ व तोफखानाही चांगला होता. "हैदरअलीवर तिसरी स्वारी" या प्रकरणांतील पत्रांतून जागोजाग या स्वारीबद्दलचे उल्लेख आले आहेत व पुढील प्रकरणांतही कांहीं यावयाचे आहेत. ह्या सर्वांचा गोषवारा येथें आम्हीं देण्याचें योजिलें आहे. या स्वारीची समग्र सुसंगत रीतीनें हकीगत देतां यावी ह्मणून वायव्य प्रांतांतील जिल्ह्यांचें सरकारी ग्याझेटियर पाहून त्यांतीलही माहिती मधून मधून घेतली आहे.

नर्मदा उतरून मराठ्यांचें लष्कर प्रथम बुंदेलखंडांत गेलें. तेथें त्याचे तीन भाग झाले. एक भाग घेऊन रामचंद्र गणेश त्या प्रांतांतील बंडखोर संस्थानिकांस जरब देण्याकरितां पावसाळ्यांत छावणी करून तेथेंच राहिला. दुसरा भाग घेऊन महादजी शिंदे उदेपुराकडे स्वारीस गेला. तिसरा भाग घेऊन तुकोजी होळकर बुंदी, कोटा व त्याच्या आसपासचीं इतर रजपूत संस्थानें यांपासून खंडणी वसूल करण्याकरितां

तिकडे गेला. शिंद्यानें उदेपूरकरांच्या राज्यांत धुमाकूळ करून त्यांस हैराण केलें व त्यांपासून साठ लक्ष रुपये खंडणी घेण्याचें ठरविलें. त्यांत पन्नास लक्ष सरकारचे व दहा लक्ष 'अंतस्थ' होते! सदर रकमेपैकीं उदेपुरकरानीं पांच लक्षांची सावकारी निशा दिली तेव्हां ते रोखच आले म्हणावयाचे. शिवाय त्यांनीं पंधरा लक्षांचें म्हणून जें जवाहीर दिलें त्याची किंमत मराठ्यांच्या लष्करांत सारी पांच लक्ष झाली. बाकी राहिलेल्या रकमेबद्दल त्यांनीं आपल्या राज्यांतील निरनिराळे प्रांतांवर 'तनखे' करून दिले. हा वसूल सावकाशीनें होणारा होता. होळकरानेंही बुंदी व कोटा या संस्थानांपासून खंडणी घेतली. हें सर्व स. १७६९च्या पावसाळ्यांत झालें. पावसाळा संपतांच रामचंद्र गणेश छावणी हालवून सागरापाशीं आले. तेथें त्यांस शिंदे होळकर आपापलीं कामें आटपून येऊन मिळाले. नंतर हें लष्कर जाटांचा समाचार घेण्यास निघालें.

स. १७६९ त जवाहीरमल्ल जाटाचा जयपूरच्या राजानें पराभव केल्यावर पुढें तो लवकरच मरण पावला. त्याचा मुलगा केसरी हा गादीवर बसला होता. तो अल्पवयी असल्यामुळें त्याचा चुलता नवलसिंग हा राज्याचा कारभार पहात असे. मराठ्यांची यंदा आपणावर स्वारी होणार हें त्यास कळलें असल्यामुळें त्यानें लढाईची खूब तयारी केली होती. मराठे भरतपुरावर चालून येऊं लागले तेव्हां तो आपली समग्र सेना घेऊन निर्धास्तपणें त्यांचा मुकाबला घेण्याकरितां आला. दोहों फौजांची भरतपुरापासून आठ कोसांवर गांठ पडून तीन प्रहरपर्यंत तुमुल युद्ध झालें. जाट जरी आवेशानें व शौर्यानें लढत होते तरी शेवटीं त्यांचा पूर्ण पराजय झाला. नवलसिंग दीडशें स्वारानिशीं पळून गेला. हजारों जाट मारिले गेले व हजारों पाडाव सांपडले. तोफा, हत्ती, घोडे, हत्यारें व दारूगोळा, बाजारबुनगें हें सर्व मराठ्यांच्या

हातीं लागलें. याप्रमाणें धूळधाण झाल्यानंतर मराठ्यांचें सैन्य जाटांच्या सर्व मुलूखभर पसरलें व तेथें त्यांनीं लुटण्या जाळण्याची कांहीं पराकाष्ठा केली. त्यामुळें नवलसिंग दीन होऊन त्यांस शरण आला. त्याचा चुलता सुरजमल्ल यानें मराठ्यांचा आग्रा प्रांत व किल्ला बळकाविला होता तो आतां नवलसिंगानें त्यांचा त्यांस परत दिला व खंडणी पांसष्ट लक्ष रुपये देण्याचें कबूल केलें. त्या रकमेच्या वसुलाची व्यवस्था मराठ्यांच्या मनाप्रमाणें झाल्यावर त्यांस आतां या पुढील मसलती करण्यास फुरसत सांपडली.

पानपतच्या स्वारीतले मराठ्यांचे शत्रु अबदाली, रोहिले, पठाण व सुजाउद्दौला असे चौघे होते. पैकीं अबदाली काबूलचा राहणारा असल्यामुळें त्याचा अपकार मराठ्यांच्या हातून आतां कांहींच होण्याजोगा नव्हता. बाकीच्या तिघांवर मात्र पुरता सूड उगविण्याची त्यांची इच्छा मनापासून होती. त्या तिघांतही सुजाउद्दौल्याविषयीं त्यांच्या मनांत द्वेषबुद्धि कांहीं कमी होती. जरी त्यानें त्यांचे प्रांत बळकाविले होते तरी पानपतानंतर मराठ्यांची विनाकारण कत्तल करणें वगैरे अनन्वित कृत्यांपासून तो अलिप्त राहिला होता. रोहिले व पठाण यांनीं मात्र मराठ्यांशीं प्रथम मैत्री केल्यासारखें दाखवून हळूच अबदालीशीं राजकारण करून त्यांस आणून विश्वासघात केला. पानपतची लढाई संपल्यावर लाखों निःशस्त्र मराठ्यांची या पाषाणहृदयी लोकांनीं कत्तल केली, बायकापोरें धरून गुलाम करून नेलीं; हा द्वेष मराठ्यांच्या मनांत धुमसत होता. त्यांच्या फौजा दिल्लीकडे येत आहेत असें पाहून सुजाउद्दौल्यास काळजी पडली व रोहिले व पठाण तर चळचळां कांपूं लागले. मराठ्यांचा अत्यंत द्वेष करणारा नजीबखान रोहिला. पानपतचा सारा व्यूह अथपासून इतिपर्यंत त्याच्याच हातें घडून आला होता. त्यास आतां वाटूं लागलें कीं, आपल्या पापाचे घडे संचित

भरले! त्यानें व शिंद्याच्या घराण्यानें मुळापासून हाडवैर. दत्ताजी शिंद्यास व जनकोजी शिंद्यास त्यानेंच मारविलें होतें. त्याच दत्ताजीचा भाऊ व जनकोजीचा चुलता महादजी शिंदे या स्वारींत प्रमुख आहे. त्याअर्थीं आतां कांहीं तो आपलीं पाळेंमुळें खणून काढल्याशिवाय रहात नाहीं हें पक्कें ओळखून त्यानें मराठ्यांशीं सलोख्यानें बोलणें लाविलें.

पूर्वीं मराठ्यांनीं जेव्हां उत्तर हिंदुस्थान पादाक्रांत केलें तेव्हां प्रथम त्यांनीं दिल्लीच्या बादशहाशीं राजकारण करून त्यांस आपल्या कह्यांत आणिलें. दिल्लीच्या दरबारांत त्याजवाचून अगदीं पान हालेनासें झालें. तेव्हां त्याच बादशहाचें नांव पुढें करून व त्याच्याच फौजेची मदत घेऊन त्यांनीं रोहिलखंड, आग्रा, दुआब, पंजाब यांपैकीं बहुतेक भागांत आपला अंमल बसविला होता. हल्लींच्या स्वारींतही प्रथम त्यांस तेंच राजकारण करावयाचें होतें. बादशाहीचा खरा वारस शहाआलम हा त्यावेळीं अलाहाबाद येथें इंग्रजांचे आश्रयास जाऊन राहिला होता. कोणीतरी बलाढ्य राजानें त्यास नेऊन दिल्लीच्या तक्तावर बसवावें तेव्हां तेथें त्याचा निभाव लागावा अशी स्थिति होती. कोणाची मदत न घेतां जर तो दिल्लीस जाता व राज्यांत अंमल बसवूं लागता तर जाट, रजपूत, रोहिले, पठाण यांनीं त्यास मुळींच जुमानिलें नसतें! त्याचा मुलगा जवानबक्त हा दिल्लीस होता तो बापाच्याच नांवें अधिकार चालवीत होता. या शहाजाद्याचा कारभारी नजीबउद्दौला होता. नजीबाच्या कर्तृत्वावर शहाजाद्याचा अंमल राजधानींत व भोंवतालच्या थोड्याशा प्रदेशावर मात्र चालत असे. असली ही नामधारी बादशाही शहाअलमास नको होती. दिल्लीस जाईन तर सार्वभौम ह्मणूनच जाईन हा त्याचा हेका होता. स. १७६६ सालीं दादासाहेबांनीं हिंदुस्थानावर स्वारी केली त्यावेळीं माळवा व बुंदेलखंड या प्रांतीच त्यांचे बहुतेक

दिवस गेले. चंबेळी उतरून पलीकडे जाण्यापर्यंत त्यांची मजल आली नाहीं. त्यावेळीं आपणास आपल्या पूर्वजांच्या तक्तावर बसविण्याविषयीं शहाअलम यानें दादासाहेबांशीं बोलणें लाविलें होतें; परंतु त्यांस तिकडे लक्ष देण्यास फुरसतच सांपडली नाहीं. सांप्रत रामचंद्र गणेश व शिंदे होळकर आग्रा भरतपूर प्रांतीं आले तेव्हां शहाअलम याची स्थापना दिल्लीस नेऊन करण्याविषयीं पुनः चर्चा होऊं लागली. त्यांजकडूनही हेंच बोलणें करण्याकरितां वकील आले होते. ती बातमी नजीबउद्दौल्यास कळतांच त्यानें मराठे सरदारांस सांगून पाठविलें कीं, माझे पूर्वीचे अपराध माफ करून मला पदरीं घ्यावें. मी तुमचें बादशहाशीं राजकारण जुळवून देतों. नजीब शूर व मसलती मनुष्य होता. रोहिल्यांवर व पठाणांवर त्याचें वजन चांगलेंच होतें. दिल्ली त्याच्या ताब्यांत होती. मराठ्यांच्या मनांत रोहिल्यांचें व पठाणांचें पारिपत्य चांगलेंच करावयाचें होतें. पण तूर्त त्यांस प्रथम बादशहाची दिल्लीस स्थापना करावयाची होती. नजीबाशीं वैर कायम ठेवावें तर बादशहाची दिल्लीस स्थापना करणें मोठें प्रयासाचें काम होईल हें मराठे सरदारांस माहीत होतें. पण त्याशीं मैत्री करणें हेंही त्यांस आवडण्याजोगें नव्हतेंच. अशा स्थितींत नजीबाशीं कसें वागावयाचें याविषयीं मराठे सरदारांचें एकमत होईनासें झालें. रामचंद्र गणेश व विसाजी कृष्ण या दोघांमध्यें माळव्यांत लष्कर आल्या वेळेपासूनच कुरस वाढत चालली होती. त्या दोघांची दररोज प्रत्येक गोष्टींत हमरीतुमरी चाले. शिवाय शिंद्यांचें व रोहिल्यांचें हाडवैर तर होळकराचें व रोहिल्यांचें फार दिवसांपासूनचें सख्य! होळकर व विनीवाले यांचें म्हणणें असें होतें कीं, नजीबउद्दौल्याशीं सख्य करावें. शिंदे व रामचंद्र गणेश यांचा आग्रह कीं, या दुष्टाचा समूळ उच्छेद करावा. याजवर बिलकूल दया करूं नये. दोन्ही पक्षांनीं आपापल्यापरी साधकबाधक मजकूर लिहून पुण्यास श्रीमंतांकडे पाठविला. त्याचें उत्तर त्यांनीं या सरदारांस लिहिलें कीं,

नजीबाचीं पूर्वकर्में ध्यानांत आणिलीं तर त्याचा नाश करावा हेंच योग्य. परंतु दिल्लीच्या मसलतीस जर त्याचा उपयोग होण्यासारखा असेल तर तूर्त त्याशीं सख्य करून तो उपयोग करून घेण्यास काय हरकत आहे? त्याशीं कायमची दोस्ती कधीं करूं नये ह्मणजे झालें. याप्रमाणें श्रीमंतांची आज्ञा झाल्यावरून रामचंद्र गणेश वगैरे सरदारांनीं नजीब-उद्दौल्यास निरोप पाठविला कीं, तूं आह्माशीं इमानानें वागण्याचें व दिल्लीप्रकरणीं व इतर ममलतींत आह्मांस मनापासून मदत करण्याचें कबूल करीत असशील तर तुझें आमचें सख्य होईल. पण हें सख्य होण्याआधीं तूं एक गोष्ट केली पाहिजेस. पूर्वी दुआबाच्या मध्य-भागचा मुलूख आह्मांस बादशहाकडून जहागीर होता. पानपत झाल्या-नंतर अबदालीनें त्या मुलखाच्या सनदा शहाजादा जवानबक्त यांजकडून तुला व इतर रोहिल्यांस देवविल्या आहेत. शहाजाद्याकडून त्या मुलखाच्या सनदा तूं पुनः आमच्या नांवें करून दे. नजीबानें त्याप्रमाणें सनदा शहाजाद्याकडून करून घेऊन मराठे सरदारांकडे पाठवून दिल्या व आपण तुकोजी होळकराच्या विद्यमानें भेटीस आला व तेथून पुढें मराठ्यांच्याच लष्करांत राहूं लागला. तो मराठ्यांस सांगूं लागला कीं, पानपतच्या लढाईपूर्वी माझी जेवढी जहागीर होती तेवढी मजकडे कायम ठेवा ह्मणजे झालें. बाकी रोहिलखंड व दुआब यांमध्यें तुह्मीं काय पाहिजे तें करा. माझी त्यास पूर्ण संमति व मदत आहे! नजीबास बरोबर घेऊन मराठी लष्कर यानंतर दिल्लीस गेलें. तेथें त्याचा बरेच दिवस तळ पडला होता परंतु त्यांजकडून त्या शहरास बिलकुल उपद्रव झाला नाहीं.

मराठ्यांनीं जाटांचा पराजय केला तेव्हांपासूनच रोहिले, पठाण, सुजाउद्दौला व इंग्रज यांस मोठी काळजी उत्पन्न झाली होती. आतांही टोळधाड आपणांपैकीं कोणावर प्रथम येऊन पडत्ये इकडे त्यांचें लक्ष

घेऊन गेले होते. मराठे दिल्लीस आज इतके दिवस राहिले असून ती राजधानी ते आपल्या ताब्यांत कां घेत नाहींत हें इंग्रजांच्या ध्यानांत येईना. शहाआलम जरी आपल्या आश्रयास सध्यां आहे तरी मराठ्यांशीं त्यानें राजकारण केलें आहे हें इंग्रजांस माहीतच नव्हतें! सुजाउद्दौलाही नजीबउद्दौल्याप्रमाणेंच मराठ्यांशी सख्य करण्याचा प्रयत्न करूं लागला. या दोघांनीं जर मराठ्यांस न मिळतां रोहिल्यांचा व पठाणांचा बचाव करण्याची मनापासून खटपट केली असती तर पुढील मोहिमेंत मराठ्यांस यश जितक्या सुलभ रीतीनें मिळालें तितक्या सुलभ रीतीनें तें खचित मिळालें नसतें. पण नजीब व सुजा यांनीं असा बेत केला होता कीं, मराठ्यांशीं मैत्री करून आपापल्या दौलती बचावाव्या म्हणजे झालें. मग पानपतच्या मोहिमेंतले आपले दुसरे सोबती रोहिले व पठाण सरदार आहेत ते मराठ्यांच्या तावडींत सांपडून मरोत कीं तरोत! तिकडे पहावयाचें म्हणून नाहीं! मराठ्यांनीं रोहिल्यांस पुरे चीत केल्यावर मराठ्यांस इंग्रजांच्या मदतीनें हुसकून लावून रोहिल्यांस कुमक करण्याच्या मिषानें रोहिलखंडांत शिरून तें सर्वच आपल्या राज्यास जोडावें हा सुजाउद्दौल्याचा पुढचा बेत होता!

दिल्लीस मराठ्यांचें लष्कर बरेच दिवस राहिलें होतें. त्या मुदतींत पठाणांवर मोहीम करण्याची मसलत पक्की ठरून तें लष्कर तेथून निघालें तें यमुना उतरून अंतर्वेदींत शिरून गंगेच्या तीरीं रामघाट येथें पावसाळ्याकरितां छावणी देऊन राहिलें. पठाणांची राजधानी फरकाबाद. तेथें त्यांचा मुख्य सरदार अहंमदखान बंगस म्हणून रहात होता. ह्यावर स. १७५१ त सफदरजंग व मल्हारराव होळकर व गोविंदपंत बुंदेले यांनीं स्वारी करून जेर केलें. तेव्हां त्यानें आपल्या राज्याच्या तेतीस परगण्यांपैकीं साडेसोळा परगणे मराठ्यांस [redacted] सनदा करून दिले होते. ते परगणे स. १७६१ पर्यंत मरा-

ठ्यांकडे निर्भयपणें चालत होते. त्यावर्षी पानपत झालें. त्यानंतर ह्या परगण्यांपैकीं शिकोआबाद व इटावा हे रोहिल्यांनीं व बाकीचे या बंगसानें बळकाविले होते. ते परत देण्याविषयीं यंदां मराठ्यांनीं मागणी केली ती बंगसानें साफ नाकारिली. त्यामुळें त्यावर स्वारी करण्याकरितां मराठ्यांची सेना वर सांगितल्याप्रमाणें अंतर्वेदींत शिरली. हें पहातांच तो अहंमदखान बंगसही फारकाबादेंतून बाहेर पडला व पन्नास हजार पठाण जमा करून मराठ्यांशीं गांठ घालण्याकरितां आला. तों पावसाळा सुरू झाल्यामुळें तो गंगेच्या पलीकडे कांहीं अंतरावर तळ देऊन राहिला. त्याच्या तोंडावर पंधरा हजार फौजेसह बापूराव हरि यांस ठेवून बाकीचे मराठे सरदार रामघांटीं छावणी करून राहिले.

शके १६९२ च्या आषाढापासून कार्तिकापर्यंत मराठ्यांची छावणी रामघांटीं होती. त्यांच्या लष्करांत तो दगाबाज नजीबउद्दौला होताच. त्याच्या सांगण्याप्रमाणें या पठाणांच्या मोहिमेचीं सूत्रें चालविलीं जात होतीं. यद्यपि त्यावर मराठ्यांचा विश्वास बिलकुल नव्हता, तरी सावधपणानें वागतां वागतां शेवटीं गफलतीचें पर्यवसान असें झालें कीं, नजीबानें मराठ्यांस आणून खड्ड्यांत घातल्यासारखेंच केलें! कारण कीं, त्यांच्या पिछाडीस यमुना, पुढें गंगा व मध्यें इतर नद्या नाले पावसाळ्यामुळें अपरंपार भरले होते. भोंवतालचा मुलूख सर्व शत्रूचा होता. मराठ्यांस कोठें इकडे तिकडे हिंडतां येईना व मागेंही परततां येईना! याप्रमाणें ही फौज मोठ्या अडचणींत सांपडली होती. तिला अजूनही नजीब गोडगोड थापा देतच होता. परंतु यानें व बंगसानें आंतून सूत्र आहे ही गोष्ट आतां त्या फौजेंतील लोकांस कळली होती. मागें पानपत होण्याच्या आदल्यावर्षी दत्ताजी शिंद्याची फौज अशीच पावसाळ्यांत यमुने पलीकडे अडकली होती. त्यावेळीं याच नजीबानें

## पठाणांशीं युद्ध.

दत्ताजीशीं मैत्री दाखवून अबदालीस आणून व त्यांस मिळून दगा केला. मराठी फौज बुडविली व दत्ताजीस जिवें मारिलें. आतांही हुबेहूब तीच स्थिति प्राप्त झाली होती. पठाणांची प्रचंड सेना तयार होऊन पुढें तळ देऊन बसलीच होती. रोहिल्यांनींही लढाईची तयारी झपाट्यानें चालविली होती. सुजाउद्दौलाही तयार होत होता व इंग्रजांचाही तोच विचार होता व मराठे तर कोंडले गेल्यामुळें या गोष्टीचा त्यांच्या हातून कांहीं प्रतीकार होत नव्हता. आपल्या सरदारांनीं नजीबाच्या नादीं लागून अंतर्वेदींत छावणी केली हें पाहून पेशव्यांस राग आला व मोठी काळजी उत्पन्न झाली. त्या सरदारांस कुमक करण्याकरितां त्यांनीं पुण्यास दुसरी फौज तयार केली होती. त्या फौजेची रवानगी व्हावी इतक्यांत नजीबउद्दौला एकाएकीं मृत्यु पावला व आश्विनाच्या प्रारंभींच नद्यांचें पाणी ओसरून कोंडलेल्या मराठी फौजेस चोहोंकडे फैलावण्यास मोकळीक झाली. यामुळें तिकडील काळजी दूर होऊन पुण्याहून फौज पाठविण्याचा बेत श्रीमंतांनीं तहकूब केला.

नजीबखान मराठ्यांच्या लष्करांत आपला मुलगा जाबिताखान यास ठेवून नजीबगड येथें जात असतां वाटेंत मृत्यु पावला. तें वर्तमान येतांच रामचंद्र गणेश यानें जाबिताखानास नजरकैदेंत ठेविलें. त्यापासून जबर खंड घ्यावा व त्याच्या जहागिरीचे एक दोन परगणे घ्यावे तेव्हांच त्यास सोडावें असा रामचंद्र गणेश व महादजी शिंदे यांचा बेत होता. पण होळकरापासून आणभाक घेऊन त्याच्या विश्वासावर नजीब मराठ्यांच्या लष्करांत आला होता. यामुळें त्याच्या मुलास सुरक्षितपणें पार करून देण्याचें जोखीम होळकराच्या शिरावर होतें. त्याच्याच साह्यानें एका अंधाऱ्या रात्रीं जाबिताखान मराठी लष्करांतून पळून आपल्या जहागिरीकडे गेला. तिकडे जातांच त्यानें मराठ्यांशीं

लढाई करण्याची तयारी चालविली. त्यास दिल्लीच्या दरबारीं अमीर उल उमरा हें पद मिळालें होतें तें मराठ्यांनीं शहाजादा जवानबक्त यास सांगून त्याजकडून काढविलें ह्मणून त्याजविषयीं त्याच्या मनांत अधिकच वैरभाव उत्पन्न झाला. एवढाच एक रोहिला मराठ्यांस मिळाला होता तोही आतां शत्रुपक्षास जाऊन मिळाला.

कार्तिकाचा महिना सुरू झाल्याबरोबर मराठे दुआबांत पसरून चोहों-कडे लुटालूट करूं लागले. पठाणांची फौजही तयार होतीच. ती तत्काळ त्यांजवर चालून आली. दोंही फौजांच्या गांठी पडून दररोज लढाया होऊं लागल्या. शिकोआबाद व इटावा हे परगणे आतां मराठे घेतील हें रोहिल्यांस भय होतेंच. त्यामुळें रोहिले व पठाण यांचा एकमेकांस मदत करण्याचा ठराव यापूर्वीच झाला होता. त्यास अनु-सरून रोहिल्यांची पंधरा हजार फौज फत्तरगडाजवळ गंगेस नावांचा पूल बांधून त्यावरून दुआबांत आली आणि फरकाबाद व फत्तेगड यांमध्यें येऊन उतरली. तिजवर मुख्य सरदार हाफिझ रहिमत हा होता. रोहिले व पठाण यांची मिळून आतां सत्तर हजार फौज जमली. पण इतकें असूनही मराठ्यांपुढें त्यांचें कांहींच चाललें नाहीं. दर युद्धांत त्यांचा पराजय होऊन त्यांच्या फौजांच्या टोळ्या अनेक वेळां मारिल्या गेल्या. एक फरकाबादेखेरीज सारा दुआब प्रांत मराठ्यांनीं लुटून फस्त केला. इटावा व दुसरे त्या प्रांतींचे मोठमोठे किल्ले होते ते सारे मराठ्यांनीं घेतले. शेवटीं स. १७७१ च्या मे महिन्यांत हाफिज यानें वारंवार पराजय झाल्यामुळें निरुत्साह होऊन रोहिलखंडा-कडे पलायन केलें. मग मराठ्यांचा सर्व मारा एकट्या पठाणांवरच पडला. तेव्हां त्यांची चांगलीच रग जिरून अगदीं दुर्दशा होऊन गेली. शेवटीं आतां आपलें सारेंच राज्य जाणार असें पाहून अहमदखान

बादशहाची स्थापना.

मराठ्यांस शरण आला. त्यांचा त्यानें जितका मुलूख बळकाविला होता तितका सर्व परत दिला व आपला बचाव करून घेतला. नंतर लवकरच ह्मणजे या सालाच्या जुलई महिन्यांत अहमदखान बंगस मरण पावला.

पठाणावरची मोहीम सुरू असतां बादशहास दिल्लीस आणण्याचें राजकारण सुरू होतें तेंही आतां सिद्ध झालें. तें इंग्रजांच्या कानीं जातांच त्यांनीं शहाअलम यास सांगितलें कीं, तुह्मीं मराठ्यांच्या विश्वासावर दिल्लीस जाऊं नये. आह्मांस फुरसत मिळेल तेव्हां आह्मीच तुह्मांस पुढें दिल्लीस नेऊं व तक्तावर बसवूं. हें बादशहा मान्य करीत नाहींसें पाहून त्यांनीं आग्रह सोडून दिला. त्याच्या जाण्यास अडथळा बिलकुल केला नाहीं. याचें कारण असें कीं, बंगाल्यचें राज्य पशाखालीं उतरेपर्यंत बादशहा जवळ असल्यापासून त्यांचा फायदा होता. बादशहानें दिवाण ह्मणून त्यांनीं बंगाला हातीं घेतला होता व स्वामित्वाबद्दल दरसाल पन्नास लक्ष रुपये त्यास द्यावयाचा ठराव केला होता. शिवाय कोरा व अलाहबाद हे परगणे दरसाल बारा लक्ष रुपये उत्पन्नाचे त्याच्या स्वाधीन केले होते. आतां बंगाल्यावर त्यांचा अंमल पूर्णपणें बसला होता व सुजाउद्दौल्याच्या राज्यांतही त्यांचें चांगलेंच बस्तान बसलें होतें. अर्थात् आतां बादशहास जवळ ठेवून घेण्यापासून त्यांस कांहींच फायदा होत नव्हता. तो आयता आपण होऊन दरसाल पन्नास लक्षांची नेमणूक व बारा लाखांचे परगणे यांवर पाणी सोडून जर मराठ्यांकडे जाऊं लागेल तर ते तरी त्यास कशास नको ह्मणतील? मराठ्यांशीं त्याचा करार असा ठरला होता कीं, त्यानें त्यांस दहा लक्ष रुपये तूर्त खर्चास द्यावे. त्यांनीं त्यास नेऊन त्याच्या पूर्वजांच्या तक्तावर बसवावें. त्यांचे पुढें जे जे बेत आहेत त्यांस त्यानें आपली

## बादशहाची स्थापना.

संमती व मदत देत जावी. त्यांजकडे पानपत होण्यापूर्वी ज्या ज्या जहागिरी होत्या त्या त्यांजकडे पुनः सुरू कराव्या. महमदशहाच्या कारकीर्दीपासून चौथाईची बाकी तुंबली होती ती द्यावी. त्याचे जे जे शत्रू असतील त्यांचें त्यांनीं पारिपत्य करावें. पुढें मोहिमा दोघांनीं मिळून कराव्या व लूट सारखी वांटून घ्यावी. याप्रमाणें उभयपक्षीं करार ठरल्यानंतर बादशहा आपली फौज, सरदार, कारखाने, मुलें-माणसें व सर्व लवाजम्यानिशीं प्रयागाहून निघाला. तेव्हां कोरा परगण्याच्या सरहद्दीपर्यंत इंग्रजांची फौज त्यास पोंचवावयास आली होती. तो दुआबांतून दिल्लीच्या रोखें चालला असतां त्यांस वाटेंत अहमदखान बंगस मेल्याची बातमी कळली. तेव्हां त्याचा दिवाण हिशामुद्दीनखान यानें सल्ला दिला कीं अहमदखानाची जहागीर जप्त करण्यास ही खाशी संधि आहे. याप्रमाणें आपली मर्जी असल्यास उत्तरदुआबांत महादजी शिंदे आहे त्यास बोलावून आणितों. हें बोलणें बादशहास पसंत पडून त्यानें फरकाबादेच्या रोखानें कूच केलें व शिंद्यासही जलदीनें येण्याविषयीं पत्र पाठविलें. ती बातमी अहमदखानाचा मुलगा व कारभारी यांस कळतांच त्यांनीं बादशहाचा बक्षी नजीफखान यास एक लक्ष रुपये दिले व त्याच्या द्वारें बादशहास सहा लक्ष रुपये नजराणा देऊन त्याची समजूत काढिली. पत्र गेल्याप्रमाणें महादजी शिंदे जलदीनें आला पण पहातो तों आपण येण्यापूर्वीच तंटा मिटला! पठाणास जरब देऊन कांहीं पैका उकळण्याचा त्याचा बेत होता तो फसलासें पाहून त्यास राग आला. पण पुढें बादशहापासून आपणास पुष्कळ कामें करून घ्यावयाचीं आहेत, इतक्यांतच त्याशीं कडू होऊन उपयोगी नाहीं असें मनांत आणून तो स्वस्थ बसला. बादशहाची स्वारी फरकाबादेहून निघून तीन महिनेपर्यंत नबीगंज येथें राहिली होती. समागमें महादजी शिंदे होता.

## रोहिल्यांवर मोहीम.

तेथून दिल्लीस जाऊन बादशहा विसाजी कृष्ण व होळकर यांस मिळाला व स. १७७१ च्या दिसेंबर महिन्याच्या अखेरीस सिंहासनावर बसला.

नंतर रोहिल्यांवर मोहीम करण्याची मसलत मुकरर झाली. नजीबखानाच्या पोराबाळांवर सूड घेण्याविषयीं महादजी शिंद्याचा आग्रह फार होता. बादशहाचा व जाबिताखानाचा खासगी द्वेष असल्यामुळें त्यांजकडून शिंद्यास अधिकच उत्तेजन मिळालें. मराठ्यांनीं रोहिल्यांस चिरडून अगदीं दीन करून टाकिल्यावर मग आपण रोहिल्यांची मदत करण्याचें ढोंग माजवून त्यांचें राज्य घ्यावें हा सुजाउद्दौल्याचा डाव होता यामुळें तो हल्लीं स्वस्थ बसून होता.

सन १७७२ च्या प्रारंभीं बादशहाची व मराठ्यांची फौज दिल्लीहून निघाली. मराठ्यांशीं लढण्याकरितां जाबिताखानानें फौज जमा केली होती व कांहीं रोहिले सरदारही कुमकेस आणिले होते. यांजपुढें मैदानांत आपला निभाव लागणार नाहींसें जाणून तो शुक्रतालच्या किल्ल्याच्या आसऱ्यास जाऊन राहिला. त्याचा बाप नजीबउद्दौला यानें स० १७५९ त दत्ताजी शिंद्याची स्वारी आली तेव्हां याच शुक्रतालच्या छावणींत राहून शिंद्याशीं कित्येक महिनेपर्यंत टक्कर मारिली. त्यावेळीं त्यापुढें शिंद्याचें कांहीं एक चाललें नाहीं. याकरितां आपणही तसेंच केलें ह्मणजे मराठ्यांचें भय बाळगण्याचें कारण नाहीं असें समजून तो शुक्रतालाच्या आश्रयास राहिला होता. पण बापाला जें साधलें तें ह्मणजे मुलास साधेलच असा कांहीं नियम नाहीं. मराठ्यांनीं येऊन शुक्रतालास वेढा दिला. या खेपेस त्यांजबरोबर मोठमोठाल्या तोफा होत्या त्यांचा मारा सुरू होतांच जाबिताच्या फौजेंत कहर उसळला. रोज हजारों शिपाई मरूं लागले तेव्हां तेथें राहण्यास

## रोहिल्यांवर मोहीम.

त्यास धीर पुरवेनासा होऊन तो एका काळोख्या रात्री तेथून निसटून पुनः गंगा उतरून बिजनार जिल्ह्यांत आला. तो पळाला हें कळतांच मराठेही तावडतोब गंगा उतरण्याकरितां चंडी घांटाच्या उतारास आले. पलीकडच्या तीरीं जाबितानें तोफांची बातेरी ठेविली होती व दोन फौजा ठेविल्या होत्या. पण मराठ्यांनीं नदी उतरून तोफा हस्तगत केल्या व दोन्ही फौजा गांठून तुडवून धुळीस मिळविल्या. नंतर सर्व बिजनार जिल्हा त्यांनीं लुटून उध्वस्त केला. त्यांची फौज पाठीवर आलीसें पाहून नजीबगड येथें जाबिता राहिला होता तेथून पुनः पळाला. जातां जातां त्यानें मुलें माणसें व जामदारखाना फत्तरगडास ठेविला. पण त्या किल्ल्यावर अन्नपाण्याचा संग्रह करण्यास त्यास फुरसत मिळाली नाहीं. मराठे पाठलाग करीत आले त्यांनीं नजीबाबाद हल्ला करून घेतली व लुटून जाळून तिचा विध्वंस केला. तेथें नजीबउद्दौल्याची कबर होती तीही फोडून त्यांनीं छिन्नविछिन्न करून टाकिली! नंतर त्यांनीं फत्तरगडास घेरा घालून तोही घेतला. तेथें नजीबउद्दौल्यानें पानपतच्या वेळीं मराठ्यांपासून लुटून घेतलेली अपार संपत्ति भरून ठेविली होती ती आतां सर्व त्यांच्या हातीं लागली. जाबिताचीं बायकामुलेंही सांपडलीं. नंतर घोसगडचा किल्ला त्यांच्या हातीं आला. जाबिताच्या सर्व जहागिरीवर त्यांचा अंमल बसला. नंतर त्यांची फौज सर्व रोहिलखंडभर पसरली. यावेळीं कत्तल, लुटालूट, जाळपोळ करण्याची त्यांनीं कांहीं शिकस्त करून सोडिली. पानपतच्या वेळचें उसनें फेडण्यांत त्यांनीं कांहीं आळस केला नाहीं! रोहिले लोक शूर खरे, परंतु आदल्यावर्षी दुआबांत त्यांस चांगलाच मार बसला असल्यामुळें यंदां मराठ्यांची फौज त्यांच्या मुलखावर येऊन पडली तेव्हां त्यांची गाळण उडाली. ते सैरावैरा पळत सुटले. कितीही बळकट किल्ले असोत, त्यांच्या फौजेचे तळ कितीही बळकट व अडचणीच्या जाग्यांत असोत, पण

## रोहिल्यांवर मोहीम.

मराठ्यांचा एखादा स्वार दृष्टीस पडला नाहीं तोंच रोहिल्यांनीं किल्ले व छावण्या सोडून धूम पळत सुटावें असें वारंवार होऊं लागलें. मराठी फौजेच्या टोळ्या साऱ्या रोहिलखंडभर स्वच्छंदपणें जिकडे तिकडे विध्वंस करीत फिरत होत्या. पण त्यांस आडवें येण्याची मगदूर कोणाचीच झाली नाहीं! हाफिझ रहिमतखान, फत्तेखान सरदारखान, महीबुल्लाखान, फत्तेउल्लाखान व दुसरेही छोटे मोठे रोहिले सरदार उत्तरेस तिराईच्या रानांत पळून गेले. पावसाळा सुरू होण्याच्या सुमारास मराठ्यांचें लष्कर रोहिलखंडांतून परत गेलें तेव्हां रोहिले सरदार तिराईतून परत आले. पण तोंपर्यंत तेथील रोगट हवेनें त्यांचीं आठ हजार मनुष्यें प्राणास मुकलीं! रामचंद्र गणेश याचें इतर सरदारांशीं बनेनासें झाल्यामुळें रोहिल्यांवरची मोहीम सुरू होण्यापूर्वींच त्यास पेशव्यांनीं परत बोलावून स्वारीची मुख्य सरदारी विसाजीपंत बिनीवाले यास दिली होती. रोहिल्यांचा व मराठ्यांचा अद्यापि तह झाला नव्हता. पावसाळा संपल्यावर पुनः त्याची स्वारी येईल ही रोहिल्यांस भीति होतीच. यामुळें ते सुजाउद्दौल्यास शरण गेले. तो या प्रसंगाची वाटच पहात बसला होता. रोहिल्यांनीं सुजास सांगितलें कीं, आतां इतःपर मराठ्यांची स्वारी आह्मांवर झाली असतां ती तूं परतून लावावीस. ह्या कामगिरीबद्दल आह्मीं तुला चाळीस लक्ष रुपये देऊं. तें सुजानें कबूल केलें. पठाणही त्यास अनुकूल झाले. इंग्रजांचें त्यास पाठबळ चांगलें होतेंच. मराठ्यांशीं लढण्याकरितां जाटांसही तो उत्तेजन देत होता. याप्रमाणें सुजाच्या आश्रयाखालीं तिकडील राजेरजवाड्यांचा हा मराठ्यांविरुद्ध मोठाच कट तयार होत होता.

पावसाळ्यांत मराठ्यांची कांहीं फौज दुआबांत राहिली व कांहीं दिल्लीस परत गेली. जाबिताखानाकडे मीरबक्षी हें पद होतें तें

## रोहिल्यांवर मोहीम.

त्याजकडून दूर करून महादजी शिंद्यानें बादशहाकडून पेशव्यांचे बंधु नारायणराव यांस देवविलें होतें. तें पद व आपली जहागीर आपणास परत मिळावी म्हणून जाबिताखानाची बादशहाकडे खटपट सुरू होती. त्या खटपटीस बिनीवाले व होळकर अनुकूल झालेले पाहून जाबिताचा हाडवैरी महादजी शिंदे यास फार राग आला व तो रजपूत राजांपासून खंडणी वसूल करण्याच्या निमित्तानें दिल्लीहून कूच करून राजपुतान्याकडे आला. बादशहा व मराठे यांमध्यें फूट पाडावी म्हणून सुजाउद्दौला व इंग्रज यांचा प्रयत्न चालू होता. तो सफळ होऊन बादशहाच्या मनांत मराठ्यांविषयीं इतका तिटकारा उत्पन्न झाला कीं, हे दक्षिणचे गांवढळ व उर्मट लोक दिल्लींतून हांकून द्यावे असा त्यानें आपला बक्षी नजीफखान यास हुकूम केला! या हकीगती स. १७७२ च्या पावसाळ्यांत झाल्या. या स्वारीचा यापुढचा वृत्तांत पुढील प्रकरणांतून क्रमशः येणार आहे याकरितां तो आतां येथें आम्हीं देत नाहीं.

# पेशव्यांचें दुखणें व मृत्यु.

इ. स. १७७० त पेशव्यांची स्वारी "हैदरअलीवर तिसरी स्वारी" करण्याकरितां गेली होती ती पावसाळ्यास परत झाली. पुनः १७७१त तिकडे मोहिमेस जावें असें त्यांच्या मनांत होतें. परंतु प्रकृतीच्या नादुरुस्तीमुळें त्यांस परत यावें लागलें. त्यांस क्षयरोगाची व्यथा जडली होती व औषधोपचार जरी जारीनें सुरू होते तरी या दुखण्यांतून आपण वांचूं असा भरंवसा त्यांस फारसा नव्हता. कर्नाटकांत व हिंदुस्थानांत त्यांच्या फौजा मोहिमेवर गुंतल्या होत्या तिकडे त्यांचें सर्व लक्ष वेधलें होतें. स. १७७१ चा पावसाळा संपतांच ते पुण्याहून निघून नगरच्या रोखें गेले. तेथें कांहीं मुक्काम करून गोदावरीतीरीं गेले. तेथून पुनः नगरास येऊन सिद्धटेंकास आले. तेथें पुष्कळ दिवस मुक्काम होता. एकंदरींत गेला पावसाळा सुरू झाल्यापासून त्यांची प्रकृति कांहीं बरी होती. परंतु स. १७७२ चा उन्हाळा सुरू होतांच प्रकृति पुनः बिघडली व दिवसेंदिवस शक्तिपात होत चालला. त्या सालच्या फाल्गुन मासीं ते थेउरास येऊन राहिले. आपल्या राज्याचें पुढें कसें होईल ही त्यांस फार मोठी काळजी होती. आपल्यामागें दादासाहेबांचा बंदोबस्त आपल्या बंधूच्या हातून होणार नाहीं असें वाटून त्यांनीं दादासाहेबांस कैदेंतून सोडण्याचा बेत केला. या सुमारास जानोजी भोंसले त्यांस भेटण्याकरितां येत होता. त्याची भेट झाल्यानंतर दादासाहेबांस मोकळें करण्याचा त्यांनीं निश्चय केला.

जानोजीचीही प्रकृति बिघडून तो क्षीण होत चालला होता. त्यास मुधोजी, साबाजी व बिंबाजी असे तीन भाऊ होते. या चौघा भावांत फक्त मुधोजीस दोन पुत्र होते. त्यांत थोरल्या मुलाचें नांव रघोजी असें होतें व यासच आपल्या मागें जहागीर व सेनासाहेब सुभ्याचें पद

मिळावें अशी जानोजीची इच्छा होती. आणि याकरितांच तो थेउरास पेशव्यांच्या भेटीकरितां आला होता. त्यासमयीं त्यांनीं त्याचा यथायोग्य सन्मान करून तुझ्यामागें जहागीर व सेनासाहेब सुभ्याचें पद रघोजीस चालविलें जाईल असें वचन दिलें. नंतर त्यांचा निरोप घेऊन तो पंढरपुरास जाऊन तुळजापुरास गेला. तेथून जोगाईच्या आंब्यास जात असतां आसपास मोंगलांचे सरदार तहवारजंग व इब्राहिमखान धौशा ह्मणून होते त्यांनीं त्यास भेटीस बोलाविलें. त्यांत धौशाची भेट घेऊन तो परत आला, तों एकाएकीं त्याच्या अंगाची अतिशय काहिली होऊन तो मरण पावला.

जानोजीच्या व पेशव्यांच्या भेटीशीं दादासाहेबांच्या मुक्ततेचा कांहीं तरी संबंध असावा असें त्यावेळच्या पत्रव्यवहारावरून वाटतें. पण तो संबंध काय होता हें समजत नाहीं. नाना व मोरोबा फडणीस हेही दादासाहेबांस कैदेंतून सोडावें असेंच या वेळीं पेशव्यांस सांगत होते. त्यांच्याही मनांत तें घोळत होतेंच. त्यांनीं पुण्याहून दादासाहेबांस बोलावून नेलें व सात लक्षांची जहागीर व सिंवकचा किल्ला त्यांस देऊन त्यांचें समाधान केलें. आपण फक्त स्नानसंध्या करून राहूं. राज्यकारभारांत मन घालणार नाहीं व कांहीं बंड फितूर इतःपर करणार नाहीं असें दादासाहेबांनीं कबूल केलें. याचवेळीं पेशव्यांनीं दुसरी एक महत्वाची गोष्ट केली ती ही कीं, मोरोबादादाकडून कारभार काढून तो त्यांनीं सखारामबापूस दिला. राज्यांतले तंटेबखेडे मोडावे, आपल्यामागें आपल्या भावानें राज्य निर्विघ्नपणें चालावें, उत्तरोत्तर आपल्या राष्ट्राचा उत्कर्ष होत जावा, हीच कायती वरील गोष्टी करण्यांत पेशव्यांची इच्छा होती.

रोग्याच्या प्रकृतीविषयीं वैद्य निराश झाले, त्यांनीं हा रोग असाध्य आहे असें स्पष्ट सांगितलें, तरी रोग्याची व त्याच्या आप्तइष्टांची आशा

सुटत नाहीं. त्यांचे दैवी मानवी उपाय शेवटपर्यंत चालून असतात. त्या वेळचे प्रसिद्ध वैद्य गंगा विष्णु, रणछोड व रूपेश्वरबावा यांनीं पेशव्यांची प्रकृति असाध्य ह्मणून जरी ठरविलें, तरी पेशव्यांचे व त्यांच्या आप्तइष्टांचे व जवळच्या लोकांचे आरोग्य होण्याविषयीं उपाय जारीनें सुरू होते. प्रथम दादासाहेब अनुष्ठान करीत होते व औषधही देत होते; परंतु उपयोग होत नाहींसें पाहून त्यांनीं दोन्ही सोडून दिलीं. कोणी ह्मणूं लागले कीं दादासाहेबांचा गुरु गौड जातीचा कोणी मांत्रिक आहे, तो नर्मदेच्या तीरीं गुप्तस्थळीं रहात आहे, त्यानें श्रीमंतांस मूठ मारिली आहे. ही शंका निघतांच तीच मूठ त्या मांत्रिकावर उलट ण्यासाठीं कोणी जादूगार वगैरे ढोंगी लोकांच्या भजनीं लागले. कोणी ह्मणत कीं, हा भूतबाधेचा प्रकार असावा. तोही उपाय करून पहावा ह्मणून नारायणरावसाहेब वांईजवळ धोम येथें नृसिंहाचें जागृतस्थान आहे तेथें जाऊन देवास प्रार्थना करून व अनुष्ठानास ब्राह्मण बसवून आले. याप्रमाणें भुतांचा पक्का बंदोबस्त झाला तरी पेशव्यांची प्रकृति मात्र सुधारली नाहीं. ती दिवसेंदिवस अधिकच खचत चालली. ते ज्या दिवशीं थेऊरास आले त्या दिवशींच मोत्यांचा तुरा दहा हजार रुपयांचा त्यांनीं देवास दिला. नवस सायासही बहुत प्रकारचे केले. गिरीच्या त्र्यंबकेश्वरास त्यांनीं दहा लक्ष रुपये देण्याचा नवस केला. देवानें "घोड्यावर बसेन करावे. मग आपण नवस फेडावा. मग कारभार करावा" हा संकल्प. कोणी ज्वरशांति व इतर नानाप्रकारचीं अनुष्ठानें केलीं. परंतु सर्व व्यर्थ! श्रावणापासून प्रकृति अगदीं बेताल झाली. दररोज अंगांत ज्वर भरूं लागला व कांहीं वायूचाही संचार ज्वरामध्यें होत असे. तो ज्वर भरला ह्मणजे अंगाची इतकी भयंकर काहिली होई कीं आगळ्या व शंखनाद करण्यापर्यंत मजल येई. त्या यातना दुःसह झाल्यामुळें ते दादासाहेब व सखारामबापू

यांची विनवणी करीत कीं, मला या यातना सोसवत नाहींत. मला खंजीर आणून द्या ह्मणजे तो छातींत खुपसून घेऊन मरून जातों!

*

पेशवे आतां जगत नाहींतसें पाहून ते मरण पावल्यानंतर नारायणरावसाहेबास गादी न मिळतां ती आपणास मिळावी ह्मणून दादासाहेब पुण्यांतून दसऱ्याच्या मुहुर्तानें बाहेर पडले. दोन हजार स्वार व कांहीं गारदी त्यांनीं चाकरीस ठेविले आणि निजामअल्ली, हैदर व भोंसले यांस आपली कुमक करण्याविषयीं पत्रें लिहिलीं. ही बातमी पेशव्यांस कळतांच त्यांनीं सर्व फितुराचा तत्काळ छडा लाविला, पत्रें धरिलीं, स्वार व गारदी जमले होते ते मोडून उधळून लाविले व या फंदांत दादासाहेबांचे प्रमुख शागीर्द सात असामी होते त्यांस पकडून बेड्या घालून डोंगरी किल्ल्यांवर कैदेंत पाठविले व दादासाहेब तुळापुरापर्यंत गेले होते त्यांस धरून परत पुण्यास आणिलें. यावेळीं त्यांस पुनः कैदच व्हावयाची, परंतु पेशव्यांनीं त्यांचा अन्याय माफ केल्यामुळें तो प्रसंग टळला. हें एक पेशव्यांस मरतां मरतां मोठें दुःख होण्यास कारण झालें.

यावेळीं पेशव्यांसमीप त्रिंबकरावमामा पेठे, नाना व मोरोबा फडणीस, सखारामबापू, त्रिवर्ग रास्ते बंधु, बाबूजी नाईक बारामतीकर, मोरोबा, बामनराव, परशुरामभाऊ, रघुनाथराव व श्रीपतराव हे पांच पटवर्धन, कृष्णराव काळे, पाटणकर, दरेकर व यांखेरीज अनेक मुत्सद्दी, सरदार, मामलेदार वगैरे राष्ट्रांतले प्रमुख लोक होते. ज्वर येऊन गेला ह्मणजे पेशवे कांहीं वेळ ग्लानीनें निपचित पडत. त्यांतून सावध झाले ह्मणजे नारायणराव व दादासाहेब व सखारामबापू, यांस पुढें राज्यकारभार कसा चालावा याविषयीं सांगत असत. दादासाहेब यांस कुटुंबांत कलह व राज्यांत फंदफितूर न करण्याविषयीं त्यांनीं अनेक प्रकारें बोध केला व नारायणराव यांचा हात त्यांच्या हातीं देऊन त्यांचा सांभाळ करण्या-

विषयीं निरवणूक पुनः पुनः केली. नारायणराव यांचा स्वभाव तामसी व उतावळा होता. लहान वयामुळें पेंचपाच व मारदस्तपणा त्यांच्या अंगी बिलकुल नव्हता. यामुळें त्यांसही पुढें कोणाशीं कसें वागावें याविषयीं बहुत बहुत उपदेश त्यांनीं केला व सखारामबापूपासून वचन घेतलें कीं, माझ्या जिवांतजीव आहे पर्यंत मी नारायणरावसाहेबांस अंतर देणार नाहीं. हरीपंत फडक्यावर पेशव्यांचा विश्वास व प्रेम बहुत असे. अलीकडे पांच सात वर्षे ते दर स्वारींत त्यांजबरोबर नेहमीं असत. ते पूर्वीचे कारकुनी पेशाचे असतांही श्रीमंतांचा अष्टौ प्रहर सहवास अनेक वर्षे घडल्यामुळें त्यांच्या कारस्थानांनीं धोरणें व लष्करी कामाचा नाना प्रकारचा अनुभव त्यांस सहजासहजी प्राप्त झाला होता. त्यांनीं आजपर्यंत एकनिष्ठेनें सेवा केली व दुखण्यांतही नेहमीं जवळ राहून चाकरी फार चांगली केली, सबब श्रीमंतांनीं त्यांस आपलें श्रीवर्धनचें देशमुखीचें खासगत वतन इनाम करून दिलें. कोंकणचे सुभेदार रामाजी महादेव हे नुकतेच वारले होते यास्तव तो सुभाही त्यांनीं फडक्यांसच सांगितला. दुसरे कित्येक कारकून व खिजमतगार विश्वासांतले होते त्यांपैकीं कोणास इनाम गांवें व कोणास नक्त बक्षीस पाहून पाहून दिलें. एके दिवशीं ज्वराचा दाह शांत होऊन गेल्यावर त्यांस कांहीं स्मरण झालें व त्यांनीं आपाजीराव पाटणकर व खंडेराव दरेकर सरलष्कर यांस बोलावून आणून विचारिलें कीं, मागें एकदां पर्वतीस जातांना मी तुम्हांस तुमचें कर्ज फेडीन असें बोललों होतों. तर आतां सांगा कीं तुम्हांस कर्ज किती आहे. मागें सहज बोललेल्या गोष्टीचें-सुद्धां स्मरण धरून आसन्नमरण असतांही श्रीमंतांनीं हा प्रश्न केलेला ऐकून त्या सरदारांस गहिंवर आला. त्यांनीं जबाब दिला कीं, आम्हीं बहुत दिवसांचे चाकर. असल्या स्थितींत कर्जमुक्त होऊनही आम्हांस काय सुख लागावयाचें आहे! परमेश्वरकृपेनें आपण बरें झाल्यां तर घाल तें घेऊं. आतां आम्हीं पैका साफ घेणार नाहीं!

श्रीमंतांनीं हिंदुस्थानच्या स्वारीच्या सरदारीवरून आपणास दूर करून परत बोलाविलें म्हणून रामचंद्र गणेश यास वैताग येऊन त्यानें संन्यास घेण्याचा बेत केला व एक दोन दिवस गांवांतून 'नारायणपात्र'ही फिरविलें. आतां शिखासूत्राचा त्याग करणार इतक्यांत सखारामबापूस तें वर्तमान कळल्यावरून त्यानें त्याचा निषेध करून सन्यासापासून परावृत्त केलें. हिंदुस्थानांत सुजाउद्दौल्यानें इंग्रज, रोहिले, पठाण व जाट यांस मराठ्यांविरुद्ध उठविण्याची खटपट चालविली होती तिचा प्रतिकार तिकडील मुख्य सरदार विसाजीपंत बिनीवाले यानें कांहीं केला नाहीं व शिंद्याशीं भांडण केलें म्हणून बिनीवाल्यावर श्रीमंतांचा रोष झाला होता. त्यास सरदारीवरून काढून रामचंद्र गणेश यास पुनः तिकडे पाठवावें असाही बेत पुण्याच्या दरबारीं घाटत होता पण तो तूर्त तसाच राहिला.

कार्तिक शुद्ध द्वादशीच्या दिवशीं श्रीमंतांनीं सर्वप्रायश्चित्त घेतलें त्याची तयारी सर्व आपल्या नजरेखालीं करविली. त्या प्रसंगीं त्यांनीं लाखों रुपये दानधर्म केला. पुण्यांत पांच हजार ब्राह्मणांस नित्य क्षीरभोजन घालण्याचा हुकूम करून लिंबकरावमामाची त्या कामावर नेमणूक केली. कंची कामाक्षीस पन्नास हजार रुपयांच्या मोहरा वांटण्याकरितां पाठविण्याचें उदक सोडिलें व दुसरींही दानधर्माचीं उदकें सोडिलीं. ते इतके दुखणेकरी होते तरी सर्वांवर त्यांचा वचक पहिल्याप्रमाणेंच असे. त्यांस बोलण्याची देखील शक्ति उरली नव्हती तरी दरबारी लोक त्यांस पाहतांच चळचळां कापत असत! रमाबाईस त्यांनीं सहगमन करण्याविषयीं बोध केला. पण हा बोध तिला करण्याची अवश्यकताच नव्हती. अलीकडे कित्येक दिवस फक्त गोमूत्र व दूध यावरच त्या साध्वीनें शरीर धारण केलें होतें. सती जाण्याचा तिचा निश्चय पक्का ठरला होता. पेशव्यांना आतां कधीं अकस्मात्

अंत होईल याचा भरंवसा बिलकुल राहिला नव्हता. एके दिवशीं श्रीमंतांचा अतिशय वाग्रा होऊन ते मरण पावल्याची हूल उठली. त्यावेळीं रमाबाईनें सती जाण्याच्या वेळचीं नेसावयाचीं पातळें आणण्याकरितां पुण्यास सांडणीस्वार पिटाळिला. तो तेथें जातांच शहरांत जिकडे तिकडे हलकल्लोळ झाला. मग श्रीमंत जिवंत असल्याची खात्रीलायक बातमी गेल्यावर पुष्कळ वेळानें स्वस्थता झाली. हें वर्तमान श्रीमंतांच्या कानीं जातांच त्यांनीं त्या दुर्दैवी सांडणीस्वाराचा हात तोडण्याविषयीं हुकूम केला! तो हुकूम रद्द होण्यास पुष्कळांची रदबदल खर्ची पडली.

नानाफडणीस व हरीपंत फडके नेहमीं श्रीमंतांजवळ असत. त्यांस ते बोलले कीं, माझे सरदार व मुत्सद्दी व रयत लोक मला पहावेसे वाटतात. याकरितां मजकडे येण्यास कोणास बंदी करूं नका. हा हुकूम सुटतांच हजारों लोक श्रीमंतांच्या दर्शनास जाऊं लागले. आपला अंतकाळ समीप आलासें पाहून त्यांनीं वैद्याची प्रार्थना केली कीं, मरणसमयीं मला कफ न व्हावा, अतिसार व्हावा, अशी योजना करा. कारण कीं, कफ झाल्यास वाचा बंद होऊन परमेश्वराचे नामोच्चारणास मी अंतरेन! कार्तिक वद्य अष्टमी रोजीं सकाळच्या प्रहर दिवसास श्रीमंतांचें देहावसान झालें. मरणापूर्वी दोन घटका सर्व मंडळी व मोठमोठे वैदिक तपस्वी ब्राह्मण बोलावून आणून त्यांस त्यांनीं नमस्कार केला व 'महायात्रेस आह्मीं जातो. आमच्या स्वारीची तयारी करा' असें सांगून स्मृतींत 'गजानन' 'गजानन' असा नामघोष करीत असतां मोठ्या योग्याप्रमाणें नेत्रद्वारें प्राण गेला!

पूर्वसंकल्पाप्रमाणें रमाबाई सती गेली. जातांना तिनें आपलें जवाहीर व अलंकार गोरगरिबांस वांटून टाकिले व धर्मशिळेवर उभी राहून

नारायणराव साहेबांचा हात दादासाहेबांच्या हातीं देऊन त्यांस "सर्वांचें वडीलपणें यथास्थित चालवावें" असा बोध केला. मोठमोठे सरदार व मुत्सद्दी व इतर हजारों लोक तिच्या पायांवर डोई ठेवण्यास आले त्यांस आपलें स्मरण रहावें ह्मणून तिनें कोणास अंगठ्या, मोहरा, पुतळ्या, रुपये असे वांटिले. व सर्वांचा निरोप घेऊन शांत वृत्तीनें चितारूढ होऊन अग्नीच्या ज्वालांत ती अदृश्य झाली!

---

श० १६९४ **पेशव्यांच्या आजाराची स्थिति.** इ. स. १७७२

नं० ११७६ ( ७ जून. )

केसो सदाशिव व शिवाजी रामचंद्र यांचें पांडुरंगरावास पत्र ज्येष्ठ शु० ६ रविवारचें पुण्याहून—

" श्रीमंत राजश्री दादासाहेब शु० १३ च्या मुहूर्तें पुण्यास येणार. श्रीमंतांची शारीरप्रकृति आहे तशीच आहे. हैदरखानाकडील सल्ला झाला. फौजा तुंगभद्रेवर आल्या, ह्मणून बाजारी वर्तमान व सावकारी लिहिलें आलें. शु० २ स हिशेब नाना फडणवीस यांस दाखविले. मुहूर्त मात्र झाला. "

नं० ११७७ ( ज्येष्ठ वद्य पंचमी. २० जून. )

मोरो बल्लाळाचें पांडुरंगरावास पत्र पुण्याहून.
पै॥ १८ रबिलावल—

" श्रीमंतांची शरीरप्रकृत आज दोन चार दिवस तो बरीच आहे. थेउरास जावयाचा मनसबा होता. राजश्री सखारामपंतबापू यांनीं जाऊं नये ह्मणून विनंती केली त्याजवरून जावयाची गडबड दिसत नाहीं. तूर्त राहणें झालें असें दिसतें. परंतु जाणें राहणें निश्चयांत नाहीं. श्रीमंत राजश्री दादासाहेब आनंदवल्लीहून निघून त्रयोदशी शनवारी तिसरे प्रहरीं पुण्यास येऊन दाखल झाले. पुढें श्रीमंत राजश्री थोरले राव व मोरोबादादा आगाबयास आडवे गेले होते. जाऊन येऊन आले. वाड्यांतच राहिले आहेत."

---

१. हे पटवर्धनांचे कारकून. जहागिरीचे हिशेब समजून देण्याकरितां मोरो बल्लाळ ऊर्फ मोरोबा आबा याजबरोबर पुण्यास गेले होते. २. पेशव्यांचे बंधु नारायणराव.

शा० १६९४ **पेशव्यांच्या आजाराची स्थिति.** इ. स. १७७२

नं० ११७८ (२१ जून.)

केसोपंत व जिवाजी रामचंद्र यांचें पांडुरंगरावास पत्र.

पुण्याहून ज्येष्ठ वद्य ६ चें—

" श्रीमंत राजश्री दादासाहेब शुद्ध त्रयोदशीस आले. श्रीमंतांची शरीरप्रकृत आहे तशीच आहे. तेही प्रस्तुत बागेतून वाड्यांत आले. शेषाद्रिशास्त्री निघून गंगापुरास गेले. श्रीमंतांस आरोग्य होणेंविषयीं दादासाहेब अनुष्ठान करितात व औषधही प्रस्तुत तेच देत असतात. हिशेबाचा अद्यापि प्रथम दिवस आहे. लष्करचें वर्तमान किमपि नाहीं."

नं० ११७९ (ज्येष्ठ वद्य ७. २२ जून.)

मोरो बल्लाळाचें पांडुरंगरावास पत्र २० रबिलावलचें पुण्याहून—

" श्रीमंत बाबूरावबाबांच्या बागेत होते ते पंचमी मंदवारीं वाड्यांत आले. आज सप्तमी इंदुवारीं राजश्री सखारामपंतास कारभार सांगितला. धाकट्या रायांजवळ बसून कारभार करीत जावा याप्रमाणें श्रीमंतांची आज्ञा झाली. श्रीमंतांची शरीरप्रकृत तर ठीक नाहीं. ईश्वरी कृपेनें घडेल तें खरें! सखारामपंताच्या कारभारामुळें बहुतांस समाधान झालें. परंतु आम्हांस मात्र पेंच पडला! बरें! ईश्वरसत्ताप्रमाण आहे.

---

१. या लिहिण्यांतील मर्म असें आहे कीं, पेशव्यांनीं कैदेंत ठेविल्यापासून त्यांच्या जिवास अपाय व्हावा या बुद्धीनें दादासाहेब कांहीं अनुष्ठानें करीत असत व कडकडीत ऊन पाण्यानें अर्घ्ये देणें हें एक त्यापैकीं अनुष्ठान होतें व या अनुष्ठानांच्या योगानें पेशव्यांस क्षयरोग झाला अशी सार्वत्रिक समजून होती. हल्लीं तेच दादासाहेब त्याच पेशव्यांस आरोग्य व्हावें म्हणून अनुष्ठान करितात ' असें हें उपहासाचें लिहिणें. २. कर्नाटकांत गेलेल्या लष्करचें. ३. बाबूराव रामचंद्र फडणीस हा मोरोबादादाचा बाप व नाना फडणीस याचा चुलता. ४. पेंच पडण्याचें कारण असें कीं, सखारामबापूचें व पटवर्धनांचें मुळापासूनच विल्वाष्टकें उजू!

फौजा देशास येत्या तर फारच चांगलें होतें. आषाढ मास लागला, अद्यापि तह होत नाहीं, तेव्हां पुढें कधीं येतात पहावें! ईश्वरें संकटें आणिलीं आहेत.

नं० ११८० (ज्येष्ठ व० ७. २१ जून.)

केसोपंत व जिवाजी रामचंद्र यांचें पांडुरंगरावास पत्र २० रबिलावलचें पुण्याहून--

"काल अष्टमी इंदुवारीं राजश्री सखारामबापू यांस दिवाणगिरी झाली. श्रीमंत राजश्री नारायणराव यांजवळ बसून कारभार करावा याप्रमाणें झालें. 'घावें' 'देणें' सर्व बाकट्या रायांकडे आहे. श्रीमंत थेऊरास जाणार. शरीरप्रकृत फारच कठीण झाली आहे. त्यांचे शरीराचा भरंवसा दिसत नाहीं. राजश्री मोरोबादादा स्वस्थ आपले घरीं बसून आहेत."

नं० ११८१ (१९ जून.)

जिवाजी रामचंद्र यांचें गंगाधररावास पत्र ज्येष्ठ वद्य ४ भृगुवासरचें पुण्याहून.

"श्रीमंत मातुश्री[1] बाईस बरें वाटत नाहीं म्हणून श्रीमंत गंगापुरास जाणार अशी बोलवा आहे. पालख्यांची डांक गंगापुरापर्यंत बसविली आहे. गंगो विष्णुही[2] गेला आहे. शहाजी मोंमले[3] यांजवळ तीन लक्ष (रुपये) मागतात त्याजवरून शहाजी मोंमले येथें आले आहेत. रुपये घेतात. न दिले तर गाडदी बसवून रुपये घेणार!"

---

१. पेशव्यांची आई गोपिकाबाई. २. हा पेशवाईतील प्रसिद्ध वैद्य. ३. अक्कलकोटकर. यांजकडे पेशव्यांचें तीन लक्ष रुपये देणें निघालें होतें.

शा० १६९४ पेशव्यांच्या आजाराची स्थिति. इ. स. १७७२

नं० ११८२ (आषाढ व० १.
१९ जुलई.)

मोरो बल्लाळ यांचें पांडुरंगरावास पत्र (पै॥ १३ रबिलाखर.)

"श्रीमंतांची शरीरप्रकृत आहे तशीच आहे. शतचंडी करविणार. थेऊरास जावें असाही मनसबा आहे. राजश्री आपाजीराव गाडगीळ व कृष्णराव बल्लाळ असे पुढें थेऊरास पाठविले आहेत कीं देवास चिठ्ठ्या घालाव्या कीं यावें कीं न यावें? यास्तव उभयतां गेले आहेत. धाकटे श्रीमंतांस जवळ बसवून घेऊन (सखाराम) बापू सर्व कारभार करितात. मसलाशा कांहीं धाकटे श्रीमंतांकडून करवितात. बरकड राजश्री मलबा पानशे व गुरुजी यांजकडून करवितात. महालच्या रसदा घेऊन बंदोबस्त करणें हें देखील कारभारी यांजकडेच झालें. काम कारभार तडका चालतो."

नं० ११८३ (आषाढ शु० १०.
१० जुलई.)

नारो बाबाजी दामले यांचें पांडुरंगरावास पत्र
८ रबिलाखर भृगुवारचें—

"श्रीमंतांची शरीरभावना आहे तशीच आहे. अलीकडे ब्राह्मणच वैद्य औषध देतात ह्मणून बोलतात. सर्व मुत्सद्दी यांणीं सरकारचे

१. हा आपाजीराव रामचंद्र गाडगीळ अक्कलकोटकरांचा कारभारी. याचें वास्तव्य वाई. २. गुरुजी महादाजीपंत हे नानासाहेब पेशव्यांच्या कारकीर्दीपासून पेशव्यांच्या विश्वासांतले मुत्सद्दी. ३. सालमसाल मामलेदारांनीं सरकारांतून मामले पतकरण्यापूर्वी सरकारांत मामल्याच्या वसुलाची निम्मी रकम आगाऊ भरण्याची ती. ४. झपाट्यानें. ५. हाही कारकून पटवर्धनांचाच. ६. ब्राह्मण ह्मणण्याचें कारण असें कीं तेरदाळ येथील राहणार रणछोड या नांवाचा एक अत्यंत प्रसिद्ध वैद्य या सुमारास पेशव्यांनीं पुण्यास बोलावून नेला होता तो परदेशी होता.

वाड्यांत कचेरीस जावें, तेथें कारभार करावे, कोणी आपले घरीं सरकारी काम करूं नये, याप्रमाणें ताकीद आहे. थोरले ( दादासाहेब ) फार करून स्नानसंध्याच करितात! दरबार कचेरीस जात नाहींत. श्रीमंत राजश्री नारायणराव दोन वेळां नेहमीं कचेरीस बसतात. बापू जवळ असतात. राजश्री मोरोबादादा बाहेर निघत नाहींत. कार्याकारण एखादे दिवशीं श्रीमंत राजश्री पंत प्रधान यांजकडे मात्र जातात. श्रीमंत राजश्री मोरोबा आबा आज दोन रोज श्रीमंत राजश्री नारायणराव यांजकडे जातात. नित्य येत जावें ह्मणून सांगितलें ह्मणून ऐकितों."

नं० ११८४ ( २३ जुलई. )

बाबूराव राम यांचें पांडुरंगरावास पत्र आषाढ वद्य ८ चें पुण्याहून.

"श्रीमंत राजश्री नारायणराव थोमास गेले ते काल आले ते पर्वतीस राहिले. मृत्युयोग होता ह्मणोन काल वाड्यांत आले नाहींत. आज नववा दिवस ह्मणून येत नाहींत. भृगुवारीं येणार. थोरले श्रीमंत ( थोमास ) द्वादशीस जाणार. डेरे पंचमीस बाहेर झाले आहेतच. समागमें मुत्सद्दी कोण जातील न कळे. धाकटे श्रीमंत नागपंचमीच्या उत्साहाकरितां त्वरेनें आले आहेत."

नं० ११८५ ( १० जुलई. )

गंगाधर बापूजी व केसो सदाशिव व शिवाजी रामचंद्र यांचें पांडुरंगरावास पत्र आषाढ शुद्ध ११ भृगुवारचें पुण्याहून.

"श्रीमंतांची शरीरप्रकृत आहे तशीच आहे. हिंदुस्थानचें वर्तमान तर राजश्री विसाजी कृष्ण व पातशहा शुक्रताळाहून माघारे गंगा उत-

---

१. मोरोबा पटवर्धन हा आपला यजमान ह्मणून त्यास श्रीमंत हें उपपद. २. हरी पटवर्धनांचा कारकून.

रून आले. नावाही अलीकडे ओढिल्या. कां ह्मणाल तर सुजाउद्दवला व इंग्रज व जाट एकत्र होऊन पातशहास पत्र लिहिलें कीं, "हिंदूंस न मिळावें. तथापि ते तुह्मीं एकत्र होणार असिल्यां तर युद्धास सिद्ध होणें." त्यावरून हे मावारे आले. दुसरा मजकूर तर राजश्री रामचंद्र गणेश[1] याणीं चतुर्थाश्रम संपादावयाचा बेत केला होता, त्यास एक दोन दिवस भिक्षाही मागितली. हें वर्तमान श्रीमंतांस व सखाराम-बापू यांस कळलें. त्यावरून त्यांनीं एक दोन गृहस्थ येथून पाठविले कीं 'संन्यास न घ्यावा.' त्यावरून राहिले."

नं० ११८६ (१९ जुलई.)

बाबूराव राम यांचें पांडुरंगरावास पत्र आषाढ वद्य ९ चें पुण्याहून.

"श्रीमंत राजश्री रावसाहेब यांची प्रकृति आठ दिवस उत्तम आहे. श्रीमंत राजश्री नारायणराव धोम येथें गेले आहेत. तेथें सेवेशीं ब्राह्मण लाविले आहेत. तेथें कोणाच्या अंगीं भुतें ग्रह वाढत असतात त्यांनीं कांहीं बाधा आहे ह्मणून सांगितलें. त्यावरून धाकटे श्रीमंत गेले. तेथें भुतें वाढतात त्यांस पुसावें, ब्राह्मण प्रदक्षणेस लावावे, लौकरच निवून तेथून यावें, (ह्मणून हे गेले आहेत.) ते आलियानंतर येथून द्वादशीस श्रीमंत निघोन वांईस कृष्णातीरीं जाणार. सर्व कारभारी मुत्सद्दी समागमें जातात. श्रीमंत राजश्री दादासाहेबही समागमें जाणार ह्मणून वर्तमान आहे. राजश्री रामचंद्र गणेश संन्यास घ्यावयास आरंभ करणार होते. एक दिवस गांवांत नारायणपात्र[2]

---

१. स. १७६९ त पेशव्यांनीं शिंदे होळकरसुद्धां हिंदुस्थानच्या स्वारीस जी फौज पाठविली होती तीवर हा रामचंद्र गणेश कानडे मुख्य सरदार नेमून पाठविला होता. विसाजी कृष्ण बिनीवाले यास त्याचा कारभारी नेमिलें होतें. पुढें दिल्ली व रोहिल-खंड प्रकरणीं याच्या वागणुकीचें धोरण पेशव्यांस नापसंत झाल्यामुळें बिनीवाले यास मुख्य सरदारी देऊन रामचंद्र गणेश यास त्यांनीं परत बोलाविलें. त्यामुळें वैतागून त्यानें हा संन्यास घेण्याचा उपक्रम केला होता! २. भिक्षापात्र.

घेऊन भिक्षा केली. एका दो दिवशीं शिखा मूल टाकावें असें होतें. तों मशारनिल्हेच्या चिरंजीवांनीं येथें कारभारियांस पत्र पाठविलें. त्यावरून राजश्री बापूनीं निषेध करून पत्र लिहिलें. त्यावरून तो प्रकार प्रस्तुत राहिला. पुढें त्यासे आणून हिंदुस्थानची मसलत सांगणार. तेथें गृहस्थ आहेत त्यांस उतारा द्यावा असें आहे. हिंदुस्थानाकडील वर्तमान तर आजपर्यंत उत्तमच आहे. अलीकडे वर्तमान आलें आहे कीं, जाट व सुजाउद्दवला व रोहिले हे त्रिवर्ग एकत्र झाले आहेत. त्यांस यांसे पंचवीस कोसांचें अंतर आहे. मराठी फौजा व पातशहा हे एकत्र झाले आहेत. परंतु पातशहाचा विश्वास पुरता नाहीं. शिंदे होळकर यांची ( परस्पर ) चित्तशुद्धता नाहीं. व विसाजीपंत यांचेंही कोणाशीं बनत नाहीं. असा बखेडा आहे."

नं० ११८७ ( आषाढ वद्य अमावास्या. ३० जुलई. )

नारो बाबाजी दामले यांचें पांडुरंगरावास पत्र २८ रबिलाखरचें.

" हिंदुस्थानाकडील वर्तमान तरी विसाजीपंत व शिंदे होळकर यांचें वैमनस्य आहे ह्मणून श्रीमंतांचा त्यांजवर रोष आहे. दुसरा कारकून बाळाजीपंत ह्मणून कंवटीचे पागेस असतो त्यास विसाजीपंतास आणाव-यास तयार केलें आहे. लवकरच जातील."

नं० ११८८ ( ३० जुलई. )

गंगाधर बापूजी व भिवाजी रामचंद्र यांचें पांडुरंगरावास आषाढ वद्य अमावास्या सौम्यवारचें पुण्याहून पत्र.

---

१. सखारामबापू. २. रामचंद्र गणेश यांस. ३. हिंदुस्थानांत मुख्य सरदार विसाजीपंत विनीवाले आहेत त्यांस परत बोलवावें. ४. मराठी फौजांस. ५. विसाजीपंतावर.

## श० १६९४ पेशव्यांच्या आजाराची स्थिति. इ. स. १७७२

" श्रीमंत राजश्री पंतप्रधान थेऊरास जावयास निघून गेले. सांप्रत आठ दहा रोज शरीरप्रकृत बरीच आहे. श्रावणमासची दक्षणा झाल्यावर श्रीमंत राजश्री नारायणराव जाणार आहेत. धारण जोंधळे पावणेपांच पायली, तांदूळ अडीच पायली, हरभरे पावणेतीन पायली, व किरकोळ जिन्नसही महागच आहेत. "

नं० ११८९ (आषाढ वद्य. जुलै० दु० पंधर०.)

मोरो बल्लाळाचें पांडुरंगरावास पत्र पुण्याहून.

" श्रीमंत मातुश्री बाईसाहेब महायात्रेस जाणार ह्मणून ऐकिलें, कधीं निघणार, समागमें फौजांची नेमणूक होईल कीं काय, हें लिहावें ह्मणून लिहिलें; ऐशास सांप्रत तो पाहतां जावें असाच सिद्धांत ठरला आहे. साहित्याची गडबड लागली आहे. समागमें पथकें खंडेराव दरेकर व राजश्री शहाजी भोंसले व आणखी कोणी कोणी व खेरीज हुजरातपैकीं कांहीं नेमणूक आहे. याप्रमाणें तो गडबड दिसते. "

नं० ११९० श्रीगणराज. (फाल्गुन वद्य. मार्च दु० पंधरवडा.)

पुरवणी चिरंजीव राजश्री आबा यांस आशीर्वाद उपरी तुह्मीं दरबारास जातां त्यास यंदा ईश्वरें मुलुखगिरींत तिघे चिरंजीव नेले. यामध्यें गोपाळराव कर्ता मनुष्य लौकिकाचा गेला. तैसाच नीलकंठराव गेला. माधवराव गेला. चिरंजीव राजश्री गोविंदपंत व सौभाग्यवति

१. पत्र त्र्यंबक हरीचें. हें श० १६९३ च्या अखेरीस लिहिलेलें पत्र येथें चुकून लागलें आहे. २. गोपाळराव व माधवराव हे पुतणे व नीलकंठराव पुत्र. ३. धाकटा भाऊ गोविंद हरि व त्याची स्त्री.

## नं० ११९४ पेशव्यांच्या आजाराची स्थिति. इ. स. १७७२

यमाबाई गेली. कर्ते गेले. आज तीन वर्षें लोक रानांत. पुढें दाही श्रीमंत रहा म्हणतील तेथें राहिलें पाहिजे. राहिल्यास लोक हात नाहींत. एक दुसरे राहिले तर राहतील. घरांत बायकांचा आतिशय आहे. चिरंजीव कोनेरीचें स्मरण करते. यामुळें पत्र लष्करास लीं तों ( कळलें कीं ) चिरंजीव राजश्री भाऊस बरें वाटत नाहीं. चिरंजीव राजश्री वामनराव अशक्त. अशी आमची अनुपत आहे हें चित्तांस निवेदन करणें. इतकेंही होऊन कृपा न करीत तरी ईश्वर नेस! याकरितां आम्हीं साम दाम जितका करणें तें करून निरोप दिल्यानें येत आहे. आणि ते न ऐकत तरी जें होणें तें होईल! यांत तुम्ही जितकी युक्ती करणें ती करावी. हें पत्र तुम्हांस लिहिलें आहे. बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद.

पौ॥ छ० २९ जिल्हेज.

## नं० ११९५ श्रीगणराज. ( श्रावण शुद्ध दशमी.

( आगष्ट. )

तीर्थस्वरूप राजश्री आबा वडिलांचे सेवेशी.

अपत्यें परशुरामानें विज्ञापना तागायत छ० ८ जमादिलावल मुक्काम तासगांव. वर्तमान यथास्थित असे. विशेष. आम्ही तासगांवास श्रावण शुद्ध अष्टमीयुक्त नवमी गुरुवारीं रात्रीं एक तास यानंतर मुहूर्ते दाखल झालों. तीर्थरूप मातुश्रींची व सर्वांची भेट झाली. राजश्री ता-

१. परदेशी मुलांकरितां. २. बायको आक्रोश करिते की मी थकत चाललें, माझा अंतकाळ समीप आला, माझीं मुलें परदेशीं स्वारीत आहेत तीं मला आणून भेटवा! हीं मुलें म्हणजे मुलगा कोन्हेरराव, नातू रघुनाथराव नीलकंठ, पुतण्ये वामनराव व परशुरामभाऊ. ३. कृपा 'परत या' म्हणून आज्ञा देण्याची. ४. नमस्कार न लिहिण्याचें कारण चुलती ( त्र्यंबकरावांची बायको ) वारली तिच्या सुतकांत हें पत्र लिहिलें म्हणून. चुलतीच्या मृत्यूचा मजकूर पुढें या पत्रांतच आहे.

सिंगराव घायगुडे आले होते त्यांस मेजवानी केली. ते भृगुवारीं भोजन करून पुढें गेले. मिरजेसही मेजवानी झाली. वरकड वर्तमान तुंगभद्रा-पार झाल्यावर सविस्तर वर्तमान लिहून पेशजी पाठविलेंच आहे त्याजवरून विदित झालेंच असेल. आपणाकडील सविस्तर वर्तमान लिहावें. तीर्थरूप मातुश्री अक्काबाईस श्रावण शुद्ध अष्टमी गुरुवार प्रहर दिवसास देवाज्ञा झाली. आह्मीं सौम्यवारीं संध्याकाळीं मिरजेस आलों. गुरुवारचा मुहूर्त तासगांवास यावयाचा होता ह्मणून कुरुंदवाडास न जातां परभारेंच गुरुवारीं संध्याकाळास आलों. भृगुवारीं मिरजेस वर्तमान आलें. मिरजेहून चिठ्ठी आज मंदवारीं आली. तें वर्तमान ऐकून खेद झाला. आमचे भेटीचा वियोग झाला! बरें! ऋणानुबंध नव्हता! ईश्वरसत्ता प्रमाण! बहुत काय लिहिणें हे विज्ञापना.

नं० ११९२ **श्री.** ( १ आगष्ट. )

सेवेशीं नारो विंबक कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत श्रावण शु० २ स्थिरवासरे पावेतों स्वामीचे कृपावलोकनकरून सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेष. स्वामीनीं पत्र पाठविलें तेथें आज्ञा कीं, 'कच्चें वर्तमान हरघडी लिहीत जाणें.' त्यास श्रीमंत भवानी पेठेंत द्वादशीस मुहूर्तकरून जाऊन राहिले होते. दुसरे दिवशीं मुक्काम होता. तिसरे दिवशीं रात्रौ सर्वांस ताकीद लोकांस केली कीं, "उदईक रात्रौच कूच करणार. कोणी गांवांत न जाणें. येथें निजणें." ह्मणून बेलदार कामाठी व फरास खिजमतगार दालाईत वगैरे लोकांस ताकीद करविली असतां पीठकुटाकरितां कोणी कोणी गांवांत आले होते. इतक्यांत तोफ झाली याजमुळें जागच्या जागां माणसें अडकलीं. श्रीमंतांनीं दोन प्रहर रात्रीसच कूच केलें. डेरे पाडा ह्मणतात तों माणसें

१. हा पटवर्धनांचा एक कारकून. उपनांव पोंक्षे.

कोणी नाहीत! तेव्हां रागें भरले. खास बिछान्याचा माल एक उंट लादविला आणि पालखींत बसून निघाले ते थेऊरासच जाऊन देवदर्शन घेऊन एक प्रदक्षणा करून पथ्य घेतलें. दुसरे दिवशीं सारीं माणसें मागाहून गेलीं. मग (श्रीमंतांनीं) कारकून आदीकरून (लोकांस) हाणमार केली! शरीरप्रकृत बरी आहे. देवाचें दर्शन नित्य घेतात. एक दुसरी प्रदक्षणाही नित्य करितात. परंतु शरीरांस ज्वरांश आहे ह्मणतात. पहिल्यानें चांगेत होत तेव्हां तेज बरें होतें. आतां म्लानवदन आहे. मर्जी दिवसेंदिवस कठीण. पथ्य करीत नाहींत. वैद्यानें जो पदार्थ खाऊं नका ह्मणावें तो अगत्य खावा, ज्यानें आणून न घातल्यास शिवीगाळ द्यावी, असा प्रकार आहे. दुसरा मजकूर भवानी पेठेंतील ह्मणतात परवां बृधवारीं दोन्हा दोन घटका डोलत होता. साऱ्या शहरानें पाहिला. हें एक विपरीतच झालें. हें काय आहे न कळे! मध्यें आठ चार दिवस श्रीमंत राजश्री आवास आंव पडत होती याजमुळें दरबारास जात नव्हते. आज गेले होते. हिशेबाचा प्रकार कारभारी यांनींही निकड थोडीसी दाखविली आहे. तयार होतात. राजश्री गुरुजी (आमच्या) घरास आले होते. हिशेब पाहिले. तारीफ तो फारच केली. 'असे हिशेब कोणाच्याही सरंजाम्याचे अगर कमावीस महालाचे नाहींत' ह्मणत होते. मागें राजश्री नाना फडणवीसानींही शिफारस केली होती. हिशेब फारच चांगले आकारले आहेत (असें ह्मणत होते.) कारभारी यांनीं हिशेब पाहिल्यानंतर त्यांसही समजेल. अद्यापि पाहिले नाहींत तों आज असाच दिसतो. विदित होय हे विज्ञापना.

१. स्वारांची माणसें वेळेवर आपल्या कामावर हजर न राहिल्यामुळें हे स्वारी कारकुनास बक्षीस!!! २. हा कारकुनांचा तारीफ स्वतः कारकुनानें आपल्या यजमानास लिहिणें हे साहजिकच! महाराजांपासून गडकरी व नाना फडणीस यांची शाबासकी मिळणें हे कारकून लोकांस भूषण वाटत असेल यांत संशय नाहीं.

नं० ११९३ श्रीगणराज. (६ आगष्ट.)

तीर्थस्वरूप राजश्री आबा वडिलांचे सेवेशीं.

अपत्यें वामनानें साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत श्रावण शुद्ध अष्टमी गुरुवार जाणोन सदैव आशीर्वाद पत्र पाठवीत जावें. इटग्याचे मुक्कामाहून पत्रें आपणास पाठविलीं होतीं तीं पावोन सविस्तर मजकूर कळलाच असेल. काली सप्तमी बुधवारीं पंचवीस घटकांनंतर घरास आलों. वडिलांस कळावें. चिरंजीव राजश्री भाऊ आज बेवीस घटका रात्रीनंतर मुहूर्त आहे तेसमयीं घेरास जाणार. चिरंजीव रावोबा रामदुर्गच्या मुक्कामाहूनच कुरुंदवाडास सडे होऊन आले ते पंचमी सोमवारीं कुरुंदवाडास दाखल झाले. राजश्री नरसिंगराव घायगुडे आह्मांसमागमेंच मिरजेपर्यंत आले. येथून पुढें गेले. कळलें पाहिजे. आपणाकडील सविस्तर वर्तमान हिशेबाचें वगैरे नवलविशेष सविस्तर लिहावें. एरडकिऱ्यांचा मजकूर पेशजी लिहिलाच आहे. राजश्री मामा नदी कोणे ठिकाणीं उतरले त्याचे बातमीस जासूद जोडी पाठविली आहे ती आली ह्मणजे सविस्तर लिहून पाठवितों. राजश्री लक्ष्मणराव रास्ते आणि आह्मीं एक जागांच इटग्याजवळी तुंगभद्रा उतरलों. ते बागलकोटास गेले. श्रीमंतांस पत्र लिहिलें आहे. आपण वाचून पाहून प्रविष्ट करावें. वरकड सर्व भेटीअंतीं निवेदन होईल. सेवेशीं विदित होय हे विज्ञापना.

नं० ११९४ श्रीगणराज. (श्रावण शुद्ध. आगष्ट. प० पंच०.)

चिरंजीवें राजश्री तात्या यांसी आशीर्वाद उपरी राजश्री बाबूराव-बाबा फडणवीस हे धडधडीत होते. दुखणेंबाणें कांहीं नव्हतें. नाकांत एक पुळी होऊन तोंड अगदीं सुजलें. रक्त काढविलें तरी उतार पडेना.

१. तासगांवास. २. पत्र मोरो बल्लाळ बाचें पांडुरंगरावास. ३. हा मोरोबा दादाचा बाप व नाना फडणिसाचा चुलता.

दोन रोजांतच मूत्र स्थापिलें. डोळे सुजेमुळें दिसेनासे झाले. याजमुळें राजश्री नाना फडणवीस व हरिपंत तात्या श्रीमंतांबरोबर थेऊरास गेले होते तेही आले. राजश्री मोरोबादादा पंचमीचे मुहूर्तें थेऊरास श्रीमंतांकडे जावयाकरितां निघणार होते. दुखणें कठीण पाहोन घरास गेले. आह्मीं इंदुवारीं भोजनोत्तर गेलों होतों. अवस्था कठीणच दिसून आली. आदले दिवशीं (त्यांनी) पंधरा वीस हजार रुपये धर्म केला. आह्मी संध्याकाळपावेतों तेथें होतों. संध्याकाळीं घरास आलों. दादा तेथेंच राहिले. दोन प्रहर रात्रीस आह्मांस बोलावणें दादांनीं पाठविलें. गेलों. वाचा बंद झाली होती. गोदानें वगैरे धर्म झाला. बायकोनें पाऊण लाख रुपयेपर्यंत वांटिले. बरोबर जावयाचा सिद्धांत केला. उजाडल्यानंतर षष्ठी भौमवार प्रहर दिवसास काल झाला. दोन प्रहरास दहन झालें. स्त्री समागमें गेली. बाबा फडणवीसांमारखें मनुष्य गेले, मोठी अनुचित गोष्ट झाली! ईश्वर करणीस उपाय नाहीं. रामाजी महादेव मार्ष्टांचे सुभेदार त्यांस बहुत दिवस बरें वाटत नव्हतें तेही मृत्यु पावले. आठ दिवस झाले. बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद.

नं० ११९६ (श्रावण शुद्ध.
आगष्ट. १० पंच०.)

होत्या+ त्या हल्लीं बदलून नव्या घेऊन समग्र तीन पाठविल्या

---

१. बापूराव यांच्या पहिल्या बायकोचा पुत्र मोरोबादादा. ती मेल्यावर बापूराव यांनीं दुसरा स्त्रा केला. ती फार नाजूक व सुंदर होती असें म्हणतात. सावत्र आईशीं पटेनासें झाल्यामुळें मोरोबा निराळा राहत असे. २. सती जाण्याचा. हिला मूलबाळ कांहीं नव्हतें. + या पत्राचा पहिला व शेवटचा कागद गहाळ झालेला आहे. अक्षर बिसाजी नारायण बाडदेकर याचें आहे. यावरून त्यानेंच हें पत्र पांडुरंगरावास लिहिलें हे स्पष्ट आहे. हा बिसाजीपंत पुढें सवाई माधवरावाच्या कारकीर्दीत पटवर्धनांकडून पेशव्यांच्या दरबारीं वकील होता. दक्षणमसभानें आंकडे मूळपत्रांत आहेत, पण रुपये व आगष्ट ही फोड आह्मी केली आहे.

आहेत. इकडील राजकीय नवल विशेष वर्तमान तरी अधिकोत्तर लिहिजेसें नाहीं. श्रीमंत आबांनी लिहिलें आहे त्याजवरून कळल. बाबूराव फडणीस श्रावण शु० ६ स मंगळवारीं प्रातःकाळचे चार घटका दिवसास देवाज्ञा झाले. समागमें स्त्रीही गेली. कांहीं दुखणेंबाणें फार नव्हतें. नाकांत पुळी झाली इतकें मात्र निमित्य होऊन तीन दिवसांत गेले. श्रावणमासचे दक्षिणेस ब्राह्मण संख्या झाले—

| रु० | | ब्रा० |
|---|---|---|
| २,५२,००० | रमण्यांत झाले. | ३८,३५४. |
| ५२,००० | वाड्यांत झाले. | १,५५८. |
| ३,०४,००० | | |

याप्रमाणें समारंभ श्रावणमासचा झाला. दक्षणा उत्तम प्रत दिली. दशग्रंथी चांगले यांस पंचवीसापासून चाळीसपावेतों दिली. पंचग्रंथी यांस पंधरापासून पंचवीसपर्यंत याप्रमाणें दिली. केवळ गृहस्थांस चारपासून दहापावेतों याप्रमाणें दिली. दक्षणा उत्तम दिली. आमच्या वाड्यांत श्रावणमासांत पांच दिवसपावेतों एकशेंएंशीं, एकशेंनव्वद, दोनशें पात्रें होत होतीं. दशमीपर्यंत समारंभ पात्रें याप्रमाणें होतील. मग सव्वाशें शंभर होतील. तिकडील ब्राह्मण आले होते ते त्यांची वगैरे याद पाठविली आहे. वडिलीं पहावी. पुण्यांत खेरदी गजन्या केल्या होत्या त्यांचे गठ्ठे उंटावर पाठविले आहेत. गठ्ठे सहा. चार गठ्ठे थोर व लहान गठ्ठे दोन, एकूण गठ्ठे सहा पाठविले आहेत. ठेवावे. बुरणूस तीन, किंमत रुपये नऊ, येणेंप्रमाणें पाठविले आहेत. जाळनापुरची ओझीं तीन पावलीं म्हणून लिहिलें तें कळलें. पेचाची (?) ओझीं रवाना झालीं आहेत. येऊन पावतील. रुपया परत फार होईल. पुण्यांतील पारख कठीण. मिरजेची पारख चांगली नाहीं. जुनयर अर्धवट पाहिलें म्हणजे नाईकांनीं घ्यावे परंतु यावे पोटांत+

श० १६९४ **पेशव्यांच्या आजाराची स्थिति.** इ. स. १७७२

नं० ११९६ **श्रीगणराज.** ( ७ आगष्ट. )

चिरंजीव राजश्री वामनरावबाबा यांसी.

प्रती मोरो बल्लाळ आशीर्वाद उपरी येथील कुशल तागायत श्रावण शुद्ध नवमी भृगुवासर जागृन स्वकीय कुशल लेखन करीत जावें. विशेष. तुह्मीं आषाढ शु० १४ चें पत्र बडगमानहळ्ळी तालुके शिरें येथील मुक्कामाहून पाठविलें तें छ० २९ रबिलाखरीं पावलें. लिहिला मजकूर विस्तारपूर्वक कळला. त्या अलीकडे इटगाच्या मुक्कामास आल्यानंतर चिरंजीव राजश्री तात्यास पत्रें पाठविलीं तींच पत्रें चिरंजीवांनीं आह्मांकडे पहावयास पाठविलीं. वर्तमान कळोन बहुत समाधान पावलों. तुह्मीं आस्तां ही मोठी गोष्ट झाली. यापरता दुसरा लाभ नाहीं! आजला मिरजेस आलांच असाल. कोणते दिवशीं घरीं दाखल झालां हें सविस्तर लिहावें. एरंडकेरेविशीं राजश्री मामांनीं वचन देऊन वचनाप्रमाणें निभावून दिलें नाहीं, ठाणें शेवटीं सरकारचें बस-विलें, ह्मणून तपशीलवार वृत्त लिहिलें तें कळलें. मामांनीं वचन देऊन बेवचन केलें! असो. त्याची चिंता नाहीं. मामाबद्दल चित्र-दुर्गकर व रायदुर्गकर वकील येतीलच. त्या गोष्टीचा फडशा येथेंच श्रीमंतांसमक्षच होईल. तुह्मीं बहुतां दिवसांनीं घरास आलां. स्वस्थ चित्तेंकरून घरीं रहावें. इकडे यावयाची गडबड न करावी. तूर्त आह्मीं प्रसंगीं आहोंच. पुढें येथील विचारानें सारें लिहून पाठवूं त्याप्रमाणें करावें. श्रीमंत थेऊरास जावयाकरितां येथून आषाढ वद्य द्वाद-शीस निघून एक रोज बाहेर राहून दुसरे दिवशीं निघून थेऊरास गेले ते अद्यापवर तेथेंच आहेत. सगळा श्रावण तेथेंच मुक्काम होईल असें दिसतें. शरीरप्रकृत सांप्रत आहे त्यांत बऱ्यांतच आहे. धाकटे राव दक्षणेकरितां राहिले होते. दक्षणा झाली. तीस पस्तीस हजार ब्राह्मण झाले. रुपये तीन सव्वातीन लक्ष रुपयेपावेतों लागले. समा-रंभ उरकला. आतां धाकटे श्रीमंत व कारभारी व मुत्सद्दी वद्य द्वाद-

शीम येथून निघून श्रीमंतांकडे जाणार असें आहे. ते गेल्यानंतर आह्मासही समागमें जावें लागेल. हिशेबास प्रारंभ केला आहे. आमचें जाणें श्रीमंतांकडे झालें तरी हिशेबाचें काम तटून राहों देत नाहीं. कारकुनाची गांठ घालून देऊन चालतें करून देऊं. हिंदुस्थानाकडील वर्तमान तर फौजा भागीरथी पार होत्या त्या अलीकडे उतरून आल्या. (तुह्मीं) दुसरीं पत्रें आषाढ वद्य त्रयोदशीचीं नदीपार झाल्यानंतर पुरवण्यायुक्त तपशीलवार पत्रें पाठविलीं तीं आजच पावलीं. मागाहून यांचें उत्तर लिहून पाठवितों. आमचे शरीरीं आज चार रोज आंवेचा उपद्रव झाला होता. प्रस्तुत बराच आहे. तुह्मीं घरास येऊन चार दिवस स्वस्थ रहावें. आह्मीं येथील सर्व प्रकार पाहून विचारून कधीं यावें हें पुसोन ठेऊं, भेटी आमची (व श्रीमंतांची) होईल, तदोत्तर इकडे येण्याचा प्रकार करावयासीं येईल. बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद.

नं० ११९७ **श्रीगणराज.** (श्रावण शुद्ध. आगष्ट. ५० पं४०.)

आशीर्वाद उपरी. श्रीमंतांची मर्जी व कारभाराचा डौल कसा आहे हें तपशीलवार लिहावें ह्मणून लिहिलें, ऐशास श्रीमंतांची मर्जी बरीच आहे. शरीरप्रकृत आहे तशीच आहे. येथून थेऊरास जावयाचा सिद्धांत होऊन मुहूर्त पाहिला आहे. वांईस जाऊन राहणार. राजश्री आप्पाजीराव गाडगीळ यांचा वाडा रिकामा करविला आहे. थोरले श्रीमंत तेथें राहणार. सामान सारें पुढें रवाना झालें. श्रीमंत राजश्री दादासाहेब व धाकटे राव व कारभारी व मोरोबादादा व नाना फडणीस

---

१. पत्र मोरो बल्लाळ यांचें वामनरावास. वामनराव स्वारींतून परत घरीं मिरजेस आला होता.

झाडून मुत्सद्दी आर्दाकरून समागमें जाणार. पुण्यांतील कारभारास राजश्री नारो आप्पाजीस सांगितलें. याप्रमाणें नेमणूक झाली आहे. तेथून थेऊरास पांच सहा दिवस जाऊन राहणार. पुढें हलक्या हलक्या मजलीनें वांईस जाणार असें आहे. हेंच ठरेल असें दिसत नाहीं. आम्हांसही समागमें जावें लागेल. जाण्याचा निश्चयच ठरला तरी हिशेबाचें काम कारकून ठेऊन चालीस लावून मागाहून आम्ही मात्र जाऊं. काय ठरेल तें मागाहून लिहून पाठवितों. याप्रमाणें ठरलें होतें इतक्यांत पर्जन्यही अतिशय दोन तीन दिवस लागला आणि मर्जीस काय आलें न कळे, तूर्त खासा राहिले. धाकटे रायांस पाठविलें आहे. जाऊन तीन दिवस झाले. तेथें जाऊन देवाची प्रार्थना करून अनुष्ठानास ब्राह्मण लाऊन दहावे रोजीं माघारें यावें याप्रमाणें करार झाला आहे. धाकटे श्रीमंत आल्यानंतर खाशांचा जाण्याराहण्याचा निश्चय ठरेल. खासा द्वादशीस जाणार असें आहे. बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद.

नं० ११९८ **श्रीगणराज.** ( ज्येष्ट वद्य. जून द्वि० पंध्र०. )

चिरंजीव राजश्री तात्यांस आशीर्वाद. श्रीमंतांची मर्जी थेऊरास अगर वडुतास जाऊन रहावें अशी होती. इतक्यांत श्रीमंत राजश्री दादासाहेब आले त्यानीं सांगितलें कीं आजवर उष्णकाल होता, बागेतील हवा ठीक होती. आतां पर्जन्यकाळचे दिवस. बागेंत राहूं नये. आणि थेऊरासही जाऊं नये. वाड्यांतच तूर्त येऊन रहावें. त्यावरून वाड्यांत यावयाचें मान्य करून जेष्ठ वद्य ६ शनवारीं पहांटेची दहा घटका रात्र होती तेव्हां वाड्यांत मुहूर्तेंकरून श्रीमंत येऊन राहिले. शरीरप्रकृत

१. पत्र मोरो बल्लाळ याचें पांडुरंगरावास.

या प्रकारेंच आहे. शेषाद्रीस्वामी आज दोन महिने येथेंच होते. आतां चातुर्मास्य आला यास्तव गंगातीरास गेले. हे आशीर्वाद. लष्करास पत्रें लिहिलीं आहेत. तुम्हीं पाहून पुढें रवाना करावीं. हे आशीर्वाद.

नं० ११९९

नारो बाबाजी दामले यांचें पांडुरंगरावास पत्र पुण्याहून श्रावण शु० १३ चें.

" श्रीमंत राजश्री पंत प्रधान थेऊरच्या मुक्कामीं आहेत. राजश्री गंगा विष्णु वैद्य आले. कांहीं दिवस श्रीमंत तेथेंच राहतीलसें दिसतें. प्रस्तुत शरीरप्रकृत बरीच आहे. मुत्सद्दी जाऊन येऊन पुण्यांतच आहेत. कोंकणप्रांतांत सुवर्णदुर्ग तालुका रामाजी महादेव यांजकडे होता तो राजश्री हरीपंत फडके यांजकडे सांगितला. "

नं० १२०० ( १० आगष्ट. )

मोरो बल्लाळाचें वामनरावास व पांडुरंगरावास पत्र पुण्याहून श्रावण शुद्ध द्वादशीचें.

" श्रीमंतांची शरीरप्रकृत ठीक नाहीं याजमुळें कोणापुढें सांगावें, कोणास पुसावें, असें झालें आहे. श्रीमंत प्रस्तुत थेऊरींच आहेत. तेथेंच राहणार. गंगा विष्णूचें औषध घेणार. गुण दिस्यास येथेंच रहावें नाहीतरी गंगातीरास जावें, असें आहे. "

नं० १२०१ ( २५ आगष्ट. )

वामनरावाचें मोरो बल्लाळास पत्र श्रावण वद्य १२ चें मिरजेहून.

" राजश्री त्रिंबकरावमामा येडूर मांजरीचे उतारास उतरावयास आले. समागमें पांच हजार फौज आहे. "

श० १६९४ **पेशव्यांच्या आजाराची स्थिति.** इ. स. १७७२

नं० १२०२ **श्रीगणराज.** ( श्रावण वद्य १०. २३ आगष्ट. )

पै॥ छ० २३ जमादिलावल.

आशीर्वाद+ उपरी. श्रीमंतांची शरीरप्रकृत प्रस्तुत बरीच आहे. सांप्रत मुक्काम थेऊरास आहे. तेथील हवा शरीरास मानल्ये, याजकरितां तेथेंच राहिले आहेत. घोमास जावयाचा प्रकार तो हल्लीं दिसत नाहीं. गंगा विष्णुस बोलावणें गेलें होतें ते आले. त्यांचे चित्तांत " श्रीमंतांनीं पुण्यांत यावें, पथ्य आपण सांगेन त्याप्रमाणें करावें, ह्मणजे औषध द्यावयास आरंभ करीन," ह्मणतो. अद्याप कोणतेंही ठरलें नाहीं. मागाहून घडेल तें लिहून पाठवूं. धाकटे श्रीमंत व कारभारी एसे येथेंच आहेत. श्रीमंतांचा येथें येण्याचा अगर तेथें राहण्याचा निश्चय ठरेल त्याप्रमाणें धाकटे राव व कारभारी मुहूर्तेंकरून नेहमीं रहावयास जातील. तूर्त दोहों दिवसाआड जाऊन येतात. राजश्री नाना फडणीस समागमें होते. बाबूराव फडणीस वारले याजकरितां माघारे आले आहेत. सुतक फिटलें. क्रिया लौकिकाप्रमाणें झाली. याउपरी राजश्री नाना फडणीस जातील. मागाहून राजश्री मोरोबादादाही जाणार आहेत. धाकटे राव नेहमीं थेऊरास रहावयास कारभारीसुद्धां मुहूर्तेंकरून निघाले ह्मणजे आह्मांस जावें लागेल. तोंपर्यंत येथेंच आहों. हिशेबास प्रारंभ झाला आहे. महाळकरी मंगळवेढें व गळगलेकरी येणें, त्यांपैकीं मंगळवेढ्याहून राजश्री चिंतोबा आले. येऊन चार दिवस झाले. गळगलेकर अद्याप आले नाहींत. तुह्मीं आणवून रवाना केले असल्यास येतील. श्रीमंतांस तुह्मीं पत्र पाठविलें होतें तें प्रविष्ट करितां. ' श्रीमंतांचे भेटीस कधीं यावें हीं मर्जी पाहून लिहून पाठवावें. त्याप्रमाणें भाद्रपद शुद्धांत निघून येऊं ' ह्मणून लिहिलें, ऐशास तूर्त इकडे याव-

---

\+ मोरो बल्लाळ यांचें वामनरावास पत्र.

याची गडबड न करावी. आह्मीं येथील सुमार पाहून लिहून पाठऊं तेव्हां यावयाचें करावें. 'पैक्याचा फडशा होत आहे. उद्याचा फडशा झाला त्याचे पदरीं लागलाच एवज घालोन निरोप देतों.' ह्मणून लिहिलें, उत्तम आहे. 'पुढील नालबंदीची पैरवी कोणे प्रकारची' ह्मणून लिहिलें, त्यास येथील विचार पाहून मागाहून लिहून पाठवूं त्याप्रमाणें तरतूद करावी. एरडकिऱ्याचा मजकूर पेशजी तपशीलवार लिहिला तो कळला. आजवर अशौचामुळें दरबारास गेलों नाहीं. याउपर राजश्री सखारामपंतबापू यांसी बोलून ठेवितों. "कित्तूरचा प्रकार कसा ठरला, जरब द्यावी लागेल कीं काय," ह्मणोन लिहिलें, त्यास देसाई लबाडीच्या विचारांत आहे. विना पारपत्य केल्याशिवाय पैका देत नाहीं हें आह्मांस समजलें आहे. ऐशास हा मजकूर श्रीमंतांस श्रुत करून पारिपत्य करावें असेंच ठरल्यास तोफखान्यास चिठ्ठी घेऊन ठेवितों. अद्याप अव-काश आहे. लोकांसही दम खाऊं द्यावा. कार्तिकमासाच्या सुमारें लोक जमा होतील तेसमयीं जरब पोंचवून पैका घ्यावयास येईल. श्रीमंतांची प्रकृत नीट नियमेंकरून रहात नाहीं. चार रोज चांगली, चार रोज वाईट, अशी असते. बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद.

नं० १२०३ श्रीगणपति. (२० आगष्ट.)

तीर्थस्वरूप राजश्री आबा वडिलांचे सेवेशीं.

अपत्ये परशुरामानें कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति येथील कुशल तागायत श्रावण कृष्ण सप्तमी गुरुवारपावेतों आशीर्वादेंकरून क्षेम असों. विशेष. आह्मीं तीर्थरूप मातुश्री अक्काबाईच्या अकरावे दिवशीं कुरुंदवाडास गेलों. जातांना तीर्थरूप मातुश्री काशीकाकींची व तीर्थस्वरूप सौभाग्यवती मथुरा वयनींची भेटी घेऊन कुरुंदवाडास गेलों. त्याजउपर षष्ठी बुधवारीं कुरुंदवाडाहून निघालों व मागती मातुश्रीची भेट घेऊन गणेशवाडीस जाऊन मिरजेस राहिलों. आज

नं० ११९४ पेशव्यांच्या आजाराची स्थिति. इ. स. १७७२

तीर्थस्वरूप राजश्री भास्करपंत अप्पाचे घरीं भोजन करून घरास गेलों. मातुश्री गणेशचतुर्थीचे उत्सवास्तव चिरंजीव राजश्री श्रीपतराव असे मिरजेस परवां नवमी मंदवारीं देवापासून येणार आहेत. वडिलांस कळावें. श्रीमंतांची शरीरभावना दोन वर्षें फारच गळाठली आहे. आम्हीही तीन वर्षें मुलुखगिरी करून घरास आलों. एकदां श्रीमंतांचे पाय पहावे, सेवेंच माघारें यावें हें उत्तम, असे आहे. तेणेंकरून लौकीकही उत्तम दिसेल. नाहीतरी सारे सरदार लोक येऊन भेटतील. आम्ही पत्र आल्यानंतर आलों असें होईल. यास्तव सर्वांचे विचारें तीर्थरूप बाबांनीं सडे जाऊन श्रीमंतांचें दर्शन घ्यावें हें चांगलें. वरकड कामाचा प्रकार—त्यास आपण तेथेंच आहां. आणि पर्जन्यही साळमम-कुरी नाहीं तेव्हांच फडशा फार करून झाला आहे! कांहीं राहिला साहिला असेल तो राजश्री त्रिंबकरावमामा याचमार्गें बागलकोटावरून पुढें तेरदळचे सुमारे येतात तेव्हां होईल! तीर्थरूप राजश्री श्रीमंतांचे दर्शनास येत आहेत, परंतु लवकर निरोप देऊन माघारे लावून द्यावे. आपला ऐवज पुंगनुराकडे होता तो उगवून आलाच आहे. पाऊणशें रुपये बाकी चहू हजारांपैकीं राहिले. वरकड ऐवज आला तो उद्यां घरास गेल्यानंतर चिरंजीव राजश्री श्रीपतराव याजकडे पाठवून देतों. बहुत काय लिहिणें लोभ असो द्यावा हे विनंती.

नं० १२०४ श्रीगणराज. ( श्रावण वद्य. आगष्ट ५० पं०. )

अपत्यें+ वामनानें विनंती. आम्ही येथें आल्यानंतर सविस्तर लिहून पाठविलेंच आहे. राजश्री त्रिंबकरावमामा मुद्धुरासजवळ तुंगभद्रा

---

+ पत्र मोरो बल्लाळास. नमस्कार न लिहिण्याचें कारण चुलतीचा मृत्यु. पहा पत्र नं० ११९१.

उतरोन कपाट संगमास कृष्णा उतरावयास गेले. रास्ते बागलकोटास गेले. तेथून बांईस जावयास बाहेर निघाले. लौकरच बांईस जातील. राजश्री[1] आनंदराव गोपाळ कुडचीपाशीं कृष्णा उतरावयास आले. दोन दिवसांत कृष्णा उतरोन काल कूच करून गेले. कळावें. श्रीमंतांची प्रकृत चार दिवस बरी, चार दिवस बिघडते, ऐशियास तेथील मर्जीचा प्रकार पाहून श्रीमंतांच्या कानावर घालून त्यांचे मर्जीनुरूप आपल्या विचारें आह्मीं तूर्तच भेटीस यावें असें झाल्यास तसेंच लिहावें, ह्मणजे भाद्रपद शुद्धांत आह्मीं येऊं. श्रीमंतांचे पाय पाहिले ह्मणजे उत्तम आहे. आह्मीं आल्यानंतर महिना पंधरा दिवस लागतीलच. हिशेबाचा प्रकार चालीस लागला आहे, इतक्या अवकाशेंकरून विल्हे लागेलच. ह्मणजे आह्मीं व आपण समागमेंच माघारे येऊं. तूर्त आपण यावयाचें करणार नाहीं व करूं नये. दोन पर्याय लिहिले आहेत. जो सुचा दिसेल तो करावा. विदित होय हे विज्ञापना.

नं० १२०५ (भाद्र० व० ९. २१ सप्तंबर.)

मोरो बल्लाळानें पांडुरंगरावास पत्र पुण्याहून २२ जमादिलाखरचें.

"राजश्री त्रिंबकरावमामांचा मुक्काम वाडीवर झाला होता, घरास आणिले, मेजवानी केली, वस्त्रें दिलीं, ह्मणून तपशीलवार लिहिलें तें कळलें. उत्तम केलें. राजश्री मामा शुद्ध दशमीस थेऊरास आले. येथून श्रीमंत दादासाहेब व धाकटे राव आडवे गेले. जाऊन घेऊन आले. सर्वांच्या भेटी झाल्या. राजश्री मामा अद्यापि तेथेंच आहेत. धाकटे राव माघारे आले. श्रीमंतांची प्रकृत चहूं दिवसांखालीं बिघडली होती. मागती यथाप्रकारें आहेत. पृथ्वीचें छत्र आहे! श्रीनें कृपा

---

१. नरसोबाच्या वाडीस. मिरजेपासून नऊ मैलांवर.

करावें तरीच बरें! श्रीमंत राजश्री दादासाहेब गंगापुरास जावयास गेले. याचें कारण श्रीमंत मातुश्री बाईसाहेबांस किंचित् समाधान नाहीं. महायात्रेस समाधान झाल्याखेरीज निघों नये म्हणून सांगावयास गेले आहेत."

नं० १२०६ (भाद्र० वद्य. सप्तं० दु० पंच०.)

मोरो बल्लाळाचें पांडुरंगरावास पत्र पुण्याहून.

"आम्हांस आज दीड महिना समाधान नव्हतें याजकरितां श्रीमंताकडे न गेलों. त्यास काल जाऊन दर्शन घेतलें. शरीरप्रकृत त्याप्रकारेंच आहे. औषध उपाय यथाप्रकारें होतच आहेत, परंतु गुण नाहीं. दोन दिवस प्रकृत बरी तर चार दिवस विकृत असते. ईश्वर काय करील कळत नाहीं. मर्जी पाहून त्यांची प्रकृत नीट असते तेव्हां जातों. कांहीं बोलतात. प्रकृत बरी असलिया मग बोलास पेंचच नाहीं. रोग विशेष दिसत नाहीं, परंतु चढउतार हेंच फार आहे. अनुष्ठानें उपाय बहुत होतात."

नं० १२०७ (९ आक्टोबर.)

बाबूराव राम यांचें पांडुरंगरावास पत्र आश्विन शु० १३ चें पुण्याहून.

"श्रीमंत राजश्री दादासाहेबांकडील शागीर्द कांहीं लबाडीस प्रवर्तले त्याजमुळें पांच सात असामी धरून किल्ल्यावर घातले. श्रीमंत तुळापुरावर आहेत.. आज कूच करून पुढें गेले आहेत म्हणोन वर्तमान

---

१. दादासाहेबांस सहा सात महिन्यापूर्वी कैदेतून सोडून सात लक्षांची जहागीर त्रिंबकचा किल्ला देऊन पेशव्यांनीं समजूत केली असतांही पेशवे दुखणेकरी आहेत असें पाहून दादानीं पुनः बंड करण्याचा उपक्रम हा केला व ह्मणून पुण्याहून तुळापुरास गेले.

आहे. राजश्री कृष्णराव काळेही त्यांजकडे गेले होते. काय निश्चय झाला न कळे. थोरल्या श्रीमंतांची मर्जी दुखण्यामुळें दिवसेंदिवस कठीण आहे. रोग कांहीं उणा होत नाहीं. अलीकडे पेशजीपेक्षां शरीर बहुत क्षीण झालें आहे. आयुष्यमर्यादा आहे तों आहे. पुढें चिन्ह नीट दिसत नाहीं!"

नं० १२०८ (१० आक्टोबर.)

केसो सदाशिव व जिवाजी रामचंद्र यांचें पांडुरंगरावास पत्र अश्विन शु० १४ मंदवारचें पुण्याहून.

"श्रीमंत राजश्री दादासाहेब याणी विजयादशमीस निघोन जावयाची तजवीज केली होती परंतु साधली नाहीं! भोंसलेसही कागद लिहून पाठविले होते, ते कागदसुद्धां शागीर्द मंडळी असामी ७ सांपडले. त्यांस धरून बेड्या घालून किल्ल्यावर पाठविले. श्रीमंत राजश्री दादासाहेब यांस फिरून पूर्ववत् प्रमाणें झाले."

नं० १२०९ (१० आक्टोबर.)

आप्पाजी त्रिंबक पोंक्षे यांचें पांडुरंगरावास पत्र अश्विन शु० १४ चें पुण्याहून.

"श्रीमंत दादासाहेबांच्या शागीर्दांपैकीं ७ असामीस पकडलें त्यांस निरानिराळे किल्ल्यावर बेड्या घालून पाठवून दिले. दादासाहेब तुळापुरास आहेत त्यांचा अभिप्राय कळत नाहीं. त्यांजकडे कृष्णराव बल्लाळ पाठविले आहेत. हें प्रकटांत नाहीं, गुप्त बोलतात पत्र पाहून विसर्जन करावें."

१. कैद झाली असें पत्र लिहिणाऱ्याचें ह्मणणें.

नं० १२१० श्रीगणराज. ( १० अक्टोबर. )

चिरंजीव राजश्री तात्या यांसी प्रती मोरो बल्लाळ आशीर्वाद उपरी येथील कुशल तागायत आश्विन शु० १४ मंदवार जाणून स्वकीय कुशल लिहीत जावें. विशेष. तुह्मीं भाद्रपद वद्य नवमीचें पत्र चिरंजीव राजश्री बाबा मुहूर्तानें डेरे दाखल झालियानंतर पाठविलें तें व अलीकडे शु० ३ चें पत्र पाठविलें तें प्रविष्ट होऊन लेखनार्थ कळला. "मंडळी कधीं येऊन पावली, श्रीमंतांची भेट जाहल्याचें वगैरे सविस्तर लिहावें" ह्मणून लिहिलें, ऐशास चिरंजीव राजश्री बाबा पुमेसावळीच्या मुक्कामास आलियानंतर आह्मांस पत्र आलें कीं "प्रतिपदेस थेऊरास येतों. ते दिवशींच श्रीमंतांचे भेटीस मुहूर्त आहे. तुह्मीं थेऊरास यावें" ह्मणून. त्यावरून आह्मीं थेऊरास प्रतिपदेस लिहिलेप्रमाणें गेलों. तों चिरंजीव आले नव्हते. मार्गीं पर्जन्यानें अडविलें याजकरितां येणें न झालें. आह्मीं संध्याकाळपावेतों मार्ग पाहून माघारे आलों. इतक्यांत चिरंजीवाचें पत्रही सापचे मुक्कामाहून आलें कीं, "पाऊसामुळें प्रतिपदेस येणें घडत नाहीं. चतुर्थी बुधवारीं येतों. तुह्मीं येथें यावें." त्यावरून चतुर्थीस निघोन गेलों. चिरंजीवही आले होते. सर्वांची भेटी झाली. तेच दिवशीं श्रीमंतांची भेट व्हावी असें होतें, परंतु मर्जी ठीक नव्हती याजकरितां ते दिवशीं भेट न झाली. दुसरे दिवशीं श्रीमंतांनींच स्मरण करून बोलावूं पाठविलें. त्यावरून स्वामी मंडळी घेऊन गेलों. दर्शन झालें. एक घटका आंत सारे होतों. चिरंजीव बाबा व भाऊस श्रीमंतांनीं पुसिलें कीं, 'तुमची शरीरप्रकृत कशी आहे? औषध व्रत असतां किंवा नाहीं?' वरकडांसही 'हे कोण, हे कोण' ह्मणून विचारिलें. अमके अमके असें सांगितल्यावर ओळखिलें. उपरांतिक सर्वांस विडे दिले. मग निघोन डेऱ्यास आलों. थाकटे श्रीमंत पुण्यांत होते त्यांचे भेटीस मुहूर्त नवमी रविवारीं होता, अगोदर गांवांत जाऊन कशास रहावें, ह्मणून दोन मुक्काम थेऊरासच केले. तिसरे दिवशीं

नवमी रविवारीं निघोन ते दिवशीं मृत्युयोग वीस घटका होता तो टाकून पुण्यास आलों. परभारें तसेच वाड्यांत जाऊन धाकटे रायांची भेट घेतली. तसेच श्रीमंत सौभाग्यवती पार्वतीबाई व रमाबाई या उभयतांचें दर्शन घेऊन घरास आलों. कारभारी यांचीही भेट वाड्यांतच झाली. राजश्री मोरोबादादा व नाना फडणीस यांचीही भेट झाली. याउपर होईल तो मजकूर मागाहून लिहून पाठवितों. हिशेब तयार झाले कीं नाहींत ह्मणून लिहिलें, त्यास तयारच आहेत. याउपर फडशा होईल. चिरंजीव राजश्री कोन्हेरराव आज येथें येऊन पावले. कळावें. बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद.

नं० १२११. **श्रीगणराज.** ( आश्विन वद्य.
आक्टोबर. दु॰ पंधर०.

अपत्यें+ वामनानें साष्टांग नमस्कार विनंती. आह्मीं परवां संध्याकाळीं येथें आलों. श्रीमंतांच्या नमस्कारास गेलों होतों. दोन घटका राहून आलों. श्रीमंतांनीं राजश्री नारो अप्पाजी यांस सांगितलें कीं, तुह्मीं व बचाजीपंत मिळून त्यांसीं बोलावें. तेव्हां राजश्री सखारामपंतानीं सांगितलें कीं, आज, उद्यां, परवां, तीन दिवस वाईट आहेत. न बोलावें. तेव्हां मजकूर दोन दिवस राहिला. राजश्री सखारामपंत शिवाजीपंताजवळ व रामाजीपंताजवळ ह्मणत होते कीं " रिकाम्या गोष्टी बोलता. ऐकाव्यात!" तेव्हां ( आणखी ) बोलिले जे, " वाटेनें सर्वांनीं चालावें. श्रीमंतांस कर्ज झालें आहे हें. फिटलें पाहिजे. सरळपणें जाबसाल करावें. एक सालचा ऐवज सरकारांत घ्यावा. तोट्याचा जाबसाल ह्मणों नये. बेहड्यावर कलमें लिहिलीं आहेत त्याचा वाजवी फडशा करावा. श्रीमंतांस रुष्ट करूं नये. आपणही रुष्ट न होतां गोडीनेंच कारभार करावा. " याणींही उत्तर प्रतिउत्तर करावयाचें

---

१. पत्र मोरो बल्लाळ यांस थेऊराहून पुण्यास.

तें केलें. राजश्री नारो आपाजीही जवळच होते. त्यांणींही युक्तायुक्त जाबसाल त्यांस वाईट न वाटावें असे केले. बाहेर आल्यावर ( नारो आपाजीनीं ) उभयतांजवळ सांगितलें कीं, आह्मीं आतांच लटकें खरें कशास ह्मणावें ? वाईट वाटेल. फड पडेल तेव्हां समजोन जाबसाल करूं. तोट्याचे वगैरे जाबसाल सर्व समजूनच होतील. आह्मांकडून दुसरा विचार नाहीं. " असें ह्मणत होते. याप्रमाणें वर्तमान आहे. आपणास कळावें ह्मणून लिहिलें आहे. श्रीमंत परवा पुण्यास येणार आहेत असें आहे. न आले तर आपणास यावें लागेल. राजश्री नारो आपाजी यांचें पत्र रामचंद्रनाईकास पाठविलें आहे. अबदुल लतीफखान याच्या गांवाविशीचे कागदपत्र घ्यावे. अतःपर गुंता राहिला नाहीं. उपरांत श्रीमंत धाकटे तेथें येणार. तेव्हां मावारे बलाविताल किंवा काय, कळत नाहीं. जातात किंवा काय तें आजी सायंकाळपर्यंत कळेल. बहुत काय लिहिणें हे विज्ञापना.

नं० १२१२ ( १९ आक्टोबर. )

श्रीपतराव मोरेश्वर यांचें पांडुरंगरावास पत्र
आश्विन वद्य ९ चें पुण्याहून.

" श्रीमंत राजश्री दादासाहेब पहिल्याप्रमाणें करून येथें पाठवून दिले. आजच येथें आले. निघूनही जात होते, परंतु थोरले श्रीमंतांस बातमी कळतांच कृष्णराव काळे यांस पाठवून दादासाहेबांस आणविलें. दादासाहेबानी दोन हजार पावेतों राऊतही जागां जागां ठेविले होते व गाडदीही ठेविले होते. परंतु थोरल्या श्रीमंतांचें प्रारब्ध थोर आहे ! "

नं० १२१३ ( २० आक्टोबर. )

अंताजीराम यांचें पांडुरंगरावास पत्र पुण्याहून आश्विन वद्य ९ चें.

" श्रीमंत थेऊरासच आहेत. शरीरभावना आहे तशीच आहे.

वरकड कांहीं नाहीं. काहिली मात्र होत्ये. सन्निध हरीपंत फडके व ईच्छारामपंत मात्र असतात. दादासाहेब थेऊरींच आहेत."

नं० १२१४ (आश्विन वद्य १०.
२१ आक्टोबर.)

आपाजी त्रिंबक पोंक्षे यांचें पांडुरंगरावास पत्र
२३ रज्जबचें पुण्याहून.

"सांबाच्या[1] गणांनीं[2] लबाडी केली ती उमगली ह्मणून जिकडील तिकडे ठेऊन[3] बंदोबस्त गणांचा केला. सांब मनांत समजूनच गणपति[4] पुत्र ह्मणून सन्निधच येऊन राहिला. लौकिक वाईट होईल ह्मणून मनोमन समजून ती गोष्ट रुजीसच आणिली नाहीं. कृष्णाजी हरी साठे निवर्तले त्यांस बायका दोघी. श्रीमंतांची सासू धाकटी ती गरोदर. थोरली बायको समागमें (सती) जाईन ह्मणून ह्मणत होती. परंतु इष्ट-संबंधी यांणीं समजाऊन घेतली ह्मणोन राहिली. कपाळीं नसतां कोठून जाईल!"

नं १२१५ (कार्तिक वद्य ४.
१४ नोवेंबर.)

मोरो बल्लाळाकडून पांडुरंगरावास पत्र थेऊराहून. (पै॥ २० साबान).

"श्रीमंतांनीं द्वादशीस प्रायश्चित्त घेतल्यापासून आज पांच दिवस प्रकृत ठीक आहे."

---

१. उपनाम केरे. हा पुढें नारायणराव साहेबांचा खून झाला त्या गर्दीत मारला गेला. २. दादासाहेबांच्या. ३. शागिर्दांनीं. ४. किल्ल्यांवर कैदेंत पाठवून. ५. गणपति कोण? सखारामबापू!

नं० १२१६ श्रीगणराज. ( २७ अक्टोबर. )

पै॥ छ० ४ साबान मंदवार षष्ठी. सुरुसन सल्लास सबैन मया व अलफ.

चिरंजीव राजश्री तात्या यांसी प्रती मोरो बल्लाळ आशीर्वाद उपरी येथील कुशल तागायत कार्तिक शु० १ भौमवासर जाणून स्वकीय लिहीत जावें. विशेष तुम्ही जामुदाबरोबर आश्विन वद्य दशमीचें पत्र पाठविलें तें पौचोन लिहिला मजकूर सविस्तर कळला. फडशाचा प्रकार कसकसा झाला, वर्षश्राद्धास येणें होईल कीं नाहीं, ह्मणोन लिहिलें; ऐशास आज दोन तीन दिवस राजश्री नारो अपाजी व गुरुजी बोलावयास येत असतात. कलमांची याद दप्तरांतून निवडून काढिली होती ती घेऊन आले. कलमांप्रमाणें सवालजाब पुसून दिला तेव्हां थंड झाले! आम्ही एकच उत्तर साफ सांगितलें कीं, "सालमजकुरीं पर्जन्य नाहीं हें ठाऊक आहे. जो वाजवी चौकशीमुळें आकार होईल त्यांत पागा व जातीचा खर्च व महालखर्च व शिबंदी व सरदारी खर्च व खेरीज कांहीं फौजेचा खर्च असा वजा जातां बाकी जी खेरीज राहील त्यापैकीं कर्ज आगचें वजा होऊन जितकी जमा राहील ती द्यावी यास आम्ही मान्य आहों" ह्मणून सांगितलें. त्यांसही नाशिकाचा मजकूर समजला आहे. आतां ह्मणतात कीं, "भर वसूल आहे त्यापैकीं मोघम अमकी बेरीज असें बोलावें आणि फडशा करावा. बारकड तुमचें तुम्ही घ्यावें. नाशिकाची चौकशी आतां आम्ही पहात नाहीं! पेस्तर समजल्यानंतर पुढील सालांत जें वजा देणें तें देऊं. सा॥ राहिल्या ऐवजांपैकी अन्वयें फौज पेस्तर ठेवावी." असें बोलतात! आम्ही कांहीं मान्य केलें नाहीं. पहिल्यापासून खणखणीत सांगितलें आहे. याउपर आणखी कांहीं मजकूर होईल तो मागाहून लिहून पाठवूं. चिरंजीव राजश्री बाबा व भाऊ व सर्वत्र परवां थेऊरास सहज गेले आहेत. आम्ही कां जात नाहीं ह्मणाल तर पहारें झालें आहे, वाऱ्यांत गेल्यास विशेष बाधा होईल, हें एक.

दुसरें आह्मी सर्व एके ठिकाणीं मिळालों ह्मणजे सवालजाबाचें नेट लागतें तेव्हां उपाय नाहीं. यास्तव ते एकीकडे, आह्मीं एकीकडे, राहिलों ह्मणजे आह्मांकडे पुसावयास येतात तेव्हां आह्मीं सांगतों कीं, "बाबा धणी. त्यांस पुसोन काय तें सांगतों." तेव्हां त्याकडे जातात. ते आह्मांवर चालवितात. असें करून दिवसगतीचा प्रकार होतां होईल तें खरें. श्रीमंतांचे शरीरप्रकृतीचें वर्तमान तर आज चहूं दिवसांतालीं मोठा बाधा झाला होता. बाकी कांहीं नव्हतीं. मागती किंचित् कांहीं समाधान आहे, परंतु ठीक नाहीं. ईश्वर काय करितो न कळे! श्रीनें कृपा करावी तरच बरें आहे! धाकटे श्रीमंत व कारभारी व मुत्सद्दी आदीकरून थेऊरासच आहेत. दसरा करून चिरंजीव तेथें गेले होते तेव्हां डेरे ठेऊनच आले होते. आतां सर्वत्र गेले याजकरितां हेही गेले होते. वर्षश्राद्धास तर थोडके दिवस राहिले. चिरंजीवाचें येणें होईल असें येथील डौल पाहतां दिसत नाहीं. वडिलांचें पुण्य समर्थ आहे त्या योगेंकरून जाहल्यास न कळे! चिरंजीव सौभाग्यवती यमुनाबाई व सखूबाईस बोलावणें पाठविलें होतें ते उभयतां दिपवाळीस येथें आलीं. मिरजेस लावून द्यावयाचें सुमार पाहून रवानगी करूं. चिरंजीव सौभाग्यवती सखूबाईस वाताचा उपद्रव झाला आहे. त्यास निवडुंगाचें तेल वेद० राजश्री शास्त्रीबुवाकरितां तुह्मीं काढविलें होतें त्यापैकीं कांहीं पाठवून द्यावें. नसलिया आणखी काढवावें. येथें हिशेबाचें काम चालतें सबब आह्मीं थेऊरास न गेलों. कळावें. सविस्तर तुमचीं उत्तरें मागाहून पाठवून देऊं. पर्जन्य गेला. मोठा कडाड झाला आहे! श्री कृपा करील ती खरी! बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद.

नं० १२१७ (कार्तिक शुद्ध.
नोवेंबर. प० पं४०.)

वामनरावाचें पत्र थेऊराहून पुण्यास मोरो बल्लाळ यांजकडे.

" आपणाकडे पत्र रवाना केल्यानंतर पांच घटकांनी फार काहिली झाली होती. फारच घाबरे झाले होते. पुनः दोन घटकानंतर सावध झाले. राजश्री त्रिंबकरावमामा यांस पुणियाचे बंदोबस्ताकरितां पाठवून दिले."

नं० १२१८ (आश्विन वद्य १२.
२१ आक्टोबर.)

मोरो बल्लाळ व वामनराव व परशुरामभाऊ यांचें
पांडुरंगरावास पत्र थेऊराहून २९ रज्जबचें.

" श्रीमंत आज पांच सात दिवस गंगा विष्णूचें औषध घेत होते. पथ्य कठीण याजकरितां औषध घ्यावयाचें टाकिलें."

नं० १२१९ (आश्विन वद्य.
आक्टो० दु० पंध०.)

मोरो बल्लाळाचें पांडुरंगरावास पत्र पुण्याहून.

" श्रीमंत मातुश्री बाईसाहेब महायात्रेस जाणार होती त्यास श्रीमंतांची अवस्था फारच कठीण ऐकून राहिली."

नं० १२२० (कार्तिक शुद्ध.
नोवें०. प० पंधर०.)

मोरो बल्लाळाचें पांडुरंगरावास पत्र थेऊराहून.
(गोविंद हरीच्या वर्षश्राद्धाच्या तिसऱ्या दिवशी लिहिलेलें.)

" श्रीमंतांची प्रकृति परवाचे दिवशीं रात्रीस फारच बिघडली होती. बाकी कांहीं नव्हती. स्वल्प स्वस्थ होतांच व ज्यांत होते ते श्रीगणपतीच्या देवळाच्या आवारांत ओवऱ्या आहेत तेथें येऊन राहिले आहेत. कालही फारच वाख्या झाला होता. कोणे वेळेस काय

होईल हा भरंवसा आतां पुरत नाहीं. सर्व मंडळी झाडून थेऊरास आली आहे."

नं० १२२१ श्रीगणपति. ( कार्तिक शुद्ध ११. ६ नोव्हेंबर. )

अपत्यें साष्टांग नमस्कार विनंती येथील वर्तमान तरी भृगुवार मध्यरात्र पावेतों यथास्थित असो. विशेष. श्रीमंतांची मर्जी काल प्रातःकाळीं बिघडली होती तेसमयीं श्रीमंत राजश्री दादासाहेबांस व सखारामपंतांस ह्मणत होते कीं, "आपल्या हातून कांहीं वेदना सोसवत नाहीं. आपणास खंजीर देणें. पोट कटारी करून घेतों." बहुत येविशीं आग्रह केला. श्रीमंत दादासाहेबीं करार केला आणि शपथ ( व ) देवाच्या तुळसीही दिल्या होत्या. "रविवारीं कांहीं गुण नये तरी मग आपणास खंजीर देईन!" त्यास कालपासून कांहीं फारसा ज्वरही नव्हता व तळखीही नव्हती. आज तिसरे प्रहरीं कांहीं थोडासा ज्वर आला व थोडीशी काहिली झाली. त्यासमयीं श्रीमंत राजश्री दादासाहेबांस व सखारामपंत यांस बलावून ( श्रीमंत ) ह्मणों लागले कीं, "आपली स्थिति कांहीं बरी नाहीं. आपणास खंजीर कालच्या करारप्रमाणें देणें. प्राणत्याग करणार." यांनीं "विचार करून सांगतों" ह्मणतांच बहुतच रागें भरले. अर्जुनवाद्यें केलीं. इच्छारामपंत कांहीं बोलिले यास्तव त्यांसही शिवीगाळी दिल्या. शेवटीं उभयतांस आण घातली कीं, "तुह्मीं जेवाल, संध्या कराल, तरी तुह्मांस गाई ब्राह्मणांची शपथ आहे!" यांनीं शेवटीं निदान सांगून पाठविलें कीं, "आमचा आपला करार होता रविवारचा. आपण तें एकीकडे ठेवून आज आह्मांजवळ काय ह्मणून खंजीर मागितला? तेव्हां तुमची आमची शपथ होती ती गेली. याउपरी आजही आह्मीं खंजीर

१. पत्र परशुरामभाऊचें थेऊराहून पुण्यास मोरो बल्लाळ यास.

देत नाहीं आणि याउपरी पुढेंही देणार नाहीं." त्यामुळें बहुतच आक्रोश केला. ज्वर फारसा नव्हता व काहिलीही नव्हती. परंतु संतापेंकरूनच घाबरे झाले. आपण पथ्य घेतलें नव्हतें. मग नऊ घटका रात्रीस आपण पथ्य घेतलें. हे[1] देवालयांत सर्व फरसावर बसले होते. श्रीमंत राजश्री नारायणरावसाहेबही जेवले नव्हते. उपाशीच आहेत ह्मणोन कळलेवर त्यांजकडे (श्रीमंतांनीं) सांगून पाठविलें कीं, तुह्मांकडे काय गुंता आहे? तुह्मीं जेवणें. तेही बातमीतच होते. मग तेही जेवले. श्रीमंत राजश्री पंतप्रधान भोजन केले असें वर्तमान येतांच सखारामपंत व श्रीमंत राजश्री दादासाहेब यांणीं सांगून पाठविलें कीं, "आपण भोजन करून निजलां. आतां आह्मीं जातों." मागती नि[illegible]पाची वाट [illegible]तां देवळांतून बाहेर आले. प्रकृत परत्वांपरीस कांहीं विशेष [illegible]डच नव्हती. परंतु कांहीं वायूचा संचार झालासा [illegible]तो. याउपरी कांहीं भरंवसा दिसत नाहीं. पथ्य तो कांहींमात्र [illegible]. औषधही नाहीं. असें आहे. आह्मीं बाहेरेच होतों. मग श्रीमंत [illegible]श्री दादास[illegible]नीं (आह्मांस) बोलाऊं पाठविलें. त्याचें कारण चिरंजीव राजश्री बळवंतराव लिमये गेले त्यांणीं सांगितलें कीं ते बाहेर बसले आहेत. मग बोलाऊं पाठविलें. मग आह्मीं उभयतां गेलों. श्रीमंत राजश्री दादासाहेबांची भेट झाली. तेथेंच बारा घटका रात्रपावेतों होतों. उपरांतिक सारे राजश्री बाबूजी नाईक व आनंदरावदादा व कृष्ण[illegible] बल्लाळ वगैरे होते ते आले. आह्मीं आलों. आपणास कळावें. परवा गडबड झाली होती तशी फिरोन पुण्यास गडबड होईल यास्तव आपणास कळावें यास्तव सूचना लिहिली आहे. आपल्यास ज्वर येतो किंवा राहिला हें लिहावें. येथें कांहीं आतां भरंवसा नाहीं. सर्व भार

1. दादासाहेब, सखारामबापू वगैरे. 2. देवळाबाहेर. 3. मी व वामनरावबाबा. 4. बारामतीकर. 5. रात्रें. 6. काळें.

श्रीवर आहे. आज आणखी श्रीगणपतीस जलाची संततधार धरिली आहे. व ज्वरशांति व आणखी कित्येक अनुष्ठानास ब्राह्मण घातले आहेत. परंतु श्री काय करितो न कळे! श्रीमंत मातुश्री बाई महायालेस जाणार होतीं तीही इकडील अवस्था ठीक नाहीं असें जाणून राहिली त्यांचें पत्रच आलें (कीं) यंदा आपण तुमच्या सर्वांचे विचारें न ये तरी राहिलों. राजश्री आनंदरावदादास काल बहुत प्रकारें श्रीमंत राजश्री नारायणरावसाहेबांनीं सांगितलें होतें कीं, "मातुश्री जात आहेत. तुह्मीं तिघांतून कोणीतरी एका जणानें जावें. त्याजवरून त्याणींही कबूल केलें होतें. परंतु मातुश्रीचें पत्रच आलें. सविस्तर वडिलांस कळावें. बहुत काय लिहिणें हे विनंती. (श्रीमंतांच्या अंगीं) वायूचा संचार दिसतो, परंतु कांहीं वितर बोलणें अथवा असमंजस करणें असें नाहीं. आठवण चांगली धरून बोलतात. परंतु बहुतच आक्रोश करितात त्याजवरून माल वाटलें यास्तव लिहिलें आहे. हे विनंती.

नं० १२२२ **श्री.** (कार्तिक शु० पौर्णिमा. १० नोवेंबर.)

सेवेशीं गंगाधर बापूजी. कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती. पेशजी पत्र पाठविलें तें पावलेंच असेल. छ० ५ रोजिचें वर्तमान तर प्रकृत बरीच होती. ज्वर आला होता परंतु काहिली झाली नव्हती. परंतु सौभाग्यवती बाईस येण्याविशीं फार बोध केला. रुबरूच तिणें इतका जाब दिला, "ईश्वरसत्ता प्रमाण!" हजामत केली. कोणाचें एकत

१. पेशव्यांची आई गोपिकाबाई. २. कारण कीं आनंदराव रास्ते हे आपल्या आईचे सख्खे बंधु. ३. तिघा भावांतून. ४. हे पटवर्धनांचे फडणीस. उपनांव ओक. ५. छ ५ साबानचें. त्या दिवशीं तिथि कार्तिक शुद्ध षष्ठी होती. ६. गर्ती येण्याविषयीं.

नाहींत. मनस्वी खाणें. तसेंच बोलणें. 'समीप कारभाराचें बोलणें बोलूं नये. सर्व सोडिलें.' असेंच बोलतात. एकशेंऐंशी गाईदानास आजच प्रारंभ केला. दुसऱ्यानें भरवावें तेव्हां जेवण. देवळांतच आहेत. आजच श्रीमंत दादासाहेबांनीं ओले हरभरे पाठविले होते. नेहमीं श्रीमंतांजवळ दादासाहेब असतात. वासुदेवबावा[१] व भगवंतराव प्रतिनिधी यांत फारच वाकडें आलें आहे. रास्ते यांणीं भरसाल सरंजामाचें कबूल केलें. शिबंदी महालचे व सरदारी (यांसंबंधें सरकारावर) खर्च पडूं नये असें कबूल केलें. अंतर्यामीं असें बोलतात. जे दिवशीं (श्रीमंत) देवळांत आले ते दिवशीं दहा हजारांचा तुरा देवास दिला. कोणी (मांत्रिक) प्रयोग, कोणी दुखणें, (भूत) बाधा, (असें ह्मणतात.) निश्चय नाहीं. कोणी ह्मणतात, "राजश्री दादासाहेबांचे गुरु नर्मदेस आहेत गौड त्यांचा (हा) प्रयोग! परंतु खरें एकही नाहीं. असें आहे. छ० ६ रोजचें वर्तमान तर ज्वर बराच आला होता. देवास उचलून नेलें होतें. तशांत लक्ष्मण कोन्हेर व आणखी एक दोन असाम्या चोरून चोरून ब्राह्मणांत (श्रीमंतांस) पहावें या अर्थे बसल्या होत्या. त्यांणींच पाहिल्या. मग पारिपत्य धक्काबुक्की करून बाहेर घातलें. बहुत रागें भरले. पर्जन्यही दोन प्रहरापासून दोन घटका रात्रपर्यंत बराच लागला. राजश्री भास्करराव नरगुंदकर यांचें बोलणें पडलें आहे जे 'किल्लेदार सरकाराचा ठेवावा.' नाहीं तर पैका मागतात हें बोलणेचा प्रसंग आहे. आमचें तो आठ चार दिवस बोलणें मागें टाकिलें आहे. कळावें. छ ७ रोजचें वर्तमान तर दिवसभर प्रकृत बरीच होती. कांहींसा पर्जन्यही पडला. ज्वर[२] एक प्रकारची. प्रहररात्रपर्यंत स्वस्थ पूर्ववत्प्रमाणेंच होते. मागती ज्वर बराच आला. घालमेल थोडीशी झाली. मग पथ्य घेतलें. सावध झाले. कणेरा करून तोंडांत घालावा असें आहे. दहा

१. वासुदेव अनंत. हे प्रतिनिधीचे मुतालिक. २. बमन्धारिक.

लक्षांचा नवस श्रीव्यंकटेशास करून पंधरा वीस दिवस झाले. " देवानें घोड्यावर बसेतं करावें, नवस फेडावा, मग कारभार करावा." परंतु दिवसेंदिवस अधिक होतें. उणें होत नाहीं. काहिली होऊन हांका बोंबा होत होत्या तें मात्र राहिलें. त्यास कारण शक्ति नाहीं. आणि खंजीर कटार कोणी देत नाहींत. राजश्री दादासाहेब हे दोन दिवस इकडे येत नाहींत. श्रीमंत राजश्री बाबा व भाऊ आज गेले होते दरबारास. श्रीमंतांस तर बरें वाटत नाहीं. कारभारी नवे, धणी नवे, प्रसंग एक प्रकार घातला आहे! निकडीची तर गोष्ट बोलतां न ये, निरोप मागतां न ये, असें श्रीनें संकटांत घातलें! इच्छारामपंतीं कबूल केलें होतें कीं, " खंजीर आपण देईन." त्याच्यानें देववतो काय? तेव्हां श्रीमंतांनीं मागितला तेव्हां तो उगाच राहतांच मुसक्या बांधून मारविलें खरें, परंतु बाहेर लटकाच मार दिला ह्मणोन तो गृहस्थ बोंबलला! मग त्यांणींच घरांत बलाविलें. शहाण्यानें बोंबलावयानें नव्हतें! हें वर्तमान. सर्वांनीं मूर्ख ह्मणून मात्र ठरविलें. काय आहे देव जाणे! छ० ८ रोजचें वर्तमान तर श्रीमंतांची प्रकृत बरीच आहे. रात्रौ ज्वर किंचितच होता. परंतु क्षीणता फार झाली. शब्द राहिला. आज पर्जन्य दिवसास दोन प्रहर, रात्रौ दोन प्रहर, फारच पडला. त्यामुळें इतकेच बातमी लागली. चौकी दाट बसली आहे. बातमी कोणासही फुटों देत नाहींत. देवळांत कोणी बसूं नये, दर्शन मात्र घेऊन बाहेर यावें, असा ( हुकूम आहे.) या दुखण्यामुळें पांच सात हजार फौजेचे हाल थेऊरीं होत आहेत! प्रजेस तर फार पीडा बेगारीची पडते. जिगजिग माणूस मात्र झालें आहे. कफ झाला आहे. सूज सर्वांगास आली आहे. दुसऱ्यानें भरवावें. धाकटे राव व हेरीपंत भरवितात. ऐसें आहे. नित्य क्षीरभोजन शत ब्राह्मणांस होत आहे.

---

१. फडके.

छ० ९ रोजचें वर्तमान तर रात्रौ पर्जन्य विशिष्ट पडला. आज प्रकृत बरीच होती. तिडीक मात्र थोडीशी पोटांत आहे. ज्वर थोडाच होता जाणोन यजमानानी श्राद्धास जावें पुण्यास म्हणून धाकटे रायाचे निरोप घेतले सर्वांनीं आणि ( पुण्यास जाऊन परत ) सायंकाळीं आले. आज रात्रौ प्रकृत बरीच होती. येणेंप्रमाणें वर्तमान. छ० १० रोजचें वर्तमान तर तीन प्रहर दिवसपर्यंत नित्याप्रमाणें प्रकृत होती म्हणून राजश्री भाऊ वगैरे मंडळी राहिली. आम्ही यजमानसुद्धां पुण्यास आलों. बरकड मंडळी दुसरे दिवशीं येऊं म्हणून राहिले. त्यास सायंकाळचे प्रहर दिवसास श्रीमंत फार गडबडले. भुईवर उतरले. परंतु आंतच गडबड, बाहेर कळलें नाहीं कोणासही. तेव्हां रात्रौ भूमिशयनच होते. आमचे मंडळीचें व रास्ते वगैरेचें व खेळगडी व कांहीं ममतेचे मंडळीचें स्मरण केलें. "येतील त्यांस येऊं देत जाणें, मना न करणें, देवालयांत कोणासही मना न करणें," येणेंप्रमाणें आज्ञा झाली. राजश्री नाना फडणीस समीप होते. ( श्रीमंतांनीं ) धाकट्यांस निदानीची निरवणूक करणें ती केली. त्यांतीच बारीक मोठें काय कळे! आणि दोन घटका रात्र पहाटेनी उरली, आपण वांचत नाहीं, हा निश्चय जाणून सर्वप्रायश्चित्त द्या म्हणून निकड केली. याप्रमाणें आजचें वर्तमान. छ० ११ रोजचें वर्तमान, प्रायश्चित्त प्रातःकाळीं प्रारंभ केला. क्षौरांत केलें यथा विधिपूर्वक. पन्नास हजार रुपये कंचीकामाक्षीस आणखी धर्मास बहुत उदकें घातलीं. आणि भूमी सारवून सोवळा बिछाना घालून शूद्रस्पर्श नसावा या न्यायें राहिले. एकशेंएकशी गाई दिल्या. क्षेत्रीं क्षेत्रीं पाठवाव्या ( असें सांगितलें. ) प्रातःकाळीं फडणिसानी रात्रौ स्मरणाचें स्मरण धरून चिठ्ठी यजमानांचे नांवें पाठविली तों आम्ही तेथें नाहीं. मग भाऊंकडे

---

१. वामनराव, परशुरामभाऊ व कोन्हेरराव यांणीं. २. वामनरावाचे. ३. परशुरामभाऊकडे.

चिठ्ठी गेली. ते तसेच उठोन गेले. जवळ बसले. नंतर यजमानांचें नांव घेऊन ( श्रीमंतांनीं ) पुसिलें. 'श्राद्धास गेले' ह्मणून ( यांनीं ) सांगितलें. तेव्हां बोलिले जे, 'नेहमीं येथें बरोबर असावें.' तेसमयीं जलद चिठ्ठी पुण्यास आली ती बारा घटका दिवसास आली. तसेच यजमान निघाले. मी बरोबर होतों. राजश्री आबाचें स्मरण ( श्रीमंतांनीं ) केलें ती चिठ्ठी आली. तों तेही मागाहून आले. आह्मीं पुण्याहून गेलों होतों तसेच देवळांत गेलों. यजमान चार घटका बाहेर बसले. इतक्यांत राजश्री आबा आले. मग उभयतां मिळोन आंत गेले. दर्शन झालें. पाव घटका बसले. ( श्रीमंतांनीं ) डोळे उघडोन पाहिलें. माघारे येऊन बाहेर बसले. फार अवस्था कठीण शरीराची! अशी कोणा समर्थाची अथवा गरीबाची नाहीं! फार हाल होत आहेत. दुसऱ्यानें हात पाय उचलावे तेव्हां हालचाल घडते. सर्व गोष्टींचें[1] साहित्य आपण सांगूनच खासगीकडून करविलें इतकी तरतूद आणि सावधता! येणेंप्रमाणें वर्तमान सायंकाळपर्यंत पाहून मग डेऱ्यास आलों. प्रदोषाचीं भोजनें झालीं. रात्रौ तेथेंच राहून प्रहर दिवसास मागती सडे राजश्री नाना फडणीसांचा निरोप घेऊन पुण्यास श्राद्धास[2] आलों. छ० १२ रोजचें वर्तमान तर श्रीमंतांची मर्जी कालप्रमाणेंच होती. परंतु इतकें अधिक भाषण राहिलें. हालचाल फारशी नाहीं. श्रीमंत राजश्री भाऊ वगैरे मंडळी लागलेच जेऊन मागती सारेच माघारे आलों तों बरोबर तेरा घटका रात्र झाली. राजश्री आबा व शिवबा[3] राहिले होते. चिलदुर्गकराचा[4] जाबसाल उरकावा ह्मणून सरकार आज्ञा झाली त्यावरून त्यांसी बोलूं लागले. तो त्याचा चेंगट

१. सर्व प्रायश्चित्ताचें व दानें वगैरेचें. २. हें गोविंद हरांचें वर्षश्राद्ध. यावरून तो कार्तिक शु० १२ श० १६९३ इ. स. १७७१ रोजीं वारला हें स्पष्ट आहे. ३. शिवाजी बाबाजी हौशकर. ४. त्रिंबकरावमामासीं.

कारभार. एरडकिरें गांव घ्यावें हें वचन श्रीमंतांचे मतें चालवावें. मामाचे मतें जाजती पैका देईल त्यास चालवावें. तेव्हां श्रीमंतांचे मर्जीस न आलें. तेव्हां त्याजपासून गुंता उरकून घ्यावा असा करार झाला. कळावें. येणेंप्रमाणें वर्तमान आहे. छ० १२ रोजचें वर्तमान तर कालप्रमाणेंच वर्तमान. परंतु अधिक भावना चलन राहिलें होतें. भाषण परिमितींत आलें आहे. शिपीनें तोंडांत तरवणी करून रात्रौ घातलें. पुण्यांत ब्राह्मणभोजन नित्य पांच हजार घालावें येणेप्रमाणें आज्ञा. पुण्याची रखवाली येणेंप्रमाणें रात्रीस त्रिंबकरावमामास सांगून आजच पाठविलें. काय आहे पातक तो देव जाणे! येणेंप्रमाणें वर्तमान. आजच मजमदार व चिटणीस यांजवर धाकटे श्रीमंतांचा बहुतच राग झाला. त्याचें कारण मजमदार हलपाटे मनुष्यांस फार देतात ह्मणून. चिटणीस (आपणा) जवळ येऊन बसत नाहींत ह्मणोन. फारच दरडाविलें. धाकटे यांची जलदी फार आहे. कसें परिणामास लागेल न कळे! थोरल्यानीं धाकट्यास सांगितलें जे, रास्ते व आमची फौज हीं पथकें ममतेचीं. यांसीं घासाघीस न करणें. कदाचित् बरें वाईट होईल तर पंचवीस हजार फौजेनिशीं बालघांटावर जाणें ह्मणजे दोनी[2] यवन व भोंसले यांजवर दाब बसेल. आपाडमासपावेतों तेथें रहावें. मग दहा हजार फौज छावणीस ठेऊन पुण्यास यावें. याप्रमाणें आज्ञा केली. आणखी कितेक प्रकार मजकूर बोलिले. निरखणुकेस कांहीं गुंता नाहीं. इतका दुखणेकरी, हालचाल मोडली, शब्द नसतां, अजून लोक चळचळां कांपतात! मोटा दाब! ईश्वर कृपेनें मुसळास अंकूर फुटले कदाचित् तर दांत आहे दुखण्यांतील! परंतु हेंच कठिण! कसें घडेल? ब्राह्मणांस उपोषणें बारा झालीं

१. रायदुर्ग व चित्रदुर्ग येथील संस्थानिकांपैकीं जो अधिक पैका देईल त्यास. पटवर्धनांनी. २. निजामअली व हैदर.

निश्चक्र. थोरथोर ब्राह्मण आहेत परंतु स्वप्न नाहीं कोणासही! काय संकटांत आहे कळेना! रास्ते आनंदराव यांची कन्या व आपाजीराव बळवंत यांचा पुत्र येणेंप्रमाणें मार्गशीर्ष शुद्ध नवमीस लग्न नेमिलें आहे. सौभाग्यवती रमाबाई[1] गोमूत्र दूध याजवर पांच सात रोज आहेत. बहुतच कृश झाली आहे. आमचा प्रकार अजून तोच आहे. कागदपत्र सर्व तयार झाले. दुमाल्याचे झाडे झाले. थोडेसें लिहिणें राहिलें त्यास राजश्री आबा येथून गेल्यावर होईल. श्रीमंतांची बातमी पुरती लागली नव्हती. त्यास पहांटेच्या प्रहर रात्रीस बरीच काहिली झाली होती. परंतु बाहेर कोणास कळलें नव्हतें. रणछोड वैद्य आला ह्मणून बातमी आहे व रूपेश्वर वैद्यही आला येणेंप्रमाणें वर्तमान आहे. प्रायःश्चित्त दिल्यापासून जो विचार आहे तोच आहे. पहिले अंगास कोणास हात लाऊं देत होते. हल्लीं देत नाहींत. परंतु त्या जवळील असें बोलतात कीं, कांहींशी आशा दिसते. ईश्वरें त्यांस आरोग्य केलिया राज्यास स्वस्थ! ब्राह्मणांस घरीं बसोन स्नानसंध्या सुखेंकरून राहण्यास येईल. श्री काय करितो पहावें! प्रभु तर तुर्त खबरदार नव्हत. आणि कारभारी तर यमदूत आहेत! मामलेदार यांसी कांहीं बदमामलीचा विचार दिसतो. बोलणें एक, कर्तृत्व एक, असें आहे. लिमये याचे घरीं कांहीं कलह आहेसा दिसतो. बारीकसें कळलें नाहीं. विष्णु महादेव गद्रे यांची व पुतण्याची पंचाईत मांडिली आहे. राजश्री आबाकडेच आहे. अजून आठ पंधरा दिवस लागतील. आह्मांबरोबरील लोकांस निरोप द्यावा असें आहे. मुलें माणसें आणावीं असेंही बोलतात. आमचें मत आणूं न ये. आणलिया मग फारच हेलपाट्याखालीं पडेल. कारभारी 'आमचें बोलणें[3] कोणी बोलत नाहीं' ह्मणोन बाहेर पेंचपाच

---

१. ही पेशव्यांची स्त्री. २. खासगी. ३. बोलणें 'पटवर्धनांनीं आपणास लांच द्यावा, आपण त्यांचे हिशेब समजून घेऊं,' अशा आशयाचें.

बोलत असतात असेंही आहे. राजश्री रामचंद्र नारायण व येसाजीराम या उभयतांस पूर्ववत्प्रमाणें ( धारवाडची ) मामलत सांगावी हेंही घाटीत असतात. बारीक मोठीं वर्तमानें कांहीं बाजारी कळेल तैसीं सेवेशीं रिकामपणीं लिहिलीं आहेत. पुढें होईल तें लिहून पाठवितों. बहुत काय लिहिणें. मिती कार्तिक शुद्ध १९ भौमवासर हे विज्ञापना. वर्तमान नाजूक. येथेंच घरीं पुसावें तर कोण जाणें कसें ह्या देहाजवळून घडेल ह्मणून चोरतात! बरें! या देहाजवळून काय घडेल न कळे! पार पाडणार श्री समर्थ आहे. तुमचा प्रताप! राजश्री बळवंतरावजीस साष्टांग नमस्कार. विनंती. पोथी पुण्यास जाऊन तयार करवितों. रुपये पन्नासपर्यंत पडतील. हे विनंती.

नं० १२२३ श्रीगणराज. ( कार्तिक शुद्ध. नोवें० ५० पंधर०. )

आशीर्वाद उपरी. श्रीमंतांची शरीरप्रकृत चार दिवस बरी तर चार दिवस वाईट. उपाय बहुतच होत आहेत. सांप्रत प्रायःश्चित्त घेणार आहेत. पृथ्वीचें छत्र आहे. ईश्वर कृपा करील तरीच बरें आहे! हल्लीं गंगा विष्णूही आणविल्यावरून आला आहे. औषध घेणार आहेत. आह्मीं आजच थेऊरास जाणार. तेथें गेलियानंतर तुमच्या येण्याचा ठराव करून लिहून पाठवितों. बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद.

नं० १२२४ श्रीगणराज. ( कार्तिक शुद्ध. नोवेंबर. ५० पंध०. )

आशीर्वाद उपरी. श्रीमंतांनीं चार पांच दिवस गंगा विष्णूचें औषध घेतलें परंतु पथ्य होईना याजकरितां टाकिलें. आतां तेरदाळकर रणछोड

१. पत्र वामनरावाचें पांडुरंगराव यांस. २. पत्र पांडुरंगरावास मोरो बल्लाळ याचें.

नाईक व रूपेश्वरबावास आणविले आहेत. वाटेस डांक ठेविली आहे. उभयतांस आणावयास येथून पालख्या व सरकारचीं पत्रें घेऊन राजश्री पांडुरंगपंत गोडबोले आले आहेत त्यांजवळ आह्मीं अंताजीपंत फडणीसास पत्र दिलें आहे कीं, त्यांच्या वोझ्यास तटू मागितल्यास द्यावा. दोन माणसें व किरकोळ साहित्य देऊन त्यांच्या निवण्याचा तट पडों न देतां रवानगी करणें, ह्मणून पत्र दिलें आहे. तुह्मांस कळावें ह्मणून लिहिलें आहे. श्रीमंत राजश्री दादासाहेब थेऊरास आहेत. आज दोन दिवस औषध श्रीमंतांस तेच देतात. कळावें. तुह्मांकडून वरचेवर पत्रें येतात त्यांचीं उत्तरेंही पाठविलीं आहेत. बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद.

नं० १२२९ श्री. (२ नोवेंबर.)

सेवेशीं[1] आपाजी त्रिंबक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत कार्तिक शुद्ध सप्तमी मुक्काम थेऊर येथें वर्तमान यथास्थित असे. विशेष. स्वामींनीं पत्र पाठविलें तें पावलें. स्वामींनीं आज्ञा केली कीं, "तुह्मीं उभयतां बंधू तेथें आहां. तुह्मांस वर्तमान समजलें ह्मणजे लिहीत जावें" ह्मणून आज्ञा. आपण असें लिहिलें तर्‍हां आमचा उपाय काय! आह्मीं येथें आल्या तागायत विनंतीपत्रें पाठवीतच आहों. आपणास न ल्याहावें तर कोणास लिहिणें? असो. आपण कृपावंत होऊन लिहितां तेंच आह्मांस हितकर. आपल्या चाकरांस बुद्धिवाद देत असावा. तें सेवकास उत्तमच आहे. मध्यस्थांजवळ बोलणें झाल्याचा प्रकार पेशजी येथें आल्यानंतर पत्र लिहिलें आहे तें पावलें असेल. त्याजउपर मध्यस्थ येथें येऊन श्रीमंतांस भाव समजवावे तर श्रीमंतांची प्रकृत फार बिघडली होती ह्मणून मजकूर आह्मांकडील कानावर घातला

---

१. पत्र पांडुरंगरावास.

नाहीं. थोरले श्रीमंत औषध देत होते तें समाप्त झालें. उपशम नाहीं. गंगा विष्णु येथें आहे त्याचें औषध ( श्रीमंत ) घेत नाहींत. त्याची व आमचे यजमानांची गांठ पडली होती. 'प्रकृत फारच नाजूक आहे' ह्मणून सांगत होता. काहिली फार होऊं लागली तेव्हां देवळांत नेऊन ठेवणें ह्मणून ( श्रीमंतांनीं ) आग्रह केला. 'जाऊं नका' असें ह्मणावयाची जुरत कोणाची नाहीं! तृतीयेचे दिवशीं उजाडतां हातावर उचलून आणून वोवरींत आणून ठेविले. नंतर प्रहर दिवसास काहिली झाली. त्या आवईत श्रीमंत सौभाग्यवती मातुश्री बाईसाहेबांनीं पातळें आणावयास कोणास न कळत सुतरस्वार पुण्यास पाठविला होता. त्याजवरून पुण्यांत दोन घटका नौबत व दुकानें देखील बंद! अशी गडबड झाली. फिरोन वर्तमानें कळतांच गडबड वारली असें झालें होतें. गडबड कशावरून झाली ही चौकशी होत होती. सुतरस्वार उमगला. 'हात तोडा' ह्मणून स्वामींनीं हुकूम केला होता. मग कोणी रदबदली केली न कळे. हात तोडला नाहीं. आमचे श्रीमंत धाकटे श्रीमंतांकडे नेहमीं जात असतात. आमचे यजमानाशीं घासूं नये ह्मणून मुख्यानीं कारभारी यांस सांगितलें आहे ह्मणून ऐकितों. श्रीमंतांनीं आठा दिवसांखालीं बाळोजी पलांडे व लक्ष्मणपंत आपटे व मोरोपंत भावे व इच्छारामपंत हे नेहमीं सेवेंत असतात ह्मणून कृपाळू होऊन हजार पांचशें रुपयांचे गांव ( प्रत्येकास ) इनाम दिले. राणोजी खिजमतगार यास हजार रुपये बक्षीस दिले. आणखी खिजमतगारांस दोनशें चारशें पाहून पाहून बक्षीस दिले. आपाजीराव पाटणकर व

---

१. जुरत = छाती. २. सती जातेवेळीं नेसण्याचीं. ३. पेशवे जिवंत असल्याचें. ४. मरतां मरतांसुद्धां पेशव्यांचा हा कडक कायदेशीरपणा! सांडणी स्वाराची चूक भयंकर खरी, पण तीं कोणाच्या सांगण्यावरून त्या बिचाऱ्यानें केली इकडे लक्ष पोंचलें नाहीं! ५. वामनराव पटवर्धन. ६. नारायणराव साहेबांकडे.

खंडेराव दरेकर यांस तुमचें कर्ज वारीन ह्मणून वचन दिलें होतें. कालचे काहिलींत सावध झाल्यानंतर आपाजीराव यांस समक्ष बोलाऊन नेऊन सांगितलें कीं, "तुमचें कर्ज वारीन ह्मणून मागें पर्वतीस जातांना सांगितलें होतें. तर तुमचें कर्ज किती आहे?" ह्मणून पुसिलें. यांनीं उत्तर केलें कीं "साहेबांचे (आह्मीं) शिलकी चाकर. अशांत आह्मीं कर्ज वारावयास पैका मागावा हें आह्मांस उचित नाहीं. उतार पडल्यानंतर साहेबीं कृपा करून देतील तेव्हां घेईन. तूर्त आजचे प्रसंगीं घेत नाहीं." असें उत्तर केलें. याजमुळें मोठे मोठे व छोटेदेखील 'ईश्वरा! या धणियाचें कल्याण कर' ह्मणून प्रार्थना करितात! तो गजानन कृपा करील तर काय न होईल! श्रीमंत थोरच. आपाजीराव याणींही थोरपणाचेच जाबसाल केले आणि रुपये न घेतले. खंडेराव दरेकर (यांसही) याप्रमाणेंच मान्य. एकदां फडशा होता ह्मणजे लवकरच निरोप होता. कोण वेळ कशी, कसा प्रसंग पडतो, निरोप कधीं होतो, हें कळत नाहीं. श्रीमंत आबाचे घरीं तृतीयेस श्राद्ध. सर्व मंडळीसह पुणियास भोजनास गेलों होतों. भोजन करून सर्वच माघारे दोन घटका रात्रीस येथें आलों. ते दिवशीं उशीर झाला सबब आह्मांस ज्वर आला. दोन दिवस स्नान केलें नाहीं ह्मणून उपशम झाला. एक दिवस बरें तर दोन दिवस अपकार होतच आहे. मातुश्रीस नच सांगावें. आपणांस कळावें ह्मणून लिहिलें आहे. श्रीमंत श्रीपतराव यांस (श्रीमंतांनीं) घोड्यास (ह?) अबदागीर दिला. राजश्री हरीपंत फडके यांसी आपले देशमुखीचें वतन इनाम करून दिलें. कळावें हे आशीर्वाद.

नं० १२२६ (कार्तिक शुद्ध १२.

८ नोवेंबर.)

बाबूराव राम याचें पांडुरंगरावास पत्र १२ साबानचें पुण्याहून—

" इकडील वर्तमान तर श्रीमंत पंत प्रधान थेऊरींच आहेत. शरीर-भावना फारच कठीण. लिहाविशीं नाहीं. आज चार दिवस श्रीमंतां-जवळ सारे मातबर आहेत त्याणीं चार चार घटका सर्वांनीं बसावें याप्रमाणें श्रीमंतच बोलले. सर्वांनीं चाकरीचाकरी केली आहे, आह्मांस पहावें असें वाटतें. याजकरितां सर्वांनीं यावें. असें ( बोलणें ) झालें कोणास मनाई नाहीं. बाबासाहेब ( वामनराव ) व भाऊसाहेब ( परशुरामभाऊ ) व आबासाहेब ( मोरो बल्लाळ ) सर्वच तेथें आहेत. "

नं० १२२७ ( १२ नोव्हेंबर. )

मोरो बल्लाळाचें पांडुरंगरावास पत्र कार्तिक वद्य २ चें पुण्याहून.

" श्रीमंतांनीं द्वादशीचे दिवशीं सर्व प्रायश्चित्त घेतलें. पन्नास हजार रुपयेच्या मोहरा कंची व कामाक्षी या दोन क्षेत्रांस लाऊन देणें ह्मणून उदक सोडिलें. ऐवज कारकुनासमागमें देऊन क्षेत्रास रवाना करणार. श्रीमंतांनीं धर्माविषयीं अतिशय केला. नित्य पांच हजार ब्राह्मण भोज-नास पुण्यांत घालावे अशी आज्ञा झाली. त्याचा बंदोबस्त त्रिंबकरावमामा यांजकडे सांगितला आहे. "

नं० १२२८ श्री. ( कार्तिक वद्य १०. २० नोव्हेंबर. )

सेवेशीं+ आपाजी त्रिंबक. साष्टांग नमस्कार विज्ञापना. श्रीमंतांची स्मृति आमरणांत होती. दोन घटकानें* पुढें प्राण जातसमयीं सर्व मंडळी व वैदिक मोठे मोठे ब्राह्मण बोलावून आणून नमस्कार केला. " महायात्रेस आह्मीं जातों. आमचे स्वारीची तयारी करा. " असें सांगोन ' गजानन ' ' गजानन ' असें ह्मणतांच नेत्रद्वारें प्राण गेला!

---

+ पत्र पांडुरंगरावास. * प्राण जाण्यापूर्वी दोन घटका.

त्याचप्रमाणें श्रीमंत सौभाग्यवती मातुश्री बाईसाहेबानीं शर्त केली. जवाहीर जें होतें तें आपले हातानें वांटून धर्मशिळेवर उभें राहून श्रीमंत दादासाहेबांस बोलावून आणून धाकटे श्रीमंतांस त्यांच्या हातीं दिलें. "सर्वांचें वडीलपणें यथास्थित चालवावें" ह्मणोन सांगोन ( सती ) गेलीं. ( बाईसाहेबानीं ) मोहरांच्या पिशव्या दोन जवळ ठेऊन घेऊन जो नमस्कार करावयास आला त्यास कनिष्ठास देखील एक मोहोर दिली. श्रीमंतांनीं आपल्या खाशा गाई होत्या त्यांस ते दिवशीं आपले हातें ब्राह्मणांस दान दिल्या. धर्माविशीं श्रीमंतांनीं कांहीं मनाई केली नाहीं. मोक्षधेनूचा संकल्प आपण स्वमुखें करून दानें दिलीं. वैद्यास प्रार्थना अगोदरच असे कीं 'अतिसार मरणसमयीं व्हावा हें उत्तम. कफ होऊं न द्यावा. नाहीं तर स्मरण गजाननाचें व्हावयाचें नाहीं.' असें अगोदर दोन चार दिवस बोलत असत. प्राण जाऊं लागला ते समयीं 'अन्न घालूं नका. दूध अथवा गंगोदक मिळोन घालणें.' अशी ताकीद. त्याचप्रमाणें ते पुण्यवंत ह्मणून अतिसार झाला. कफ झाला नाहीं. स्मृतींत 'गजानन' 'गजानन' ह्मणत मोठ्या योग्याप्रमाणें नेत्रद्वारें प्राण गेला! बाईनीं समागमें यावें अशी पहिलीच आज्ञा. त्याप्रमाणें बाईनीं शर्त केली. ( नारायणरावसाहेब ) हा विधि उरकल्यानंतर सातान्यास जाऊन आल्यानंतर पुढील कर्तव्य काय योजतात पहावें. श्रीमंत बाबास हिऱ्याची अंगठी आंत गणपतीची मुहूर्त असलेली ( बाईसाहेबानीं ) दिली. अंगठी चांगली दिली. भाऊंस पाचेची दिली तीही चांगली आहे. वरकडांस मोहरा दोन चार पांच अशा दिल्या. हे विज्ञापना.

नं० १२२९ **श्रीगणराज.** ( कार्तिक वद्य दशमी. २० नोवेंबर. )

अपत्यें पांडुरंगरावानें साष्टांग नमस्कार विज्ञापना. आज भृगुवारीं

---

१. पत्र कोन्हेररावास कुरुंदवाडास मिरजेहून.

दोन घटका रात्रीस थेऊराहून सांडणीस्वार पत्र घेऊन आला. श्रीमंत पंत प्रधान कार्तिक वद्य ८ बुधवारीं कैलासवासी झाले. ईश्वरें अनुचित गोष्ट केली. ईश्वर इच्छा! उपाय नाहीं. श्रीमंत सौभाग्यवती रमाबाईसाहेब याणीं सहगमन केलें. बुधवारीं प्रातःकाळचे सहा घटका दिवसास देहावसान झालें. आपण सावधपणें असावें. हे विनंती.

नं० १२३० ( २० नोवेंबर. )

वामनराव गोविंद यांचें पांडुरंगरावास पत्र.

कार्तिक वद्य दशमी भृगुवारचें थेऊराहून—

" श्रीमंत अष्टमीस देवाधीन झाले. ते दिवशीं दोन घटका दिवस असतां सुतरस्वार तुह्मांकडे रवाना केला त्याजवरून सर्व कळेल. प्रजेचें छत्र गेलें! मोठा घात झाला! इलाज नाहीं. धाकटे श्रीमंतच उत्तरकार्य करितात. काल अस्थि सिंचन करून गंगेस लावून दिल्या. हा विधि उरकल्यानंतर सप्तरुषीस जावयाचा उद्योग होईल. असा प्रकार आहे. तिकडे आधीं जाऊन यावें लागेल तें उचितच आहे. सौभाग्यवती मातुश्री रमाबाई जाऊं लागली ते दिवशीं आह्मीं मंडळीसह नमस्कारास गेलों होतों तेव्हां आह्मांस हिऱ्याची एक अंगठी व चिरंजीव राजश्री भाऊस पाचेची एक अंगठी दिली. तीर्थस्वरूप राजश्री आबास पांच मोहरा व चिरंजी रावोबास दोन मोहरा व चिरंजीव श्रीपतराव यास दोन मोहरा दिल्या. जो पायां पडावयास गेला त्यास एक एक मोहर दिली. वरकड जवाहीर वस्तभाव जी होती ती आपले हातें सर्वस्व वांटून गेली. श्रीमंतांचा प्रताप जसा होता तसा बाईनीं शेवट केला. त्यांच्या पुण्यास जोडा नाहीं. सूर्यमंडळ भेदोन गेली!"

---

१. मातोश्यास.

नं० १२३१ ( ३० नोवेंबर. )

वामनरावाचें पांडुरंगरावास पत्र मार्गशीर्ष शुद्ध ६ चें थेऊराहून.

"श्रीमंतांचें उत्तरकार्य झालें. आज शांतोदकही झालें. आह्मीं आज वाड्यांतच जेवावयास गेलों. भोजनें करून आज पुण्यास जाणार. डेरे लावून दिले. खडे राहिलों आहों. भोजनें करून पुण्यास जाणार. तेथून नवमीचे दिवशीं निघोन (श्रीमंत) सातान्यास जाणार. आह्मीं समागमें जाऊं. राजदर्शनास द्वितीयेस मुहूर्त नेमिला आहे. वस्त्रें झाल्यावर मनसब्याचा डौल कळेल."

नं० १२३२ ( कार्तिक शुद्ध ११.
२१ नोवेंबर. )

पांडुरंगरावास वामनराव व परशुरामभाऊ यांचें पत्र.

छ० २९ साबान रविवारचें थेऊराहून.

"उत्तरकार्य उरकल्यानंतर सररुपीस जाऊन आल्यानंतर पुढील कर्तव्याचा डौल कळेल. फौज ठेवावयाचा प्रकार तो दिसत नाहीं. हुजूरपागा व हुजुरातचे लोकांपैकीं खाशां खाशांस दोचां चौघांनिशीं बोलाविलें आहे. पांच हजार फौज तूर्त जमा आहे. आह्मांकडील जाबसालास तर प्रथम दिवस! श्रीमंत कैलासवासी यांस आमचा सर्व प्रकार दखल होता. आतां सर्व प्रकार नवीन आहे."

# नारायणराव पेशव्यांची कारकीर्द.

मयत पेशव्यांचें उत्तरकार्य नारायणरावसाहेब यांनींच केलें. दहावे दिवशीं पिंडास कावळा स्पर्श करीना तेव्हां नानाफडणीस वगैरे मुत्सद्यांनीं संकल्प केला कीं, नारायणराव यांस पुत्र झाला तर त्याचें नांव माधवराव ठेवावें. नंतर पिंडास काकस्पर्श झाला. उत्तरकार्य आटपल्यावर नारायणराव व दादासाहेब व सर्व मुत्सद्दी व सरदार थेऊराहून पुण्यास आले. शहरांत प्रवेश करण्यापूर्वी नारायणरावसाहेब व दादासाहेब यां दोघांनीं संकेत ठरविला कीं, झाल्या गोष्टी त्या झाल्या. मागचें सर्व विसरून जाऊन यापुढें दोघांनीं मनमिळाऊपणानें रहावें. निद्रा मात्र दोघांनीं पृथक् स्थळीं करावी. स्नानसंध्या, भोजन, बसणें उठणें, राज्यकारभार हें सर्व दोघांनीं एका ठिकाणीं बसून करीत जावें. 'द्यावें' नारायणरावसाहेबांनीं व 'देवावें' दादासाहेबांनीं करीत जावें. हे संकल्प कमलपत्रावरील बिंदूप्रमाणें होते. कारण कीं ते तितकेच सुंदर पण नश्वरही होते. तें कसें हें आतां पुढें समजेलच.

मार्गशीर्ष शुद्ध सप्तमीच्या मुहूर्तानें श्रीमंत नारायणरावसाहेब गारपिरावर डेरेदाखल होऊन छत्रपतींकडून पेशवाईचीं वस्त्रें घेण्याकरितां साताऱ्यास जावयास निघाले. समस्त मुत्सद्दी व पटवर्धन व रास्ते वगैरे सरदार स्वारींत हजर होते. दादासाहेबांस बरोबर येण्याविषयीं श्रीमंतांनीं आग्रह केला तेव्हां ते अडून बसले. ते ह्मणूं लागले कीं, आह्मांस पंचवीस लक्षांचा सरंजाम द्यावा. आह्मीं फौज बाळगून चाकरी

# नारायणराव पेशव्यांची कारकीर्द.

करूं. नारायणराव साहेबांस हें बोलणें अर्थातूच रुचलें नाहीं. त्यांनीं सांगितलें कीं, सरंजाम देण्यास आह्मांस अनुकूळ पडत नाहीं. सर्व राज्यच तुमचें आहे. तुमच्या आज्ञेप्रमाणें वागण्यास मी सर्वथा सिद्ध आहें. आपण धनीपण सोडून निराळा सरंजाम तोडून घेऊन चाकर होण्याची इच्छा कां करितां? याप्रमाणें बोलल्यावर व इतर पुष्कळ लोकांनीं समजूत घातल्यावर दादासाहेब येण्यास कबूल झाले. नंतर उभयतां श्रीमंत निघाले ते मार्गशीर्ष शुद्ध द्वादशीच्या दिवशीं साताऱ्याहून एक कोसावर वेण्येच्या दक्षिणतीरीं येऊन राहिले.' तेथें श्रीमन्महाराज यांस आणून मेजवानी केली व मोत्यांची कंठी, तुरा, जेगा, शिरपेंच याप्रमाणें जवाहीर, खेरीज पांच उंची पोषाख व हत्ती व घोडा याप्रमाणें श्रीमंतांनीं महाराजांस दिलें. अर्काटच्या नबाबाकडून माजी पेशव्यांस नजराण्यांत पालखी आली होती, तीच याप्रसंगीं महाराजांस दिली. ते खुष होऊन परत किल्ल्यावर गेले. महाराजांच्या दोन स्त्रिया होत्या त्यांच्याही दर्शनास जाऊन श्रीमंतांनीं त्यांस वस्त्रें व जवाहीर दिलें. मार्गशीर्ष वद्य चतुर्थी रविवार या दिवशीं महाराजांनीं श्रीमंत नारायणरावसाहेब यांस पेशवाईचीं वस्त्रें व शिक्केकट्यार व जरीपटका दिला. दादासाहेबांसही वस्त्रें व जवाहीर दिलें. मुतालिकीचीं वस्त्रें बजाबा पुरंदरे यांस दिलीं. पूर्वीं दादासाहेबांनीं विठ्ठलराव विंचूरकर यांस न्यायाधीशाचें पद देवविलें होतें तें आतां त्यांच्या घराण्यांतून काढून पूर्वींच्या न्यायाधीशाच्या घराण्याकडे कायम करण्यांत आलें. खंडेराव दरेकर यांजकडे पुनः सरलष्करीचें पद कायम झालें. महाराजांस किल्ल्यावरून काढून खालीं शहरांत ठेवावें व त्यांस बाहेर हिंडण्याफिरण्यास प्रतिबंध होता तोही दूर व्हावा असें यावेळीं ठरलें होतें; परंतु पुढें तसें घडून आल्याचें मात्र दिसून येत नाहीं. वस्त्रें मिळाल्यानंतर श्रीमंतांची स्वारी पुण्यास परत गेली.

# नारायणराव पेशव्यांची कारकीर्द.

नानाफडणीस व हरिपंत फडके यांजवर श्रीमंतांचा प्रथम प्रथम विश्वास बराच होता. पटवर्धन मंडळीवरही प्रेम चांगलें होतें. सखारामबापूवर त्यांची मर्जी मूळपासूनच नव्हती. श्रीमंतांचा स्वभाव उतावळा व वृत्ति क्षणभंगुर होती. त्यांचे कान हलके होते. नेहमींच्या वागणुकींतसुद्धां उग्रपणा फार असे. भारदस्तपणा बिलकुल नव्हता. त्यांच्या वयाकडे लक्ष दिलें ह्मणजे त्यांच्या अवगुणांचें फारसें नवल वाटत नाहीं. जगाचा अनुभव अधिकाधिक जसा त्यांस मिळता, तसतशी त्याच्या स्वभावांत कदाचित् सुधारणा झाली असती. पण तूर्त तरी त्यांस नवीन मिळालेल्या अधिकाराचा किती जपून उपयोग केला पाहिजे हें कळत नव्हतें. सेवक लोकांस जरबेंत वागविणें व कामकाजांत तडफ दाखविणें या दोन गोष्टींत ते आपल्या थोरल्या बंधूचें अनुकरण करीत होते हें खरें, पण त्यांच्याच वयामध्यें त्या थोरल्या बंधूनें आपल्या सद्गुणांच्या व सुस्वभाच्या योगानें लोकांवर जी छाप पाडिली होती, ती त्यांजकडून पडण्यासारखी नव्हती. प्रथमच त्यांनीं कांहीं एका कामांत सखारामबापूची रदबदली न ऐकतां त्यास दुरुक्ति बोलून त्याचें मन दुखविलें व आपलाच हेका शेवटास नेला, ही गोष्ट वाईट झाली. कारण कीं तो वृद्ध, अनुभवी व कुटिल स्वभावाचा मुत्सद्दी उदासीन होऊन कारभाराचें काम होतां होईल तो अंगाबाहेर टाकूं लागला. श्रीमंतांजवळ हलक्या लोकांची रीघ पडत चालली, त्यामुळें अब्रूदार मुत्सद्दी दरबारी कामांत फारसा पुढाकार घेईनासे झाले.

बाबूजी नाईक बारामतीकर यांचा मुलगा पांडुरंगराव यांशीं दादासाहेबांची कन्या दुर्गाबाई हिचें माघ महिन्यांत लग्न झालें. यापूर्वी भाऊसाहेबांस पानपतच्या युद्धांत मृत्यु येऊन पूर्ण बारा वर्षें झाली होतीं. त्यांची स्त्री पार्वतीबाई ही अद्यापि सौभाग्यचिन्हें धारण करीत होती. तिला सोंवळी करून नंतर हें लग्न उरकावें असें दादासाहेब व दरबारी

लोक यांचें मत होतें. भाऊसाहेबांचे नांवानें कोणी तोतया प्रकट झाला होता, त्याची लबाडी शाबीत होऊन त्यास नगरच्या किल्ल्यांत कैदेंतही ठेवण्यांत आलें होतें. परंतु तो खोटा असेल असें पार्वतीबाईस मुळींच वाटत नव्हतें. त्यामुळें सोंवळी होण्याची गोष्ट काढतांच तिनें सर्वांस सांगितलें कीं तुह्मीं कोण तोतया ह्मणतां तो मजपुढें आणून उभा करा, तो खरा खोटा याची मी खात्री प्रत्यक्ष करून घेईन आणि नंतर सोंवळी होईन! हें उत्तर ऐकतांच तिला सोंवळी करण्याचा नाद त्यांनीं सोडिला. असें करण्याचें बहुधा कारण असें दिसतें कीं, यद्यपि यथास्थित चौकशी होऊन तोतया लबाड हें ठरलें आहे, तथापि हिनें तो खोटा असें साफ ह्मटलें तर बरें, पण जर का तसें ह्मणण्यांत ती गोंधळली तर मोठीच अडचण येऊन पडणार!

पोर्तुगीज लोकांपासून मराठ्यांनीं तेतीस वर्षांपूर्वीं साष्टी, वसई वगैरे उत्तरकोंकण सर केलें होतें. तो मुलुख परत हिसकून घेण्याचें त्यांच्या मनांत होतें, परंतु आजपर्यंत त्यांस संधि सांपडली नव्हती. आदल्या वर्षीं त्यांनीं कोंकणांत कांहीं गडबड केली होती, परंतु त्यांच्या यत्नास यश आलें नव्हतें. यंदां त्यांची तयारी जय्यत झाली होती. ते आपल्या आरमाराचीं मोठमोठीं पांच सहा जहाजें व इतर पुष्कळ लहान गलबतें घेऊन विजयदुर्ग व रत्नागिरी या बंदरांच्या बाऱ्यांवर मार्गशीर्ष महिन्यांत येऊन उतरले. ही बातमी पुण्यास जातांच तेथें आरमाराचे सरदार गेले होते, त्यांस तत्काळ परत जाण्याविषयीं श्रीमंतांनीं निरोप दिला व त्यांच्या कुमकेस कांहीं स्वार व पायदळ मिळून फौजही पाठविली. परंतु ही फौज तिकडे जाण्यापूर्वींच कृष्णाजी धुळप यानें पेशव्यांचें आरमार सज्ज करून शत्रूंच्या आरमाराशीं गांठ घालून त्यांस हुसकून लाविलें व मालवणापर्यंत त्यांचा पाठलाग केला.

# नारायणराव पेशव्यांची कारकीर्द.

दादासाहेब व आनंदीबाई व त्यांची शागीर्दमंडळी यांच्या फंद-फितुराच्या मसलती पुनः सुरू झाल्याचें कोणी पेशव्यांस कळविलें. यांवरून क्रुद्ध होऊन पूर्ण चौकशी न करितां त्यांनीं दादासाहेब व त्यांचा परिवार यांस पुन कैदेंत ठेविलें. ही गोष्ट नानाफडणीस वगैरे मुत्सद्यांच्या मनास आली नाहीं. परंतु कोणा अप्रबुद्ध माणसाच्या चिथावणीवरून त्यानीं हें केलें. त्यांची आई गोपिकाबाई गंगापुरास रहात असे. तिला भेटावयास जावें व तिकडेच कांहीं महिने रहावें असें त्यांच्या मनांत होतें. परंतु आपण तिकडे गेलों व दादासाहेबांनीं इकडे कांहीं खेळ केले तर काय करावें या भीतीनें त्यांनीं याप्रमाणें फितुराचा आपल्या मतें बंदोबस्त केला!

उत्तरहिंदुस्थानांत श्रीमंतांच्या फौजा मुलुखगिरीवर होत्या त्यांचीही हालहवाल सांगितली पाहिजे. सुजाउद्दौला व इंग्रज यांच्या चिथावणी-वरून बादशहानें आपला बक्षी नजीफखान यास मराठ्यांस दिल्लींतून हांकून लावण्याविषयीं हुकूम फर्माविल्याचें मागें लिहिलेंच आहे. मराठे सरदारांपैकीं महादजी शिंदे तर दिल्लीहून निघून राजपुतान्याकडे या-पूर्वीच गेला होता. होळकर व बिनीवाले मात्र दिल्लीस होते. त्यांच्या मनांत बादशहाशीं बिघाड करावयाचें मुळींच नसल्यामुळें त्यांनीं त्याचा कोप शांत करण्याविषयीं पुष्कळ प्रयत्न केला. परंतु सामोपचाराचीं बोलणीं यावेळीं तो मुळींच ऐकेना. नजीफखानाच्या मनांत लढाईची खुमखुम फार होती. त्यामुळें शेवटीं लढाईचीच मसलत मुकरर ठरली. बादशहाची फौज पंधरा हजार होती ती युद्धाच्या तयारीनें शहराबाहेर येऊन उभी राहिली. तेव्हां मराठ्यांनीं तिजवर हल्ला करून तिचा पूर्ण पराजय केला. इंग्रज अंमलदारानीं तयार केलेलीं दोन तीन पलटणें बादशहाच्या नोकरीस होतीं, तेवढीं मात्र व्यवस्थेनें हटून परत बचावून गेलीं. बाकी सारी फौज मराठ्यांनीं लुटून टाकिली. लढाईचा हा असा परिणाम झालेला पाहून बादशहानी लेशा उडाली. तो पळून किल्ल्यांत

जातो तों मराठ्यांचा शहरास गराडा पडला. मग बादशहाकडून मध्यस्थ येऊन रदबदली होतां होतां, शेवटीं पुनः पूर्वीप्रमाणें मैत्री होण्याचें ठरलें.

मागच्या सालीं रोहिल्यांचें मराठ्यांनीं पारिपत्य केलें तेव्हां रोहिल्यानीं सुजाउद्दौल्याशीं ठराव केला होता कीं, यापुढें मराठ्यांची स्वारी होईल, तर ती सुजानें मागें फिरवावी व त्याबद्दल रोहिल्यांनीं त्यास चाळीस लक्ष रुपये द्यावे. याप्रमाणें ठराव होऊन आतां रोहिल्यांस सुजा व इंग्रज व पठाण यांची कुमक मिळाली होती. ही गोष्ट मराठ्यांस कळली असूनही त्यांनीं रोहिल्यांवर पुनः पावसाळा संपतांच स्वारी करण्याचा बेत केला व त्यांस सांगून पाठविलें कीं, वीस वर्षांपूर्वीं तुह्मीं सफदरजंगाच्या मार्फत आह्मांस पन्नास लक्ष रुपयांचीं खतें लिहून दिलीं आहेत, त्या रुपयांचा आतांच्या आतां फडशा करा! या मागणीस समर्पक जबाब न आल्यामुळें नद्यांचें पाणी ओसरूं लागतांच रोहिलखंडावर स्वारी करण्याच्या उद्देशानें मराठी फौज गंगेकडे येऊं लागली. रोहिल्यांचा मुख्य सरदार हाफिझ रहिमत यानें लढाईची तयारी केलीच होती. त्याचा तळ बिसौली येथें होता. मराठे रामघाटापाशीं गंगा उतरणार अशी बातमी कळल्यावरून त्यानें त्या उतारावर अहमदखान नांवाच्या सरदाराबरोबर कांहीं फौज पाठविली. तो सरदार असदपूरच्या उतारापर्यंत जाऊन पोंचतो, तों तुकोजी होळकर नदी उतरून अहमदखानाच्या फौजेवर येऊन पडला. होळकरानें रोहिल्यांची फौज मोडून लुटून फस्त केली व खुद्द अहमदखानासच पकडून कैद केलें. नंतर होळकरानें सर्व मुरादाबाद जिल्हा लुटून व जाळून उध्वस्त केला. इतक्यांत पायदळ व तोफखाना घेऊन विसाजीपंत बिनीवाले मागून येत होता तोही गंगेवर येऊन पोंचला. तेव्हां हाफिझ रहिमत यानें मराठ्यांशीं तहाचें बोलणें लाविलें. तहाचा प्रकार जुळून आला

# नारायणराव पेशव्यांची कारकीर्द.

र आपल्या मुलखाचा बचाव होईल व मराठ्यांस काय
ावयाचें तें देऊन वाटेस लाविल्यावर मग सुजाउद्दौल्यास
ाळीस लाख रुपये देऊं केले आहेत ते द्यावयास नकोत,
सें हाफिझ यास वाटत होतें. पण ही तहाची वाटाघाट ऐकतांच सुजा
इंग्रज लांबलांब मजली करून रोहिलखंडांत येऊन पोचले. इंग्रजी
ौजेवर सर राबर्ट बार्कर ह्मणून मुख्य सरदार होता, त्यानें बिनी-
ाल्याची चार हजार फौज गंगा उतरून नुकतीच अलीकडे आली
ोती ती पुनः गंगापार हुसकून लाविली. इंग्रजी फौजेनें होळकर व
बेनीवाले यांमधलें दळवण तोडण्यासाठीं गंगेच्या तीरीं असदपूर येथें
ाळ दिला. सुजा व रोहिले मिळून होळकरांचा पाठलाग करण्याच्या
ाजवीस लागले. बिनीवाल्याची फौज पलीकडे होती तिला अलीकडे
येऊं न देतां होळकर अलीकडे अडकला होता त्याचें सर्वांनीं मिळून
पारिपत्य करावें हा यावेळीं सुजा, इंग्रज व रोहिले यांचा बेत होता.

याप्रमाणें या मोहिमेंत मराठ्यांवर जो हा धोक्याचा प्रसंग येऊन गुदरला, त्यास मुख्य कारण ह्मटलें तर माधवराव पेशवे यांचा मृत्यु हें होय. सर्व हिंदुस्थानच्या राजेरजवाड्यांवर त्यांचा दरारा मोठा होता व हिंदुस्थानच्या फौजेच्या मसलती व हालचाली ज्या होत होत्या त्या सर्व त्यांच्याच हुकमानें होत होत्या. वेळ पडली तर लक्षावधि फौज हिंदुस्थानच्या फौजेच्या कुमकेस पाठविण्याचें त्यांमध्यें सामर्थ्य होतें. ते मरण पावल्याचें वर्तमान ऐकतांच मराठ्यांच्या शत्रूंस धीर आला. शिंदे राजपुतान्याकडे व रामचंद्र गणेश स्वदेशीं गेल्यामुळें मराठी फौज निम्मे कमी झाली आहे, ज्यांनीं ही मोहीम सुरू केली ते पेशवे मृत्यु पावल्यामुळें पुण्याहून आतां कुमक येण्याचा संभव नाहीं, या गोष्टी लक्षांत आणून सुजाउद्दौला व इंग्रज रोहिल्यांच्या कुमकेस आले होते. शत्रूंची फौज साठ सत्तर हजारपर्यंत जमली असून आपली त्यांच्या निम्म्यापेक्षां

फारशी अधिक नाहीं, देशाहून कुमक येण्याची आशा नाहीं, इतकेंही असून गनिमी काव्यानें लढावें तर उन्हाळ्यास सुरुवात झाली असल्यामुळें मुलूखगिरीचे दिवस थोडे राहिले. पावसाळ्यापूर्वीं यमुने अलीकडे फौज काढून न नेली तर पूर्वीं दत्ताजी शिंदे दुआबांत आडकला होता त्याप्रमाणें आपण अडकले जाऊन आपली दुर्दशा होईल, हें सर्व मनांत आणून मराठ्यांनीं दिल्लीस परत जाण्याचा निश्चय केला. पलीकडून बिनीवाल्यानें इंग्रजांवर तोफांचा मारा केला. तो मारा त्यांवर लागू न पडतां उलट त्यांच्या तोफांचा मारा मात्र आपणांवर लागू पडण्याचा सुमार दिसल्यामुळें बिनीवाल्यानें आपला तळ हालविला व इंग्रजांची फौज गंगा उतरून अलीकडे येतांच त्यांशीं लढाई न देतां त्यानें दिल्लीचा रस्ता सुधारला. मागून लवकरच होळकरही मुरादाबादेंतून निघून गंगा उतरून दिल्लीस आला.

जानोजी भोंसले यानें मरणपावण्यापूर्वीं मुधोजीचा मुलगा रघोजी यास दत्तक घेतलें होतें. ती गोष्ट माजी पेशव्यांच्या संमतीनेंच झाली असल्यामुळें, त्यांनीं रघोजीस भोंसल्यांच्या जहागिरीचा मालक ठरवून त्याचा बाप मुधोजी यास त्याचा पालक नेमिलें होतें. भोंसल्यांच्या घरांत व त्याचप्रमाणें खुद्द पेशव्यांच्या घरांत एकी नसल्यामुळें ही व्यवस्था फार दिवस टिकली नाहीं. नारायणराव साहेब व दादासाहेब यांमध्यें वितुष्ट उत्पन्न झाल्यामुळें दादासाहेबांस कैद प्राप्त झाली. त्यांचे अनुयायी व अभिमानी जे होते त्यांत मुधोजी भोंसले मुख्य होता. मुधोजीचें व त्याचा बंधु साबाजी यांचें चित्त शुद्ध नव्हतें. साबाजीच्या मनांत रघोजीचा पालक मुधोजी झाला आहे त्याचा तो अधिकार आपणास मिळावा असें होतें. तो नारायणरावसाहेब यांच्या मर्जीतला सरदार होता. उभयतां फडणीस, हरिपंत फडके व त्रिंबकरावमामा यांच्याशीं त्याची मैत्री होती. "हैदरअलीवरच्या तिसऱ्या

# नारायणराव पेशव्यांची कारकीर्द.

स्वारी " त स. १७७० साली तो पेशव्यांबरोबर कर्नाटकांत होता व तिकडे त्यानें अनेक चांगल्या कामगिऱ्या बजाविल्या होत्या. दादासाहेबांस कैद झाली तेव्हां मुधोजीचें बळ कमी होऊन नारायणरावसाहेबांनीं रघोजीकडून जहागीर व सेनासाहेब सुभ्याचें पद काढून तीं दोन्हीं साबाजीस दिलीं. मग साबाजी व मुधोजी यांची झटपट सुरू झाली. साबाजीस पेशव्यांचें पाठबळ चांगलें होतें. तीन हजार फौजेनिशीं बाळोजी पलांडा पुण्याहून त्याच्या कुमकेस आला होता. निजामअलीकडेही त्याचें वळण चांगलेंच होतें. मुधोजीस फक्त इलिचपूरच्या नबाबाची मदत होती. साबाजीचा जोर अधिक झाल्यामुळें मुधोजी टेंकीस येऊन त्यानें भावाशीं समेट करून घेतला. हा समेट होतो न होतो तों जानोजीची स्त्री दर्याबाई साबाजीकडे होती ती त्यास सोडून मुधोजीस मिळाली. मग मुधोजी पुनः बिथरून दंगा करूं लागला.

फाल्गुन मासीं नारायणरावसाहेब आपल्या आईस भेटण्याकरितां पुण्याहून गंगापुरास गेले. ती संधि साधून दादासाहेबांनीं बंडावा करण्याचा प्रयत्न केला. त्यांनीं मागीलप्रमाणेंच गुप्तरूपें कांहीं फौज जागोजाग जमविली. मुधोजी भोंसले तर त्यांच्या सुटकेची इच्छा करीत होता व त्यांचे विश्वासू कारकून व पुण्यांतील कांहीं उपद्व्यापी लोक या खटपटींत होते. शिवाय हैदराचा वकील आपाजीराम याच्या मार्फत दादासाहेबांनीं हैदरअलीकडे आपल्या कुमकेस फौज पाठविण्याविषयीं पत्रें पाठविलीं. आतां वाड्याबाहेर निघून जावें इतक्यांत फितुराची बातमी फुटून शहरचा मुख्य अधिकारी नारो आपाजी तुळसीबागवाले यानें शहरची नाकेबंदी केली व वाड्याभोंवतीं खडे पहारे उभे केले. हे पहारे आह्मांवर काय ह्मणून उभे केले आहेत? आह्मींच निघून जावयाचें मनांत आणिल्यास आह्मांस कोण प्रतिबंध करणारा आहे? याप्रमाणें दादासाहेब पुष्कळ चरफडले व जाण्याचा आव

दाखवून शहराबाहेर त्यांनीं आपले डेरेही देवविले. परंतु कृष्णराव बल्लाळ काळे याच्या खटपटीमुळें त्यांचा निघून जाण्याचा बेत तहकूब झाला.

या बातम्या गंगापुरास पोंचतांच नारायणरावसाहेब तावडतोब निघून पुण्यास आले. येतांच त्यांनीं चौकशी करून फितुराचे कागदपत्र हैदराकडे गेले होते ते पकडले व आपाजीराम यास बोलावून आणून त्याची निर्भर्त्सना करून बेडी घालून त्यास सिंहगडावर पाठविलें. इतर फितुरीही पकडून कैदेंत घातले. दादासाहेबांची फौज जागोजाग जमली होती तींपैकीं कांहीं पळाली व कांहीं पकडली गेली.

इकडे साबाजी व मुधोजी यांची लढाई जारीनें सुरूच होती. साबाजीच्या कुमकेस पेशव्यांकडून पलांडे व मोंगलाकडून जाबितजंग आला होता. तें सर्व लष्कर वर्धा नदीवर उतरलें होतें. मुधोजी व दर्याबाई यांनीं नागपुरापर्यंत धामधूम करीत जाऊन तेथें देवाजीपंत कैदेंत होता त्यास मुक्त करून आपल्या दिवाणगिरीचा अधिकार त्यास दिला. तेथेंच साबाजीची बायको होती तिजपासून व शहरांतील शेटसावकार यांपासून बलात्कारानें द्रव्य हरण करून त्यांनीं चांद्याचा रस्ता सुधारिला. मुधोजीचा पक्ष बळावलासें पाहून पेशव्यांनीं खंडेराव दरेकर व मोंगलानें आपला दिवाण रुक्नुद्दौला यांस साबाजीच्या कुमकेस पाठविलें. मुधोजीस मुख्य आधार इलिचपूरचा नबाब इस्मायलखान याचा असल्यामुळें साबाजीनें मोंगलाकडून व पेशव्यांकडून आलेल्या फौजेसह जाऊन इलिचपुरास वेढा घातला.

याच सुमारास परभू प्रकरण उपस्थित झालें. परभू लोक आपण क्षत्रिय असून आपणास वेदोक्त कर्माचा अधिकार आहे असें ह्मणून त्याप्रमाणें वागणूक करीत असत. पूर्वीपासून या बाबतींत ब्राह्मणांची व त्यांची कलागत होत आली असून अनेक वेळां उभय

## नारायणराव पेशव्यांची कारकीर्द.

पक्षांकडून सरकारांत फिर्यादीही गेल्या आहेत. परंतु त्या त्या वेळचे प्रभु सूज्ञपणानें या जातीजातींच्या कलहाचा निकाल कोणच्याही पक्षाचा अभिमान न धरितां "पूर्वी चालत आलें आहे तसें चालवावें, नवें करूं नये. जुनें मोडूं नये." असा करून ती वेळ भागवून नेत असत. प्रस्तुत ब्राह्मणांकडून परभूंवर सरकारांत फिर्याद आल्यावरून नारायणरावसाहेबांनीं परभू क्षत्रिय नाहींत, त्यांस वेदोक्त कर्माचा अधिकार नाहीं, शूद्राप्रमाणें त्यांनीं वागावें, असा ठराव केला व त्या अर्थाचा परभूंपासून नऊ कलमांचा कतबा लिहून घेतला. परभूंनें ह्मणणें असें आहे कीं, आपण हा कतबा खुषीनें लिहून दिलेला नाहीं. आपल्या जातींतील प्रमुख लोकांस पेशव्यांनीं धरून नेऊन तीन दिवस उपाशीं कोंडून घातलें व नानाप्रकारें जुलूम केला त्यामुळें निरुपायानें त्यांनीं याप्रमाणें लिहून दिलेलें आहे. तें आपणास बिलकुल मान्य नाहीं. या पेशव्यांच्या कारकीर्दीतले जे कागदपत्र पटवर्धनी दप्तरांत आह्मांस पहावयास मिळाले आहेत त्यांवरून हे पेशवे अविवेकी, उतावळे, उग्र स्वभावाचे व हेकट असावे असा आमचा ग्रह झालेला आहे व परभू आपणावर जुलूम झाल्याचें जें सांगतात त्यांत कांहीं तथ्य असावें असें आह्मांसही वाटतें. हा परभूंपासून कतबा लिहून घेतल्यामुळें ती सारी जात खवळून गेली व इतउत्तर तिनें दादासाहेबांचा पक्ष धरिला. या पेशव्यांचें व तिचें हाडवैर पडलें. पेशव्यांनी दादासाहेबांस फितूर उपडकीस आल्यापासून कडक बंदोबस्तांत ठेविलें होतें हें खरें आहे. पण दादासाहेबांचा व आनंदीबाईचा नानाप्रकारें अनन्वित छळ पेशव्यांनीं केल्याविषयीं परभूंनीं जे लेख लिहिलेले आहेत ते सर्व खरे आहेत असें आह्मांस वाटत नाहीं. सदर लेखांविषयीं आमचें मत ग्रांट डफ् साहेबांच्या मताप्रमाणेंच आहे. तें हेंच कीं, या पेशव्यांच्या हातून मूलपणामुळें जे अल्पस्वल्प दोष घडले असतील त्यांचें पक्षाभिमानास

## नारायणराव पेशव्यांची कारकीर्द.

प्रवृत्त झालेल्या लोकांनीं तिखट मीठ लावून वर्णन केलें आहे व त्यांस भयंकर पातकाचें स्वरूप आणिलें आहे!

माधवराव पेशवे मरण पावल्याबरोबर हैदरखानाच्या मनावर जो मराठ्यांचा दरारा होता तो नाहींसा होऊन मागच्या स्वारींत झालेल्या नुकसानाचा वचपा काढण्यासाठीं लढाईची तयारी तो झपाट्यानें करूं लागला. तेव्हां दसरा झाल्याबरोबर त्यावर स्वारी करण्याचा पेशव्यांसही बेत करावा लागला. त्यांत आपल्या चुलत्यानें हैदराची मदत मागितली होती हें लक्षांत आणून येत्या स्वारींत त्याचा समूळ नाश करण्याचा त्यांचा निश्चय ठरला होता. हा निश्चय तडीस नेण्यास फौजेची तयारी मोठ्या प्रमाणावर केली पाहिजे, सबब हिंदुस्थानच्या फौजेस दिल्लीहून निघून येण्याविषयीं पेशव्यांनीं सक्तीचीं पत्रें पाठविलीं. खरें ह्मटलें तर होळकर व शिंदेवाले यांस चमेली अलीकडे बोलावणें ह्मणजे त्यांनीं आज तीन वर्षे तिकडे केलेले श्रम व्यर्थ घालविणें होतें. बादशहा व त्याचा बक्षी नजीफखान, जाट, पठाण, रोहिले, सुजाउद्दौला, इंग्रज, राजपुतान्यांतले व बुंदेलखंडांतले राजे हे सर्व मराठ्यांवर उठले होते. त्यांस जरबेंत ठेवण्यासाठीं आणखी मोठ्या फौजेची रवानगी पुण्याहून व्हावयास पाहिजे होती. तसें न करितां तिकडे आहे तीच फौज परत आणिल्यानें अंतर्वेदी, रोहिलखंड, आग्रा, दिल्ली, मथुरा, कनोज हे सर्व प्रांत आपल्या हातचे जातात, काशी व प्रयाग या क्षेत्रांबद्दल बादशहापासून मिळविलेल्या सनदा व्यर्थ होतात, हें हल्लींच्या पेशव्यांनीं किंवा त्यांच्या कारभाऱ्यांनीं मनावरच घेतलें नाहीं! माधवराव पेशवे जिवंत असते तर ते कर्नाटकची मसलत संभाळून देखील हिंदुस्थानची मसलत सांभाळिते यांत संशय नाहीं. पण त्यांची सलाबत त्यांजबरोबर गेली व ते मरण पावले तेव्हांच हिंदुस्थानांत मराठ्यांची सार्वभौमसत्ता होण्याची आशा नष्ट झाली! परत येण्याविषयीं पुण्याहून वारंवार

सक्तीचे हुकूम जाऊं लागल्यामुळें होळकर व शिंदेवाले दिल्ली सोडून परत आले.

साबाजीनें इलिचपुरास वेढा घातल्याचें मागें लिहिलेंच आहे. त्याबरोबर पंचवीस हजार फौज होती. तींतील सरदार खुद्द साबाजी व बाळोजी पलांडे व खंडेराव दरेकर व रुकनुद्दौला यांस आपण लवकरच इलिचपुर घेऊं असें वाटत होतें. परंतु त्या शहरांत इस्मायलखान नबाब होता त्यानें मर्दुमीनें व कौशल्यानें लढाई केल्यामुळें इतक्याही फौजेचें कांहीं चालेनासें झालें. इस्मायलखानाच्या कुमकेस मुधोजी भोंसले आला तो वेढा घालणाऱ्या लष्कराभोंवतीं घिरट्या घालून नेहमीं कहीचीं उंटें व तट्टें नेऊं लागला. तेव्हां अर्थातच त्या लष्करांत दाणावैरणीचा तुटवडा पडून लोक उपाशीं मरूं लागले. अशी स्थिति असतां एका दिवशीं इस्मायलखान पांच हजार पठाणांनिशीं शहराबाहेर येऊन मोंगलाच्या बातऱ्यांवर तुटून पडला. तेथें मोठी मारामारी होऊन मोंगलाचें पांचशें माणूस मारिलें गेलें व त्यांच्या दहा तोफा इस्मायलखानानें गांवांत नेल्या. मग हा नबाब व मुधोजी आपणांस आंवरत नाहींतसें पाहून वेढा घालणारें लष्कर वेढा उठवून तेथून सहा कोसांवर जाऊन उतरलें. नंतर साबाजी व मुधोजी यांमध्यें सलोख्याचें बोलणें सुरू होऊन या भावाभावांच्या भेटी व्हाव्या असें ठरलें. पेशव्यांकडून साबाजीस सेनासाहेब सुभ्याचें पद मिळालें होतें तें त्याजकडेच कायम राहून जहागिरीचा अंमल मात्र दोघांनीं सारखा करावा असें ठरण्याचें धोरण दिसत होतें. परंतु मुधोजीचें दैव बलवत्तर असल्यामुळें याच-वेळीं अशी एक गोष्ट घडून आली कीं, जिच्यायोगानें साबाजीचें सामर्थ्य अगदीं कमी होऊन जहागिरीची मालकी मुधोजीच्या हातीं आली. ही गोष्ट ह्मणजे नारायणराव पेशवे यांचा खून ही होय.

पेशवे व त्यांच्या दरबारचे लोक यांस साबाजीचा अभिमान पडला होता. इलिचपुरचा वेढा त्यास उठवावा लागला व त्याचें बळ कमी

पडून मुधोजीची सरशी झाली हें पाहून पेशव्यांस वाईट वाटलें व स्वतःच मुधोजीवर स्वारी करून त्याचें पारिपत्य करावें असेंही त्यांच्या मनांत आलें. इकडे मुधोजीचा जय झालेला पाहून दादासाहेब व तत्पक्षीय लोक यांस फारच संतोष झाला. त्यांनीं पेशव्यांविरुद्ध कट पुण्यांतल्या पुण्यांतच उत्पन्न केला. प्रथम या कटाचें स्वरूप फारसें भयंकर नव्हतें. दादासाहेबांस कैदेंतून सोडवून पुण्याबाहेर न्यावें व फौज ठेवण्यास त्यांस मदत करावी. त्यांनीं फौज जमवून धामधूम सुरू केली ह्मणजे पेशवे इकडेच अडकले जाऊन मुधोजीवर स्वारी करण्याचा बेत त्यांस सोडून द्यावा लागेल इतकेंच काय तें या मसलतीचें स्वरूप होतें. मुधोजीचे कारकून व्यंकटराव काशी व लक्ष्मणराव काशी आणि दादासाहेबांच्या मर्जीतला सरदार सखाराम हरि हे तिघे परभू या कटाचे प्रथम उत्पादक होत. त्यांची उडी कांहीं फार मोठीशी नव्हती हें वर दाखविलेंच आहे. परंतु बडीं बडीं प्रस्थें जेव्हां या कटांत येऊन मिसळलीं तेव्हां पहिला रंग बदलून आतां निराळीच मसलत ठरली. ती हीच कीं, दादासाहेबांस कैदेंतून मुक्त करावयाचें इतकेंच नव्हे, तर नारायणरावसाहेबांस कैदेंत ठेवून दादासाहेबांस पेशवाईचे खावंद करावयाचें! भवानराव प्रतिनिधि, सदाशिव रामचंद्र, विठ्ठल विश्राम, चिंतो विठ्ठल व या सर्वांहून वरिष्ठ सखारामबापू इतके या मंत्रांत होते. सर्व व्यवस्था दादासाहेबांच्या संमतीनें चालली होती हें सांगावयास नकोच. येथें सखारामबापूचें नांव आह्मीं लिहिलें आहे खरें, तथापि या कटांत त्याचें अंग निसटतेंच—फक्त कानाडोळा करण्यापुरतेंच—असावें असें वाटतें. यापूर्वीं पुण्यांत पुष्कळदां फितूर झाले होते पण ते सर्व उघडकीस आले व या कटाचा मागमूस शेवटपर्यंत कोणास कळला नाहीं ही गोष्ट आश्चर्य करण्यासारखी आहे. सर्व गोष्टी फार जलद व अत्यंत गुप्तपणानें झाल्या असाव्या असें दिसतें. हा कट तयार होतो तों कांहीं दुष्ट लोकांनीं राज्यप्राप्तीसाठीं हपापलेल्या आनंदीबाईच्या संमतीनें

## नारायणराव पेशव्यांची कारकीर्द.

किंवा कदाचित् आज्ञेनें या कटाच्या आंत आणखी एक कट उभा केला. तो असा कीं, नारायणरावसाहेबांस कैद करण्याच्या भरीस न पडतां त्यांस ठार मारून टाकावें! हा कटाच्या आंतला कट खुद्द दादासाहेबांस किंवा सखारामबापूस किंवा वर ज्यांचीं नांवें लिहिलीं आहेत त्यांपैकीं कोणासही माहीत असावा असें आह्मांस अगदीं वाटत नाहीं. नारायणरावसाहेबांस धरण्याचें काम पेशव्यांच्या नोकरीस गारदी लोक असत त्यांच्या सुमेरसिंग, खरगसिंग, व महंमद इसब या तीन जमादारांवर सोंपविण्यांत आलें होतें. गारद्यांमध्यें मराठी माणूस कोणी नसावयाचेंच. रोहिले, हबशी, पुरभय्ये, आरब वगैरे परदेशी लोकांचा गारद्यांत भरणा असे. त्यांचें येथें घर ना दार. पैशासाठीं कोणाचीही मान कापावयास ते तयारच! त्यांस दादासाहेबांचा हुकूम स्वदस्तुरचा गेला त्यांत 'नारायणराव यांस धरावें' असें वाक्य होतें. परंतु पूर्वीं ठरल्याप्रमाणें आनंदीबाईनें तो हुकूम मागून घेऊन दादासाहेबांस न कळत त्यांतील 'ध' चा 'मा' केला!!! गारद्यांस साष्टी, नगर व पुरंदर हे तीन किल्ले व पांच लक्ष रुपये देऊं केलेले होते ही गोष्ट मागून प्रसिद्धीस आली. पण ही बक्षिसी दादासाहेबांनीं देऊं केली होती कीं आनंदीबाईनें? ही पेशव्यांस धरण्याबद्दल कीं मारण्याबद्दल? कीं अमुक केल्यास अमुक व अमुक केल्यास अमुक असें पूर्वीं ठरलें असून दोन्ही बक्षिसें गारदी मागत होतें हें कळत नाहीं. तर्कानें पहातां भवानराव व चिंतो विठ्ठल व सखारामबापूसारखीं माणसें ज्या अर्थीं या मसलतींत होतीं त्या अर्थीं पेशव्यांस धरण्याबद्दल पांच लक्ष रुपये देऊं केलेले असावे हेंच खरें. साष्टी, नगर व पुरंदर हीं महाराष्ट्राचीं नाकीं. हीं देणें ह्मणजे पर्यायानें गारद्यांस राज्यच देण्यासारखें होतें. ही गोष्ट कोणीही शहाण्या मुत्सद्यानें अथवा दादासाहेबांनींदेखील कबूल केली नसती. ही मसलत बायकांची व अत्याग्रहास पेटलेल्या मूर्ख लोकांची दिसते!

## नारायणराव पेशव्यांची कारकीर्द.

ही मसलत सिद्ध होण्यास इतर गोष्टीही दादासाहेबांस अनुकूळच होत्या. पावसाळ्यामुळें फौजेस घरीं जाण्यास निरोप मिळाला असल्यानें पुण्यास तीन चार हजारांपेक्षां अधिक फौज नव्हती. आपणास कोणी कैद करील किंवा जिवें मारील हें भय स्वप्नींही नसल्यामुळें नारायणरावसाहेबांना सावधपणा या बाजूनें नव्हता. दादासाहेबांची कैद कायम रहावी इतक्यापुरताच त्यांचा बंदोबस्त होता. दादासाहेब कांहीं फितूर करण्याच्या बेतांत आहेत अशी बातमी जरी लोकांस कळली असती तरीही कोणास त्याचें कांहींच वाटलें नसतें. कारण असे फितुर त्यांनीं पूर्वीं पुष्कळ वेळां केलेले होते. त्यांची मसलत फार झालें तर पळून जाण्याची व फौज जमवून दंगा करण्याची! ती त्यांनीं पूर्वी केलेली होती. तिनें काय इतकें विशेष आहे! गारदी दंगा करणार आहेत किंवा पेशवे कैद होणार आहेत या गोष्टीसुद्धां अश्रुतपूर्व होत्या असें नाहीं. सर्व फौजेंत गारदी लोक पराकाष्ठेचे माथेफिरू व कज्जेदलाल असल्यामुळें त्यांच्या कटकटी लष्करांत नेहमीं होत असत. खुद्द माधवराव पेशवे वर्षभर कैदेंत होते व दादासाहेब तर आज पांच वर्षें कैदेंत होतेच. पण गारद्यांच्या हातें पेशव्यांचा खून करण्यासारखी अंगावर शहारे आणणारी भयंकर मसलत कोणाही मराठी मुत्सद्याच्यानें कबूल करविली नसती व ती बाहेर फुटल्यावांचूनही कधीं राहिली नसती! यावरून बायकांच्या व अल्पबुद्धि दुष्ट लोकांच्या संमतीनें ही मसलत आयत्यावेळीं ठरली असावी हें निस्संशय होय.

भाद्रपद शुद्ध त्रयोदशी श० १६९५ (ता० ३० आगष्ट स० १७७३) या दिवशीं प्रातःकाळीं कुलाब्याहून नुकत्याच आलेल्या रघोजी आंग्र्याची भेट घेऊन पेशवे पर्वतीस देवदर्शनास जाऊन वाड्यांत आले. त्या दिवशीं गारद्यांच्या मनांत कांहीं दंगा करावयाचा

## नारायणराव पेशव्यांची कारकीर्द.

आहे ही बातमी पेशवे पर्वतीवर असतांच कोणी त्यांस सांगितली होती. व बरोबर हरिपंत फडके होते त्यांस त्यांनीं हुकूम केला होता कीं गारद्यांचा बंदोबस्त करावा. पण हरिपंतानें तत्काळ बंदोबस्त करण्याचें सोडून त्या दिवशीं त्यास कोठें जेवावयास जावयाचें होतें तिकडे तो गेला. भोजनोत्तर बंदोबस्त करावयाचा त्याचा बेत होता. गारद्यांचे दंगे नेहमीं होत असत. आजच्या दंग्यांत कांहीं विशेष आहे असें न वाटल्यामुळें त्यानें हलगर्जीपणा केला!

त्या दिवशीं बारानंतर दोन वाजण्याच्या सुमारास सुमेरसिंग, खरगसिंग व महमद इसब यांनीं हजेरीच्या निमित्तानें सात आठशें गारदी शनवार वाड्याजवळ गोळा केले. गारद्यांस पुढें काय करावयाचें हें आगाऊन ठाऊक असल्यामुळें त्यांनीं एकदम दरवाजावरच चाल करून तेथें पहारेकरी होते त्यांपैकीं कित्येकांस ठार मारिलें व कित्येकांस कैद केलें. तेव्हां बाकीचे पहारेकरी पळून गेले. आंतील चौक्यांचीही याचप्रमाणें गत करून ते गारदी हं हं म्हणतां सर्व वाडाभर पसरले. त्यांनीं एकसारखी लुटालूट व कत्तल करण्यास प्रारंभ केला. "लूट फार झाली. देवघर झाडून गेलें. स्वयंपाकांतील भांडींदेखील गेलीं. देवतार्चनाचें सामान, जडिताचे दागिने व सोन्यारुप्याचें फार होतें तें लुटलें गेलें. पितांबर आदींकरून फाडून घेतले. ब्राह्मण सात आठ असामी, दोन गाई, दोन कुणबिणी, यांखेरीज चौकीदार मारले गेले." सर्व वाडाभर गारद्यांचा अंमल बसला. त्यांची एक टोळी घेऊन सुमेरसिंग व महमद इसब पेशव्यांस शोधून काढून ठार मारण्याच्या इराद्यानें वाडा धुंडाळीत होते. श्रीमंत झोंपी होते ते गारद्यांचा दंगा ऐकून जागे होतात तों ते दुश्मान जवळ येऊन ठेपले. ज्याचा हुकूम होतांच लक्षावधि मराठ्यांच्या तरवारी म्यानांतून उपसल्या जाव्या व देशचेदेश ओसाड पडावे त्या पेशव्यांच्या जिवावर हा प्रसंग येऊन बेतला तेव्हां जवळ कोण होते तर एक दोन पुरभय्ये!!! ते तर गारदी

## नारायणराव पेशव्यांची कारकीर्द.

दृष्टीस पडतांच पळून गेले. त्यावेळीं नारायणरावसाहेब दादासाहेब कैदेंत होते त्या ठिकाणीं गेले व आपला प्राण वांचविण्यासाठीं त्यांची बहुत काकलूत करूं लागले. मला पाहिजे तर किल्ल्यावर कैदेंत ठेवा. नाचण्याची भाकर घालून ठेवा. तुह्मींच राज्य करा. पण कसेंही करून माझा प्राण वांचवा. याप्रमाणें बोलून त्यांनीं चुलत्याच्या गळ्यास घट्ट मिठी मारिली. तों सुमेरसिंग व महमद इसब व दुसरे गारदी मागून धांवत आले. तुळाजी पवार ह्मणून पेशव्यांचा एक खिजमतगार होता तो फितूर झालेला होता. दादासाहेब पुतण्यास न मारण्याविषयीं गारद्यांस सांगूं लागले. तेव्हां त्यांनीं उत्तर केलें कीं, आतां आह्मांस मागें सरतां येत नाहीं. पेशव्यांस तुह्मीं सोडा. नाहीं तर दोघेही मरून जाल! इतकेंच बोलून ते गारदी राहिले नाहींत. सुमेरसिंगानें तरवारीचा एक वारही केला. त्यानें दादासाहेबांच्या कपाळास व हातास जखम झाली. तेव्हां पेशव्यांस लोटून दिलें. तुळाजी पवारानें पेशव्यांचे पाय धरून त्यांस खालीं पाडिलें, तों चांपाजी टिळेकर ह्मणून एक विश्वासू खिजमतगार होता तो पेशव्यांच्या अंगावर पडून त्यांचा जीव न घेण्यासाठीं गारद्यांची प्रार्थना करूं लागला. पण ते कसचे ऐकतात! त्यांनीं पांच सात वार करून दोघांसही ठार केलें! इच्छारामपंत ढेरेही तेथेंच मारिला गेला.

याप्रमाणें गर्दी झाल्यावर वाड्यांत शहाजणें वाजूं लागलीं व गारद्यांनीं दादासाहेबांच्या नांवाची द्वाही फिरविली. दादासाहेब येऊन सदरेस बसले व चोपदारांकरवीं वाड्याचा बंदोबस्त करूं लागले. नारोबा नाईक ह्मणून नारायणरावसाहेबांच्या मर्जींतला कोणी मनुष्य होता त्यास सर्व गर्दी आटपून गेल्यावर दादासाहेबानीं गारद्यांकरवीं मारविलें व हरिपंत फडके सांपडल्यास त्याचीही दशा अशीच करीन असें बोलले. ती बातमी हरिपंतास कळतांच तो तात्काळ बारामतीस पळून गेला. नारायणरावसाहेबांची स्त्री गंगाबाई सती जाण्याविषयीं आक्रोश करीत

# नारायणराव पेशव्यांची कारकीर्द.

असतां आनंदीबाईनें तिला खोलींत कोंडून घातलें. वाड्यांत सर्वत्र नाकेबंदी गारद्यांची व दादासाहेब स्वतः गारद्यांच्या कैदेंत होते. याप्रमाणें फक्त देखावा दाखविण्यांत येत होता, कीं खरोखरच ते गारद्यांच्या ताब्यांत होते हें सांगतां येणें कठीण आहे.

वाड्यांत शिरून गारदी दंगा करीत असल्याची बातमी तत्काळ सर्व शहरभर पसरली. लोक घाबरून गेले व चोंहोंकडे पळापळ सुरू झाली. सखारामबापू, नानाफडणीस, त्रिंबकरावमामा, मोरोबादादा व इतर मुत्सद्दी कोतवालचावडींत जमा झाले व त्यांनीं स्वार जमा करून शहरची नाकेबंदी केली. हा बंदोबस्त झाला ह्मणून बरें, नाहीं तर गारद्यांनीं त्या दिवशीं शहर खचित लुटलें असतें. इतकें झालें तरी वाडा गारद्यांच्याच ताब्यांत होता व त्यांनीं दरवाजाचा पक्का बंदोबस्त केला असल्यामुळें आंत काय चाललें आहे याची बातमी बाहेर कांहींच फुटेना. वाड्यास तोफा लावून गारद्यांस जबरदस्तीनें बाहेर काढावें असेंही कोणी सुचविलें, पण विचाराअंतीं मुत्सद्यांस तोही बेत नापसंत वाटला. नारायणरावसाहेब अद्यापि जिवंत आहेत असें त्यांस वाटत होतें. यामुळें वाड्यांत दोन खासे, त्यांच्या बायका व इतर आप्त इष्ट असतां गारद्यांबरोबर त्यांच्याही जिवास अपाय होईल हें त्यांस भय होतें. अशा पंचाईतींत ते पडले असतां आंतून दादासाहेबांची स्वदस्तुरची चिठी सखारामबापूस आली कीं, "आतां व्यर्थ खटपट कशास करितां? चिरंजीव राव गारद्यांच्या कटकटींत मारिले गेले. मीही गारद्यांच्या कैदेंतच आहे. तुह्मीं आंत येऊन भेटून जावें." ही चिठी आल्यावर बापू आंत गेला व त्याची व दादासाहेबांची भेट झाली. नारायणरावसाहेबांस धरून कैद करावें येथपर्यंत मसलतीस बापूची संमति होती. पण तिचा तो भयंकर परिणाम झालेला पाहून त्याचें मन विटून गेलें. गारदी लोकांच्या रक्तानें भरलेल्या नागव्या तलवारी सम-

# नारायणराव पेशव्यांची कारकीर्द.

कत आहेत, प्रेतांचे ढीग व रक्ताचा सडा जागोजाग पडला आहे, श्रीमंतांच्या पदरचे बहुत दिवसांचे विश्वासू सेवक नाहक मारिले गेले आहेत, खुद्द नारायणरावसाहेब यांच्या शरीराचे तुकडे तुकडे होऊन गेले आहेत, रडारडीचा हलकल्लोळ माजला आहे, त्यांतच दादासाहेबांच्या नांवाचा जयघोष होत आहे, आनंदीबाई व त्या मंडळीपैकीं कांहीं क्षुद्र लोक यांचा धन्यवाद सुरू आहे, इत्यादि प्रकार पाहून बापूस काय वाटलें असेल याची कल्पना करावी ह्मणजे झालें! तो दादासाहेबांस बोलला.कीं, "आमचे शरीरीं समाधान नाहीं, आह्मीं घरास जातों. लेखणीचे धनी फडणीस. त्यांशिवाय आपलें चालावयाचें नाहीं. त्यांस बोलावून आणा." इतकें बोलून निरोप घेऊन तो घरीं गेला. नंतर नाना व मोरोबा फडणीस यांस बोलावून नेऊन पूर्वी तुह्मीं कामें करीत होतां त्याप्रमाणें करीत जावीं अशी ताकीद केली व मोरोबाकडून शिंदे, होळकर, गायकवाड, पवार, पटवर्धन वगैरे सरदारांस व प्रांतोप्रांतींच्या मामलेदारांस पत्रें लिहविलीं कीं, चिरंजीव नारायणराव गारद्यांच्या गर्दीत मारिले गेले. ईश्वरी इच्छेस उपाय नाहीं. तुह्मीं आपापल्या जागीं सावध असावें व मागून हुकूम येतील त्याप्रमाणें वर्तत जावें. सायंकाळीं त्यांनीं त्रिंबकराव मामांस बोलावून नेऊन नारायणरावसाहेबांच्या प्रेताची व्यवस्था करण्याची आज्ञा दिली. त्यावरून मामानें मध्यरात्रीस तें प्रेत नदीच्या कांठीं नेऊन दहन करविलें. प्रेत नेण्यापूर्वी परभूंनीं नारायणरावाची पिठाची मूर्ति करून तिजवर तो आपणापासून लिहून घेतलेला कतबा जाळून टाकिला असें एका परभू लेखकानें लिहिलें आहे तें बरोबर नाहीं. कारण स. १७८९ त परभूप्रकरण पुनः उपस्थित झालें होतें त्यावेळीं हा कतबा अस्तित्वांत होता व त्याच्याच आधारानें त्या वेळीं सवाई माधवराव यांनीं ठराव केलेला आहे. तो ठराव व त्यासंबंधाचा पत्रव्यवहार आह्मीं त्या सालचे कागद छापूं तेव्हां छापिला जाईल.

---

नं० १२३३ (मार्ग० शुद्ध.
नोवें० ते० पंच०.)

गोरो बल्लाळांनी पांडुरंगरावास पाठविलेल्या पत्राचा एक खंड.

"टका कावळा शिवला नाहीं. तेव्हां श्रीमंत राजश्री नारायणराव-साहेबांस पुत्र झाला तर माधवराव ह्मणून नांव ठेवावें ह्मणून उदक सोडिलें तेव्हां काकस्पर्श झाला. सपिंडी येथें करून पुण्यास सोमवारीं जाणार."

नं० १२३४ श्री. (१६ दिसेंबर.)

सेवेशीं गंगाधर बापूजी साष्टांग नमस्कार विनंती येथील क्षेम तागायत मार्गशीर्ष वद्य ६ पावेतों आपले कृपेंकरून वर्तमान यथास्थित असे. विशेष. आपण पत्रें पाठविलीं तीं पावलीं. कळलें वर्तमान लिहिणें ह्मणोन आज्ञा, त्यास आतां मनसब्याचें दरबारीं वर्तमान कळणें कळतच आहे! तत्रापि कळलें वर्तमान लिहिलें आहे. थेउरीं छ० ६ मिनहू-पर्यंत (?) होते. उत्तमप्रकारें क्रिया झाली. तेरा दिवस सर्व मासिकें वगैरे वर्षपर्यंत होणार तें उरकलें. शांतोदक झालें. ब्राह्मणभोजन दक्षणा पुण्यांतच झाली. लक्ष रुपयेपर्यंत सर्व साहित्यसुद्धां लागले. घांट थेऊरचा बांधण्यास प्रारंभ झाला आहे. तेच रात्रीस कूच करून पहाटे पांच घटका रात्रीस वाड्यांत आले. छ० ४ रोजीं एक दोन दिवस दुःखालालीं गेले. स्वारीस बाहेर एक दिवस गेले होते. बोलावयास बरोबर सरदार मुत्सद्दी असावे तें तो नाहींच! छ० ७ रोजीं गुरुवारीं अवशीचे दोन घटका रात्रीस बाहेर सेसरुपीस जाण्यास निघोन गारपिरानजीक राहिले. तेच दिवशीं दोन प्रहरा काय सूत्र झालें तें बाहेर कोणा एकास कळलें नाहीं. अकस्मातच त्रिंबक विनायक यांस सेरमुभा

---

१. पत्र पांडुरंगरावास पुण्याहून. २. सातार्‍यास. ३. वसईचा.

सांगतों ( असें ह्मणाले. ) वस्त्रें देखील आणविलीं. त्यापासून शिक्के कटार घेऊन ( त्रिंबक विनायक याच्या ) स्वाधीन केली व पागा व हत्तीसुद्धां ( विसाजीपंतापासून ) घेतलें. तें बापूस वर्तमान कळलें. तो येऊन रदबदल करूं लागला. त्यास तोडमोड ( श्रीमंत ) सांगूं लागले. तो फार रदबदल करूं लागला तेव्हां बेरे वजेनेच कडाडले. फारच टाकून बोलले. तेव्हां ( तो ) उठोन गेला. तेसमयीं वस्त्रें राहिलीं. स्वाधीन केलेलें तसेंच राहिलें. तेसमयीं विसाजीपंतास वर्तमान कळलें. लौकिकांतं बापूनें अंतरंग असें करावें अंतर्याम करावयास कारण आपण घरीं बसलों तेसमयीं हा कारभार करीतच होता यामुळें आह्मांस असें बोलतात. बाह्यात्कार असा दिसतो. हें अनुचित झालें. तेच दिवशीं या कल्पना झाल्या. तहकीक न कळे. छ० ८ रोजीं श्रीमंत दादांकडे भोजनासच गेले. साताऱ्यास जावें न जावें हे मसलत त्यांची होती. हे गेले. यांणीं बहुत प्रकारें मान देऊन सांगितलें. न याल तर तोही प्रकार सुचला तो सांगितला. तेव्हां त्यांनीं आड घातली जे "पंचवीस लक्षांचा सरंजाम देणें. आह्मीं चाकरी करूं." त्यांणीं साफ सांगितलें, "सरंजाम मिळत नाहीं. सर्व तुमचेंच आहे. मी 'देणें' मात्र करीन. आपण कारभार करावा." यांणीं कदाचित् अडावें तर काय करितील हें भय, आणि प्रकृति इकडे मिळाली तेव्हां मान्य करून बरोबर येतों ( असें ) कबूल केलें. छ ९ रोजीं प्रातःकाळीं सार कूच होऊन लोणीस आले. निघतेसमयीं त्रिंबक विनायकास वस्त्रें दिलीं. राजश्री नानाफडणिसांचा राग पूर्वीपासून वकील नामकावर होताच. हलीं मर्जीविरहित वेगळे श्रीमंत क्षण-

१. विसाजीपंतापासून. २. उत्तमप्रकारें. ३. 'लौकिकांतं' येथपासून 'असें बोलतात' पर्यंत या वाक्याचा अर्थ ध्यानांत येत नाहीं. ४. खरें. ५. दादासाहेबांची. ६. आनंदीबाई. तिचें मत नारायणरावाप्रमाणेंच पडलें. ७. वसईचा सुभेदार विसाजीपंत याबर. ८. नाना फडणीस.

भर रहात नाहींत. हरीपंत हेही समीप असतात. आपटे व भावे वगैरे हे पूर्वस्थितीस येतीलसें दिसतें. छ० १० रोजीं जेजुरीस मुक्काम झाला. आम्हीं सर्व मंडळीसुद्धां तेथें न आलों. राजश्री आबा पुण्यांत राहिले. (ते तेथें) कागदपत्र तयार करितात. बुधवारीं येणार, परंतु खरें नव्हे. छ० ११ रोजीं लोणंदचा मुक्काम झाला. छ १२ रोजीं सातारां दाखल कोसभर राहिला. सोळा कोस (कूच होऊन) मुक्काम झाला. छ १६ रोजीं सहा घटका दिवसास महाराज यांच्या भेटी झाल्या. येणेंप्रमाणें वर्तमान. तूर्त श्रीमंतांची मर्जी फारच उतावळी आहे. (ईश्वर) कसें पार पाडील न कळे! लहान माणसाची चाल पडेलसी दिसती. पीकपाणी इकडे फार चांगलें झालें. श्रीमंतांची कैद भारी. काल एका दोघांचे कान कापिले! रामाजीपंत बर्वे यांचे पुत्र याची चाल फार झाली आहे. त्यांणीं गेरवाका समजावून 'वामनराव (यांनीं) चाळीस माणसांची डांक ठेऊन मिरजेहून (दररोज) वांगीं आणून देतों ह्मणून कबूल केलें' ह्मणून श्रीमंतांस समजाविलें. त्यांणीं सांडणीचा प्यादा पाठविला. यांणीं रामाजीपंत साळ्याबरोबर सांगून पाठविलें जे, वांगीं आलीं नाहींत. पहातां अशी लबाड कारभार (असें श्रीमंतांस कळलें) तेव्हां राहिले. राजश्री नागोराम यास पागा व राऊत देऊन यवनांकडे रवाना करणार. पागा दिली. रवानगी होणें आहे. छ १४ रोजीं कूच करून माहुलीस जाणार होते. परंतु राहिले. बरोबर सौभाग्यवती गंगाबाई व आनंदीबाई आहेत. फौजेचा प्रकार तर जीव दिसत नाहीं. फौज बोलाविली परंतु रोजमुरा नाहीं. गारदी तर दूर केले. सय्यद इसफ गारदी मातबर शिपाई चांगला त्याजकडे फार्जीलें होतें त्याजपैकीं

---

१. फडके २. संघट्टन श्रीमंतांपाशीं. ३. मिरजेस व कृष्णाकांठच्या इतर गांवीं वांगीं फार चांगलीं होतात. ४. निजामअल्लीकडे. ५. सरकारचे देणें.

वीस हजार रुपये माफ करून घरीं बसविला. चार महिन्यांनीं चाकरीस बलाऊं तेव्हां यावें (असें त्यास सांगितलें.). बरोबर तोफा पांच आहेत. आम्हांबरोबरील लोकांस निरोप दिला. भोंसले नांदेडावर सात आठ हजार फौजेनिशीं आहे. यवन तर तेथेंच आहे. शत्रुच नसलिया फौजेचें प्रयोजन नाहीं! घाटाखालीं फिरंग्याचा शह आला याजमुळें नवे सुभेदार व बेवें रवाना केले. बरोबर शंभर राऊत व गाडदी शंभर येणेंप्रमाणें रवाना केले. छ० १७ रोजीं तीन घटका रात्रीस वस्त्रें श्रीमंत पंतप्रधानांस झालीं. सरलष्कर खंडेराव दरेकर व सेनाखासखेल गोविंदराव गायकवाड, मजमदार, चिटणीस, वाकनीस, (हेच कायम झाले.) न्यायाधीशी विठ्ठल शिवदेव यांस श्रीमंत दादानीं दिली होती ती दूर करून जुन्यास दिली. येणेंप्रमाणें वस्त्रें देविलीं. थोरली राणी व धाकटी राणी यांचे निरोप घेऊन डेऱ्यास आले. श्रीमंत राजे यांस खालीं ठेवावें ऐसें बोलणें झालें. येथून कोणीकडे जाणार हा निश्चय नाहीं. पुण्यास जाऊन गंगापुरास जाणार असें आहे. पुण्यास गेले, उत्तम. इकडे फिरूं लागले तर बरोबर फौज नाहीं. फौजेविना फिरणें वाईट असें आहे. घडेल तें खरें. विसाजीपंत लेले यांचे बायकोस पुत्र झाला. मेहुणीस कन्या झाली. तेव्हां मेहुणीस पुत्र देऊन कन्या घेतली. बारा दिवसांतील कारभार,[1] त्यास दोन महिने झाले. उभयतां पुरुषांस वर्तमान कळलें नाहीं. तों कन्या झाली ते गुणगुण मेहुणीचे भ्रतारास कळली. तो फिर्याद सरकारांत झाला. पुत्र माघारा घेतला. सरकार हिमाइतीनें सरकारांतून हा दोष माथां आरोप. आधींच अवकृपा. दीड लक्ष पाऊण लक्ष रुपये घेतले असें बोलतात. हें एक वर्तमान. छ. १९ रोजीं वाईस लग्नास रास्ते यांचे घरीं गेलों. पुढें वर्तमान होईल तें लिहून पाठवितों. हे विज्ञापना.

---

१. हा कारभार बायकाबायकांतच झाला.

नं० १२३९ श्री. ( मार्ग. वद्य ६.
१६ दिसेंबर. )

पुरवणी. साष्टांग नमस्कार विज्ञापना. इकडील मजकूर मार्गशीर्ष शुद्ध नवमीस पुण्याहून निघून साताऱ्यास आलों. राजश्री विसाजीपंत लेले सरसुभेदार यांचा सुभा काढून राजश्री त्रिंबकराव विनायकांस सांगितला. वस्त्रें दिलीं. वीस लक्ष रुपये तेजकरा झाला. तारूं सांपडलें होतें त्यापैकीं अठरा लक्ष व प्रांतांतील दोन लक्ष. वीस लक्षपैकीं ठरतील तें खरें! श्रीमंत राजश्री दादासाहेब व नारायणराव असे एकत्र होऊन एक जागांच असतात. थेऊराहून पुण्यास गेले ते समयीं गांवाबाहेर राहिले. मग उभयतांची आणभाक जाहली कीं, देवपूजा, स्नानसंध्या, भोजन, एक जागां. निद्रा मात्र निराळी. स्वारींत चालणें तें दादासाहेब पुढें, राव मागें. 'द्यावें' दादासाहेब करितात. 'देणें' राव करितात. याप्रमाणें तूर्त चालत आहे. पुढें काय होईल पहावें. येथें वस्त्रें राज्याचीं ध्यावयाकरितां मार्गशीर्ष शुद्ध १९ स साताऱ्यास आले. तेच दिवशीं (महाराजांची) भेट झाली. शहराचे बाहेर डेरे देऊन राजास येथें आणून भेटोन मग किल्यापर्यंत जाऊन माघारे आले. वस्त्रांचा मुहूर्त मार्गशीर्ष वद्य ४ रविवारीं आहे. वस्त्रें घेऊन मग एक मनसबा कीं दोन महिने गंगापूर पंढरपूर इतक्यांत असावें. दुसरा मनसबा पुण्यास जावें आणि श्रीमंत भाऊसाहेब कैलासवासी यांसी जाऊन पौष मासीं बारा वर्षे होणार, त्यांचें उत्तरकार्य करून माघ मासीं दादासाहेबांचे कन्येचें लग्न करावें. असा मनसबा आहे. घडेल तो पहावा. श्रीमंत राजश्री आबासाहेब मागें पुण्यास राहिले आहेत. हिशेबाकरितां मागें राहिले. मवा बेहडा तैनात जाबता दुसरचा करून घेणार (तो)

---

१. मागचें पत्र लिहिणारानेंच हें पत्र लिहिलें आहे. २ सरकारी पैशाची अफरातफर. ३. मोरो बल्लाळ.

येथें बिल्हेस लावणार. नाना फडणीस यांस (आबाचें) पत्र आलें होतें. त्यांणीं लिहिलें आहे कीं हिशेब घेऊन येणें. त्यावरून पत्रें गेलीं आहेत. ते येतील. आल्यानंतर येथून निरोप घ्यावा असा अर्थ आहे. परंतु निरोप होतां दिसत नाहीं. नारायणरावसाहेब यांची मर्जी बाबासाहिबांवर बरीच आहे. सखारामबापू याणीं कोकणस्थांवर बहुत रागेच आहेत. हे[२] कांहीं त्यांचें आर्जव करीत नाहींत. नाना फडणीस यांचे साहित्यावर आहे. कळावें. बहुत काय लिहिणें हे विज्ञापना.

नं० १२३६ **श्रीगणराज.** (१६ दिसेंबर.)

तीर्थस्वरूप राजश्री आबा वडिलांचे सेवेशीं.

अपत्यें वामनराव साष्टांग नमस्कार विनंती. येथील कुशल तागायत मार्गशीर्ष वद्य ६ भौमवासर मुक्काम सातारानजीक दक्षिण वेण्या तीर वर्तमान यथास्थित असे. विशेष. श्रीमंतांच्या व महाराज स्वामींच्या भेटी झाल्याचें वृत्त पेशजीच्या पत्रीं लिहिलें आहे त्याजवरून कळलें असेल. पेशवाईचीं वस्त्रें चतुर्थी रविवारीं तीन घटका झालीं. नववे घटकेस श्रीमंत डेऱ्यास आले. उपरांत तमाम सरदार वगैरे लोकांनीं नजराणा केला. मजमदार, चिटणीस, वाकनीस, यांसही वस्त्रें तेसमयीं दिलीं. मुतालकीचीं वस्त्रें राजश्री बैजाबास दिलीं. पेशजी न्यायाधीश होते त्याजकडून (तें पद) दूर होऊन विठ्ठल शिवदेव यांस वस्त्रें श्रीमंत राजश्री दादासाहेबीं देविलीं होतीं ते प्रस्तुत त्यांजकडून दूर होऊन ज्याचीं त्यांजकडे करार झालीं. त्यांसच वस्त्रें दिलीं. आपणास कळावें म्हणून लिहिलें असे. आपणास निघून यावयाविशीं मागें लिहिलें आहे त्यास वडील निघालेच असतील. सत्वरच यावें. आपल्या येण्याची

---

१. वामनराव. २. पटवर्धन वामनराव वगैरे. ३. पुरंदरे.

मार्गप्रतिक्षा करितों. राजश्री आनंदरावदादांचे घरीं लग्न. त्यांणीं फार आग्रह केला. राजश्री आपासींही वचन गुंतलें होतें. त्यांस श्रीमंतांनींही सांगून पाठविलें कीं " जावें. एक दिवस राहून सत्वर यावें. " त्यावरून आज वांईस गेलों. उदईक सायंकाळास येऊं. श्रीमंत महाराज यांस श्रीमंत रावसाहेब उदईक डेऱ्यास आणून मेजवानी करणार आहेत. भृगुवारीं निरोप घेणार. परंतु नवमीस राजश्री बजाबाचे घरीं लग्न आहे त्यास तोंपावेतों येथेंच राहतील. कळावें. करकंबेहून राजश्री बाळाजीपंताचीं पत्रें आलीं ते पाठविलीं आहेत. घ्यावीं. बहुत काय लिहिणें हे विनंती.

नं १२३७ श्रीगणराज. ( ११ दिसेंबर. )

चिरंजीव राजश्री तात्या यांसी प्रती वामनराव गोविंद. आशीर्वाद. उपरी येथील कुशल तागायत मार्गशीर्ष वद्य ६ भौमवार मुक्काम सातारा वेण्या दक्षिण तीर जाणोन स्वकीय कुशल लिहिणें. विशेष. तुह्मीं पत्रें पाठविलीं ती पावलीं. लिहिला मजकूर कळला. तीं पत्रें तीर्थस्वरूप राजश्री आबाकडे पुण्यास पाठविलीं आहेत. वडील दोन चार रोजांत येतील. श्रीमंत राजश्री नारायणरावसाहेब यांस पेशवाईचीं वस्त्रें शिक्के कट्यार व जरीपटका काल चतुर्थी रविवारीं तीन घटका रात्रीस महाराजानीं दिलीं. श्रीमंत राजश्री दादासाहेबही समागमें होते त्यांसही वस्त्रें दिलीं. नव घटका रात्रीस डेऱ्यास ( परत ) आले. तमाम सरदार व मुत्सद्दी यांनीं नजरा केल्या. येथें नवमीपर्यंत मुक्काम आहे. महाराजांस गुरुवारीं श्रीमंत डेऱ्यास आणून मेजवानी करणार आहेत. भृगुवारीं श्रीमंत निरोप घेणार. मास पक्ष महादेवाच्या

---

१. ज्यांच्याशीं आनंदराव रास्त्यांची सोयरीक व्हावयाची होती ते आपा बळवंत मेहेंदळे. २. पत्र पांडुरंगरावास मिरजेस. ३. आबा.

सुमारें रहावें, बनल्यास पंढरपूरपर्यंत जाऊन देवदर्शन घेऊन पुण्यास यावें, हा मजकूर आहे. आह्मांकडील सवालजबाब अद्याप नाहींत. पहिलाच दिवस आहे! तीर्थस्वरूप राजश्री आबा आलियावर निरोपाचें पुसूं. यंदां फौज ठेवण्याचा प्रकार दिसत नाहीं. किरकोळ सरंजामी लहान मोठे यांचा कोणाचा अद्याप सवालजाब नाहीं. येथून कूच जाहलियावर सवालजाब बोलतीलसें दिसतें. राजश्री विसाजीपंत वसईचे सुभेदार यांजकडील मामलत दूर करून सरसुभा देखील राजश्री त्रिंबक विनायक यांस सांगितला. सरसुभ्याचीं वस्त्रें झालीं. कोंकणप्रांतीं फिरंग्यानें दंगा मांडिला आहे. चार पांच सर्या[1] मातबर शिवाय गलबतें असें सामानसुद्धां विजयदुर्ग रत्नागिरी येथील बारियांवर समुद्रांत जाहे. अद्याप तोंड कोठें टाकिलें नाहीं. किल्ल्यांच्या बंदोबस्तास कांहीं फौज व गारदी असें सामान हुजूराहून रवाना केलें आहे. त्रिंबक विनायकही तिकडे रवाना होणार. एक दोन दिवसांत मशारनिल्हेची रवानगी कोंकणांत होईल. आजी आह्मीं वांईस रास्ते यांचे घरीं लग्नास गेलों. उदईक माघारे येऊं. बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद.

नं० १२३८ **श्रीगणपति.** ( मार्गशीर्ष वद्य. दिसें. दु. पंध. )

अपत्यें साष्टांग नमस्कार विनंती उपरी. श्रीमंतांनीं महाराजांस गुरुवारीं मेजवानी केली. डेऱ्यास आणिले. भोजनें झालीं. उपरांत जड जवाहीर दिलें. मोत्याची कंठी, तुरा, जेगा, शिरपेंच याखेरीज पांच पोषाक उंच दिले. महमदअलीखान याणीं पालखी पाठविली ते नऊशें होनांची दिली. हत्ती घोडा येणेंप्रमाणें दिलें. फार उदारता केली.

१. तिर्कटी तारवें लढाऊ.

महाराज फारच संतोषी होऊन शहरांत गेले. संध्याकाळचे श्रीमंत साताऱ्यास जाऊन उभयतां बाईसाहेबांस वस्त्रें जवाहीर दिलें. नित्य महाराजांकडे श्रीमंत जात असतात. उदईक रविवारीं महाराजांचा निरोप घेणार आहेत असें आहे. कूच रविवारीं किंवा मंगळवारीं व्हावें असें आहे. आपण आतां सत्वर यावें. बहुत काय लिहिणें हे विनंती.

नं० १२३९ (मार्ग० वद्य २ १२ दिसेंबर.)

वामनराव यांचें मोरो बल्लाळ यांस पत्र (पै॥ १६ रमजान) साताऱ्याहून पुण्यास.

"येथून निरोप झाल्यावर श्रीमंतांनीं महादेवाकडे वैरणीची सोय पाहून चार दिवस क्रमावे असा मजकूर आहे. पौषअखेर पुण्यास जातील. माघमासीं श्रीमंत राजश्री दादासाहेबांचे कन्येचें लग्न, तेव्हां माघारे जाणार. लांब जाण्याचा मजकूर कांहीं दिसत नाहीं. गुदस्तां फिरंगी यांचा बिघाड झाला होता याजकरितां फिरंगी यानें पांच मुचा वगैरे जहाजें घेऊन विजयदुर्ग रत्नागिरी या बारियांवर येऊन राहिला आहे. तिकडील बंदोबस्त होतच आहे. चिरंजीव राजश्री भाऊ भीमाशंकराहून आलेच असतील. ते (व) तुह्मीं सत्वर येण्याचें करावें. निःकारणीक आतां लष्करांत खर्च खात फिरण्याचें कांहीं प्रयोजन दिसत नाहीं. मित्ती मार्गशीर्ष वद्य २ भृगुवार चार घटका दिवस."

नं० १२४० (मार्ग० वद्य. दिसें० दु० पंध०.)

पांडुरंगरावाचें वामनरावास पत्र मिरजेहून साताऱ्यास. पै॥ २६ रमजान.

"राजश्री विसाजिपंताचा मामला निघाला ह्मणून लिहिलें तें कळलें. तरांडीं फिरंग्यांचीं आलीं आहेत याजकरितां धुळप यांसही निरोप झाला ह्मणून लिहिलें तें कळलें. तरांडीं आलीं होतीं खरींच. परंतु कृष्णाजी धुळप बाहेर निघोन लढाई होऊन मालवण पार पावेतों पाठलाग केला ह्मणून कोंकणांतून मनुष्य आला त्यानें उडतें सांगितलें. फत्तेचें वर्तमान कळलें तें लिहिलें. तिकडेही दिनवृत्त आलेंच असेल."

नं० १२४१ (पौष शुद्ध २.
२६ दिसेंबर.)

पांडुरंगरावास वामनरावाचें पत्र (पै॥ १ सवाल.)

"तुह्मांकडे पत्रें पाठवावयास साताऱ्याचे मुक्कामास लिहून तयार केलीं इतक्यांत तेथून कूच झालें ते दहीगांवास आलों. आजचा दिवस मुक्काम आहे. काल श्रीमंत वांईस गेले आहेत. आज येथें येतील. उदईक कूच होईल. पुण्यास गेल्यावर तेथून श्रीमंत गंगापुरास श्रीमंत मातुश्री बाईसाहेबांकडे जाणार."

नं० १२४२ श्रीगणराज. (पौष शुद्ध २.
२६ दिसेंबर.)

पुरवणी आशीर्वाद उपरी. दिल्लीहून गाजुदीनखान वजीर श्रीमंतांच्या भेटीस्तव आला आहे. समागमें दोन अडीचशें राऊत आहेत. बाहेर उतरला आहे. काल उभयतां श्रीमंत त्याचे भेटीस काल जेथें उतरला होता तेथें गेले होते. समागमें आह्मांसही बोलावून नेलें होतें. भेटी झाल्या. कळावें. बहुत काय लिहिणें. हे आशीर्वाद.

---

१. वामनरावाचें पांडुरंगरावास पत्र.

नं० १२४३ ( १२ जानेवारी. )

गंगाधर बापूजी फडणीस यांचें केसोपंत व रामचंद्रपंत यांस
पत्र पुण्याहून पौष वद्य पंचमीचें.

"इकडील वर्तमान तर आह्मीं हिशेब लिहून तयार केले आहेत परंतु पुसत कोणीच नाहीं! श्रीमंत सौभाग्यवती पार्वतीबाईचा विधि[1] (न्हावण्याचा, त्याविषयीं बोलणें) तिजपासून कांहींच नाहीं! परंतु (श्रीमंतांस) वस्त्रें झालीं सातान्यास त्या दिवसापासून मुख्य कारभारी व धेणी जेष्ठ इतक्यांचे मनांत होतें जे, 'विधि उरकावा.' परंतु कनिष्ठ यांचे मनांत नव्हतें. त्याचे पर्याय बहुत आहेत. तेव्हां पुण्यांत येऊन वचनें काढून सिंहस्थपावेतों राहविलें. त्यास (पार्वतीबाईस) विचारून करावें असा मनसबा होता, परंतु तीं ह्मणणार जे "पर्वतवासी (तोतया) आणून फडशा करून टाकणें. मग विधि उरकून टाकावा." परंतु तें झालेंच नाहीं. [3]सकारनामकाचे मनांत विधि उरकून मग ब्राह्मणांस सांगावें असें आहे. कारभारी यांचें व फडणीसांचें विसाजी केशव लेले यांजमुळें वांकडें आलें आहे. फडणीसांचें घर कारभारसंबंधें राहिलें. तेरीख मात्र घालावी, (इतकें करितात.) श्रीमंतांचा प्रकार तर—बालकृष्णच आहे! परंतु केवळ कारभारी यांचे स्वाधीन नाहीं. आमचे येथील तर कांहींच पुसूंच नका! बारीक सारीक गोष्टींतसुद्धां कारभारी यांस पुसावें लागतें! असो. + श्रीमंत रावसाहेब गेले याजमुळें सर्वच फसल्यासारखें झालें आहे. वाघ गेला! सारीं कोल्हीं राहिलीं आहेत! ईश्वर सत्ताप्रमाण!"

. . .

१. सौवळी करण्याचा विधि. २. एकूण पार्वतीबाईस सोंवळी करण्याचा आग्रह दादासाहेब व सखारामबापू यांचा! ३. सखारामबापूचे मनांत बळजबरीनें हा वपनविधि उरकून घ्यावयाचा होता! + माधवराव पेशवे.

नं० १२४४ **श्रीगणराज.** ( पौष वद्य २
१० जानेवारी. )

आशीर्वाद उपरी श्रीमंत राजश्री दादासाहेबांचे कन्येचें लग्न माघमासीं होणार. वर राजश्री बाबूजी नाईक यांचा मूल नेमिला. साहित्य तेडका होत आहे. क्रियेचा[3] प्रकार तूर्त राहिलासा दिसतो. कळावें. हिंदुस्थानांतील वर्तमान तर---पातशहानें राजश्री विसाजीपंत यांसीं बिघाड केला तेव्हां उभयतांत युद्ध व्हावें ही तयारी परस्परें होऊन (लढाई) स्वल्प झाली. पातशहाही जमावानिशीं (दिल्ली बाहेर येऊन) उतरला होता. फौज सामान्यच होती. (आमच्या फौजांनीं ती) लुटून टाकिली. हत्ती तोफखाना यांजकडे (लुटींत) आला. खासा किल्ल्यांत पळोन गेला. यांनीं शहराबाहेर चौक्या देऊन बसले आहेत. आंतून मध्यस्थही बोलावयास आला आहे. तह ठरल्याचें वर्तमान अद्याप कांहीं आलें नाहीं. बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद.

नं १२४५ **श्रीगणराज.** ( पौष वद्य २
१० जानेवारी. )

पै॥ छ १६ सवाल मुरुसन सल्लास मय्या व अल्लफ.

पु० आशीर्वाद उपरी. आह्मांकडील सवालजाब अद्यापवर बोलण्या चालण्यांत कांहीं नाहीं. आह्मीं नित्य दरबारास जात असतों. मर्जी पहातां लवकर निरोप देऊं नये असाच डौल दिसतो. बरें! येथील ऋणानुबंध किती दिवस आहे तेथवर राहणें होईल! श्री इच्छा प्रमाण! प्रस्तुत श्रीमंत गंगापुरासही जात नाहींत असें दिसतें. श्रीमंत राजश्री दादासाहेब मोरेश्वरास मागें चार दिवस राहिले होते. नवमी स्थिरवारीं प्रातःकाळच्या सात घटका दिवसास येथें आले.

---

१. हें व यापुढचें हीं दोन्ही पत्रें वामनरावाचीं पुण्याहून पांडुरंगरावास मिरजेस.
२. बापाल्यानें. ३. पानपतांत मृत्यु पावलेल्या भाऊसाहेबांची क्रिया.

आदले दिवशीं कातरजेस येऊन राहिले होते. दुसरे दिवशीं श्रीमंत तेथे जाऊन त्यांस घेऊन ( दोघे ) एके अंबारींतच बसून वाड्यांत आले. कळावें. श्रीमंत राजश्री दादासाहेबांचे कन्येचें लग्न माघमासीं करावें ह्मणतात. परंतु दादासाहेबांचे चित्तीं भाऊसाहेबांची क्रिया झाल्या-शिवाय आधीं लग्न करूं नये. यंदां क्रिया करून पुढें मार्गशीर्षांत लग्न करावें. श्रीमंत राजश्री रावसाहेबांचे मानस आंवदा माघांत लग्नकार्य करून पुढें चैत्रांत क्रिया करावी. याप्रमाणें दोघांचीं दोन मतें आहेत. अद्याप निश्चयांत एकही आलें नाहीं. हल्लीं याच गोष्टीचा शास्त्रार्थ पडला आहे. ठरेल तें मागाहून लिहून पाठवूं. बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद.

नं० १२४६ **श्रीगणराज.** ( पौष वद्य प्रतिपदा.
( ८ फेब्रुवारी. )

पु० चिरंजीव राजश्री तात्या यांसी आशीर्वाद उपरी. शुद्ध द्वितीयापासून गांवांत आमंत्रणास श्रीमंत राजश्री रावसाहेब खासाच पन्नास पाऊणशें घरांस पायउतारा गेले होते. तशाच बायकाही गेल्या होत्या. आमचे घरास आमंत्रणाकरितां आले होते ते दिवशीं शेलापागोटें व महमुदी व किनखाप याप्रमाणें सणगें दिलीं. बायकांसही लुगडें दिलें. गडगनेरास श्रीमंतांस येण्याविषयीं विनंती केली होती ( ती ) मान्य करून चतुर्दशीस रात्रौ उभयतां श्रीमंत आले होते. समागमें राजश्री नाना फडणीस व बजाबा व हरीपंत फडके व कृष्णराव बल्लाळ व त्रिंबकरावमामा व शास्त्री व कारभारी यांचे पुत्र यांखेरीज पुराणीक व उपाध्ये

१. पत्र मोरो बल्लाळ यांचें पांडुरंगरावास. २. दादासाहेब यांच्या मुलीचें बाबूजी नाईक यांच्या मुलाशीं लग्न नेमिलें होतें त्याच्या आमंत्रणास. ३. नारायणराव पेशवे. ४. सखारामबापूचे.

वगैरे बोलाविले होते. सर्वत्रांस दुहेरी वस्त्रें दिलीं. श्रीमंत दादासाहेब रात्रौ भोजन करीत नाहींत. एरवींच आले होते. रावसाहेबांनीं मात्र भोजन केलें. उभयतांस वस्त्रें दोन पोषाक दिले. बायकांसही बोलवावें तर दिवसच वांटणीस येईनात, याजमुळें बायकांचें येणें न झालें. लग्न नवमीसच होणार होतें परंतु सप्तमीस श्रीमंत सौभाग्यवती आनंदीबाई अस्पर्श झाली याजमुळें पौर्णिमेचा निश्चय करून द्वादशीस सीमंतपूजन झालें. चतुर्दशीस देवदेवक. काल पौर्णिमेस आवशीस दहा घटिका रात्रीस लग्न झालें. कळावें. गांवांतही लग्नें घरोघर बहुतच झालीं. आणखी होतच आहेत. आह्मीं येथें राहिलों याजकरितां सर्वांचीं आमंत्रणें येतात याजमुळें अहेर करणें प्राप्तच झालें. राजश्री लक्ष्मण कोन्हेर यांचे घरीं लग्न झालें यास्तव चिरंजीव सौभाग्यवती सीताबाई येथें आली आहे. राजश्री त्रिंबकराव परचुरे यांचे मुलीचे लग्न पौर्णिमेस झालें. शरीरसंबंध आबाजीपंत भिडे वसईचे मजमदार यांसी झाला. आमंत्रणास तीर्थरूप सौभाग्यवती बयाबाई आली होती. आह्मांस येथून (त्या लग्नास जाण्यास) निरोप होणार नाहीं ह्मणोन (श्रीमंतांनीं) सांगितलें. दोनी लग्नें एकच मुहूर्तांची यास्तव तळेगांवास जातां नये. श्रीमंत निरोप देत नाहींत ह्मणून जाणें झालें नाहीं. बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद.

नं० १२४७ **श्रीगणराज.** (पौष वद्य प्रतिपदा. ८ फेब्रुवारी.)

पुरवणी चिरंजीव राजश्री तात्या यांसी प्रती मोरो बल्लाळ आशीर्वाद उपरी. करवीरवासी यांनीं कांहीं जमाव केला आहे व करितात असें तुह्मीं पेशजीचे पत्रीं लिहिलें होतें, त्यास अलीकडे तिकडील वर्तमान कळत नाहीं. जमाव किती केला आहे, मसलत काय आहे, ही बातमी ठीक माणूस पाहून पाठवावी. वरचेवर तिकडील बातमी राखोन लिहीत

जावें. चिकोडी मनोळी द्यावयाचा करार पहिला झाला होता तो लांबणीवर रावसाहेब वारल्यामुळें (पडलासा) दिसतो. सिद्धीस जाईल असें दिसत नाहीं. कारभारी सरकारांतून करवीरास द्यावा असें श्रीमंतांचें मानस आहे. कसकसा ठराव होईल पहावें. मुसनफा तेथें जामदारखान्यांत आहेत त्यांपैकीं एक मुसनफा चिरंजीव राजश्री बाळाकडे पागेची घोडी आहे त्यास पाहिजे. तर तीस रुपयेपर्यंत मुसनफा एक पाठवून द्यावी. बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद.

नं० १२४८ (चैत्र शुद्ध २. २५ मार्च.)

परशुरामभाऊनें पत्र मोरो बल्लाळास गंगापुराहून पुण्यास १ मोहरमचें.

"राजश्री नारो शंकर मालेगांवाहून निघून येथें श्रीमंतांचे भेटीस आले. आह्मीं परवां (त्यांच्या) भेटीस गेलों होतों. वृद्धपणामुळें फारच शरीर गेलें आहे असें दिसतें. श्रीमंत पौर्णिमा करून येथून निघणार अशी वदंता आहे."

नं० १२४९ श्रीगणराज. (चैत्र शुद्ध. मार्च. दु. पंध०.)

आशीर्वाद उपरी. श्रीमंत गंगापुरास गेले, मागें कोणी नाहीं, हीं संधि पाहून श्रीमंत दादासाहेब याणीं बाहेर निघून जावें हा मनसबा करून जागां जागां फौजही गुप्तरूपें ठेविली. आणि हैदरखानाकडीलही येथें वकील आहेत त्यांचे विचारें पत्रें राजकारणाविशींचीं पाठविलीं. बाहेर निघून जावें इतक्यांत वर्तमान प्रगट झालें. तेव्हां येथें कारभारी

---

१. अव्यवस्थित संस्थानिकाच्या गळ्यांत आपल्या तर्फेचा कारभारी बांधण्याची चाल इंग्रज सरकारचीही आहेच! २. पत्र मोरो बल्लाळ याचें पांडुरंगरावास.

राजश्री नारो आपाजी होते त्यांनीं तमाम चौकी पहारे ठेऊन बंदोबस्त केला. वाड्यासभोंवते खडे पहारे गारद्यांचे उभे केले. तेव्हां रकारपूर्वक नारो आपाजीस बोलूं लागले कीं, पहारे कायनिमित्य उभे केलेत? आह्मींच जाणार जाहल्यास कोण नको ह्मणणार येथें आहे? आह्मीं आजच निघून जातों. ह्मणोन डेरे बाहेर दिले. तेव्हां राजश्री कृष्णराव बल्लाळही येथें होते. चार गोष्टी समजून सांगून गंगापुराहून स्वारी येई तोंपर्यंत जावयाचें करूं नये याप्रमाणें सांगून राहविलें. तेव्हां जागां जागां राऊत मिळाले ते जिकडील तिकडे निघून गेले. कांहीं सरकारांत सांपडले ते कैद करून घोडीं पागेस लाविलीं. हें वृत्त गंगापुरास श्रीमंतांस कळलें तेव्हां श्रीमंतही आले. येतांच हैदरखानाकडील वकील आपाजीराम यांस डेऱ्यास बोलावून नेऊन रुबरू शिवीगाळ केली. त्याचा दस्तऐवज सांपडला सबब त्याचे पायांत बेडी घालून पुरंदर किल्ल्यांत कैदेंत ठेविला. आणखी चौकशीमुळें कोणकोण उमगतात पहावें. पुढें होईल तें लिहून पाठवूं. बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद.

नं० १२५० **श्रीगणपति.** ( १४ मार्च. )

श्रियासह× चिरंजीव राजश्री तात्या व गंगाधरराव यांसी प्रती परशुराम रामचंद्र आशीर्वाद उपरी येथील कुशल तागायत फाल्गुन वद्य ६ मंदवारपावेतों मुक्काम पुणें येथें सुखरूप असों. विशेष. तुह्मीं पत्र पाठविलें तें पावोन लिहिलें वर्तमान कळलें. " दिवसगत लागावयाचें कारण काय, पहिले काय ह्मणत होते, हल्लीं काय ह्मणतात, बोलण्यांत तफावत किती, हें सविस्तर लिहावें " ह्मणून लिहिलें, ऐशास दरबारच्या बोलण्यांत सालमजकूरची आफत पावसाची आहे ही परिछिन्न मजुरा न द्यावी. कमाल सालची बेरीज घ्यावी. आह्मांकडील बोलण्याचा प्रकार

---

१. रघुनाथराव दादासाहेब. × हें पत्र दोन नंबर आधीं पाहिजे. याचें साल श० १६९४ आहे.

तरी आफत मजुरा द्यावी. जातीने व पागांने सरदारी खर्च द्यावे आणि बाकी राहील ती ध्यावी. हें त्यांचे विचारास येत नाहीं. कारभारी यांचें मत पहिल्यापासून विरुद्धच. त्यांचे मनापासून हरकसेंही करून फसवावें. आह्मामुळें कोणाचा फडशा करीत नाहींत. श्रीमंत तो अद्यापि कांहीं समजत नाहींत! ( त्यांस ) आपपर हें पुरतें कळलें नाहीं. जे कारभारी करितील तेंच प्रमाण! असा प्रकार आहे. ते मागतात त्याप्रमाणें पैका द्यावा तरी चार पांच लक्ष रुपये आफती आहे व मागेंही कर्जें बहुतकरून बुडालीं. पुढें करावें तरी कोणी बघणार नाहीं. आणि श्रेयस्करही नाहीं. व धणियांत पुरतें धणीपण नाहीं, कारभारी आहेत त्यांचा ऋणानुबंध कळतच आहे, या अर्थे लांबणीवर पडलें आहे. कोणाचें आर्जव करावें तरी तें ठीक नाहीं. लौकिकही चांगला रहाणार नाहीं आणि कार्यही होणार नाहीं. फजिती होईल कीं 'राव' गेले. त्यांचे मागें हे घरोघर फिरों लागले.' यास्तव आह्मीं कोठें बाहेर जात नाहीं. आपले घरीं स्वस्थ श्रीमंत बोलावितील तेव्हां दरबारास जाऊन आहों. प्रस्तुत गंगापूराकडे जाणार. आह्मींही समागमें जात आहों. कारभारी यांचे मतें पेस्तर ( आमची ) फौज ठेऊं नये, आह्मांशीं घासावें, असें आहे. 'हिंदुस्थानांत जा' ह्मणावें असे कित्येक बोलण्याचे उद्गार आहेत! यांत श्री परिणाम लावणार! हरीसत्तेस इलाज नाहीं. श्रीनें निर्मिलें असेल तदनुसार घडेल. येथून गेल्यावर विशेष वर्तमान आढळेल तें मागाहून लिहून पाठवितों. बहुत काय लिहिणें लोभ असों दीजे हे आशीर्वाद.

नं० १२५१ **श्रीगणराज.** ( २५ मार्च. )

तीर्थस्वरूप राजश्री आबा वडिलांचे सेवेशीं.

अपत्यें वामनानें कर जोडून साष्टांग नमस्कार विनंती. येथील

---

१. गोपाळराव.

कुशल तागायत चैत्र शुद्ध द्वितीया गुरुवासर मुक्काम गंगापूर येथें आपले आशीर्वादेंकरून समस्त मंडळी सुखरूप असो. विशेष. आपला निरोप छ० २१ रोजीं घेऊन निघालों ते खेडचे मुक्कामीं आलों. छ० २२ रोजीं ओतुरास सतरा कोस आलों. छ० २३ थुगांव. छ० २४ रोजीं सिन्नर. छ० २५ रोजीं मौजे मजकुरास दाखल झालों. सायकाळचे च्यार घटका दिवसास श्रीमंतांची भेटी घेतली. आपली प्रकृति श्रीमंतीं विचारिली. 'आले नाहींत कां' ह्मणून विचारिलें, त्याजवरून सांगितलें कीं, प्रकृत बिघडली ह्मणून न आले. श्रीमंत मातुश्री बाईची[1] भेटी ते दिवशीं झाली नाहीं. दुसरे दिवशीं सायंकाळीं भेटी मात्र झाली. परंतु कांहीं बोलिली नाहींत. त्याजवर आपणाकडे पत्र पाठवावें, त्यास ग्रहण कर झालियामुळें पत्र न पाठविलें. कालही मागती श्रीमंतीं विचारलें कीं, आपली प्रकृत कशी आहे बरी आहे ह्मणून सांगितलें. परंतु आपले भावनेचें वर्तमान आह्मीं आलियापासून कळत नाहीं तर सविस्तर शरीरभावनेचा मजकूर लिहून पाठवावें. श्रीमंतही ते दिवशीं बोलिले जे, 'गंगा विष्णु वैद्य यानें औषध द्यावें. त्याची मुजारद करावी. ज्या तऱ्हेनें तो मन घालून औषधी उपाय करून बरें करी तें करावें.' तर आपणही त्यांचा संतोष जमा असेल ते रीतकरून औषध द्यावें. आह्मीं आजच श्रीक्षेत्र नासिकांत देवब्राह्मण केला. एका दो दिवसांनीं श्रीमंत त्रिंबकेश्वरास जाणार त्यांबरोबरच जाऊं. त्यांचा अवकाशच दिसून आला तर आह्मीं निरोप मागून त्रिरात्र तेथें राहून येऊं. श्रीमंत पुण्याकडे त्वरेनेंच येणार अशी वदंता आहे. ठराव नाहीं. मुधोजी भोंसले व साबाजी भोंसले यांचा सलूख होऊन एकत्र झालियाचीं पत्रें सरकारांत आलीं होतीं. त्यांस येथून पत्रें जातील

---

१. पेशव्यांची आई गोपिकाबाई हिची.

त्याप्रमाणें येणें तर येतील. राजश्री नागे शंकरही फाल्गुन वद्य चतुर्दशीस येथे आले. आमची त्यांची भेटी एका दो रोजीं होईल. मळ्यांतील जाग्याचा मजकूर राजश्री हरीपंतास सांगितला आहे. अद्यापि कांहीं उत्तर झालें नाहीं. आज उद्यां राजश्री नानाशीं बोलून जाबसाल होईल तो लिहून पाठवितों. आपली शरीरभावना वरचेवर लिहीत जाणें. बहुत काय लिहिणें हे विनंती.

नं० १२५२ श्रीगणराज. ( ७ मे. )

चिरंजीव राजश्री तात्या यांसी प्रती वामनराव गोविंद आशीर्वाद उपरी येथील कुशल तागायत वैशाख वद्य १ जाणोन स्वकीय कुशल लिहिणें. विशेष. इकडील वर्तमान तर परवांच्या पत्रीं सविस्तर लिहिलें आहे त्याजवरून सविस्तर कळेल. आमच्या जाबसालाचा प्रथम दिवसच आहे. बोलतात, परंतु निर्गमाजोगें बोलणें नाहीं! आकर्ती दरोबस्त मजुरा देत नाहीं ह्मणतात त्या पक्षीं कसा निर्गम पडेल? जेथपावेतों भोग आहे तोंपावेतों रहावें लागतें. उपाय नाहीं. राजश्री मुधोजी भोंसले व दर्याबाई एकत्र झाला आणि नागपुरावरून चांद्यास गेला. देवाजीपंत नागपुरीं होते त्यांस कैदेंतून काढून वस्त्रें देऊन कुटुंबसुद्धां समागमें घेतलें. राजश्री साबाजी भोंसले यांची स्त्री नागपुरीं होती त्यांजपासूनही कांहीं घेतलें. सावकारियांत जेथवर हातीं लागलें तेथवर घेतलें. राजश्री साबाजी भोंसले व यवनाची फौज व सरकारची फौज अशी त्यांचे पाठीवर जावयास गेले आहेत. या फौजा वर्धेवर आहेत. मुधोजी भोंसले यांणीं तूर्त टाळा देऊन पुढें गेले आहेत. उभय पक्षीं जमाव बराच आहे.' सेनासाहेब सुभ्याचीं वस्त्रें ( आपणच ) साबाजी भोंसले यांस दिलीं आहेत यांजकरितां श्रीमंतांस अभिमान पडला आहे. पहिले बाळोजी पलांडे गेले तिकडे आहेत. हल्लींही तीन हजार फौज ( तिकडे जावयास ) नेमिली आहे. तांकीद झाली आहे. हिंदु-

स्थानचें वर्तमान तर सुजाउद्दौला व इंग्रज एक होऊन जमले आहेत. राजश्री विसाजीपंत व होळकर वगैरे पथकें यमुनेपलीकडे आहेत. युद्ध-प्रसंगही झाल्याचें वर्तमान बाजारी आहे. पुण्यांत प्रस्तुत पाण्याचें (संकट) येऊन पडलें आहे. नदीचें पाणी झाडून आटलें आहे. असें आह्मीं कधीं पाहिलें नव्हतें. मोठें संकट उदकाचें आलें आहे. वरकड मजकूर मागाहून लिहून पाठवितों. बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद.

नं० १२५३ ( ३ मे. )

मोरो बल्लाळ याचें पांडुरंगरावास वैशाख शुद्ध ११ इंदुवासरचें पुणें मुक्कामचें पत्र.

" सालमजकूरचा अजमास समजाविणें ह्मणोन श्रीमंतांनीं आज्ञा केली त्याजवरून अजमास जमेचा व खर्चाचा व आह्मीमुद्धां समजाविला. अजमास समजल्यावर मोघम बोलणें बोलावें, आह्मी मजुरा न द्यावी, अशी मर्जी आहे. आमचें बोलणें कीं, हिशेबाच्या अजमासाखेरीज चाळीस पन्नास हजाराचा पेंच असल्यास—मातबर सरदारी—सोसूं. अजमास साडेसात लक्षांचा असतां बारा लक्ष पंधरा लक्ष द्या ह्मटल्यास कोठून द्यावे ? "

नं० १२५४ श्री. ( भाद्रपद शुद्ध. आगष्ट. दु. पंध )

पै॥ छ० १२ जमादिलाखर.

सेवेशीं विज्ञापना राजश्री साबाजी भोंसले व राजश्री मुधोजी भोंसले यांचें संधान लागलें आहे. एकत्र होतात. संशय नाहीं. मोर्चे उधळून तोफा अलजपुरकरांनीं घेतल्या हें फारच वाईट झालें. आतां

---

१. पत्र शिवाजी बावाजींचें पुण्याहून मिरजेस वामनरावबावांस.

बंधुबंधु एकत्र होणार तेव्हां साराच मनसबा विस्कळीत झाला. श्रीमंत खुष आहेत. कार्यभागी मुधोजीच्या उत्कर्षामुळें संतोषी आहेत. आपण बाहेर निघालां, मोठी गोष्ट केली. पंढरपूरच्या सुमारें जातच आहां. फौज जमा होते तों दसरा येईल.' इतक्यांत तिकडील मनसबा शेवटास गेला तर घरास येऊन पुन्हां निघावयास चिंता नाहीं. कारभारी फारच तारीफ करीत होते कीं, "बोलि-ल्याप्रमाणें केलें. अशी चाकरीची आंच आहे. उत्तमोत्तम गोष्ट केली. मातबर सरदार बाहेर निघाल्याची आवई चहूंकडे जाईल. फारच चांगलें केलें." ह्मणून भर कचेरींत आह्मांजवळ ह्मणत होते. श्रीमंतही उत्तम केलें ह्मणत होते. कामकाजाचा उलगडा करून यावें त्यास चतुर्थीच्या उत्साहामुळें आठ दिवस दरबार होत नाहीं. पौर्णिमआंतबाहेर निघून येतां. पेनूरकर (?) टाकून आल्यानें लौकिक वाईट याजकरितां पौर्णिमापावेतों होईल तसें करून निघतों. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

नं० १२९९ (भाद्र० शुद्ध. आ. दु. पंच०.)

शिवाजी बाबाजीचें पुण्याहून मोरो बल्लाळास पत्र. (पै० छ० ११ जमादिलाखर.)

"भोंसल्याकडील मजकूर तरी रुकनुद्दौला व राजश्री साबाजी भोंसले व सरकारच्या फौजेनें मिळोन कच्चा मनसबा करून अलजपुरास मोर्चे बसविले. बाहेरून रस्त नग. वैरण बंद. राजश्री मुधोजी भोंसले व अलजपूरकरांनीं दाटी करून मोर्चे उधळून तोफा दहा घेतल्या. दाणा वैरणीचा मोठा कडाड. याजकरितां (हे) सहा कोसांवर सरून राहिले. बळ त्यांचें विशेष झालें. तेव्हां बंधुबंधूंचें राजकारण लागलें. फारकरून राजकारण सिद्ध झालें. भेटी झाल्या असतील अथवा

या आठा दिवसांत होतील. मनसबा तोंडघशीं पडला. श्रीमंत खुष्ट आहेत. ज्यांस संतोष व्हावा त्यांस संतोष झाला! मनसब्यानें कसेंही होऊ, आपण मनसबा करून वामनरावचाचांस डेरे दाखल केलें ही मोठी गोष्ट केली. श्रीमंत संतोषी झाले. कारभारी भरकचेरींत आह्माजवळ बोलिले कीं, "वामनराव मातबर सरदार. आह्मासीं बोलल्याप्रमाणें बाहेर निघाले ही फार उत्तम गोष्ट झाली. त्यांस चाकरीची आंच आहे."

नं० १२९६ (भाद्रपद शुद्ध.
आगस्ट. द्रु. पंधर०.)

शिवाजी बावाजीकडून मोरो बल्लाळास पत्र पुण्याहून.

"भोंसल्याकडील मजकूर तर राजश्री साबाजी भोंसले व मुधोजी भोंसले यांचें संधान लागलें आहे. रुकनुद्दौला याणीं मोर्चे बसविले होते त्यास यांचीं कही जाईनासी झाली, रोज तट्टें उंट बैल कहीस जात ते मुधोजी भोंसले यांचे लोक नेत, याजमुळें दाणा वैरण देखील न मिळे. महागाई झाली. मोंगलांचे फौजेची व इस्मायलखान यांची बातेऱ्यांवर लढाई झाली. दोन चारशें माणूस बाहेरील पडलें. आंतील शें दोनशें पडलें. थोर लढाई झाली. इस्मायलखान याणीं (यांच्या) फौजा रगडल्या. दहा तोफा सोडविल्या. ते दिवशीं ना मोहरम होऊन हे सात कोस अंतरानें राहिले. रुकनुद्दौला याणीं भोंसल्याकडे वकील पाठविले आहेत."

पै॥ ६ जमादिलाखर.

नं० १२९७ श्री. (भाद्र० वद्य.
सपटं० ५० पंध०.)

पै॥ छ० १० जमादिलाखर.

सेवेशीं साष्टांग नमस्कार विनंती. तागायत गुरुवार दोनप्रहर. श्री-मान तर काल लेखकांच्या माणसाबरोबर त्वरेनें येण्याविषयींचा प्रकार दर्शविला होता तेसमयींचा प्रकार तसाच होता. व लेखकांचे विचारा-प्रमाणें पत्र पाठविलें होतें. अलीकडील अर्थ—गाड्यांचें प्राबल्य बहु-तच होतें कीं, ( आह्मीं ) " राज्याचा खावंद मारिला. होता तो मारिला. आतां निम्में राज्य वांटून देणें " असें बहुतच पाय पसरून बोलत होते. आंत तमाम बंदोबस्त सुमेरसिंग व महमद इसफ व खरगसिंग चौकीदार यांचा. परवानगी रसानगी त्याची. मराठे माणूस आंत अगदीं नव्हतें. शहर लुटितात अशी धास्त बसून कोणास कोणी न पुसे. अशी अवस्था होती. गाड्यांस हा मनसबा सांगितला तेसमयींचा करार— किल्ल्यांपैकीं पुरंधर व नगर व साष्टी हे तीन किल्ले व पांच लाख रुपये रोख द्यावे. येणेंप्रमाणें करार असतां आडमुद्दे राज्याचे वगैरे गाड्यांनीं मनस्वी घातले. " नाहीं तरी त्यांची गत ती यांची! अलीबहादर राज्यास खावंद करूं. " असें चित्तास येईल तसें बोलत. गांवांत जितका मुसलमान होता तितक्यांनीं बंदुका घेऊन वाड्यांत जथ पाडिला. तोफखान्यांतून धाकट्या तोफा आणून बुरजावर ठेवाव्या असा मनसबा विलक्षण करून बसले. तेव्हां [3]भैकारनाम प्रतिनिधि यांणीं सांगितलें कीं, " राज्य अथवा किल्ले कोणाचे? वांटून देणार कोण? राज्याचे चाकर आह्मीं. जतन करावें ( हें काम आमचें. ) द्यावयाचा अखत्यार आह्मां-वर नाहीं. चार रुपये अधिक आगळे मागितल्यास चिंता नाहीं. देऊं परंतु किल्ले अथवा राज्य देणार आह्मीं कोण? " तेव्हां रदबदली पडून पांच लक्ष रुपये द्यावेसा करार होता ते व किल्ल्याचे तीन लक्ष, एकूण

---

१. पत्र शिवाजी बावाजीचें पुण्याहून वामनरावास मिरजेस. हें पेशव्यांचा खून झाला त्याच्या तिसरे दिवशीं लिहिलेलें आहे. २. नानाफडणीस व मोरोबा फडणीस यांच्या. ३. भवानराव.

आठ लक्ष रुपये द्यावे येणेंप्रमाणें ठराव होऊन दोन तीनशें गाडदी बाहेर निघोन दरवाजे मोकळे झाले. मराठे माणूस आंत दोन तीनशें हत्यारबंद जमा झाले. आतां विचारें विचारें गाडदी बाहेर निघतील. परवानगी रसानगी दरवाजास गाड्यांची नाहीं. आंत लोक जातात येतात असें झाल्यामुळें जरा स्वस्थ झालें आहे. कर्म झाल्यावर दुसरे दिवशीं मकारनामक[१] लेखक यास बोलाऊन नेऊन (श्रीमंतांनीं) सांगितलें कीं नकारनामकास घेऊन येणें. तेव्हां ते येऊन त्यांस (आंत) घेऊन गेले. उभयतांस सांगितलें कीं, तुह्मीं फडणीसीचें कामकाज करीत जाणें. तेव्हां उत्तम ह्मणून (त्यांनीं) बाजीपंत व परचुरे यांस सांगितलें कीं, लिहिण्याचे जाबसाल आज्ञा होईल त्याप्रमाणें करीत जाणें ह्मणून सांगोन घरास आले. उभयतां नित्य जातात. (श्रीमंत) सांगतात त्याप्रमाणें कागदपत्र समजावितात. रोजमरा गाड्यांस वगैरे देवितात त्याप्रमाणें देतात. चिकारनामक[२] व भिडे उभयतां कामकाजाच्या गडबडींत आहेत. भकारनामक प्रा[३] व सकारनामक मुच्छाहारी बकारनामक[४] बरवे व सकारनामक[५] परभू सारा दिवस (श्रीमंतां) जवळ असतात. चौघांपैकीं थोरले[६] दोघे या राजकारभारांत पुर्ते होते असें ह्मणतात. त्यासारखें दिसून आलें. (श्रीमंतांनीं) तमाम शागीर्द लहान मोठ्यांस तमाम बोलावूं पाठविलें. चिरंजीवें[७] आणविले. बारामतीकर गृहस्थांस तीन चार पत्रें गेलीं

---

१. मकारनामक लेखक = मोरोबा फडणीस. नकारनामक = नाना फडणीस. २. चिकारनामक व भिडे = चिंतो विठ्ठल रायरीकर व हरीपंत भिडे. ३. शेणवी सदाशिव रामचंद्र. प्रसिद्ध रामचंद्रबाबाचा मुलगा. ४. बाजीराव गोविंद बर्वे. ५. सखाराम हरी. (बाबूराव हरीचा भाऊ.) ६. थोरले दोघे कोण? एक भवानराव धरिला तर त्याच्या दर्जाचा दुसरा कोणी या मंडळींत दिसत नाहीं. ७. दत्तक पुत्र अमृतराव. माजी पेशव्यांच्या कारकीर्दींत त्यांस पुणें मना होतें त्यामुळें ते वडगांवास रहात असत.

ते येणार. काम कारभार त्यांच्या विचारें करावा असें मानस दिसतें. मुख्य कारभारी समाधान नाहीं ह्मणून या मंत्रापूर्वीच चार दिवस दरबारास येतच नव्हते. हें झालें, गाडद्यांची गोळागोळी होऊं लागली, तेव्हां कोतवालचावडीजवळ बापूनीं सारे मुत्सद्दी जमा केले होते. राउतांचा जथ पाडिला तों आंतून चिठ्ठी आली कीं, "गुंता उरकला. आतां बाहेर बसून खटपट कायनिमित्य करितां? आंत येणें." तेव्हां (सखारामबापू) वाड्यांत गेले (व) त्यांचे कानीं लागून सांगितलें कीं, "गोष्ट फटफळ झाली. फडणीस लेखणीचे धणी आहेत त्यांस बलावून सांगावें. लिहिण्याचें कामकाज त्याणीं केल्यावेरीज परिणाम नाहीं. आह्मांस समाधान नाहीं. घरास जातों." ह्मणून सांगून गेले त्यापासून दरबारास येत नाहींत. त्रिकारनामक त्यांजकडे जाऊन खलबत करून येत असतात. (सखारामबापू) काल दोनप्रहरीं पळून गेले. पर्वतीजवळ माणसांस आढळले. बायकामुलें घरांतच आहेत. चार कोस गेला. मागती काय विचार केला न कळे, फिरोन रात्रौ घरास आला. कारभार करावा असें त्रिकारनामक नित्य त्यांसीं बोलतात. त्रिकारनामकही नित्य वाड्यांत जात असतात. फडके[३] यांजवर फारच रोप याजकरितां त्या गडबडेंत ते निघोन गेले. मोरेश्वरपावेतों गेलेले आढळले. घरीं चौकी बसली आहे. त्या गडबडींत इच्छारामपंतास तीन जखमा लागल्या. दुसरे दिवशीं मृत्यु पावला. नारायणजी नाईकास सदरेस बसल्यावर मारून टाकिला. त्याप्रमाणेंच फडके यांस करावें ह्मणून बोलिले. आणखी ब्राह्मण चार पांच व चाफाजी खिजमतगार ठार झाला. त्या गडबडेंत (धाकटे श्रीमंत) थोरल्यांजवळ जाऊन पोहचले होते. "दादासाहेब! वांचवावें, किल्ल्यावर घालावें, नाचण्यांची भाकर खावी, असें ह्मणून गळां मिठी घातली तेव्हां (त्यांणीं) सोडून दिला. तुळाजी

---

१. खून करण्याच्या मसलतीपूर्वी. २. त्रिंबकरावमामा. ३. हरीपंत.

पवार भेदला होता त्याणीं पायांस धरून ओढिला. सुमेरसिंगानें वार टाकिला. पांच सहा वारांनीं पुरा झाला. तेथेंच चाफाजी ठार झाला. असें होतांच (दादासाहेब) सदरेस जाऊन बसले. तमाम चोपदारांस वगैरे यांस बोलावूं पाठवून बंदोबस्त करूं लागले. सुतक नाहीं. नित्य नमस्कार सूर्यास घालितात. "वैरियाचें सुतक कशास?" ह्मणतात! गोवधदेखील वाड्यांत झाला. दोघी कुणबिणी मेल्या. बालहत्या, ब्राह्मणहत्या, गोहत्या, स्त्रीहत्या सारेंच झालें!!! गंगाबाइ आनंदीबाईनें कोंडोन खोलींत ठेविली दहनास तिकडे गेल्यावर विधि[1] उरकविला. रात्रीस करूं नये पण तेसमयींच गुंता उरकविला! हें राजकारण फार दिवस घांटत होतें त्यांत मोठे मोठे होते असे आतां उद्गार निघतात. ज्यांनीं राजकारणें केलीं होतीं त्यांचें मानस (पेशव्यांस) कैद करावें असें होतें. परंतु करावयास गेले एक आणि झालें एक! ईश्वराच्या चित्तास आलें तसें झालें! आतां त्राता कोणी नाहींसा झाला. आपण येसाजीबरोबर पत्रें पाठविलीं तीं पावलीं. मजकूर कळला. पंढरपुराकडे जावयाचा प्रकार लिहिला, त्यास इकडून पत्रें वरचेवर गेलींच आहेत. त्वरेनें येण्याविशीं (आपणास) पत्रें गेलीं होतीं, त्यास (आतां) गाड्यांचा उलगडा होतच आहे, आतां लेखकाचे व आमचे मतें तूर्त न यावें येणेंप्रमाणें ठरोन त्यांचें पत्र व आमचें पत्र लिहिलें आहे. थोडक्या फौजेनिशीं येथें येणें हेंही ठीक नाहीं. इकडे थोरल्यानीं[2] बोलाविलेंच तर मातबरीनेंच यावें लागेल. हलके येणें ठीक नाहीं. यास्तव आह्मां तेथेंच मुक्काम करून रहावें. किल्ल्यापासून सा कोसीं असल्यास चिंता नाहीं. निकड करून फौज जमा करावी. फौजेचा जथ पाडावा. इतक्यांत येथील विचार कसा होतो हें समजतें

---

१. वपनविधि. पण ही बातमी पुढें खोटी ठरली. गंगाबाईचें वपन झालें नाहीं.
२. दादासाहेबांनीं.

त्याप्रमाणें लिहून पाठवितों. आह्मी येणार होतों, परंतु अशी गोष्ट झाल्यावरी येणें ठीक नाहीं याजकरितां राहिलों. आह्मी राहिलों हें आपल्याही चित्तास येईलच. रहिमतपुरीं दोन जासूद जोड्या ठेवाव्या. येथें चार जोड्या पाठवाव्या. येथून पत्रें रहिमतपुरास जातील. तेथून पुढें (मिरजेस) जलद जातील. घायगुडे येथेंच आहेत. आमच्या वाड्यांत (सरकारांतून) चोपदार अथवा कोणी आला नाहीं. आह्मीं होऊन त्यांजकडे गेलों नाहीं. या उपरी लेखकाचे विचारें होईल तसें करूं. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना. (आपण) माघारे फिरोन किल्ल्याजवळ आल्यानें बदनक्षा, याजकरितां जेथें पत्र पावेल तेथें मुक्काम करून रहावें. फौज जमा करावी. कोसीं अदकोसीं कूच तासगांवाकडे केल्यास चिंता नाहीं. मागें मात्र जाऊं नये. हे विज्ञापना.

नं० १२९८ **श्री.** (भाद्रपद वद्य. सपटेंबर ५. पंधर.)

सेवेशी साष्टांग नमस्कार विनंती. श्रीमंतांचें ध्यान काय आहे, कर न करी विचार! रास्ते यांचे किल्ले मागत होते. त्यांनी उत्तर मध्यस्थमुखें व रुबरूही केलें, " किल्ले स्वामीचे. आह्मीं पदरचे. संशय असल्यास जातीस तैनात व पागेस सरंजाम ठेऊन सर्वही घ्यावें. आह्मांस चाकरीचा कंटाळा. अशक्त आहों. कोट किल्ले घ्यावे." " असें निखालसपणें ह्मणतात. त्यापक्षीं त्यांकडे बहाल करावे " असें ह्मणून (श्रीमंतांचें) वचन प्रमाण झालें. देत नाहीं ह्मणते तरी जिदीस[2] गोष्ट पडती. मर्जीमाफक बोलल्यास कुमेस उशीर नाहीं असें आहे. दिवसेंदिवस बंदोबस्त होत चालला. ससरूपीस जाऊन बर्से

---

१. पत्र शिवाजीपंताचें पुण्याहून वामनरावास मिरजेस. २. हट्टास.

घेतल्यावरी मर्जी कठीण होईल. त्यापूर्वीं असें आहे. अगोदर बोलेल, मायेंत येईल, तो मायेचा; त्याजवर कृपा करावी; असें ध्यान आहे. न आल्यानें लांबणीवर पडतें व दिवसेंदिवस संशय पडत जाईल. पत्र पाठवितांच आले ह्मणजे कार्य होईल. 'त्यांच्या चित्तांत संशय नाहीं. निखालस आहेत. पत्र जातांच आले.' असा आपलाच उपर होईल. पुर्ता बंदोबस्त झाला नाहीं तों ज्यां ज्यांवर राग आहे त्यांजवर कृपा करून वचनास गुंततील. वचनास गुंतल्यावर मग पेंच नाहीं. लौकर न आल्यानें संशयानें संशय वाढेल. यास्तव अमावास्येस पत्रें पाठवावींच अशी ताकीद (फडणिसानीं[1]) केल्यावरून पत्रें पाठविलीं आहेत त्याप्रमाणें पावतील. प्रतिपदेस निघावें ते तासगांवास यावें. आबा आलियावर राउत शंभर दीडशें (बरोबर) असल्यास पुरतील. दुसऱ्यास निघावयाचें ह्मटल्यास दिवसगत लागते. दुसऱ्यास सप्त-ऋषीस जावयास (श्रीमंत) निघणार. यास्तव बाहेर निघाल्याचे पूर्वीं यावें हा उत्तम प्रकार आहे. आबानीं यावें लागेल ही सूचना पहिल्याच पत्रीं लिहिली आहे. त्यांस समाधान नाहीं हें प्रमाणच, परंतु असा प्रसंग घडला! इलाज नाहीं! काय करणार! त्यांखेरीज तोड पडणार नाहीं. हिशेब कितेबाचा गुंता नाहीं. आठ दिवसांत निरोप देवितों ह्मणून उभयतांचें वचन घेतलें. दुखणेकरी अशक्त असतां तसेच यावें असा प्रसंग प्राप्त झाला यास्तव विस्तारें विनंती लिहिली आहे. प्रतिपदेस निघावें आणि पुढें सांडणीस्वाराबरोबर पत्र रवाना करावें. राजश्री केसोपंत कुंटे[2] नित्य भेटतात. वर्तमान सांगतात. होळकर इंदुरास आहेत. अहिल्या-बाईचें समाधान करून इंदुरास घेऊन गेले. गोडीनेंच आहेत. घरफूट

---

१. नाना व मोरोबा फडणीस यांचे. २. हे होळकराचे वकील.

नाहीं. गंगोबा येथें आले आहेत त्यांस दिवाणगिरी सांगावी, शिंद्यावर केदारजी शिंदा उभा करावा, असें ह्मणतात तेव्हां दोघे[2] हातीं लागणार नाहींत असेंही समजलें. यास्तव गंगोबास निंबगांवास (श्रीमंतांनीं) लावून दिलें. दशा खातीर याजवर "जाणें. आह्मांमुळें बुडालास आहे हें आमच्या चित्तांत आहे. विचारेंकरून बंदोबस्त करूं." असें बोलून चालून त्यास निरोप दिला. चिंतो विठ्ठल, रामचंद्र गणेश व राजश्री मोरोबादादा यांसीं होळकर शिंद्यांचे कारभारी यांसीं बोलावयासी सांगितलें आहे. बोलतात. हे उत्तर करितात कीं, 'आह्मी लिहून पाठवितों, उत्तर येईल त्याप्रमाणें बोलूं;' असें ह्मणतात. आह्मांकडील नीट झाल्यावर उभयतां फडणीस (यांच्या) व आपल्या विचारें बोलणें करावें असें (त्यांच्या मनांत) आहे. बऱ्या वाईटास सोबती असावे असेंच (त्यांचें मानस) आहे. कळावें. राजश्री बाबूजी नाईक यांची पागा सरकारांत इनलाख होती त्यांस लाख रुपयांचा सरंजाम पागेपुरता तूर्त द्यावा असें ठरलें. निरंजीवास पूर्वीप्रमाणें पोतदारीचीं वस्त्रें दिलीं. राजश्री आनंदराव सचिव दूर करून बापूजी सचिव यांजपासून लाख रुपये नजर घेऊन वस्त्रें देणार. सरलष्कर मोहित्यांस अथवा शिवाजी नाईकास देणार. प्रतिनिधि राजश्री भवानराव यांस देणार, परंतु सरकारनामकांची ममता राजश्री भगवंतराव यांचे ठायींच आहे. कसें घडतें पहावें. राजश्री भास्करराव यांसीं पांच हजार मसाला करून शंभर गारदी व शंभर राउत पाठवावे ऐसें झालें होतें. शेवटीं बोलतां बोलतां 'लाख होन द्यावे, सालमजकुरीं चाकरी न करावी' असें झालें आहे. याद लिहून विल्हे लावावें लागतें. उपाय नाहीं. सेवेशीं श्रुत होत हे विज्ञापना.

---

१. गंगाधर यशवंत चंद्रचूड. होळकराचे माजी कारभारी. २. शिंदे, होळकर. ३. सरलष्करचें पद. ४. प्रतिनिधीचें पद. ५. सरदारामचापूची ६. नरगुंदकर.

नं० १२५९ श्री. ( भाद्र० वद्य.
सप्टें० प० पंधर०. )

सेवेशीं विज्ञापना. 'मकार[1]नामकाचा भरंवसा धरावयाचा नाहीं. नकारनामक यांचा भरंवसा पुरता आह्मांस आहे. याजकरितां त्यांनें विचारें कर्तव्य तें करावें.' ह्मणून लिहिलें, त्यास आपण लिहिला प्रकार तो खराच. त्याप्रमाणेंच लक्ष आहे. (श्रीमंतांचें) निराळें बोलणें चालणें नकारनामकासीं होतें. आमची खातरजमा नकार[2]नामकानीं निराळी केली आणि पत्रांतही भाव लिहिला आहेच. स[3]कारनामक मळमळीत बोलत होते. त्यांच्या घरास जावयाचा राबता घातलाच होता. परवां जाऊन बहुत कांहीं बोलणें झालें. शेवटीं बोलिले कीं, "तुमच्याविशीं दुसरा विचार करीन तरी आपल्या पुत्राची आण आहे. संशय तिलमात्र न धरणें. निखालस लिहून पाठविणें. साऱ्यांनीं मिळून ब्राह्मण्य रक्षावें असेंच प्राप्त झालें आहे! दुर्दैवेंकरून या थरास आलों. आतां साऱ्यांनीं एकविचारें राहिल्यानें ब्राह्मण्य कांहीं दिवस राहिलें तर राहील!" बोलतांना तर निखालस बोलून शपथ अवघड वाहिली आहे. शपथेचें ह्मणावें तरी पाठ पहिल्यापासूनच आहे! ज्याचें कर्म तो जाणे. नाईकांनीं खातरजमा करून घेतली. पत्रांत मोघम लिहिलें आहे ह्मणून संशय चित्तांत तिलमात्र न आणावा. श्रीमंत राजश्री आबानीं यावें हा उत्तम पक्ष. नाहीं तरी श्रीमंत राजश्री भाऊसाहेबांनीं यावें. दिवसगत न करावी. प्रतिपदेस निघाले नसल्यास नवरात्रांत निघाल्यास प्रत्यवाय नाहीं. फौजेची तरतूद जमा व्हावयाची आधीं करावी. फौज अगदीं नाहीं ही बातमी येते, याजकरितां त्वरा करावी. आणि फौज जमा करावी. राजश्री मुधोजी भोंसले यांस पत्रें (श्रीमंतांचीं)

---

१. पत्र शिवाजीपंताचें वामनरावास. २. मोरोबाचा आह्मांला विश्वास येत नाहीं. नाना फडणिसाचा विश्वास येतो. ३. सखारामबापू.

गेलीं होतीं. उत्तरें आलीं. ते भेटीस येतात. राजश्री विसाजी कृष्ण कोरेगांवावर आले. उदईक भेटीस येणार आहेत. खान याजकडील बोलणें राजश्री आपाजीराम बोलतात. 'मदगिरी व चेनरायदुर्ग होसकोटें, बाळापूर सोडावें आणि पक्का तह करावा' असें ह्मणतात. तो चिरंजीवच आहे! ठाणीं सोडतीलसें दिसतें. आपण पत्रें वाचून मिरजेस पाठवावीं. विदित होय हे विज्ञापना. श्रीमंत मातुश्री गंगाबाईचा विधि झाला ह्मणून लिहिलें होतें त्यास विधि न झाला. श्रीमंत नारायणरावसाहेबांस दगा झाला त्या दिवशीं (बाईस अस्पर्श होऊन) महिना झाला होता. अलीकडे पंधरा दिवस. एकूण दीड महिना झाला. पहिले पावणा महिन्यावर दिवस जात नव्हते. ईश्वरें कृपा केली तरी करील! हे विज्ञापना.

नं० १२६० श्री. (३१ आगष्ट.)

साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील कुशल तागायत भाद्रपद शुद्ध १३ भोमवार दीड प्रहर वर्तमान यथास्थित असे. विशेष. काल इंदुवारचा मजकूर जासुदाबरोबर लिहिला आहे त्यावरून कळेल. आज प्रातःकालापासून मजकूर तर मकारनामक लेखक यांनीं (श्रीमंतांस) रात्रौ सांगून पाठविलें होतें कीं, 'आह्मांस काय आज्ञा' त्यास निरोप आला कीं, रात्रीचीरात्र आपल्या जागां स्वस्थ असा. प्रातःकाळीं मागून तसें करावें. प्रातःकाळीं भेटीस बोलाविलें तेव्हां त्यांचें त्यांचें बोलणें झालें. तेथून निघून नकारनामकाकडे येऊन त्यांची भेटी केली. ते नमस्कार करून घरास आले. मकारनामक तेथेंच होते. लोकास तमाम सरदारांस पत्रें पाठविलीं कीं, "गोष्ट होणे ती झाली. तुह्मी

---

१. हिंदुस्थानच्या स्वारीहून. २. हैदरअली. ३. पत्र शिवाजीपंताचें वामनरावास. नारायणरावसाहेबांचा खून झाला त्याच्या दुसरे दिवशीं लिहिलेलें.

आपआपल्या जागां कायम असावें. मागाहून लिहून पाठवूं त्याप्रमाणें करणें. " तेही आंतून आतांच आले. ते नकारनामकाकडे गेले. आह्मीं जाऊन उभयतांची भेटी घेतली. पुढें आज्ञा काय ह्मणून पुसिलें. त्याणीं सांगितलें कीं, ' तुमच्या यजमानाकडे पत्रें गेलीं जे, तुह्मीं आपले जागां कायम राहणें ' याअन्वयें सांगितलें आहे. स्वामीनीं त्याचें उत्तर ( श्रीमंतांस ) लिहावें कीं, ' आपण धणी आहेत. आज्ञेप्रमाणें वर्तणूक करूं. ' मकारनामकास मुख्यार्थ ( आह्मीं ) पुसिला कीं, घोडें लगामीं आहे कीं नाहीं? त्यानें सांगितलें कीं लगामींच आहे. तुह्मीं कांहीं चिंता करूं नका. हा आंतील जीव सांगितला आहे. एक दोन रोजांत कारभाराचा डौल कसा पडतो तोही समजेल. प्रस्तुत मामा[1] व हेच[2] आजच्या बोलण्याचालण्यांत फार-करून आहेत. वृद्ध बरें वाटत नाहीं ह्मणून रात्रीस निरोप घेऊन घरास गेला आहे तो आज कांहीं आला नाहीं. चिंतो विठ्ठल, बाजीराव बर्वे, सखाराम हरी वगैरे वळण सारें जमा झालें. पाटणकर, निंबाळकर, घाटगे, घोरपडे वगैरे लहान मोठे सरदारांस बोलावून चार गोष्टी दिलाशाच्या सांगितल्या. मुख्यांस सारे रात्रींच भेटले. खेरीज दोनी लेखक. हंकार नामक माणसांसुद्धां परगृहीं कोठें गेले आहेत ते अद्याप भेटले नाहींत. उभयतां हे भेटले तव्हां त्यांसही आणून भेटवितील. कालचा प्रकार—दोन प्रहर तीन घटका वाजल्यावर दिवसास दंगा झाला. सुमेरसिंग व महमद इसफ यांचे सात आठशें गाडदी होते. आंत शिरले. तसेच दरवाजावरील लोक मारिले. चोपाचोप करीत आंत गेले तों यांजवळ[3] कोणी माणूस नव्हतें. एक दोन पुरुष होते ते तव्हांच पळाले. नारोजी नाईक व इच्छारामपंत [illegible]फाजी खिजमतगार व खासे इतकियांस दिवाणखानियांतच मारिलें.

---

१. हरीपंत फडके. २. नाना व मोरोबा फडणीस. ३. नारायणरावसाहेबांजवळ.

द्वाही फिरविली. शहाजण वाजले. दोन प्रहर रात्रपर्यंत आंतील भेद न कळे. दहनास नेल्यावर ठीक कळलें. पत्नीनें ( सती ) जाण्याचा आग्राश केला, मस्तक फोडून घेतलें, तेव्हां खोलींत घालून कडी घातली. ब्राह्मण अभागी सात आठ, दोन गाई, दोन कुणबिणी, यांखेरीज चौकीदार यांचा सुमार कळला नाहीं. लूट फार झाली. देवघर झाडून गेलें. स्वयंपाकांतील भांडीं देखील गेलीं. बाळू टोपर व बाळू दामला यांस चौकीस बसविले आहेत. याउपर कोण-कोणाचा भोग आहे तो कळेल. आनंदरावदादानीं बाळाजीपंतास रात्रीचे ( श्रीमंतांकडे ) पाठविले होते. तमाम लोक भेटून नजराणे करतात. वाड्यांत तमाम चौक्या गाड्यांच्या आहेत. व वाड्यावरूनही आहेत. जबरदस्ती प्रस्तुत गाड्यांची आहे. राउत नाकेबंदीनीं होते ह्मणून शहराचा बचाव झाला. जमादारास बक्षीस कंठ्या व शिरपेंच व वस्त्रें व लाख रुपये बक्षीस साऱ्या गाड्यांस मिळोन दिले. देवतार्च-नाचें सामान, जडिताचे दागिने व सोन्यारुप्याचें फारच होतें तें सारें लुटिलें. पितांबर आदिकरून फाडून घेतलें. आपण लोकांचा जथ पाहून स्थळीं अथवा समीप केवळ अमात्यें येणेंप्रमाणें उभयतां लेखकांनीं लिहावयास सांगितलें. रात्रीही लिहिलें आहे तें पत्र पावलेंच असेल. रोज भौमवार दोनप्रहर. जासूद लवकर पावला ह्मणजे त्यास इनाम द्यावें. चार जासूद जोड्या सत्वर पाठवाव्या. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना. भकारनामक प्रतिनिधी पहिलेच त्या पक्षांत होते तें सिद्धीस गेलें. चौक्यांची गडबड त्यांचीच आहे. हे विज्ञापना.

# दादासाहेब व गंगाबाई यांच्या कारकीर्दी.

---

मागील प्रकरणांत वर्णन केलेला अनर्थ घडून येतांच गारद्यांनीं दादासाहेबांस पेशवाईच्या गादीवर स्थापिलें. निरुपायामुळें सर्व मुत्सद्दी व सरदार शिलेदार यांनींही ती गोष्ट कबूल केली. खून ज्या दिवशीं झाला त्या रात्रीं इंग्रजांचा वकील मिस्तर मोस्तीन व दुसरे परराज्यांतील वकील दादासाहेबांच्या भेटीस आले. सखारामबापूंची भेट झालीच होती. पाटणकर, निंबाळकर, घाटगे, घोरपडे वगैरे सरदारांनीं त्याच रात्रीं भेटून नजरा केल्या. दुसरे दिवशीं नाना व मोरोबा फडणीस यांच्या भेटी होऊन राज्यकारभार चालू झाला. पहिलें काम गारद्यांस वाड्यांतून बाहेर काढण्याचें; पण तें तर फारच अवघड आहे असें तत्काळ दिसून आलें. आदल्या दिवशीं दादासाहेबांनीं गारद्यांच्या जमातदारांस कंठ्या, शिरपेंच, पेपाल व लाख रुपये बक्षीस दिलेच होते. आतां करारप्रमाणें त्यांस पांच लक्ष रुपये व तीन किल्ले द्यावयाचे. पैकीं रुपये श्रीमंत देत होते. किल्ले द्यावयाचे कबूल केलें होतें खरें, (त्यांनीं कीं त्यांच्या बायकोनें हें कळत नाहीं.) पण आतां ते ह्मणूं लागले कीं, साष्टी, पुरंदर व नगर हे किल्ले ठरावाप्रमाणें आह्मी गारद्यांस देऊन टाकले ह्मणजे राज्याची नाकीं तीं सारीं त्यांच्या हातांत गेलीं. मग आह्मीं राज्य करावयाचें तें कसलें? तर आतां गारद्यांनीं किल्ल्यांबद्दल आणखी रुपये घ्यावे. ती गोष्ट गारद्यांच्या कानीं जातांच ते अगदींच बिथरून बसले. ते ह्मणूं लागले कीं, आह्मांस अर्धे राज्य वांटून दिलें पाहिजे. न द्याल तर नारायणरावसाहेबांप्रमाणेंच तुह्मांसही मारून टाकून मस्तानीचा नातू ह्मणजे समशेरबहादराचा मुलगा अली बहादर यासीच आह्मी

## दादासाहेब व गंगाबाई यांच्या कारकीर्दी.

गादीवर स्थापना करूं. तोही पेशवाईचा वारसच आहे! याप्रमाणें दोन तीन दिवस घासाघीस होतां होतां भवानराव प्रतिनिधीच्या मध्यस्तीनें तंटा तुटला. पूर्वीं ठरल्याप्रमाणें पांच लक्ष व तीन किल्ल्यांबद्दल तीन लक्ष मिळून आठ लक्ष रुपये रोख पदरांत घेऊन व आपल्या जिवास अपाय होणार नाहीं अशाबद्दल दादासाहेबांपासून जामीन घेऊन गारद्यांनीं वाडा सोडिला. ही गारद्यांची अरेरावी व त्यांनीं दादासाहेबांस कैदेंत ठेवणें वगैरे सारा नाटकी प्रकार होता. खून वगैरे जें झालें तें सर्व गारद्यांनीं केलें, आपण कांहीं त्यांत नव्हतों, हें लोकांस कळविण्याकरितांच हें सोंग आणिलें होतें, आंतून त्या गारद्यांवर दादासाहेबांचें मन प्रसन्न होतें. यापुढें सुमेरसिंग व महमद इसब हे दोघे चांडाळ व तो निमकहरामांचा राजा तुळ्या पवार हे त्यांच्या फारच विश्वासांतले सरदार होते.

दादासाहेबांस पेशवाई मिळाल्यानें आपलें कल्याण होईल अशा आशेनें ज्यांनीं मेहनत व साहस केलें होतें, हाल अपेष्टा, नुकसान व बेअब्रूही करून घेतली होती, असे सर्व लोक आतां आपापलीं कामें करून घेण्याकरितां त्यांभोंवती जमले. त्यांत मुधोजी भोंसले व हैदरअल्ली यांचे वकील, सदाशिव रामचंद्र, बाजीराव बर्वे, सखाराम हरी परभू, भवानराव प्रतिनिधि, गंगाधर यशवंत, चिंतो विठ्ठल, विठ्ठल विश्राम व दुसरी अनेक लहान थोर मंडळी होती. शागीर्दांची भुतावळही सारी गोळा झाली. यांपैकीं बहुतेकांचीं कामें श्रीमंतांनीं करून देतों ह्मणून सांगितलें. या लोकांच्याच जिवावर राज्याचा गाडा हांकण्याची त्यांची उमेद होती. त्यांनीं गोविंदराव गायकवाड यास सांगून पाठविलें कीं, फत्तेसिंगाची जहागीर व सरदारी काढून आतां तुला देतों. मुधोजीस पत्र पाठविलें कीं, तूं आमच्या भेटीस तावडतोब निघून ये. साबाजीकडून जहागीर काढून तुझ्या हवालीं करितों. हैदराच्या वकिलास त्यांनीं समजच

सांगितलें कीं, तुझ्या धन्याचे काय काय जावसाल आहेत त्यांची यादी लिहून आण ह्मणजे सर्व तुझ्या मनाप्रमाणें नीटनेटकें करून देतों! त्यांनीं भवानरावास वचन दिलें कीं, प्रतिनिधीची जहागीर भगवंतरावास गाथ वरात पेशव्यांनीं दिली आहे ती आतां आह्मीं तुला देऊं. गंगाधर यशवंत यास सांगितलें कीं, तूं मजकरितां फार क्लेश पावलास हें सारें माझ्या लक्षांत आहे. होळकराची दिवाणगिरी पुनः तुला मिळेल. मात्र हें काम आजच होणार नाहीं. सोयीसोयीनें होईल. चिंतो विठ्ठलास तर त्यांनीं तत्काळच आपला दिवाण केलें. विठ्ठल विश्राम, सदाशिव रामचंद्र व बाजीराव बर्वे यांस जुन्या सरदारांच्या सरंजामापैकीं तिजाई मुलूख काढून घेऊन द्यावा व पंधरा हजार फौजेचे हे नवीनच तीन सरदार उभारावे, असा त्यांचा बेत झाला. बाबूजीनाईक बारा-मतीकर यांस फौजेच्या खर्चाकरितां आजपर्यंत नक्तच पैका मिळत असे. जहागीर मुलूख दिलेला नव्हता. पण अलीकडे त्यांशीं व्याह्यानें नवीनच नातें जडलें असल्यामुळें लाख रुपये उत्पन्नाचा मुलूख त्यांस श्रीमंतांनीं जहागीर देऊं केला. सदाशिव रामचंद्र यास वर सांगितल्याप्रमाणें सरदारी द्यावयाची ठरवून शिवाय अहमदाबादेचा सुभाही त्यास सांग-ण्याचें कबूल केलें.

खुनाच्या ससलतींत कोण कोण होते यांचा छडा लावून रामशास्त्री न्यायाधीश यांनीं खुद्द दादासाहेबांस त्यांच्याच हातची ती—जींत 'ध' चा 'मा' केला होता ती—चिठी नेऊन दाखविली. तेव्हां त्यांनीं आपला दोष कबूल केला व त्यास काय प्रायश्चित्त घ्यावें असें शास्त्री-बावांस विचारिलें. त्यासमयीं या दोषास देहांतप्रायश्चित्तच योग्य असें रामशास्त्र्यांनीं उत्तर दिलें. ही गोष्ट सर्वप्रसिद्धच आहे. बाबूजी-नाईकही असाच स्पष्टवक्ता होता. खून झाल्यावर त्यास पुण्यास येण्याविषयीं दादासाहेबांनीं पत्रांवर पत्रें पाठविलीं. परंतु तो त्यांकडों

न येतां पुढें एक महिन्यानें भेटीस आला. श्रीमंतांनीं रागावून विचारिलें कीं, इतका उशीर कां केलात? त्यावर तो बोलला. "होय. माझी चूक झाली खरी. तुमच्या घरीं मोठाच समारंभ व्हावयाचा होता त्याला मी तत्काळ यावयास पाहिजे होतें! दादासाहेब! काय हें कर्म केलेंत!"

मोरोबा व नानाफडणीस व त्रिंबकरावमामा यांस जरी दादासाहेबांनीं अशा या रीतीनें मिळविलेलें वर्चस्व बिलकुल खपत नव्हतें, तरी निरुपायामुळें श्रीमंत सांगतील तें काम त्यांस करावेंच लागत होतें. हरीपंत फडक्यावर या श्रीमंतांची पराकाष्ठेची अवकृपा होती. त्यास जिवें मारावयासमुद्धां त्यांनीं कमी केलें नसतें. परंतु त्यानें बारामतीस जाऊन बाबूजी नाइकाचा आश्रय केला व नाइकांच्याच मध्यस्तीनें श्रीमंतांचा त्यावरचा राग कमी झाला. मुत्सद्याप्रमाणेंच सर्व सरदारही निदान एवढ्या वेळेपुरते तरी दादासाहेबांची होईल ती आज्ञा मान्य करण्यास कबूल झाले. मुख्य संशय शिंदे, होळकर, पटवर्धन व रास्ते यांचा होता. पैकीं शिंद्यानें बेलभांडार पाठवून व शपथ घेऊन आपल्या इमानाबद्दल श्रीमंतांची खात्री केली. होळकरानें बोलणें विसाजी कृष्ण बिनीवाले याचे मार्फतीनें सुरू होतेंच. श्रीमंतांनीं रास्त्यांस तंबी दिली कीं बागलकोट वगैरे सरकारचे किल्ले तुमच्या हवालीं आहेत ते आतांच्या आतां खालीं करून द्या. कर्नाटकांत मोहीम व्हावयाची होती त्यासंबंधें फौज जमा करण्याविषयीं इतर सरदारांबरोबर रास्त्यांसही माजी पेशव्यांची ताकीद झाली होती व त्याप्रमाणें त्यांची तयारी चालू होती. एके दिवशीं सहजगत्या त्यांनीं फौजेंतील कांहीं लोकांस दारू गोळी वांटली. त्यावरून सुमेरसिंगानें दादासाहेबांस तत्काळ समजाविलें कीं, रास्त्यांच्या मनांत दंगा करावयाचा आहे. आपला हुकूम होईल तर आतांच्या आतां हल्ला करून यांस लुटून टाकितों! ती बातमी आनंदराव

रास्त्यांस कळतांच त्यांनीं चितो विठ्ठलास पैका चारून त्यांच्या मध्यस्तीनें श्रीमंतांची भेट घेऊन विनंती केली कीं, कोट किल्ले, मुलूख, पागा, हत्ती, काय आह्मांजवळ आहे तें सर्व आपलेंच आहे. मर्जी असल्यास सर्वही घ्यावें. आमची ना नाहीं. हें नम्रपणाचें भाषण ऐकतांच खुष होऊन श्रीमंतांनीं सर्व सरंजाम किल्ल्यांमुद्धां त्यांजकडे बहाल केला! नारायणरावसाहेबांनीं पटवर्धनांस पत्रें पाठविलीं होतीं कीं, मुधोजी भोंसल्यावर स्वारी करावयाचें आमच्या मनांत आहे. याकरितां भाद्रपदांतच तुह्मीं डेरे दाखल होऊन फौज जमा करावी व सत्वर आह्मांस येऊन मिळावें. त्याप्रमाणें वामनराव पटवर्धनानें मिरजेबाहेर डेरे दिले होते व पटवर्धनांची फौज मिरज, तासगांव व कुरुंदवाड येथें जमत होती. नारायणरावसाहेबांचा खून होतांच पुढें काय प्रसंग येतो न कळे असें समजून वामनरावानें एकीकडे फौजेची तयारी अधिकच जारीनें चालविली व दुसरीकडे नानाफडणिसांमार्फत दादासाहेबांकडे बोलणेंही लाविलें कीं, आह्मीं आपल्या पदरचे आज्ञाधारक सेवक आहों. आह्मांवर कृपा असावी. दादासाहेब नानाफडणिसास ह्मणाले कीं, पटवर्धनांपैकीं एका खाशानें थोड्याशा लोकांनिशीं आमच्या भेटीस यावें ह्मणजे त्यांस अभय दिलें जाईल व त्यांजवर कृपाही होईल. त्याप्रमाणें नानानें लिहून पाठविल्यावरून पांचशें स्वारानिशीं परशुरामभाऊ श्रीमंतांच्या भेटीस येण्याकरितां मिरजेहून निघाला.

इतकें हें सर्व झालें खरें, पण इकडे सखारामबापूच्या मनांत काय काय घोळत होतें याचा कोणासच तर्क झाला नाहीं! तो विशाल बुद्धीचा ह्मातारा मुत्सद्दी नारायणरावसाहेबांस फक्त धरून कैदेंत ठेवण्याच्या मसलतीस कबूल झाला होता; पण त्या मसलतीचें पर्यवसान भलतेंच झाल्यामुळें त्याचे सर्व बेत विसकटून गेले! आजपर्यंतचें त्याचें धोरण असें होतें कीं, आपल्या धन्याच्या घरांत नेहमीं

फूट असावी. एकदां या पक्षाकडे व एकदां त्या पक्षाकडे मिळाल्यासारखें दाखवून दोघांवरही छाप ठेवावी. नारायणराव आपलें ऐकेनासा झाल्यामुळें दादासाहेबांची स्थापना करण्याची त्यानें मसलत केली किंवा करूं दिली ती उगीच नव्हती. पुढें मागें दादासाहेब प्रतिकूळ झाले तर नारायणरावाची पुनः स्थापना करितां यावी इतकी सोय त्यानें ठेविली होती. पण नारायणरावाचा खून होऊन दादासाहेबांनें राज्य आतां निर्वैर झालेसें पाहतांच त्यास वाटूं लागलें कीं, आतां या चितपावनांच्या दरबारांत आपणांस कोण विचारितो! त्याप्रमाणें लवकरच त्यास प्रत्ययही येऊं लागला. फलटणच्या निंबाळकरांच्या जहागिरीसंबंधें माजी पेशव्यांच्या कारकीर्दींत त्यानें जी व्यवस्था केली होती तींत दादासाहेबांनीं घालमेल केली. त्यानें भगवंतरावास प्रतिनिधीचें पद व जहागीर माधवराव पेशव्यांकडून देवविली होती. पण आतां दादासाहेब भगवंतरावास पदच्युत करून भवानरावस प्रतिनिधि करणार होते. दुसरींही कित्येक त्याच्या अगदीं जिवाळ्याचीं कामें होतीं तीं दादासाहेबांनीं नासून टाकिलीं त्यामुळें त्याचें मन वारंवार खटू होऊं लागलें. दादासाहेब त्यास कारभार पतकरण्याविषयीं वारंवार सांगत. परंतु तो उत्तर करी कीं, मी आतां म्हातारा झालों. कारभाराची दगदग माझ्या हातून होत नाहीं. माझी जहागीर श्रीमंतांनीं कृपा करून मजकडे चालवावी. आठ पंधरा दिवशीं कधीं जरूर पडेल तेव्हां मला दरबारास बोलावून न्यावें. सुचेल तो मनसबा सांगत जाईन. मीच कारभार करावा असाच आग्रह असल्यास दीड हजारापेक्षां अधिक गारदी चाकरीस ठेवूं नयेत. शागीर्द लोकांस जवळून दूर करावें. हलक्या मनुष्यांची मसलत ऐकूं नये. मी सांगेन त्या धोरणानें वागावें. या गोष्टी कबूल असतील तर मी कारभार पतकरतों. परंतु दादासाहेब याप्रमाणें आपणांस बांधून घेण्यास कबूल नव्हते. हा निर्माल्यवत् होऊन स्वस्थ बसणारा मनुष्य

नव्हे, कुलंगडी केल्याशिवाय राहणार नाहीं, या भयानें ते त्यास ममतेंत घेतल्यासारखें दाखवीत व केव्हां तरी बोलावून नेऊन एकांतीं चार घटका राज्यकारभाराच्या गोष्टी बोलत बसत. पण त्यापासून निष्पन्न असें कांहींच होत नव्हतें. त्यांनीं चिंतो विठ्ठलास कारभार सांगितला होता. तो तर केवळ बापूच्याच ओंजळीनें पाणी पिणारा होता. पण चिंतो विठ्ठलाचें तरी दादासाहेब नेहमीं कोठें ऐकत होते! त्यांचीं खलबतें लहान शागीर्दापासून थोर मुत्सद्यापर्यंत सर्वांशींच चालत! तुजवर मात्र माझें प्रेम व विश्वास आहे, तुझ्याच मताप्रमाणें मी चालणार. बाकीचे सारे चोर आहेत, असें ते प्रत्येकास सांगत व त्या घटकेपुरतें त्याचें ऐकतही! यामुळें प्रत्येक कामकाजाचे दिवसांतून दहा रंग पालटत असत!

या सर्व गोष्टींचा परिणाम सखारामबापूच्या मनावर जसा व्हावयाचा तसाच झाला! ह्मणजे दादासाहेबांस पदच्युत करून पुनः सर्व कारभार आपल्या धोरणानें चालता करण्याची मसलत त्याच्या मनांत घोळूं लागली! सखारामबापू अप्पलपोटेपणाचा केवळ पुतळा होता अशी सार्वत्रिक समजूत आहे. पण त्याविषयीं येथें हें सांगणें न्याय्य आहे कीं, कारुण्य व वात्सल्य हे गुण त्याच्या मनांत अगदींच वसत नव्हते असें नाहीं. मरतेसमयीं माधवराव पेशव्यांनीं नारायणरावाचा हात आपल्या हातीं दिला व त्याचें रक्षण करण्याविषयीं आपलेपासून वचन घेतलें व आपणही तें दिलें. असें असतां आपल्या हातून तें वचन पार पडलें नाहीं या गोष्टीची त्याच्या जिवास फारच खंती वाटत होती. नारायणरावसाहेबांचा खून झाला त्याच्या दुसऱ्या दिवशीं तो पोरेंबाळें सारीं घरीं टाकून दुपारीं बाहेर पडला तो पर्वतीच्या आसपास एकटाच निराश मुद्रेनें भटकत असतां कोणाकोणाच्या नजरेस पडला. भला पांच चार कोस दूर गेला होता. पुनः काय वाटलें न कळे. रात्रीं

घरीं आला. नेहमीं गंभीर असणाऱ्या त्यांच्या चित्तवृत्तीचा इतक क्षोभ झाला होता! असो. हें नवीन कारस्थान रचण्याचें मनां आल्यावर तो अनुकूल व प्रतिकूल गोष्टींचा अजमास पाहूं लागला. ते आपला बेत तडीस जाईल ही त्यास आशा उत्पन्न झाली. पेशव्यांच्या दरबाराचा अनुभव त्यानें चाळीस वर्षें घेतलेला होता. कोठें कळ दाबिली ह्मणजे कोठें काय परिणाम होतो हें सारें त्यास अवगत झालें होतें. पुढील व्यूह रचण्यास त्यास मुख्य आधार ह्मटला तर गंगाबाईचें 'गरोदरपण हा होय. नारायणराव पेशवे वारले त्या दिवशीं अस्पर्श होऊन तिला बरोबर महिना झाला होता. त्यावर आणखी एक महिना जातांच आनंदीबाईस काळजी उत्पन्न झाली. प्रथम गर्भपात करण्याविषयीं खटपट करावी, तो नच होईल तर गंगाबाईस मारून टाकावें, ह्मणून ती आनंदीबाई जों जों यत्न करूं लागली तों तों दरबारी लोक गंगाबाईचा गर्भ व प्राण जतन व्हावा अशी इच्छा करूं लागले. दरबारांत सखारामबापूची व नानाफडणीसाची अशा दोन फळया असत. फडणीसाच्या फळींत त्रिंबकरावमामा, मोरोबा फडणीस, कृष्णराव काळे व नारो आपाजी हे होते व या फळीच्या लगामीं पटवर्धन, रास्ते, धायगुडे व साबाजी भोंसले हे सरदार होते. शिंदे होळकरसुद्धां बापूपेक्षां नानासच अधिक वळण्याजोगे होते. गंगाबाईचा जीव बचावावा. दादा साहेबांस पदच्युत करून तिच्या नांवाची द्वाही फिरवावी, तिला पुत्र झाला तर बरेंच झालें, नाहींतर तिच्या मांडीवर दत्तक पुत्र देऊन त्याच्या नांवें राज्यकरभार चालवावा, या गोष्टीस नानाफडणीस व त्याचे सर्व सोबती व अनुयायी आपणास अनुकूल होतील असा त्यास सुमार दिसला. नंतर तो प्रतिपक्षाकडील लोकांच्या मनाचा फारफार सावधपणें ठाव घेऊं लागला. एके दिवशीं तो पटवर्धनांचा वकील शिवाजीपंत खेसकर यास बोलला कीं, "तुमच्याशिवाय दुसरा विचार करीन तर आपल्या पुत्राची आण हें निखालस तुमच्या यजमानांस

लिहून पाठविणें. सांप्यानीं मिळून ब्राह्मण्य रक्षावें असेंच प्राप्त झालें! द्वेषेंकरून या थरास आलों. आतां सांप्यानीं एक विचारें राहिल्यानें कांहीं दिवस ब्राह्मण्य राहिलें तर राहील! "

दादासाहेबांनीं दसऱ्याच्या मुहूर्तानें स्वारीस निघावयाचा बेत केला. पेशवाईचीं वस्त्रें आपण न घेतां आपला दत्तक पुत्र अमृतराव यासच महाराजांकडून देववावीं असा त्यांचा प्रथमचा बेत होता. असा बेत होण्याचें कारण जें ते सांगत त्यावरून त्यांचा मूर्खपणा उघड होतो व तो बिचारा दुर्बल छत्रपति त्यांच्या किती अवहेलनेस पात्र झाला होता हेंही दिसून येतें! तें कारण कोणतें तर "राजा अपेशी!" माधवराव व नारायणराव यांस याच राजानें वस्त्रें दिलीं असतां त्यांस तीं फार दिवस लाभलीं नाहींत. आपण स्वतः वस्त्रें घ्यावीं तर त्याप्रमाणें आपलीही कारकीर्द लवकरच समाप्त होईल हें त्यांस भय वाटत होतें, पण त्यापेक्षां त्यांच्या अर्धांगीचें मन अधिक वद्ध होतें. पुत्र होण्याची आशा अजून तिची खुंटली नव्हती. किती झालें तरी अमृतराव हा दत्तक मुलगा. त्याला पेशवाई देऊन टाकिल्यावर मग आपणास औरस पुत्र होईल त्यानें काय करावें! असा विचार करून तिनें हट्ट धरिला कीं, वस्त्रें आपणच घेतलीं पाहिजेत. तें ह्मणणें कबूल करून दादासाहेबांनीं अमृतराव व बजाबा पुरंदरे यांस सातान्यास पाठवून आपणाकरितां त्या "अपेशी" राजाकडून पेशवाईचीं वस्त्रें आणविलीं.

पेशवाई मिळविण्याची आपली फार दिवसांची इच्छा दादासाहेबांनीं शेवटास नेली खरी, परंतु त्यांस आतां चोहोंकडून शत्रू उठल्यानें चैन पडूं देईनात. सखारामबापू आंतून फितूर मिळवीत होता तो व त्यास अनुकूळ होणार सर्व जुने मुत्सद्दी व सरदार हे अंतस्थपणें त्यांचें शत्रुत्व करीतच होते. ही झाली राज्यांतली गोष्ट. पण राज्याबाहेरसुद्धां कांहीं जुने शत्रू होते व कांहीं नवीनही होत होते. नारायणरावसाहे-

## दादासाहेब व गंगाबाई यांच्या कारकीर्दी.

यांचा खून झाल्या दिवसापासून मुंबईचे इंग्रज, आरमार व फौज सज्ज करून साष्टीवर घाला घालण्याचा लाग पहात होते. फिरंग्यांचीही तीच मसलत होती. हबशाचीही गडबड सुरू झाली होती. पण दादासाहेबांच्या दृष्टीनें हे सारे क्षुद्र शत्रु होते. ज्यांचा प्रतीकार करणें त्यांस प्राप्त झालें होतें असे शत्रु म्हटले तर साबाजी भोंसले, निजामअल्ली व हैदरअल्ली हे होत. त्यांत साबाजी हा मुधोजीचा प्रतिस्पर्धी आणि म्हणूनच त्यावर श्रीमंतांचा फार क्रोध झाला होता. त्या साबाजीस निजामअल्लीची मदत असल्यामुळें साबाजी व निजामअल्ली या दोघांवरही स्वारी करण्याचा त्यांनीं बेत ठरविला. नारायणरावसाहेबांचा खून झाल्याबरोबर आपाजीरामानें हैदरअल्लीस पत्र पाठविलें होतें कीं, पेशव्यांनीं आजपर्यंत घेतलेला आपला मुलुख पुनः काबीज करण्याची ही उत्तमोत्तम संधि आहे. याकरितां शिरें, मदगिरी, चेनरायदुर्ग, कोलार, होसकोटें, थोरलें व धाकटें बाळापूर व गुरमकोंडा हीं सर्व ठाणीं व किल्ले व त्यां भोंवतालचा मुलूख ताब्यांत घेण्याचा झटून प्रयत्न करावा. तें पत्र पोंचतांच सदर मुलखावर हैदरानें फौज रवाना केली. तिच्या उपद्रवाचे बोभाटे पुण्यास येऊं लागले. जरी हैदराचा व दादासाहेबांचा स्नेह बऱ्याच दिवसांचा होता व त्यांस कांहीं सवलती देण्याचा व त्याच्या कांहीं बारीकसारीक मागण्या कबूल करण्याचा त्यांचा बेत होता, तरी त्यानें तिकडलें सारेंच मराठी राज्य बळकाविण्याचा रोख दाखविल्यामुळें त्यांस चीड आली व त्याचें पारिपत्य करण्याचा त्यानीं बेत ठरविला. अर्काटच्या नबाबावर व अर्थात् त्याचे सोबती मद्रासकर इंग्रज यांजवर स्वारी करण्याची मसलत आज तीन वर्षे पुर्णे दरबारांत घाटत होती तीही यंदां करावी असें त्यांच्या मनांत आलें. मग असें ठरलें कीं, प्रथम साबाजी भोंसले व निजामअल्ली यांचें पारिपत्य करावें. नंतर कर्नाटकांत जाऊन हैदरास वठणीस आणावें व त्याची फौज व आपली फौज एकत्र करून अर्काटावर स्वारी करावी. याप्रमाणें बेत ठरून श्रीमंतांनीं संगमावर डेरे देवविले.

# दादासाहेब व गंगाबाई यांच्या कारकीर्दी.

श्रीमंत पुण्याहून निघून कोरेगांवास गेले तों मागें सांगितल्याप्रमाणें निवडक पांचशें स्वारांनिशीं परशुरामभाऊ मिरजेहून पुण्यास आला. त्यानें नाना फडणीस व मोरोबादादा यांची गांठ घेऊन नानाच्यान विद्यमानें श्रीमंतांची भेट जेजुरीच्या मुक्कामीं घेतली. फक्त पंचवीस लोकांनिशीं भेटीस यावें असें श्रीमंतांनीं सांगितल्यावरून तितकेच लोक बरोबर घेऊन परशुरामभाऊ भेटीस गेला होता. उभयपक्षीं खातरजमेनें बाह्यात्कारें मात्र भाषण झालें. नंतर सखारामबापूच्या डेऱ्यांतच त्यांची व भाऊची भेट होण्याचा सहजासहजीं प्रसंग आला. घटकाभर हिकडचें तिकडचें बोलणें होऊन भाऊ निरोप घेऊन गेला, तेव्हां त्याबरोबर शिवाजीपंत होता त्यास सखारामबापूनें राहून घेतलें. झाल्या गोष्टीबद्दल विलाप व ब्राह्मण्याविषयीं अभिमान या दोन सुरांवरच या मतलबी ह्यातान्यानें अलीकडे गाणें सुरू केलें होतें; तेंच त्यानें शिवाजीपंतास आणखी एकदां ऐकविलें! एकंदरींत परशुरामभाऊ पुण्याजवळ आल्यापासून सखारामबापूच्या कारस्थानास विशेष तेजी आली. गंगाबाईच्या स्थितीबद्दल परशुरामभाऊस फार वाईट वाटलें. मात्र तिची आनंदीबाईच्या पाशांतून मोकळीक करण्यास त्यानें जो उपाय एकदां मनांत आणिला होता तो मात्र धाडसाचा होता यांत संशय नाहीं! तो उपाय असा कीं गंगाबाईस शनवार वाड्यांतून काढून मिरजेस घेऊन जावें! दादासाहेबांच्या पंचवीस हजार फौजेदेखत आपल्या निवडक पांचशें स्वारांच्या बळावर तिला घेऊन पुण्यापासून मिरजेपर्यंत पल्ला मारितां येईल असें त्यास वाटत होतें! नंतर लवकरच परशुरामभाऊकडे सखारामबापूकडून स्पष्ट बोलणें सुरू झालें कीं, गंगाबाईचा बचाव करण्यासाठीं दोही पक्षांतील मुत्सद्यांनीं व सरदारांनीं एकत्र व्हावें. तिच्या नांवाची द्वाहीं फिरवावी. दादासाहेबांस पदच्युत करावें. गंगाबाईस पुत्र होईल त्याच्या नांवें किंवा पुत्र न झाल्यास तिला दत्तक पुत्र देऊन त्याच्या नांवें पेशवाई चालवावी. मग सर्व मुत्सद्दी

व सरदार यांमध्यें गुप्तरूपें निरनिराळ्या प्रसंगीं वाटाघाट होऊन बापूचा बेत सर्वांस पसंत ठरला. या मसलतीसंबंधें नाना फडणिसाचें वर्तन लक्षांत ठेवण्यासारखें आहे. बखरींतून या 'बारभाईच्या कारस्थाना' चा मुख्य चालक नाना फडणीस होता असें लिहिलेलें आहे व त्याच आधारावर आह्मींही 'नाना फडनविसाच्या चरित्रांत' तसें लिहिलें आहे. परंतु पटवर्धनांचें दप्तर चाळून पाहिल्यावर नानाविषयीं पुष्कळ गोष्टी आह्मांस नवीन कळल्या व त्यांतच या कारस्थानाबद्दलची जी माहिती मिळाली, तिजवरून बखरींतलें व आमच्या चरित्रांतलेंही लिहिणें चुकलें आहे असें कळून आलें. परशुरामभाऊ पुण्याजवळ होता तेव्हांच हें सर्व कारस्थान तयार झालें असें नाहीं. तें पक्कें ठरून सर्व जुळवाजुळव होण्यास महिना दोन महिन्यांचा अवकाश लागला. परंतु त्याचें सर्व स्वरूप आह्मीं येथें एकदांच सांगून टाकिलें आहे. नानाच्या अंगांत ही मसलत पार पाडण्याचें सामर्थ्य होतें. परंतु आपण मसलत करावी तर सखारामबापू घोंटाळा करील हें त्यास भय होतें. बापूनें स्वतः या मसलतींत पुढाकार घेतला तरीसुद्धां त्याच्या नेहमींच्या दुटप्पी वर्तनामुळें नानास त्याचा विश्वास पटेना. मोरोबा, त्रिंबकरावमामा, हरिपंत फडके, रास्ते, पटवर्धन, धायगुडे, कृष्णराव काळे, नारो आपाजी, बाबूजी नाईक हे सर्व या मसलतीस अनुकूळ झाले होते. परंतु गंगाबाईस पुण्यांतून काढून साताऱ्याच्या किल्ल्यांत नेऊन ठेवण्याचा प्रथमच विचार निघाला तेव्हां तो किल्ला नानाच्या ताब्यांत असल्यासारखाच होता. त्यामुळें त्यानें सांगितलें कीं, बाई साताऱ्यास आली ह्मणजे तिला किल्ल्यांत घेण्याचें काम मजकडे लागलें. याखेरीज जी जी मसलत करावयाची असेल तींत माझ्या तर्फेनें हरिपंत फडके कामकाज करीत जातील. मी स्वस्थ मेणवलीस बसून राहीन. पुढारीपणा नाकारण्याचा नानाचा रोंख दिसतांच पटवर्धन वगैरे सरदारांनीं जबाब केला कीं, बापूचा आह्मांला विश्वास येत नाहीं. तुह्मीं जर या

मसलतींत प्रमुखपणानें वागत नसाल तर आम्हीं कांहीं तींत पडणार नाहीं. मग असें ठरलें कीं, गंगाबाई राज्याची मालकीण, सखाराम-बापू मुख्य कारभारी व नाना फडणीस दुय्यम कारभारी व फौजेवर मुख्य सरदार त्रिंबकरावमामा याप्रमाणें व्यवस्था व्हावी. इतकें पक्कें ठरल्या-वर दादासाहेब दूर गेल्याशिवाय आपले बेत तडीस जावयाचे नाहींत हें जाणून ती संधि पहात ही मंडळी बसली.

इकडे दादासाहेब फौज जमा करीत जेजुरीहून सिद्धटेकास गेले व तेथून पेडगांवावरून निरा नरसिंगपुरास जाऊन तसेंच भीमेच्या तीरातीरानें जात जात निंबाळकराच्या जहागिरींत शिरले. सखाराम-बापू स्वारीबरोबर गेला. विसाजीपंत बिनीवाले, त्रिंबकराव मामा, रामचंद्र गणेश, आपा बळवंत, बाजीपंत अण्णा, भवानराव प्रतिनिधि, रास्ते, घायगुडे, बाबूजी नाईक, भिवराव पानशे, सुमेरसिंग, महमद इसब, चिंतो विठ्ठल, सदाशिव रामचंद्र, सखाराम हरि व दुसरे अनेक लहान मोठे सरदार आपापल्या जमावानिशीं स्वारींत हजर होते. पर-शुरामभाऊ स्वारीबरोबर होताच. वाटेंत वामनराव व रघुनाथराव नीळकंठ हेही येऊन मिळाले. श्रीमंतांचें पत्र गेल्याप्रमाणें दर्याबाई व रघोजी यांसह मुधोजी भोंसले भेटीस आला. त्याप्रसंगीं श्रीमंतांनीं रघोजीस पुनः सेनासाहेब सुभ्याचीं वस्त्रें दिलीं. नंतर दर्याबाई व रघोजी यांस नागपुरास रवाना करून पांच हजार सैन्यासह मुधोजी स्वारी-बरोबर राहिला. मराठ्यांची एकंदर फौज चाळीस हजारांवर जमली होती. शिवाय पांच हजार गारदी व दोनशें तोफा बरोबर होत्या. मोंगलांकडून वकील आले त्यांस श्रीमंतांनीं सांगितलें कीं, साबाजी भोंसले तुमच्या पाठीस पडले आहेत त्यांस तुम्हीं आमच्या स्वाधीन कराल, निदान त्यांस हांकून तरी लावाल तर तुमचें आमचें सख्य होईल, नाहींतर आम्हीं तुमचें पारिपत्य करूं. त्यावर ते वकील

बोलले कीं, साबाजीस कुमक करण्याविषयीं पूर्वी पुणें दरबारांतून वारंवार लिहून आल्यावरूनच आह्मीं त्यास सर्व प्रकारें मदत करीत आलों. आतां तुह्मीं त्यास स्वाधीन करण्याविषयीं किंवा हांकून लावण्याविषयीं सांगाल तर तें आमच्या हातून होणार नाहीं. त्याला हातीं धरून भोंसल्याच्या जहागिरींत किंवा तुमच्या राज्यांत कांहीं दंगा करावा अशी आमची इच्छा नाहीं. साबाजीसही आह्मीं तसा दंगा करूं देणार नाहीं. तो आमच्या आश्रयास स्वस्थपणें राहील. पण मुधोजीच्या आग्रहामुळें दादासाहेबांनीं हें सामोपचाराचें बोलणें मान्य केलें नाहीं. तेव्हां उभयपक्षीं लढाईची मसलत मुकरर झाली.

साबाजी भोंसले दहा हजार फौज जमा करून पैठण व आंबेड या परगण्यांत येऊन लुटालूट करूं लागला व आपण पुण्यावर स्वारी करून पुणें जाळणार असा त्यानें पुकारा केला. त्यावरून दहा हजार फौज त्रिंबकरावमामा व आनंदराव रास्ते यांबरोबर श्रीमंतांनीं देऊन त्यांस साबाजीचें पारिपत्य करण्याकरितां पाठविलें, व बाकीचें लष्कर घेऊन आपण नळदुर्गाकडे चालले. मोंगलही भागानगराहून निघाला. त्याबरोबर पंचवीस हजार स्वार, कित्येक हजार गारदी, पन्नास तोफा व दोन हजार जेजाला होत्या. शिवाय रुकनुद्दौला व इब्राहिमखान धौशा यांचीही फौज बरीच होती. मोंगलाईंतले मराठे सरदार निंबाळकर, जाधव व पांढरे वगैरे होते ते सर्व मोंगलास येऊन मिळाले. दादासाहेब नळदुर्गचा किल्ला सर करून आवसें परगण्यांतून भालकीस आले. मोंगल बेदराकडे येत असल्याचें ऐकून धायगुडे, पटवर्धन व बाबूजी नाईक दहा कोसांवर आघाडीस होते, ते श्रीमंतांच्या हुकुमावरून बेदरास गेले व तों त्याच दिवशीं मोंगल तेथें आला. दुसरे दिवशीं दादासाहेब सर्व लष्कर घेऊन येऊन पोंचले. तेव्हां त्यांशीं लढाई करण्याचें टाकून मोंगल बेदरच्या किल्ल्याच्या आसऱ्यास तळ देऊन राहिला. तेव्हां श्रीमंतांनीं

## दादासाहेब व गंगाबाई यांच्या कारकीर्दी.

तोफा त्याच्या लष्करावर नेऊन लाविल्या व तिकडूनही उलट तोफांचा मारा होऊं लागला. पटवर्धन वगैरे सरदारांनीं बेदराच्या आसपास पंधरा कोसपर्यंत शेतें, बागा, उंसाचे फड व गवतसुद्धां जाळून टाकिले व मोंगलाची कही बंद करून त्याच्या दाणावैरणीचा दुष्काळ पाडिला. तेव्हां निरुपाय होऊन मोगलानें तहाचें बोलणें लाविलें. रुकनुद्दौला दिवाण यास तह ठरविण्याकरितां पाठवावें, निजामअल्लीनें स्वतः भेटीस यावें, साबाजी भोंसल्यास आश्रय देऊं नये, माधवराव पेशव्यांनीं पूर्वी वीस लक्षांची जहागीर दिली आहे ती माघारी द्यावी, शिवाय औरंगाबाद द्यावी, हे दादासाहेबांचे मुद्दे होते, ते निजामअल्लीनें सर्व कबूल केले. मोंगलांकडून ही नवीन मिळालेली जहागीर पूर्वींपासूनच्या शिरस्त्याप्रमाणें दादासाहेबानीं कांहीं सरकारांत ठेवून बाकीची सरदारांस वांटून दिली असती, तर त्यांच्याविषयीं लोकांचा अनुकूल ग्रह होऊन त्यांच्या पक्षास बळकटी आली असती. पण त्यांनीं तिची जी विल्हेवाट लाविली ती दरबारांत व फौजेंत त्यांजविषयीं अधिकच असंतोष उत्पन्न करण्यास कारणीभूत झाली. तो प्रकार असा—

तह ठरल्यावर निजामअल्ली भेटीस आला तेव्हां श्रीमंतानीं त्याचा उत्तम प्रकारें आदरसत्कार केला. त्याचें भोजन झाल्यावर श्रीमंतांचें व त्याचें एकांतीं चार घटका भाषण झालें. त्या ठिकाणीं रुकनुद्दौला व कृष्णराव बल्लाळ मात्र हजर होते. निजामअल्ली दादासाहेबांचा स्वभाव पुरता ओळखून होता. त्यानें त्याशीं बोलतांना बहुतच लीनतेचें सोंग आणिलें. त्यांच्या पराक्रमाची फारच तारीफ केली. तुमच्यासारख्या महावीरानें आपला पराजय केला यांत आपणास दूषण नसून उलट भूषण आहे असें बोलून दाखविलें. नंतर तो ह्मणाला कीं, पूर्वी तुह्मांवर प्रसंग आला होता त्यावेळीं मीं तुमच्या कसा उपयोगीं पडलों हें ध्यानांत असेलच. तुमची व माझी मैत्री अकृत्रिम असून ती फार

दिवसांची आहे. मी सर्वस्वी तुमचा आहें व माझी दौलत राज्य काय आहे तें सारें तुमचेंच आहे! इतकें बोलून त्यानें आपलें शिक्का-मोर्तब श्रीमंतांपुढें ठेविलें आणि सांगितलें कीं तुह्मांस पाहिजे तितक्या मुलखाच्या सनदा लिहून घ्या. हें शिक्कामोर्तब तुमच्या हवालीं केलें आहे. याप्रमाणें या मायावी निजामअल्लीनें हरभऱ्याच्या झाडावर चढवितांच दादासाहेब 'भोळासांब' प्रसन्न झाला व त्यानें नवीन मिळालेली सर्व जहागीर औरंगाबादसुद्धां मोंगलास परत दिली! त्यांत शर्त एवढीच ठेविली कीं, 'मोठेंसें' काम पडेल तेव्हां मोंगलानें आपली कुमक करावी! तें त्यानें कबूल केलें. अमृतरावास पांच लक्षांची जहागीर द्यावी असें दादासाहेबांचें ह्मणणें होतें, परंतु निजामअल्लीनें टाळाटाळीचें उत्तर दिलें कीं, यंदां माझा सारा बेदरप्रांत तुमची स्वारी झाल्यामुळें बेचिराख झाला आहे. यंदां कांहीं हें काम होत नाहीं. पुढच्या वर्षीं पाहूं! याप्रमाणें खलबत आटपल्यावर मोंगलानें निरोप मागितला, तेव्हां श्रीमंतानीं त्यास वस्त्रें, हत्ती, घोडे, शिरपेंच, तुरा व मोत्याची माळ वगैरे देऊन बिदा केलें. तो याप्रमाणें ही एका दिवसाची मोहीम फत्ते करून आपल्या गोटास गेला!

मोंगलाचा व श्रीमंतांचा तह झालेला ऐकतांच साबाजी भोंसल्यानें त्रिंबकराव मामा व रास्ते यांशीं तहाचा संदर्भ लाविला. परंतु दादा-साहेबांनीं साबाजीचें पारिपत्यच करावें, तह करूं नये, असा त्या दोघां सरदारांस हुकूम पाठवून त्यांच्या कुमकेकरितां आणखी थोडी फौज रवाना केली. भोंसल्यावरची मोहीम संपल्यावर गोविंदराव गाइकवाड, मुधोजी भोंसले व बाबूजी नाईक यांस परत जाण्यास निरोप देऊन, श्रीमंत गदवाल व सुरापूर या संस्थानिकांपासून खंडणी घेऊन निवृत्तिसंगमावर कृष्णा उतरून रायदुर्गच्या रोखें चालले. यापूर्वीं हैदराकडून वकील आपाजीराम येऊन तहाचीं कलमें ठरवून

गेला होता. अर्काटावर स्वारी करावयाचें श्रीमंतांच्या मनांत होतें व हैदराची फौज या स्वारीस कुमकेकरितां नेण्याचा त्यांचा बेत होता. शिवाय त्यांस पैक्याची जरूर फार पडली होती. सबब माधवराव पेशव्यांनीं मोठ्या प्रयासानें जिंकिलेल्या तिकडील राज्यापैकीं तीन परगणे त्यांनीं हैदरापासून थोडीशी रक्कम घेऊन त्यास विकून टाकिले! हैदरास आशा उत्पन्न झाली कीं, आतां बाकींचे प्रांतसुद्धां युक्तियुक्तीनें आपणास मिळवितां येतील!

लष्कर पेडगांवच्या मुक्कामीं असतांच सखारामबापू अजारीपणाचा बहाणा करून दादासाहेबांचा निरोप घेऊन आला होता. नाना व मोरोबा फडणीस व हरिपंत फडके कांहीं कांहीं निमित्तानें लष्कर सोडून पुण्यास आले होते. लष्कर कृष्णा उतरून कर्नाटकांत जाई-पर्यंत सखारामबापू सिद्धटेकास होता. नंतर तो सासवडास गेला. व तेथून पुण्यास आला. तो येतांच पूर्वीं ठरलेली मसलत अमलांत आणण्याची सुरुवात झाली. नारो आपाजी तुळशीबागवाले यानें पुण्याच्या कोतवालाच्या मुसक्या बांधून शहर ताब्यांत घेतलें व गंगाबाई व पार्वतीबाई यांस शनवार वाड्यांतून काढून पुरंदरच्या किल्ल्यावर नेऊन ठेविलें. लष्करांत लोक होते त्यांनीं परत यावें म्हणून त्यांच्या घरीं चौक्या बसविल्या, आणि दादासाहेबांच्या पक्षाचे जितके लोक होते त्यांची मालमत्ता जप्त करून बायकामुलें कैदेंत टाकिलीं. सखारामबापू व नाना फडणीस यांनीं सातारच्या महाराजां-कडून दादासाहेबांस पदच्युत करवून पेशवाईचीं वस्त्रें गंगाबाईच्या नांवें व कारभाराचीं वस्त्रें आपल्या उभयतांच्या नांवें आणविलीं. दादासाहे-बांच्या तर्फेच्या लोकांची जिनगी जप्त करून त्यांस व त्यांच्या बायका-मुलांस कैद करण्याविषयीं त्यांनीं प्रांतोप्रांतींच्या मामलेदारांस पत्रें पाठविलीं व शिंदे, होळकर, फत्तेसिंग गायकवाड यांस आपण काय काय केलें आहे हें

## दादासाहेब व गंगाबाई यांच्या कारकीर्दी.

कळविण्यासाठीं पत्रें व कारकून पाठविले. रुकनुद्दौलाचा माधवराव पेशव्यांशीं स्नेह होता. त्याच्याच द्वारें बापू व नाना यांनीं निजामअलीस कांहीं जहागीर देऊन अनुकूल करून घेतलें. प्रथमपासून साबाजी भोंसले त्यांच्याच पक्षाचा होता. रघोजीची दादासाहेबांनीं सेनासाहेबसुभ्याच्या पदावर नुकतीच स्थापना केली होती, तें पद त्यांनीं आतां त्याजकडून काढून साबाजीस दिलें. साबाजी व तिंबकरामामा व रास्ते हे सारे आतां एक झाले. वीस हजारपर्यंत त्यांजवळ फौज होती. शिवाय आणखी फौज हरिपंत फडके पुण्यास चाकरीस ठेवीतच होता.

या बातम्या दादासाहेबांस कळतांच त्यांनीं कर्नाटकची मोहीम सोडून स्वदेशाकडे येण्याकरितां कूच केलें. त्यांच्या लष्करांत कृष्णराव काळे होता त्यानें फितूर खेळवून चोंहोंकडे पोंखरून ठेविलें होतें, त्याची त्यांस आजपर्यंत दादच नव्हती! तुमच्या लष्करांत फितूर झाला आहे, तुह्मीं फार फार सावधपणानें वागावें, असा निरोप त्यांस हैदरअल्लीकडून आला होता व त्यांसही तें आतां दिसतच होतें. परंतु ते अगदीं भांबावून गेले होते. पुढें काय करावें हें त्यांस सुचेना. भवानराव प्रतिनिधीबद्दल त्यांस फार संशय आला. त्यांच्याच सांगण्यावरून त्यानें या मोहिमेकरितां दोनतीन हजार फौज चाकरीस ठेविली होती. हयग्रीवेच्या तीरीं रायदुर्ग तालुक्यांत कनेकल ह्मणून गांव आहे तेथें लष्करचा तळ पडला असतां, श्रीमंतांनीं भवानरावास हुकूम केला कीं, तुह्मीं आतांच्या आतां आपल्या फौजेस निरोप द्यावा. तसें करणें धोक्याचें असल्यामुळें भवानरावानें तें अर्थात्च नाकबूल केलें. तेव्हां श्रीमंतांस क्रोध येऊन त्यांनीं मुरारराव घोरपड्यास प्रतिनिधींवर हल्ला करून त्याचा गोट लुटण्यास हुकूम केला. मुराररावानें उत्तर केलें कीं, आमच्या राष्ट्राचा कोण शत्रु असेल तर त्याचें पारिपत्य मी हौसेनें करीन. पण

हा घरगुती खटला, यांत आपण पडणार नाहीं. इतर सरदारांस हा हुकूम होतांच त्यांनींही याचप्रमाणें जबाब दिला. आज जी प्रतिनिधीची तीच उद्यां आमची गत हें त्यांस ठाऊक होतें व त्यांचा इरादा होता कीं, "साऱ्यांनीं एकत्र होऊन मुख्यांस विश्वरूप दाखवावें!" आपलें कोणीच ऐकत नाहींसें पाहून श्रीमंतांनीं तीन चार हुजरात व गारदी प्रतिनिधीच्या गोटाभोंवतें जागोजाग उभे केले. पांच सहा दिवस लष्करांत हमामा चालला होता. समेट करण्यासाठीं श्रीमंतांनीं मध्यस्थही पाठविले होते. परंतु कांहीं केल्या प्रतिनिधी वठणीस येईना. शेवटीं एके रात्रीं त्यांनीं प्रतिनिधीचा गोट लुटण्यासाठीं व त्यास कैद करण्यासाठीं हुजरातीस हुकूम केला, आणि या कामावर आपले गारदीही पाठविले. परंतु प्रतिनिधीच्या स्वारांनीं शपथ वाहिली कीं, आम्ही मरून जाऊं पण आमच्या धन्याच्या केंसासही धक्का लागूं देणार नाहीं! अशा शूर लोकांचा धनीही पराक्रमीच होता. त्यानें प्रतिज्ञा केली कीं प्राण गेला तरी बेहत्तर, पण पंतप्रधानांस शरण जाणार नाहीं! आपल्या बायकोससुद्धां त्यानें आपल्या पुढें घोड्यावर बांधून घेतलें होतें. बेत हा कीं, तशीच वेळ आल्यास हिला आधीं मारून नंतर आपणही मरून जावें! इतका अति प्रसंग करण्यास श्रीमंतांची हुजरात तयार नव्हती! ती हल्ला करण्यास पुढें सरसावेना. गारदीही दुरून दुरून गोळ्या घालीत. पण जवळ येण्याची त्यांची छाती झाली नाहीं. आवशीच्या प्रहर रात्रीपासून पहांटेच्या चार घटका रात्रीपर्यंत दोन्ही बाजू तटून राहिल्यावर श्रीमंतांनीं हुजरात व गारदी परत नेले व भवानरावास मध्यस्थांचे मार्फत सांगून पाठविलें कीं तुम्हांस अभय आहे. फौजेस निरोप देण्याबद्दल आमची तुम्हावर सक्ती नाहीं. तुम्हीं स्वस्थ आपल्या गोटामध्यें रहावें. वेळ मारून नेण्यासाठीं ते याप्रमाणें बोलले खरें, परंतु प्रतिनिधीबद्दल त्यांच्या मनांतला दंश तसाच राहिला तो राहिला. असो. तूर्त तरी हा तंटा मिटला.

## दादासाहेब व गंगाबाई यांच्या कारकीर्दी.

श्रीमंतांच्या लष्करापासून दोन कोसांवर पाण्याच्या सोईसाठीं ह्मणून पटवर्धन उतरले होते. श्रीमंतांनीं हुजरातेस प्रतिनिधीच्या गोटावर हल्ला करण्याचा हुकूम केला असें वर्तमान येतांच त्यांनीं घाईघाईनें त्याच रात्रीं आपलें बुणगें लक्ष्मेश्वराकडे लावून दिलें व आपण सर्व फौजेसह कूच करून श्रीमंतांच्या लष्करांत अरुणोदयाच्या सुमारें आले. येतांच त्यांनीं प्रतिनिधीचा गोट पिछाडीस ठेवून खुद्द श्रीमंतांचा गोट जेथें होता त्याच्या अघाडीस लढाईच्या तयारीनें फौज उभी केली. धोक्याचें काम नेहमीं परशुरामभाऊच्या वांटणीस यावयाचें. त्याप्रमाणें तो आजही श्रीमंतांच्या गोटाच्या अगदीं तोंडावर बाराशें स्वारानिशीं येऊन उभा राहिला होता. याप्रमाणें फौज आणून उभी केल्यावर वामनरावास वर्तमान कळलें कीं, श्रीमंतांनीं भवानरावाशीं नुकताच समेट करून घेतला. हें कळल्यावर भवानरावाच्या कुमकेस येऊन आपण तोंडघशीं पडल्यासारखें झालें असें त्यास वाटूं लागलें. कारण कीं येथें रहावें तर भवानराव सोबतीस होता तोही आतां स्वस्थ बसणार. मागें जावें तर तीही पंचाईतच! कारण कीं इतका वैरभाव दाखविल्यानंतर आतां या लष्करांत न राहतां नेहमीं निराळें फुटून सावधपणानेंच राहिलें पाहिजे! पटवर्धनांची फौज एकदम येऊन पुढें उभी राहिलेली पाहून दादासाहेब भांबावून गेले. आज यांशीं लढाईचा प्रसंग आला तर कोणकोण सरदार या बंडखोरास मिळतात न कळे असें त्यांस भय पडलें. त्यांनीं वामनरावास विचारावयास पाठविलें कीं, तुह्मीं कां आलां? त्यावर त्यानें सांगून पाठविलें कीं, "श्रीमंतांची फौज तयार झाल्याची बातमी आमच्या कारकूनानें लिहून पाठविली त्यावरून आह्मीही तयार होऊन आलों. प्रतिनिधींची समजूत झाली हें चांगलेंच झालें. आतां सरकारची जशी आज्ञा होईल तसें करूं!" या तीन वाक्यांपैकीं शेवटचें तर केवळ दरबारी आहे. त्यांत सत्याचा अंश नाहीं. पहिलीं दोन हीं इतकीं मुग्ध आहेत कीं, त्यांचा करावा तसा अर्थ

होईल! श्रीमंतांनीं हा निरोप ऐकून सांगून पाठविलें कीं, तुह्मीं आमच्या गोटाच्या पिछाडीस अथवा ज्या बाजूस नेहमीं उतरतां, त्या बाजूस (ह्मणजे डाव्या बाजूस) जाऊन उतरा. हा हुकूम झाला तरी पटवर्धनांची फौज प्रहर दहा घटका दिवस येईपर्यंत तेथेंच उभी होती. श्रीमंतांकडून वारंवार निरोप येत कीं "अजून कां जात नाहीं? लवकर चला." शेवटीं ही फौज श्रीमंतांच्या गोटाच्या अघाडीस होती तेथून निघून लष्करच्या पिछाडीस डावे बाजूनें दीड कोसावर जाऊन उतरली. तथापि तिजमधल्या लोकांस श्रीमंतांचा विश्वास नसल्यामुळें ते घोड्यावर जिनें ठेवून तसेच सायंकाळपर्यंत उभे होते. सायंकाळीं चिंतो विठ्ठल व बजाबा पुरंदरे मध्यस्तीस आले व आठ दिवसपर्यंत श्रीमंतांकडून तुमच्या अब्रूस धक्का पोंचणार नाहीं याबद्दल आह्मीं जामीन आहों असें त्यांनीं सांगितलें. याप्रमाणें इमान प्रमाण झाल्यावर फौजेनें घोड्यांवरचीं जिनें उतरलीं. त्या दिवशीं सारे लोक उपाशीं होते. दोन घटका रात्रीस जेवणें झालीं. प्रहर रात्रीस श्रीमंतांकडून पुरुषोत्तमराव पटवर्धनांस बोलावणें आल्यावरून ते भेटीस गेले, व मुराराव घोरपड्यानें मध्यें पडून कित्तूरच्या खंडणीचा वसूल करण्याकरितां ह्मणून श्रीमंतांकडून पटवर्धनांस तिकडे जाण्यास निरोप देवविला. मग ते दुसरे दिवशीं कूच करून स्वदेशीं यावयास निघाले. विसाजीपंत बिनीवाले आधींच आले होते. पटवर्धन लष्कर मोडून आल्यावर मागून नरसिंगराव धायगुडेही निघून आले.

कारभारी मंडळीनें खूळ मानवून आपणास पदच्युत केलेसें पाहून दादासाहेबांनीं कल्याणदुर्ग येथें हैदराशीं नवीन तह केला. हैदरावर माधवराव पेशव्यांनीं तीन स्वाऱ्या करून तिकडे जितकें राज्य संपादिलें होतें, तितकें सर्व आतां दादासाहेबांनीं या तहानें हैदरास देऊन टाकिलें! तें राज्य मिळविण्यास माधवरावांस किती आयास पडले,

## दादासाहेब व गंगाबाई यांच्या कारकीर्दी.

काय पराक्रम करावे लागले, कशा मसलती योजाव्या लागल्या हें सारें ऐतिहासिकलेखसंग्रहाच्या वाचकांस माहीतच आहे! दादासाहेब इतकेंच करून राहिले नाहींत, तर त्यांनीं जुन्या राज्यापैकीं, कृष्णा व तुंगभद्रा या नद्यांमधला सर्व मुलूखही हैदरास दिला! या देणगीबद्दल हैदरानें कबूल केलें कीं, दादासाहेब मात्र खरे पेशवे आहेत, कारभाऱ्यांनीं केलें आहे तें सारें थोतांड आहे असें समजेन, या पेशव्यांनीं मला जो हा एवढा मुलूख दिला आहे त्याबद्दल त्यांस मात्र सहा लक्ष रुपये खंडणी देईन, वेळोवेळीं त्यांस फौजेची कुमक करीन व त्यांशीं कायमचा स्नेह राखीन. याप्रमाणें त्यानें दादासाहेबांशीं वागण्याच्या ज्या या शर्ती कबूल केल्या त्या पुढें अगदीं अक्षरशः पाळिल्या, ही त्यासंबंधें तारीफ करण्यासारखी गोष्ट आहे. कृष्णा व तुंगभद्रा या नद्यांमध्यें जो मुलूख होता तो रास्त, पटवर्धन, नरगुंदकर भावे, गजेंद्रगडचे घोरपडे यांस जहागीर दिलेला होता व सावनूरच्या नबाबाचें राज्यही याच टापूमध्यें होतें. या सर्व मुलखाचा या नवीन तहाप्रमाणें हैदरअली मालक झाला. रास्ते, पटवर्धन वगैरे जहागीरदार दादासाहेबांच्या प्रतिपक्षास मिळाले असल्यामुळें त्यांवर त्यांस सूड उगवावयाचा होता तो त्यांनीं त्या जहागीरदारांची व या म्हैसूरच्या खवीसाची गांठ घालून देऊन उगवून घेतला! यामुळें कर्नाटकांत मराठ्यांचीं हैदराशीं व टिपूशीं जीं इतकीं रणें माजलीं त्याला कारण हा कल्याणदुर्गचा तह होय.

दादासाहेब परत फिरले ते फाल्गुनाच्या प्रारंभीं कपाटसंगमावर कृष्णा उतरावयास आले. तेथून त्यांनीं मुरारराव घोरपड्यास गुत्तीस परत जाण्यास निरोप दिला व कारभाऱ्यांशीं समेटाचें बोलणें करण्याकरितां गोपाळ नाईक तांबवेकर व भिवराव पानशे यांची रवानगी केली. कृष्णा उतरल्यापासून श्रीमंतांनीं रास्ते व पटवर्धन यांच्या

## दादासाहेब व गंगाबाई यांच्या कारकीर्दी.

जहागिरींचा सत्यानाश करण्याचा व फितुरी लोकांचें पारिपत्य करण्याचा संकल्प केला. फौजचंद फितुरी सरदार पटवर्धन वगैरे आपापल्या फौजानिशीं लष्करांतून निघून गेल्यावर त्या लष्करावर त्यांचा वचक बसत चालला. संधि साधून त्यांनीं भवानरावावर जबरदस्ती करून त्याजकडूनच त्याच्या फौजेस निरोप देवविला आणि त्यास व रामचंद्र गणेश यास नजरकैदेंत ठेविलें. विसाजीपंत बिनीवाले यांच्या मुलाचे हालहाल करून त्यांनीं दीड लाख रुपये त्यापासून घेतले व त्यासही कैदेंत ठेविलें. कांहीं फितुरी सरदार निघून गेले, कांहींस श्रीमंतांनीं युक्तीनें किंवा सक्तीनें घालवून दिलें व कांहींचीं वर लिहिल्याप्रमाणें पारिपत्यें केलीं, तेव्हां फितूर मोडला जाऊन शिलक राहिलेल्या फौजेचा श्रीमंतांस भरंवसा आला व त्यांचें मन जरा स्वस्थ झालें. नंतर ते रास्त्यांच्या जहागिरींत शिरले. त्यांनीं मोठमोठीं ठाणीं होतीं त्यांच्या वाटेस न जातां तालीकोट व बागलकोट या परगण्यांतला उघडा मुलूख होता तितका जाळून लुटून ओस पाडिला. बागलकोटास मोर्चे लावावयाचा त्यांचा बेत होता. पण इतक्यांत त्रिंबकरावमामा, साबाजी भोसले व रुकनुद्दौला हे एकत्र होऊन पन्नास हजार फौजेनिशीं त्यांवर चालून आले, दोन्ही फौजांच्या अघाडीची गांठ पडून थोडी झटपट झाली, तेव्हां बागलकोट घेण्याचा नाद सोडून गलगलें, तेरदाळ, जमखिंडी वगैरे पटवर्धनी जहागिरींत त्यांनीं आपलें लष्कर पसरिलें व या जहागिरीचीही रास्त्यांच्या जहागिरीप्रमाणेंच दशा केली. ते मिरजेस वेढा घालणार ही बातमी पसरली होती. त्यामुळें वामनराव पटवर्धन कर्नाटकांतून लांब लांब मजली करीत कंपली व हणमसागर या गांवांवरून बागलकोटास आला. मामा व पटवर्धन एकत्र मिळाले. हरिपंत फडकेही पुण्याहून साताऱ्यास तीन चार हजार फौजेसह आला होता तो तेथून निघून मामास येऊन मिळाला. मामा, फडके, रास्ते व पटवर्धन मिळून वीस हजारांवर फौजेचा जमाव झाला तेव्हां

ती फौज भोंसले व मोंगल यापासून निराळी होऊन दादासाहेबांचा निकरानें पाठलाग करूं लागली. तें पहातांच दादासाहेब मिरजेचा रोख सोडून शूर्पालावरून विजापुराकडे गेले व तेथें ठाणें घालून सांगोल्यावरून पंढरपुराकडे गेले. त्यांच्या पाठीवर मामाची फौज होतीच. शिवाय साबाजी भोंसले व रुकनुद्दौला ईशान्येकडून आणि खासा निजामअली पूर्वेकडून त्यांवर चालून येत होते. दादासाहेब पंढरपुराहून पुढें जाणार अशी बातमी होती. पण मामाची फौज सांगोल्याच्या पुढें कासेगांवच्या सुमारें आलेली ऐकून श्रीमंतांनीं पुढें कूच करणें तहकूब करून मामाच्या फौजेशीं लढाई देण्याचा निश्चय केला व त्याप्रमाणें ते सिद्ध होऊन लढाईस आले. मामाची फौज त्या दिवशीं अठरा कोसांची मजल करून आली असल्यामुळें कांहींशी थकली होती. तिनें लढाईचा प्रसंग टाळिला असता तर बरें झालें असतें. परंतु दादासाहेब एकदम चालून आले तेव्हां मामाही कासेगांवच्या माळावर लढाईस उभा राहिला. दादासाहेबांनीं तीन टोळ्या केल्या होत्या. मध्यभागीं अघाडीस गारदी व तोफा ठेवून व त्या मागें आपण स्वतः उभे राहिले व हुजरात दोन टोळ्यांनीं दोहीं बाजूंस उभी केली. मामानेंही तीन टोळ्या केल्या. उजवे बाजूस नारो शंकर, विंचूरकर व रास्ते यांचीं पथकें, डावे बाजूस पटवर्धन व मध्यें हुजरातेसह स्वतः आपण, याप्रमाणें उभे राहिले. तिकडील फौजेनें प्रथम पटवर्धनांवर हल्ला केला तो त्यांनीं मागें सारिला. पुनः हल्ला आला तोही हटविला. नंतर ती फौज पटवर्धनांस सोडून मामाच्या हुजरातीवर येऊन तुटून पडली तेव्हां मोठी मारामारी होऊन मामाच्या हुजरातेनें पळ काढिला. त्यांबरोबर विंचूरकर वगैरे पथकेंही पळालीं. पटवर्धनांपैकीं परशुरामभाऊनें शें दीडशें स्वारांनिशीं दादासाहेबांच्या गारद्यांवर निकरानें हल्ला केला व महमद इसब यास मारण्याची फार खटपट केली, परंतु त्या गारद्याच्या अंगांत चिलखत असल्यामुळें वार लागू पडले नाहींत. बाकीची फौज

## दादासाहेब व गंगाबाई यांच्या कारकीर्दी.

पळून गेलेसें पाहून वामनराव पटवर्धन आपल्या फौजेसह व्यवस्थेनें मागें हटत गेला ह्मणून त्याचें फारसें नुकसान झालें नाहीं. परशुराम-भाऊ शत्रूच्या गारद्यांत सांपडला होता तो पंधरा वीस स्वारांनिशी पळून गेला. मामाच्या हुजरातेचा अगदीं मोड झाल्यामुळें दादासाहेबांच्या फौजेची तिजवरच सारी मिठी पडली. ती मिठी सोडवीत त्रिंबकराव मामा निघून जात होता. त्याच्या तोंडावर वार लागला होता, त्यामुळें तो लढाईच्या जाग्यापासून अर्ध्या कोसावर घोड्यावरून पडला. त्यास घेऊन दादासाहेबांची फौज परत गेली. दुसरे दिवशीं तो मृत्यु पावला.

त्या दिवशीं सायंकाळीं साबाजी भोंसल्याचा मुक्काम कासेगांवापासून पांच चार कोसांच्या अंतरावर झाला होता. तेथें या लढाईंत पराजित झालेले पटवर्धन, रास्ते व दुसरे सरदार जाऊन उतरले. मामाच्या पराजयानें साबाजीची हिंमत खचली नाहीं. तो ह्मणाला कीं, "श्रीमंतांचे मागें जिवावर उदार होऊन कार्यास प्रवर्तलों. ते मामा नाहीं ह्मणून चुकलों असा प्रकार काय आहे! आज नबाब आले ह्मणजे उदईक सारा जमाव जमून चढाई करून जातों." त्रिंबकराव मामाचा मोड होऊन तो मृत्यु पावल्याची बातमी पुरंदरास कळतांच हरिपंत फडक्यास कारभाऱ्यांनीं मामाच्या जागीं नेमिलें व पटवर्धन वगैरे सरदारांस हिंमतीचीं पत्रें लिहिलीं. हरिपंतानें मेहनत करून फौजेची पुनः जुळवाजुळव केली. तो व साबाजी भोंसले व स्वतः निजामअली मिळून पुनः पन्नास साठ हजार सैन्य दादासाहेबांच्या पाठीस लागलें, तेव्हां ते पंढरपुरांतून निघून टोंक्यास गेले. तेथून औरंगाबादेवरून बऱ्हाणपुराकडे सावकाशपणें खंडण्या घेत व लुटालूट करीत गेले. हरिपंताच्या कह्यांत अंशी फौज पटवर्धन, रास्ते व इतर सरदार यांची व कांहीं हुजरात मिळून सारी तीस हजारपर्यंत होती. तेवढीच घेऊन दादासाहेबांचा झपाट्यानें पाठलाग करावा तर त्रिंबकराव मामासारखी आपलीही एखादे वेळीं दशा होईल हें त्यास भय होतें. याकरितां साबाजी भोंसले

## दादासाहेब व गंगाबाई यांच्या कारकीर्दी.

व निजामअली यांस बरोबर घेऊनच दादासाहेबांचा पाठलाग कर त्यास प्राप्त होतें. पण साबाजीचा व त्याची भावजय दर्याबाई यां तंटा लागला तो मिटविण्यांत त्याचे कांहीं दिवस गेले. निजामअली फौज आधींच अव्यवस्थित व आळशी, त्यांतून पुणें दरबाराकडून आणर कांहीं जहागीर उपटण्याचा त्याचा बेत असल्यामुळें ही मोहीम लवक संपवावी असें त्याच्या मनांत नव्हतेंच. यामुळें तो हळूहळू चाले कांहीं तरी निमित्त काढून मध्येंच मुक्काम करी!

माधवराव पेशव्यांच्या वेळीं आपण दिवाणगिरी करीत होतों, हा सखारामबापू व नानाच सर्व कारभार करितात, आपणास कोणीच पुम नाहीं, या गोष्टी मनांत येऊन मोरोबादादास वैषम्य वाटलें व बापू नाना यांवर रुसून तो जुनरास गेला. तेथें नानानें जाऊन त्या समजूत काढिली व त्यास कारभारांत घेतलें. तथापि त्यावर कोणाचा विश्वास नसल्यामुळें सर्व कामें बापू व नाना यांच्याच हातें चाल होतीं. त्यामुळें मोरोबाचा रुसवा कायम राहिला व तो कांहीं फित करण्याची संधि पहात बसला! बापूजी नाईकही बखेडेखोर असल्यामु त्याजवर पुणें दरबारचा भरंवसा नव्हता. आणखीही कोणी आंत आंतून फितुरी होतेच. हें सर्व फितुरीमंडळ आतां मोरोबादादाच मताप्रमाणें वागूं लागलें.

याप्रमाणें स्थिति असतां मराठी राज्यांतले कित्येक एकनिष्ठ मुत्स व सरदार व लक्षावधि रयत ज्या गोष्टीची इच्छा करीत होते घडून आली. ता० १८ एप्रिल स. १७७४ रोजीं गंगाब पुरंदरच्या किल्ल्यांत प्रसूत होऊन पुत्र झाला. त्यावेळीं पुण्यांती लोकांचा आनंद काय विचारावयाचा आहे! हा पुत्रोत्सव मोठ्या थाट झाला. पूर्वसंकेताप्रमाणें या मुलाचें नांव माधवराव असें ठेवण्यांत आ यासच पुढें सवाई माधवराव ऊर्फ सवाई रावसाहेब ह्मणूं लागले.

## दादासाहेब व गंगाबाई यांच्या कारकीर्दी.

ही बातमी दादासाहेबांस कळली तेव्हां पेशवाई पुनः मिळण्याची त्यांची आशा खुंटली! त्यांनीं बाबूजी नाईकामार्फत बोलणें लाविलें कीं, आपला वडीलपणा कारभाऱ्यांनीं कबूल करावा. आपण कारभारांत बोलणार नाहीं. स्वस्थ पुण्यांत राहूं. तसें होत नसल्यास आपली पूर्वीची जहागीर द्यावी. स्वस्थ स्नानसंध्या करून राहूं. तें बोलणें कारभाऱ्यांनीं मान्य केलें नाहीं. पुनः थोरल्या श्रीमंतांकडून चिंतो विठ्ठल व त्रिंबकजी केशव समेट करण्याकरितां आले. आपली मसलत तडीस गेल्यामुळें कारभाऱ्यांस बराच धीर आला होता. त्यांनीं सांगितलें कीं, फक्त दानधर्माकरितां दोन लक्ष रुपये सालीना घेऊन श्रीमंतांनीं आनंदवल्लीस रहावें. तें होत नसेल तर अंगांत दम असेपर्यंत भटकावें. पुढें व्हावयाचें तें होतच आहे!

दादासाहेबांच्या अंगांत भटकण्याचा दम अजून पुष्कळ आहे व अजून त्यांच्याद्वारें राज्यावर पुष्कळ अरिष्टें यावयाचीं आहेत हें नाना फडणीस व सखारामबापू यांस कळलें नाहीं! पाठीवर फडके, भोंसले व मोंगल आलेसे पाहून दादासाहेब नर्मदा उतरून शिंदे होळकरांच्या आश्रयास गेले, तों पावसाळा आल्यामुळें पाठलाग करणारी फौज बऱ्हाणपुरास छावणी देऊन राहिली.

---